॥ श्रीगुरुः शरणम् ॥

॥ ॐ श्रीमद् अनुपमूर्तये श्रीदत्तवासुदेवाय नमः ॥

# ❋ श्रीटेंबेस्वामीमहाराज ❋

श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानन्दसरस्वती

टेंबेस्वामीमहाराज यांचे चरित्र

( [illegible] ग्रंथ - पुष्पाङ्क १ )

खंड दुसरा



-: लेखक :-

द. सा. मांजरेकर

॥श्रीगुरुः शरणम्॥

सौ. मंदाकिनीताई मराठे यांना
सप्रेम भेट
केशव रामचंद्र जोशी

दि. ७।५।१९८८

बाहेर नेत्र लावून।
जे पाहसी तेंचि स्वप्न।
व्यर्थ तयासी गुंतून।
आयुष्य खर्चुनि मरूं नको॥

॥श्रीथोरले स्वामी महाराज॥

दर्शन झाले व अनेक सज्जनांचा समागम झाला.

हिमालयात अशी सत्संगती प्राप्त झाली; तरी सद्‌गुरूंची भेट न झाल्यामुळे त्यांनी हृषीकेशवरून श्रीसद्‌गुरुनाथमहाराजांना असे पत्र लिहिले की, " मी इकडे हिमालयात आल्यावर अनेक साधुसंतांचे दर्शन घेतले; परन्तु कोणाकडूनही माझे समाधान झाले नाही. त्यामुळे माझी तळमळ खूपच वाढली असून मी अत्यन्त अस्वस्थही झालो आहे. श्रीसंतनामदेवमहाराजांनी पुढील अभंगात व्यक्त केल्याप्रमाणेच माझी अवस्था झाली आहे असे समजून माझ्यावर आपण दयार्द्र अंतःकरणाने कृपा करावी.

तूं माझी माउली मी वो तुझा पान्हा ।
पाजीं प्रेम पान्हा पांडुरंगे ।। १ ।।
तूं माझी माउली मी तुझें वासरूं ।
नको पान्हा चोरू पांडुरंगें ।। २ ।।
तूं माझी हरिणी मी तुझें पाडस ।
तोडी भवपाश पांडुरंगे ।। ३ ।।
तूं माझी पक्षिणी मी तुझें अंडज ।
चारा घाली मज पांडुरंगे ।। ४ ।।
नामा म्हणे होसी भक्तीचा वल्लभ ।
मागेंपुढें उभा सांभाळिसी ।। ५ ।।

आपण माझी ही अवस्था जाणून मला पुण्याहूनच दीक्षा द्या. आपण महासामर्थ्यसंपन्न असून हजारो मैलांवरून साधकांना दीक्षा देण्यास समर्थ आहात हे मला माहीत आहे. मी येथे श्रीगंगेच्या काठावर बसेन व तेथून आपण आपला कृपासंचार करून मला धन्य व कृतार्थ करा. मी आपल्या पत्राची फार आतुरतेने वाट पाहत आहे. "

॥ श्रीगुरुःशरणम् ॥

॥ ॐ श्रीमद् अमृतमूर्तये श्रीदत्तवासुदेवाय नमः ॥



# ☆ श्रीथोरलेस्वामीमहाराज ☆

## श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानन्दसरस्वती टेंबेस्वामीमहाराज यांचे चरित्र

( उत्तरार्ध – सिद्धखण्ड – क्रमाङ्क १ )

## खण्ड दुसरा





–: लेखक :–

द. सा. मांजरेकर

## -: नमन :-

श्रीवासुदेवा जगत्पालका । जय विधे जगत्कारका ।
जय शंभो जगत्तारका । चित्तहारका तुज नमो ॥ १ ॥
तूंची आर्यसंरक्षक । तूंची अनार्यशिक्षक ।
तूंची हें ग्रंथकौतुक । करविसी लोक तारावया ॥ २ ॥
परात्पर परंज्योती । तूंची परब्रह्ममूर्ती ।
कोण जाणे तुझी गती । स्वयंज्योती तूं श्रीदत्त ॥ ३ ॥
विहार तुझा स्वभक्तहृदयांत । तूं भक्ताधीन सतत ।
मी मागतो पसरून हात । ह्या ग्रंथीं सतत सान्निध्य ठेवीं ॥४॥

---

## -: समर्पण :-

अनन्तकोटी ब्रह्माण्डनायक भक्तवत्सल
भक्ताभिमानी भक्तहृदयनिवासी राजराजेश्वर
श्रीवासुदेवस्वरूप श्रीमन् शक्तिपातयोगाचार्यवर्य
महासिद्धयोगी श्रीयुक्त श्रीसमर्थ संतश्रेष्ठ
श्रीसद्गुरुनाथ श्रीवामन दत्तात्रेय गुळवणीमहाराज
यांच्या चरणी परमप्रेमपूर्वक सादर समर्पण.

॥ श्रीगुरुःशरणम् ॥

# -: श्रीसद्गुरुध्यान :-

श्रीसद्गुरुं च यतिरूपधरं ह्यनन्तम् ॥
सच्चित्सुखं विधिहरीशमयं दयाब्धिम् ॥
भक्तिप्रियं भजकदुःखहरं त्र्यधीशम् ॥
श्रीवासुदेवगुरुदत्तमहं नमामि ॥

---

# -: श्रीसद्गुरुमाहात्म्य :-

गुरु हा केवळ माझा प्राण । इंद्रियें हालवि जो ॥ ध्रु० ॥

कलियुगिं संन्यासी बनुनी । तीर्थें हिंडे जो अनुदिनीं ।
भक्तिमार्ग जना दाउनी । धर्मस्तंभा स्थापितसे ॥ १ ॥

श्रुतिस्मृत्यादिक आधार । देउनि ग्रंथही केले फार ।
झाला व्यासांचा अवतार । भासे लोकां प्रत्यक्ष ॥ २ ॥

योगाभ्यासाची बहु प्रीत । शिष्या शिकउनी दाविती पंथ ।
ऐकुनी येती साधुसंत । दिसती जैसे कपिल मुनी ॥ ३ ॥

वेदां न कळे ज्यांचा अंत । शेषहि थकला गाउनि गीत ।
भाविक भक्तांवरि बहु प्रीत । भक्तां हृदयीं वास करी ॥ ४ ॥

सद्गुरु केवळ ब्रह्मस्वरूप । मायिक धरिलें मानवरूप ।
ज्याच्या स्मरणें पळतें पाप । सीताराम जपीं नित्य ॥ ५ ॥

॥ श्रीगुरुःशरणम् ॥

॥ ॐ श्रीमद् अमृतमूर्तये शिववामनाय नमः ॥

# प्रस्तावनाः-

श्रीदत्तो जयति ।

शिष्या होयीं सावधान । करूनियां एकाग्र मन ।
परिसें कथितों आत्मज्ञान । जेणें अज्ञान निरसें हें ॥
बाहेर नेत्र लावून । जें पाहसी तेंचि स्वप्न ।
व्यर्थ तयासी भुलून । आयुष्य खर्चून मरूं नको ॥
सर्वाभूतीं तो जाणून । सर्वां द्यावें अभयदान ।
हेंचि तयाचें पूजन । पुनः जनन नच दे जे ॥
ईश्वरप्रसादें स्वानुसंधान । लागें तें तोडी भवबंधन ।
हें मानवजन्माचें सार्थक जाण । तो कृपण हे न करी जो ॥

श्रीमन् शक्तिपातयोगाचार्यवर्य महासिद्धयोगी श्रीसन्त सद्गुरू श्रीवामन दत्तात्रेय गुळवणीमहाराज यांच्या असीम व लोकोत्तर प्रेम-कृपाबलाचे आज त्यांचे समर्थ सद्गुरू "श्रीथोरलेस्वामीमहाराज" अर्थात् श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानन्दसरस्वती टेम्बेस्वामीमहाराज यांच्या, माझे गुरुबन्धू श्री. द. सा. मांजरेकर यांनी लिहिलेल्या विस्तृत चरित्राचा दुसरा खण्ड अर्थात् उत्तरार्ध सिद्धखण्ड–क्रमाङ्क एक हा प्रसिद्ध होत आहे, ही परमभाग्याची गोष्ट आहे.

"श्रीथोरलेस्वामीमहाराज" या चरित्रग्रंथाच्या पहिल्या खण्डाच्या प्रस्तावनेत कथन केल्याप्रमाणे हे "श्रीवासुदेवमाहात्म्य" किंवा "श्रीवासुदेवमहापुराण" असून या महापुराणाच्या पहिल्या खण्डात त्यांच्या वयाच्या ३६ व्या वर्षापर्यंतची म्हणजे श्रीगोदा वरीच्या तीरावरील गंगाखेड येथे संन्यासदीक्षा घेईपर्यन्तची सर्व

हकीकत आली आहे. श्रीस्वामीमहाराजांनी वयाच्या ३६ व्या वर्षी श्रीक्षेत्र उज्जयिनी येथे दंडग्रहण केल्यानन्तर ६० व्या वर्षी श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे समाधी घेईपर्यंन्त त्यांचे एकूण २४ चातुर्मास झाले. त्यातील १४ चातुर्मासांचा म्हणजे त्यांच्या वयाच्या ५० व्या वर्षांपर्यंतचा काल या दुसऱ्या खण्डात चित्रित केला आहे.

माझे गुरुबन्धू श्री. द. सा. मांजरेकर यांनी हे सर्व चरित्र अत्यंत सरळ व सोप्या अशा प्रवाही भाषाशैलीत गोष्टीरूपाने कथन केले असून, जाता जाता बहुतेक सर्व कथांचे तात्पर्य सांगून, त्यात अत्यल्प अशा बोधरूप तत्त्वज्ञानाचा मिलाफ करून, त्यांनी आपले सर्व लिखाण मोठे प्रभावी केले आहे, असे म्हटले तर त्यात यत्किंचितही अतिशयोक्ती होणार नाही. अशा प्रकारे लिखाण करण्यामागे त्यांचा एक विशाल दृष्टिकोन आहे. ज्याप्रमाणे श्रीसमर्थरामदासस्वामीमहाराजांनी " ही रामकथा ब्रह्मांड भेदून पैलाड न्यावी, " हा हेतू पुढे ठेवून लिखाण केले, श्रीसंततुकाराममहाराजांनी "बुडतां हे जन न देखवे डोळां ।।," अशी लोकांची स्थिती पाहूनच त्यांच्या उद्धराचा हेतू पुढे ठेवून मेघवृष्टीने उपदेश केला आणि सकलसंतशिरोमणी श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी " ना आदिगुरु शंकरा–। लागोनि शिष्य परंपरा । बोधाचा हा संसरा । जाला जो आमुतें ।। तो हा तूं घेऊनि आघवा । कळीं गळितया जिवां । सर्व प्रकारीं धांवा । करीं पां वेगीं ।। " असा त्यांचे सद्‌गुरू श्रीनिवृत्तिनाथमहाराज यांनी सांगितलेला हेतू पुढे ठेवूनच वाङ्मयनिर्मिती केली त्याप्रमाणेच सामान्य जीवाला आपापल्या वर्णाश्रमधर्माप्रमाणे वागण्याची बुद्धी व्हावी व त्याला साधनमार्ग मिळून त्याची स्वप्रयत्नाने किंवा स्वबलाने जीवरूप अवस्था हळूहळू क्रमशः बदलत जाऊन तो शिवरूप होण्याची प्रेरणा त्याला मिळावी, हाच या चरित्र लिखणामागील उदात्त दृष्टिकोन आहे.

श्रीस्वामीमहाराजांचे साधनकालातील जीवनचरित्र जसे बहुविध पैलूंनी नटलेले दिसून आले तसे ते त्यांच्या सिद्धकालातील जीवनचरित्रातही अनेक पैलूंनी नटलेले आहे असे दिसून येते. यातील काही महत्त्वाच्या पैलूंचे दिग्दर्शन केले; तर ते सर्व साधकभक्तांना मार्गदर्शन करणारे ठरेल, असा दृढ विश्वास वाटतो.

साधुसत्पुरुषमहात्म्यांची संगती ही जीवाला परमोन्नतीकारक ठरत असते असा शास्त्रकारांचा सिद्धान्त आहे. यादृष्टीने श्रीस्वामीमहाराजांना पहिल्या चातुर्मासात सारंगपूर येथे भेटलेल्या डॉ. केशवराव बळवंतराव भट यांची हकीकत पाहण्यासारखी आहे. (पृ. ११ते२३) ज्यावेळी त्यांचे नातू डॉ. पुरुषोत्तमराव श्रीपादराव भट यांची व माझी भेट झाली त्यावेळी त्यांनी व त्यांच्या सौ. पत्नीने जी हकीकत मला सांगितली त्यावरून जन्मजन्मांतरी लाभलेल्या सत्संगतीचा किती उत्तम परिणाम होतो व जीव अधिकाधिक उन्नत दशेला कसा जातो हे स्पष्ट होते.

डॉ. श्री. पु. श्री. भट हे पुण्यात शनिवार पेठेत राहत असून ते डॉक्टरकीचा व्यवसाय करतात.त्यांना अगदी लहानपणापासून ईश्वरदर्शनाची व ईश्वराच्या भेटीची तळमळ लागलेली होती. त्यांच्या पूर्वजन्माच्या संस्कारामुळेच ही अपूर्व वृत्ती आतून उसळून येत होती यात काहीच शंका नाही. एकदा अगदी तरुणपणी ते पुणे येथील पर्वतीवर सायंकाळी फिरावयास गेले असताना पर्वतीच्या मागील बाजूला एका झाडाखाली त्यांना श्रीरघुनाथमहाराज नावाच्या एका सत्पुरुषांचे दर्शन झाले. त्यावेळी त्यांनी त्यांना असा प्रश्न विचारला की, "आपण देव पाहिला आहे का ?" त्यांचा हा प्रश्न ऐकताच श्रीरघुनाथमहाराज त्यांना असे म्हणाले की, "जेथे माणसांचा वारा नाही, पाखरांना थारा नाही आणि फक्त वाऱ्याचीच चाहूल आहे अशा निवान्त रानात व निवान्त मनात ईश्वराचे दर्शन होते."

कालौघात डॉ. श्री. पु. श्री. भट यांची व माझे परमसद्गुरू शक्तिपाताचार्य महायोगी संतश्रेष्ठ श्रीवामन दत्तात्रेय गुळवणी-महाराज यांची इ. स. १९४९ मध्ये प्रथम भेट झाल्यावर त्यांनी त्यांच्याकडून मार्गदर्शनाची मागणी केली. त्यावेळी ते त्यांना "पुढे पाहू या," असे म्हणाले. हे एकताच डॉ. भट श्रीसद्गुरुनाथ-महाराजांना असे म्हणाले की, "तुम्ही इतरांना मुक्त हस्ताने शक्तिपातयोगदीक्षा देता; मग मलाच आपण त्यापासून वंचित का करता?" डॉ. भट यांचा हा प्रश्न ऐकून श्रीसद्गुरुनाथमहाराज पुन्हा एकदा त्यांना "पुढे पाहू या," असे म्हणाले.

असे हे बोलणे झाल्यावर कदाचित् आपली दीक्षा व्हावयाची वेळ अद्याप आली नसेल असे वाटून डॉ. भट काही काल थांबले व इ. स. १९५३ साली त्यांनी पुन्हा एकदा श्रीसद्गुरुनाथमहाराजांना दीक्षेसंबंधी प्रार्थना केली. त्यावेळी श्रीसद्गुरुनाथमहाराज त्यांना असे म्हणाले की, "तुम्हाला एकदम श्रीखंड पाहिजे व मी तर माझ्या खानावळीत भाकरी वाढतो. तुमचा मार्ग वेगळा आहे. तुमचा भक्तिमार्ग आहे. आणि इतरांना श्रीखंड नको आहे."

श्रीसद्गुरुनाथमहाराजांनी असे सांगितले तरी डॉ. भट यांची अंतरीची तळमळ शांत झाली नाही. त्यामुळे सद्गुरूंच्या शोधार्थ त्यांनी इ. स. १९५४ मध्ये हिमालयात जाण्याचा निश्चय केला. हिमालयात जाण्यापूर्वी त्यांनी श्रीसद्गुरुनाथमहाराजांची भेट घेतली व त्यांना आपला मनोदय सांगितला. त्यावेळी श्रीसद्गुरुनाथ-महाराजांनी त्यांना भेट म्हणून चिपळया दिल्या. त्या घेऊन डॉ. भट हिमालयात गेले व तिकडे १३–१४ महिने राहिले. या काळात त्यांना एक महान् नग्न साधू, श्रीनारायण परमहंस, त्यांचे शिष्य श्रीसूरजमोहन माथुर, श्रीप्रभुदत्त ब्रह्मचारी, श्रीहरिवंशराय खन्ना, स्वामी श्रीआदित्यानंद इत्यादि कितीतरी साधुसत्पुरुषांचे

डॉ. श्री. पुरुषोत्तमराव भट यांचे हे पत्र मिळताच श्रीसद्गुरुनाथमहाराजांनी त्यांच्या हृषीकेशच्या पत्त्यावर प्रथम थोडक्यात व नन्तर सविस्तर अशी पुढीलप्रमाणे दोन पत्रे पाठविली.

॥ श्रीगुरुःशरणम् ॥

२० नारायण पेठ, पुणें २.
दि. २३–३–१९५५

सप्रेम आशीर्वाद विशेष

"...आपण निरनिराळ्या सत्पुरुषांच्या सहवासात आहात हे उत्तम आहे. मात्र कोणाकडूनही दीक्षा घेण्याची घाई करू नये. अंतर्यामी परमात्म्याची प्रेरणा होईल तेव्हाच दीक्षा घ्यावी..... आपले आजोबा श्री. प. प. श्रीवासुदेवानन्दसरस्वतीस्वामीमहाराजांचे शिष्य होते. त्यांच्यावर श्रीमहाराजांची चांगली कृपा होती."

आपला
वा. द. गुळवणी

॥ श्रीगुरुःशरणम् ॥

पुणे. २० नारायण पेठ.
दि. १९–४–१९५५

सप्रेम आशीर्वाद विशेष

आपले पत्र येऊन एक महिना झाला. त्याचें उत्तर त्यावेळीं थोडक्यांत दिलें होतें. तें आपणास मिळालें किंवा नाहीं समजलें नाहीं. श्री. रानडे यांचेकडून आपल्या पत्राचें उत्तर आलें काय ? आलें असल्यास कळवावें. ते हल्लीं अलाहाबाद येथें असतात. आपणास भेट घेणें असल्यास जवळ आहे. आपणाला ध्यानामध्यें जो अनुभव आला तो फारच उत्तम आहे. वाचून फार संतोष झाला. ईश्वराची कृपा असल्याचें हें द्योतक आहे. असेच साधन चालू ठेवावें. आपल्या

मनानें कोणाला तरी गुरु करण्यापेक्षां आंतून मार्गदर्शन झाल्यास त्याप्रमाणें केल्यास ठीक होईल. तोपर्यंत आपला जो नित्य कार्यक्रम चालला आहे तो ठीक आहे.

आपल्या सर्व शंकांचीं उत्तरें पत्रांतून लिहून कळविणें शक्य नाहीं. प्रत्यक्ष भेटीचा योग येईल तेव्हां बोलता येईल. तेथील ज्या प्रेमळ सत्पुरुषांची आपल्यावर कृपा आहे त्यांच्या सहवासाचा अवश्य लाभ घ्यावा परंतु भावनेच्या भरांत कोणाचाही अनुग्रह आतून आज्ञा झाल्याशिवाय घेऊ नये. शक्तिपातदीक्षा मी आपणाला केव्हांही देईन परंतु तो साधनमार्ग असल्यानें आपलें पूर्ण समाधान होणार नाही. पूर्ण साक्षात्कारी पुरुषाविना आपली इच्छा पूर्ण होणार नाहीं याची मला पूर्ण जाणीव आहे. यावरून माझा तसा अधिकार नाहीं, हे आपण समजला असालच. मी हें औपचारिक लिहीत नसून सत्य तेंच लिहीत आहे. ज्ञानेश्वरींत "सद्‌गुरु आपैसा भेटती गा" असें लिहिलें आहे. त्यावर विश्वास ठेवून परमेश्वराचें नामस्मरण भजन करीत असावें. आपली तयारी झाल्यावर अंतर्यामी भगवान् सद्‌गुरूच्या रूपाने प्रगट होऊन कृतार्थ करतील. श्री. रानडे यांच्याकडून निश्चित साधनमार्ग मिळाला तर उत्तम होईल. त्यांच्या मार्गाबद्दल शंका घेण्याचें कारण नाहीं. त्यांच्या मार्गांतील मंडळी अत्यंत सगुण भक्त असल्याचें मला माहीत आहे. मार्गांत प्रगती होणें हें ज्याच्या त्याच्या पूर्व संस्कारावर अवलंबून आहे. . . आपल्या बद्दल माझ्या मनांत पूर्ण आदर आहे. आपल्या घराण्याचा व श्रीसद्‌गुरु श्री. प. प. श्रीवासुदेवानन्दसरस्वतीमहाराज यांचा अत्यंत प्रेमाचा संबंध आहे. यामुळें आपल्याबद्दल विशेषच आदर आहे. प्रकृतीला जपून असावे. उत्तर अवश्य पाठवावे. क. हे. आ.

आपला

वा. द. गुळवणी

अशा प्रकारे श्रीसद्गुरुनाथमहाराजांनी डॉ. भट यांना सविस्तर पत्र पाठविले; तरी त्यामुळे त्यांचे विशेष समाधान झाले नाही. अशा स्थितीत ते काही काळ स्वस्थ राहिले. त्यानन्तर त्यांची अस्वस्थता पुन्हा वाढली. तेव्हा त्यांनी श्रीसद्गुरुनाथमहाराजांना पुन्हा पत्र लिहिले. त्यावेळी त्यांनी त्यांना पुढीलप्रमाणे पत्र पाठविले.

।। श्रीगुरुःशरणम् ।।

२० नारायण पेठ, पुणें २.
१९५५

सप्रेम आशीर्वाद विशेष

" . . . तुमची तळमळ समजली. आनंद झाला. मी तुमचा गुरु नाहीं. तुमचे गुरु वेगळे आहेत. लवकरच ते तुम्हाला भेटतील. "

श्रीसद्गुरुनाथमहाराजांचे हे पत्र मिळाल्यावर डॉ. भट हे थोडेसे स्वस्थचित्त झाले व ईश्वरकृपेने प्राप्त होणाऱ्या आपल्या श्रीसद्गुरूंच्या भेटीची मार्गप्रतीक्षा करू लागले. वास्तविकपणे डॉ. भट यांना पूर्वीच एका ज्योतिषाने असे सांगितले होते की, " गतजन्मी तुम्हाला पूर्ण ब्रह्मवेत्ते सद्गुरू मिळाले होते. आता या जन्मीही तुम्हाला विदग्ध ( म्हणजे पूर्ण पोहोचलेले व ज्यांची सर्व कर्मे जळून गेल्याने ज्यांचा अखेरचा जन्म आहे ) अशा सद्गुरूंचा योग आहे. " या योगाप्रमाणे व श्रीसद्गुरुनाथमहाराजांच्या आशीर्वादामुळे डॉ. भट यांना परमपूजनीय श्रीकृष्णदासमहाराज यांचे हृषीकेशला दर्शन होऊन त्यांनी त्यांना नामस्मरणाची दीक्षा देऊन भक्तियोगात मार्गस्थ केले. दीक्षेच्या वेळी श्रीकृष्णदासमहाराजांनी डॉ. पुरुषोत्तमराव भट यांना ते पूर्वीपासूनच जे विष्णूचे नामस्मरण करीत होते तेच नाम त्यांना न विचारताच दिले.

श्रीकृष्णदासमहाराज हे देहाने बंगाली होते व त्यांचे पूर्वाश्रमातील आडनाव भट्टाचार्य असे होते. ते वैष्णव संन्यासी असून त्यांनी

हिमाळयात ३५ वर्षे वास्तव्य केले होते. श्रीकृष्णदासमहाराज हे श्रीविष्णूचे परमभक्त असून ते रोज त्यांनी दाखविलेला नैवेद्य श्रीविष्णूने खाल्ल्याशिवाय जेवत नसत. असे त्यांचे देवाशी अपूर्व व अचिंत्य असे भक्तीचे नाते असून देवाच्या अंतरंग लीलेमध्ये रंगून गेलेले ते एक अलौलिक, असामान्य व लोकोत्तर असे दिव्य महापुरुष होते. श्रीकृष्णदासमहाराजांनी वयाच्या ८१ व्या वर्षी आपली देहलीला आवरून घेऊन बंगालमधील त्यांच्या श्रीवासुदेवाश्रमात ते भूतलावरून देहदृष्टचा तिरोहित झाले.

डॉ. श्री. पुरुषोत्तमराव भट यांच्या संबंधी ही सर्व हकीकत कथन करण्याचे कारण असे आहे की, त्यांच्याशी बोलताना त्यांनी मला असे सांगितले की, "कितीतरी वेळा मला असे संकेत मिळाले आहेत की, सारंगपूरला श्रीस्वामीमहाराजांच्या सहवासात आलेले माझे आजोबा डॉ. केशवराव म्हणजेच मी आहे." त्यांचे हे म्हणणे ऐकले म्हणजे आपल्या हे लक्षात येते की, पूर्वजन्मात लाभलेल्या महासाधुपुरुषाच्या अर्थात् प. प. श्रीस्वामीमहाराजांच्या अपूर्व व पवित्रतम अशा सत्संगतीच्या परिणामामुळे या जन्मात त्यांची ईश्वरभक्तीकडे जी वृत्ती लहानपणापासून वळली, ईश्वरप्राप्तीसाठी व ईश्वरदर्शनासाठी जी उत्कट तळमळ लागली व सद्गुरुप्राप्तीसाठी त्यांच्या मनाची श्रीसंतनामदेवांप्रमाणे जो स्थिती झाली ती किती विलोभनीय व स्पृहणीय आहे असे वारंवार वाटते. या सर्व विवेचनावरून जन्मजन्मान्तरी लाभलेल्या साधुसज्जनमहात्म्यांच्या सत्संगतीमुळे जीव क्रमशः प्रत्येक जन्मात कसा उन्नत होत जातो व ईश्वराभिमुख होत होत पापपुण्यात्मक सर्व कर्मे अशेषपणे संपवून शेवटी आपल्या अंतिम स्वस्वरूपावस्थेप्रत जाण्यास समर्थ ठरून व सामरस्यावस्था प्राप्त करून घेऊन मुक्त कसा होतो, याचा आलेखच स्पष्ट होतो. या सर्व विवेचनावरून "चालवीत असतां आश्रम। जे होईजे

आत्माराम। ऐसा हा सत्समागम। महिमा कोटिगुणें ॥ ५-३० ॥"
असे जे श्रीसमर्थरामदासस्वामीमहाराज यांनी पंचसमासी या प्रकरण ग्रंथात म्हटले आहे,त्याचे रहस्य अंतरंग झाल्याशिवाय राहणार नाही.

श्रीथोरलेस्वामीमहाराजांच्या सिद्धजीवन चरित्रातील सर्वात् महत्त्वाचा पैलू श्रीसमर्थरामदासस्वामीमहाराजांनी सांगितल्या-प्रमाणे "जें जें आपणास ठावें। तें तें इतरांस शिकवावें। शहाणें करून सोडावें। सकळ जन ॥" हाच आहे, हे त्यांचा हा सिद्ध-जीवनचरित्रखंड वाचला की, अत्यंत प्रकर्षत्वाने लक्षात येते. या दृष्टीने पाहिले तर श्रीस्वामीमहाराज हे स्वतःच एक विद्यापीठ असून तेच या विद्यापीठातील सर्व विषयांचे ज्ञाते असे प्राध्यापक गुरू होते, असे लक्षात येते. या दृष्टीने पृ. २६९, २७० वरील ते शिकवीत असलेले ग्रंथ, नानाविध विषय व नानाविध कार्ये पाहिली म्हणजे मन आश्चर्याने अगदी थक्क होऊन जाते. श्रीसमर्थरामदास-स्वामीमहाराजांनी "उत्तमपुरुषनिदर्शन" नावचा एक समास-ग्रंथराज दासबोधात लिहून जणूकाही श्रीस्वामीमहाराजांसारख्या लोकोत्तर महापुरुषांच्या ठिकाणी वास करणाऱ्या या दिव्य पैलूंचे साररूपाने वर्णन केले आहे असे आढळून येते. श्रीसमर्थ म्हणतात—

आपण यथेष्ट जेवणें। उरलें तें अन्न वाटणें।
परंतु वायां दवडणें। हा धर्म नव्हे ॥ १२.१०.१ ॥

तैसें ज्ञानें तृप्त व्हावें। तेंचि ज्ञान जनांस सांगावें।
तरतेनें बुडों न द्यावें। बुडतयासी ॥ २ ॥

उत्तम गुण स्वयें घ्यावे। ते बहुतांस सांगावे।
वर्तल्याविण बोलावे। ते शब्द मिथ्या ॥ ३ ॥

स्नान संध्या देवतार्चन। एकाग्र करावें जपध्यान।
हरिकथानिरूपण। केले पाहिजे ॥ ४ ॥

शरीर परोपकारीं लावावें। बहुतांच्या कार्यास यावें।
उणें पडोंचि न द्यावें। कोणी एकाचें ॥ ५ ॥
अडलें गांजलें जाणावें। यथाशक्ति कामास यावे।
मृदुवचनें बोलत जावे। प्राणिमात्रासी ॥ ६ ॥
दुसऱ्याचें दुःखें दुःखी व्हावें। परसंतोषें सुखी व्हावें।
प्राणिमात्रास मेळवून घ्यावें। बऱ्या शब्दें ॥ ७ ॥
बहुतांचे अन्याय क्षमावे। बहुतांचे कार्यभाग करावे।
आपल्यापरीच व्हावे। पारिखे जन ॥ ८ ॥
दुसऱ्याचें अंतर जाणावें। तदनुसारचि वर्तावें।
लोकांस परीक्षीत जावें। नानाप्रकारें ॥ ९ ॥
नेमकेंचि बोलावें। तात्काळचि प्रतिवचन द्यावें।
कदापि रागासि न यावें। क्षमारूपें ॥ १० ॥
आळस अवघाच दवडावा। यत्न उदंडचि करावा।
शब्दमत्सर न करावा। कोणी एकाचा ॥ ११ ॥
उत्तम पदार्थ दुसऱ्यास द्यावा। शब्द निवडून बोलावा।
सावधपणें करीत जावा। संसार आपुला ॥ १२ ॥
मरणाचे स्मरण असावें। हरिभक्तीसी सादर व्हावें।
मरोनी कीर्तीस उरवावें। येणें प्रकारें ॥ १३ ॥
नेमकेपणें वर्तों लागला। तो बहुतांस कळों आला।
सर्व आर्जवी तयाला। काय उणें ॥ १४ ॥
ऐसा उत्तमगुणीं विशेष। तयास म्हणावे पुरुष।
जयाच्या भजनें जगदीश। तृप्त होय ॥ १५ ॥

श्रीस्वामीमहाराज हे जसे महायोगी सिद्धपुरुष होते तसे ते महाज्ञानी अकामहत प्राप्तपुरुषही होते. त्यामुळे योगनिष्ठा व ज्ञाननिष्ठा या दोहोंचा "यत् सांख्यैः प्राप्यते स्थानं तद्योगैरपि गम्यते। एकं साख्यं च योगं च यः पश्यति स पश्यति॥ ५.५॥ या

श्रीमद्भवद्गीतेत सांगितलेल्या न्यायाने होणारा मनोज्ञ संगम त्यांच्या ठिकाणी झाल्याचे दिसून येते. त्यामुळेच श्रीस्वामीमहाराजांच्या जीवनचरित्राचे दुसरे सर्वात मोठे वैशिष्टच हे आहे की, त्यांनी आपल्या संपर्कात आलेल्या साधकभक्तांच्या जीवनात व स्वकृत ग्रंथात ज्ञानमार्ग व योगमार्ग यांची अपूर्व सांगड घालून या दोन्हीही मार्गांची शिकवण देऊन विश्लेषण केले आहे. या दृष्टीने पृ. २८७ वर आलेली श्री. शंकरराव कुलकर्णी, शिरोळकर, यांची हकीकत पाहण्यासारखी आहे. श्री. शंकररावांच्या इच्छेप्रमाणे श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना षट्क्रिया व प्राणायामादि योगाभ्यास शिकविल्यावर "खरा आनंद वेदान्ताच्या अभ्यासावाचून मिळणे शक्य नाही," असे सांगून व तो त्यांच्याकडून व्हावा म्हणून पुढे त्यांचे संस्कृत शिक्षण वे. शा. सं. श्री. नारायणशास्त्री एकसंवेकरांकडून करवून घेऊन, मग त्यांना वेदान्त शिकवून कृतकृत्य व धन्य केले.

श्रीस्वामीमहाराजांचा हा दृष्टिकोन व त्यांचे हे वैशिष्टच ध्यानात येण्यासाठी त्यांनी लिहिलेल्या श्रीदत्तमाहात्म्य या ग्रंथातील श्रीदत्तात्रेय व सहस्त्रार्जुन यांचा संवाद लक्षात घेण्यासारखा आहे. ज्यावेळी सहस्त्रार्जुनाने श्रीदत्तात्रेयांना "महावाक्य कोणतें। कसें चिंतावें तयातें। जेणें अपरोक्षता येते। तें मातें निरोपावें ॥१३.२॥" असे म्हणून ज्ञानाभ्यास सांगण्याची विनंती केली तेव्हा त्यांनी ज्ञानाभ्यास कसा करावयाचा ते सांगितले. पुढे "अर्जुन नमन करूनी। म्हणे वाक्यार्थ ऐकूनी। आनंद झाला मनीं। आतां योग सांगावा ॥१४.१॥" असे म्हणून सहस्त्रार्जुनाने श्रीदत्तात्रेयांना योगाभ्यासासंबंधी विचारले तेव्हा "श्रीदत्त म्हणे रे अर्जुना। सावधान करी मना। अष्टांगयोगविचारणा। सांगतों मना स्थिरवी जी ॥१४.२॥" असे म्हणून मनस्थैर्याकरिता योगाभ्यास सांगितला. या दोन्ही मार्गांचे विवरण ऐकल्यावर सहस्त्रार्जुनाने त्यांना असे विचारले की, "योगें

होतां साक्षात्कार। कासया वाक्यविचार। हा संशय करा दूर। ठेविला निर्धार तुम्हांवरी ॥१५.३॥" त्याच्या या प्रश्नाला उत्तर देताना श्रीदत्तात्रेय असे म्हणाले की, "ऐकूनी अर्जुनाचें वचन। हर्षे बोले अत्रिनंदन। केवळ योगानें नोहे निर्वाण। नसतां ज्ञान योगिया ॥ १५.४ ॥ प्राणायामें करून। स्थिर होतां आपुलें मन। जें ऐकिलें वाक्य ज्ञान। त्याचें मनन करावें ॥५॥" यावरून हे लक्षात येते की, योगास ज्ञानाची व ज्ञानास योगाची जोड दिली; तर "चैतन्य जें व्यापक। तें स्वयंप्रकाशक। तेंचि प्रगटें सम्यक। सच्चित्सुखमय तेव्हां ॥ १५.१८ ॥ असा होतां साक्षात्कार। योगी न जाणे बाह्या-भ्यंतर। स्वयें चिन्मय निरंतर। निश्चळ अजस्र सुखरूपी ॥१९॥" हे घडून येते, असा श्रीस्वामीमहाराजांचा दृष्टिकोन असून तोच सिद्धान्तरूपाने येथे प्रस्थापित केला आहे.

याशिवाय श्रीस्वामीमहाराजांना ब्रह्मावर्त येथे स्फुरलेला "दिगंबरा दिगंबरा श्रीपादवल्लभ दिगंबरा" हा महामंत्र (पृ. ३७२), श्रीस्वामीमहाराजांची असंग्रहीवृत्ती (पृ. २३३), श्रीस्वामी-महाराजांचे हिमालयात चवथा व पाचवा असे जे दोन चातुर्मास झाले ते कोठे झाले ? त्या संबंधी महायोगी श्रीगुळवणीमहाराज यांनी ती स्थाने शोधण्यासाठी जे प्रयत्न केले त्याची सर्व माहिती, श्रीस्वामीमहाराजांना पुनर्विवाहाच्या खंडनपर लेख लिहिण्यास देवांनी बंदी का केली ? (पृ. २४५) इत्यादि कितीतरी गोष्टीं-संबंधी उहापोह करणे आवश्यक असले; तरी विस्तारभयास्तव त्यातील काहींचा येथे नामनिर्देश करून, तत्संबंधीचा विचार वाचकां-वरच सोपविणे योग्य ठरेल.

येथपर्यन्त श्री. द. सा. मांजरेकर यांनी लिहिलेल्या श्रीथोरले-स्वामीमहाराज, खण्ड दुसरा, यातील काही वैशिष्टयांचे श्रीस्वामी-महाराजांच्या व श्रीगुरुचरणांच्या कृपेने यावच्छक्य दिग्दर्शन केले.

वास्तविक पाहता आणखी कितीतरी वैशिष्टचे या चरित्रात जागोजागी विखुरलेली असून त्यांचा विचार हे चरित्र लिहितानाच लेखकाने अत्यंत कौशल्याने व अपूर्वपणे केला आहे. त्या सर्वांचा आस्वाद साधक-भक्तांनी घ्यावा व ही वैशिष्टचे अंशात्मक रीतीने आपल्या अंगी यावीत म्हणून त्यांनी अत्यंत विनम्रभावाने व परा-काष्ठेच्या शरणगतीपूर्वक श्रीस्वामीमहाराजांच्या चरणी प्रार्थना करावी,अशी त्यांना विनंती आहे.

सारांश, श्रीस्वामीमहाराजांच्या चरित्राच्या या दुसऱ्या खंडात चित्रित झालेले श्रीस्वामीमहाराज म्हणजे " चलां कल्पतरूंचे अरव " या श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानेश्वरीत सांगितलेल्या न्यायाने या भूतलावरील संत-साधू-महात्मे-सत्पुरुषांच्या चालत्याबोलत्या अशा जिवंत कल्पतरूंच्या बगीचातील कल्पतरू असून प्रत्येक साधक-भक्ताने या बगीचात शिरून श्रीस्वामीमहाराजरूपी कल्पतरूखाली बसून अध्यात्मातील पराकाष्ठेची अंतिम अवस्था प्राप्त होण्यासाठी प्रार्थना केली पाहिजे. असे केले तरच त्यांच्या कृपेने श्रीसंततुका-राममहाराजांनी स्वतःचे वर्णन केल्याप्रमाणे देहात्मबोध छिन्नभिन्न होऊन भवभ्रमाचा आकार विरून जाईल व ध्याता, ध्येय, ध्यान किंवा ज्ञाता, ज्ञेय, ज्ञान ही त्रिपुटी नाहीशी होऊन आत्मसाक्षा-त्काराचा दीप उजळल्याशिवाय राहणार नाही. या दृष्टीनेच श्रीसंततुकाराममहाराज असे म्हणतात की –

अणुरेणुयां थोकडा । तुका आकाशाएवढा ॥
गिळुनि सांडिलें कळिवर । भवभ्रमाचा आकार ॥
सांडिली त्रिपुटी । दीप उजळिला घटीं ॥
तुका म्हणे आता । उरलों उपकारापुरता ॥

अशा रीतीने श्रीस्वामीमहाराजांचे, त्यांच्या महात्म्याचे व चरित्राचे कितीही वर्णन केले; तरी ते पूर्ण होईल असे वाटत नाही.

त्यामुळे श्रीसंततुकाराममहाराजांच्या शब्दात एवढेच म्हणता येईल की —

**काय सांगों आतां संतांचे उपकार। मज निरंतर जागविती ॥**
**काय द्यावें त्यांसी व्हावें उतराई। ठेविता हा पायीं जीव थोडा ॥**
**सहज बोलणें हित उपदेश। करूनि सायास शिकविती ॥**
**तुका म्हणे वत्स धेनुवेचें चित्तीं। तैसे मज येती सांभाळीत ॥**

आतां ज्यांचे या चरित्राच्या खण्डशः होणाऱ्या वृहत् छपाईसाठी व प्रसारासाठी साहाय्य झाले व होत आहे त्यांच्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करणे हे माझे कर्तव्य आहे. श्री. सूर्यकांत काशीनाथ भावे, सौ. सखूवाई दगडू पाटील, श्री. अनिल शंकर मुळचे, सौ. विजयाताई रघुवीर माटेगांवकर, श्री. रघुनाथ राजाराम आपटे, श्री. शरद सीताराम उर्फ राजाभाऊ अत्रे, श्री. गोपाळराव सदाशिवराव खांडेकर, श्री. परमानन्द नैलवाल, श्री. उत्तमराव दिनकरराव पाटील, सौ. हेमलता दिनकरराव पाटील, श्री. चंद्रकांतराव रघुनाथराव पाटील, सौ. रेखाताई चंद्रकांतराव पाटील, श्री. शिरीष इच्छाराम चौधरी, श्री. दत्तात्रेय कोंडीराम शिंदे, सौ. सुलभाताई दत्तात्रेय शिंदे, श्री. सुरेश रामचंद्र मल्लापूर, श्री. प्रभाकर धोंडोपंत अजोतीकर, श्री. सुभाष दिनकर ऊर्फ नाना खांडेकर, श्रीमती कान्ताबेन प्राणुभाई देसाई, श्री. दत्तात्रेय वासुदेव जोशी, श्री. हरिहर गोपीनाथ दाभाडे, श्री. बळवंत केशव जोशी, श्री. मंगलदास शंकरराव अंजने, श्री. मधुसूदन शंकरराव अंजने, श्री. बाळकृष्ण सिद्धेश्वर कुलकर्णी, श्री. आ. शि. देसाई, श्री. लक्ष्मणराव राजाराम महाजन, श्री. श्रीकान्त दिनकरराव खांडेकर, श्री. घनःश्याम बाबूराव वायंगणकर, श्री. श्रीराम गोपाळराव खांडेकर, श्री. शा. द. करंदीकर, श्री. हरिभाऊ नारायणराव कुलकर्णी, श्री. यशवन्तराव गजाननराव ताटके, श्री. अरुणराव प्रभाकरराव राजे, श्री. श्रीधर दिनकर ऊर्फ दादा

खांडेकर, श्री. दादासाहेब यंदे, सौ. उषाताई कुलकर्णी, श्रीमती लक्ष्मी-ताई कोटक, श्री. अरुणकुमार शंकरराव वाघ, डॉ. सौ. कुमुदिनी अरुणकुमार वाघ, श्री. दामोदर दत्तात्रेय पोळ, श्री. मुलतोजीराव दौलतराव विचारे ( ॲडव्होकेट ), सौ. हेमांगीताई मुलतोजीराव विचारे (ॲडव्होकेट), श्री. शिवराम नारायण कुलकर्णी (कोल्हापूर) या सर्व गुरुबन्धू, गुरुभगिनी, साधक व प्रेमी मंडळींचे श्रीथोरलेस्वामी-महाराज यांच्या चरित्राच्या दुसऱ्या खण्डाच्या छपाईसाठी अपरंपार साहाय्य झाले असून पुढील सर्व खंडांसाठी हे व इतरही सर्व प्रेमी-मंडळी साहाय्य करणार आहेत, ही श्रीस्वामीमहाराजांची व श्रीगुरु-चरणांची अपार कृपा आहे, यात काहीच शंका नाही. या सर्वांच्या साहाय्याविना श्रीस्वामीमहाराजांच्या चरित्राचा हा दुसरा खंड छापून प्रसिद्ध होणे कदापीही शक्य झाले नसते व पुढील खंडही छापून प्रसिद्ध होणे शक्य नाही, हे नितांत सत्य आहे. या सर्वांचे साहाय्य हे अत्यंत निरपेक्ष असल्यामुळे त्यांनी केलेली ही सेवा श्रीथोरलेस्वामीमहाराज व श्रीसद्‌गुरुनाथमहाराज यांच्या चरणी रुजू होऊन या उभयतांनी आपल्या कृपाप्रेमाचे अखंड छत्र या सर्वांवर व त्यांच्या कुटुंबीय मंडळींवर ठेवावे अशी त्यांच्या चरणी प्रार्थना आहे.

श्रीस्वामीमहाराजांच्या चरित्राच्या या दुसऱ्या खंडात जी विविध चित्रे छापली आहेत त्यातील श्रीक्षेत्र नेमावरचे फोटो श्री. विनय मुरलीधर देशपांडे, भुसावळ, श्रीक्षेत्र डाकोरचे फोटो माझे गुरुबन्धू श्री. मणिलाल नाथाजीभाई भट्ट, डाकोर व श्रीक्षेत्र उज्जयिनीचे फोटो श्री. बाळकृष्ण सिद्धेश्वर कुलकर्णी, पुणे, यांनी मोठ्या प्रेमाने, आत्मीयतीने व आपुलकीने आणून दिले. त्याचप्रमाणे श्रीस्वामी-महाराजांच्या चरित्राच्या या दुसऱ्या खंडाची छपाईप्रत माझी भाची चि. कु. राजश्री विष्णुपंत शुक्ल हिनें अत्यन्त सुवाच्च अक्षरात खूप

कष्ट घेऊन लिहून देऊन माझे श्रम हलके केले. याशिवाय या ग्रंथाचे लेखक व माझे गुरुबन्धू श्री. द. सा. मांजरेकर यांनीही या चरित्र-ग्रंथाच्या छपाईसाठी व प्रसारासाठी प्रथमपासून जे कष्ट घेतले, घेत आहेत व घेणार आहेत ते सर्व, श्रीस्वामीमहाराजांच्या व श्रीसद्गुरु-नाथमहाराजांच्या चरणी त्यांची जी दृढ श्रद्धा, निष्ठा व प्रेम आहे, त्यांचे सर्वोत्तम असे प्रतीक आहे, यात तिळप्राय शंका नाही. उपरोक्त सर्वांनी केलेली ही त्यांची विविध सेवा श्रीस्वामीमहाराजांनी व श्रीसद्गुरुनाथमहाराजांनी मान्य करून घेऊन, या सर्वांना व त्यांच्या कुटुंबीय मंडळींना धन्य व कृतार्थ करावे म्हणून या उभयतांच्या चरणी शरणागतीपूर्वक प्रार्थना आहे.

याशिवाय कित्येकांचा या चरित्राच्या दुसऱ्या खंडाच्या कार्या-साठी हातभार लागला आहे. असे जे नामोल्लेखरहित गुरुबन्धू, भगिनी, प्रेमी, सज्जन व साधक आहेत त्यांचाही मी अंतःकरणपूर्वक आभारी आहे. त्यांच्या अनुल्लेखनाबद्दल त्यांनी मला क्षमा करावी.

प. पू. श्री. राजाभाऊ करंदीकरमहाराज, संस्थापक, श्रीवासुदेवा-नन्दसरस्वती श्रीसद्गुरु प्रतिष्ठान, बोरिवली व माझे गुरुबन्धू श्री. यशवन्त महादेव बाक्रे, बोरिवली, यांनी श्रीस्वामीमहाराजांच्या चरित्राच्या प्रसारासाठी जी अमोलिक मदत करून कष्ट घेतले, घेत आहेत व घेणार आहेत त्याबद्दल मी त्यांचा अखंड ऋणी आहे. ते करीत असलेले हे साहाय्य शब्दातीत असून त्यांच्या या साहाय्याबद्दल त्यांना व त्यांच्या सर्व कार्यकर्त्यांना माझे शतशः धन्यवाद आहेत !

या चरित्र-ग्रंथाच्या दुसऱ्या खंडाची छपाई माझे मित्र व श्रीस्वामीमहाराजांचे सांप्रदायी श्री. ज. प. खरे यांनी आपले स्वतःचे काम आहे असे समजून केली व पुढील सर्व खण्डांची छपाई ते मोठ्या आत्मीयतेने करून देणार आहेत, याबद्दल मी जेवढी कृतज्ञता व्यक्त करीन व त्यांना धन्यवाद देईन तेवढे थोडेच आहेत. त्याचप्रमाणे

आदित्य मुद्रणालयातील काम करणाऱ्या सर्वांचे अपरिमित साहाय्य झाले व होत आहे, हे नमूद करणे माझे कर्तव्य आहे. या सर्व कर्मचारी बन्धूंना माझे हार्दिक धन्यवाद आहेत !

इत्यलम् । श्रीमद् आद्य शंकराचार्य यांनी श्रीमद्भगवद्गीतेच्या भाष्यात "परमार्थतत्त्वं च वासुदेवाख्यं परं ब्रह्म ।" व "अहं वासुदेवाख्या परा शक्तिर्यस्य तन्मत्परमिति ।।" म्हणजे वासुदेव या नावाचे परब्रह्म हेच परमश्रेष्ठ परमतत्त्व आहे व मी वासुदेव या नावाची पराशक्ती ज्याची आहे ते ज्ञेयही मत्पर आहे, असे म्हणून मोक्षस्वरूप श्रीवासुदेवरूपी परब्रह्माचा व तत्स्वरूप पराशक्तीचा जो महिमा गाईला आहे, त्याच श्रीवासुदेवरूपतत्त्वाने प. प. श्रीवासुदेवानन्दसरस्वतीस्वामीमहाराज हे रूप ग्रहण केले आहे, हे लक्षात घेऊन, त्या तत्त्वरूप विग्रहाच्या नित्य व अखंड स्मरणात आम्ही सर्व साधक–भक्तांनी राहून आम्हा सर्वांचे जीवन धन्य व कृतार्थ व्हावे, अशी त्यांच्या चरणी नम्र प्रार्थना आहे.

केशव रामचंद्र जोशी

**ऋणनिर्देश :–**

श्रीथोरलेस्वामीमहाराज या चरित्राच्या प्रथम खंडामध्ये ऋणनिर्देश करताना एक उल्लेख अनवधानाने राहून गेला. मी कापडाच्या गिरणीत काम करीत होतो. चरित्र लेखनाला भरपूर वेळ मिळावा म्हणूनच की काय मुंबईतील कापड गिरण्यांचा दीर्घकाळ संप झाला. त्या संधीचा फायदा घेऊन सौभाग्यवती व आमची नात चि. डॉली असे सहकुटुंब गोव्यामध्ये शापुरा गावी, आमच्या स्नुषेचे मामा श्री. दाभोळकर बंधू यांच्या घरी दोन महिने, राहून या चरित्र लेखनाचा मसुदा तयार केला. त्या दोन महिन्यांमध्ये सौ. प्रेमाताई दाभोळकर व त्यांचे दोन मुलगे या सर्वांनी आम्हाला, जे सर्वतोपरी साहाय्य केले, त्याचा येथे कृतज्ञतापूर्वक उल्लेख करीत आहे.

द. सा. मांजरेकर

## ॥ श्रीगुरुवासुदेवदत्तः प्रसन्नोऽस्तु ॥

रमागणेशसंभूतो वासुदेवयतीश्वरः ।
स्मर्तृगामीस्वभक्तानाम् भवसागरतारकः ॥ १ ॥

वेदान्तशास्त्रे शुभचित्तवृत्तिर्तत्त्वंपदं बोधयितुं प्रवृत्तः ।
संसारमार्गात्सततंनिवृत्तः स वासुदेवः परमोगुरुर्नः ॥ २ ॥

योगींद्रजो तनय अत्रि महाऋषीचा ।
श्रीपादराज पहिला अवतार ज्याचा ॥
जो हो पुनश्च यति श्रीनृसिंहदेव ।
तो हाचि दत्त भगवान् गुरुवासुदेव ॥ ३ ॥

ज्ञान योग उपासना गुरुभक्ति बोधि नतांप्रती ।
धन्य जन्म करीतसे गुरुवासुदेव सरस्वती ॥
धर्ममूर्ति दयानिधी गुरुदत्तशिष्य महामती ।
सर्वकाळ नमोऽस्तुते श्रीगुरुवासुदेव सरस्वती ॥ ४ ॥



# अनुक्रमणिका

॥ भगवान् श्रीदत्तात्रेय ॥




निम्नहातीं मालाकमंडलू। मध्यहातीं त्रिशूलडमरू।
ऊर्ध्वहातीं शंखचक्रू। तो हा महायोगेश्वर श्रीदत्तात्रेय ॥

## श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य
## श्रीदत्तगुरु भगवान्
## श्रीवासुदेवानंदसरस्वती टेम्बेस्वामीमहाराज



श्रीमत् प. प. श्रीसद्गुरु वासुदेवानंद सरस्वती स्वामीमहाराज.

**वासुदेवसरस्वत्यै भक्तानां कामधेनवे ।**
**दत्तात्रेयावताराय टेम्बेस्वामिन्नमोऽस्तु ते ॥**

योगिराज सद्गुरु
श्रीसंत वामनरावजी गुळवणीमहाराज



शक्तिपाताचा महामेरू । बहुत जनांसी आधारू ।
ब्रह्मस्थितीचा निर्धारू । शांभव योगी ।।

॥ श्रीसद्गुरु श्रीसीतारामहाराज टेम्बे ॥



( समाधी–फाल्गुन शु॥ ८ शके १८४०–इ स. १९१८–श्रीक्षेत्र वढणेरी, जि. अमरावती. )

सीतारामो योगिवरो ब्रह्मचारी कवीश्वरः ।
गुरुपादार्पिततनुः समद्गुरुतां गतः ॥

श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य
श्रीनृसिंहसरस्वती दीक्षितस्वामीमहाराज



जन्म – चैत्र शुद्ध १, शके १७८८ इ. स. १८६६ | समाधी आश्विन वद्य ७, शके १८४९ इ. स. १९२७, अयोध्या.

प्रकटोनी या धरेवरती। निजजनोद्धार करती।
शांत दांत मुनिस्वामी। ते हे नृसिंहसरस्वती यती ।।

॥ श्रीक्षेत्र गुंज ॥

श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य

श्रीयोगानन्दसरस्वतीस्वामी ऊर्फ श्रीगांडामहाराज



यो वै भूमा तत्सुखं त्वेतिगीतं गेयातीतं ध्यानगम्यं मुनींद्रम् ।
भवतंकार्थं ह्यात्त मानुष्यमूर्ति योगानन्दं तं यतीन्द्रं नतोऽस्मि ॥

जन्म शके–१७९० इ. स. १८६८ मार्गशीर्ष शुद्ध १५, श्रीक्षेत्र तलंगपूर, जि, सुरत.
समाधी शके–१८५० इ. स. १९२८ फाल्गुन वद्य १२, श्रीक्षेत्र गुंज, जि. परभणी.

॥ श्रीकृष्णदासमहाराज ॥



डॉ. श्री. पुरुषोत्तमराव श्रीपादराव भट
यांचे भक्तियोगमार्गातील मंत्रदीक्षागुरु. (प्रस्तावना)

॥ श्रीनर्मदादेवी ॥

उभयतटपुण्यतीर्था प्रक्षालित सकललोक दुरितौघा ।
देव मुनि– मनुज वन्द्या हरतुसदा नर्मदा दुरितम् ॥



यन्मूलेऽस्त्यमरेश्वरो विजयते श्रीसिद्धनाथस्तथा
कावेरी परिवेष्टितो गतिदओंकारोऽपरेचामिताः ।
मध्येऽन्येपिच शूलपाणिसहिता पश्चात्यभागेस्थिताः
सर्वेते भजतामभीष्ट फलदःवर्वतिसा नर्मदा ॥

॥ श्रीगुरुःशरणम् ॥

॥ ॐ श्रीमद् अमृतमूर्तये श्रीदत्तवासुदेवाय नमः ॥

# ❀ श्रीथोरलेस्वामीमहाराज ❀

## श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानन्दसरस्वती टेंबेस्वामीमहाराज यांचे चरित्र

## (उत्तरार्ध–सिद्धखण्ड–क्रमाङ्क १)

## – खण्ड दुसरा –

## –अध्याय पहिला–

सदानन्दति विद्वत्त्वात् सर्वदाऽति विभुत्वतः ।
मृत्युंजयति योगित्वाद्यः स मे हृदि तिष्ठतु ॥ १ ॥

नमः श्रीगुरो मेशधीशो दयाब्धे ।
भयार्तिघ्न ते स्वात्मदो वासुदेव ।
यतीट्सेवितानन्द पादाब्जयुग्मं ।
सदा मे हृदि स्थास्नुतां यातु देव ॥२॥

**चातुर्मास पहिला–शके १८१३ – श्रीक्षेत्र उज्जयिनी :–**

माणगावचे श्रीवासुदेवशास्त्री टेंबे आता परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानंदसरस्वतीस्वामीमहाराज झाले. संन्यास ग्रहणानंतर त्यांच्या जीवनक्रमात विशेष काही फरक पडणार नव्हता; कारण पूर्वाश्रमात ते संन्याशाचेच जीवन जगत होते असे म्हणावयाला हरकत नाही. वैराग्य आणि त्याग ही संन्यासधर्माची प्रमुख लक्षणे त्यांच्या ठिकाणी पूर्वाश्रमापासूनच वाणलेली होती. स्वतःच्या शरीराविषयी उदासीनता, ऐहिक भोगांबद्दल पूर्ण अनासक्ती शास्त्रांवर अढळ श्रद्धा व भगवान् श्रीदत्तात्रेयांच्या पादपद्मी विशुद्ध, भक्ती या सर्व गोष्टी त्यांच्या ठिकाणी अगदी बालपणापासून

उत्कटतेनें वास करीत होत्या. सर्वभूती परमेश्वर वास करीत आहे या दृढ विश्वासामुळे त्यांची वृत्ती निर्भय झाली होती. त्यांनी आयुष्याच्या अखेरच्या क्षणापर्यंत आपले जीवन लोकांच्या दुरिताचे तिमिर घालविण्यासाठीच खर्च केले. त्यांच्या चरित्रसागराचे अवगाहन करू लागल्यावर त्यांच्या अंगी वरील गुण किती परमोच्च कोटीला पोहोचले होते हे पाहून आपली मती अगदी गुंग होते व बुद्धी पार थक्क होऊन जाते.

श्रीवासुदेवशास्त्र्यांनी शके १८१३ च्या ज्येष्ठ शुद्ध १३ ला गोदावरीच्या तीरावरील गंगाखेड या ठिकाणी संन्यास घेतला. त्यानंतर ते वाशीम, उमरखेड, माहूर, खांडवा, बढवाई, ॐकारेश्वर, (येथे त्यांचा जवळ जवळ ८–१० दिवस मुक्काम झाला.) मंडलेश्वर, वलवाडा इत्यादि ठिकाणी मुक्काम करीत ते उज्जयिनीला जाऊन पोहोचले. या प्रवासात त्यांचे दोन आठवडे तरी नक्कीच गेले असणार. आषाढ शुद्ध २, शके १८१३ मध्ये त्यांनी दंड ग्रहण केला असा उल्लेख आढळतो. वरील प्रवासाचा काळ लक्षात घेतला; तर त्यांच्या दंड ग्रहणाचा हा दिवस बरोबर आहे असे वाटते.

संन्याशाने तीर्थक्षेत्राचा अपवाद सोडून कोणत्याही एका ठिकाणी तीन दिवसापेक्षा अधिक काळ राहू नये, सर्व संचार पायीच करावा, वाहनात बसू नये, अग्नीला स्पर्श करू नये, फक्त तीन किंवा पाच घरी भिक्षान्नच घ्यावे, धातूला किंवा पैशाला स्पर्श करू नये, पोहून नदी तरून जाऊ नये इत्यादि संन्यास धर्माचे सर्व नियम श्रीस्वामीमहाराज काटेकोरपणे पाळू लागले. दंडग्रहण केल्यावर देवांनी त्यांना अशी आज्ञा केली होती की, “लोक वर्णाश्रमधर्मापासून ढळत आहेत. तरी त्यांना उपदेश करून वर्णाश्रमावरील त्यांची निष्ठा बळकट करावी. लोकांमध्ये धर्माचा लोप होऊ पाहात आहे. तेव्हा भरतखंडात सर्वत्र पायीच संचार करून सर्व लोकांना उपदेश करून जनमानसात

धर्माची प्रतिष्ठापना करावी." देवांच्या या आज्ञेप्रमाणे वागण्यास श्रीस्वामीमहाराजांनी तात्काळ सुरुवात केली.

संन्याशांचा चातुर्मास आषाढ शुद्ध १५ ते भाद्रपद शुद्ध १५ असा दोन महिन्यांचा असतो. या दोन महिन्यात त्यांनी नदोकिनारी तीर्थ-क्षेत्रात एकाच ठिकाणी वास्तव्य करावे असा संकेत आहे. संन्यास दीक्षा घेतलेल्या वर्षापासून संन्याशांच्या चातुर्मासांना सुरुवात होते. संन्याशाचे वय त्याचे किती चातुर्मास झाले यावर मोजतात.

श्रीस्वामीमहाराजांनी आपल्या श्रीसद्‌गुरूंच्या संगतीमध्ये काही दिवस उज्जयिनीमध्ये मुक्काम केला. आषाढ पौर्णिमा जवळ येत होती. श्रीस्वामीमहाराजांनी आपला पहिला चातुर्मास उज्जयिनीलाच करावा असा श्रीस्वामीनारायणानंदसरस्वतीस्वामीमहाराजांनी आग्रह धरला. त्यांच्या आग्रहास्तव आपला पहिला चातुर्मास उज्जयिनीलाच करावयाचा असे श्रीस्वामीमहाराजांनी ठरविले. त्यामुळे शके १८१३ अर्थात् इ. स. १८९१ चा त्यांचा पहिला चातुर्मास श्रीक्षेत्र उज्जयिनी येथेच झाला.

श्रीस्वामीमहाराजांचा येथील दिनक्रम पुढीलप्रमाणे होता. भल्या पहाटे ब्राह्ममुहूर्तावर उठून शौचमुखमार्जन केल्यावर ते स्नान करीत असत. त्याचप्रमाणे दुपारी व सायंकाळीही ते स्नान करी असत. अशा रीतीने त्यांचे त्रिकाळी स्नान होत असे. सकाळी स्नानानंतर दंडतर्पण व प्रणवजप झाल्यावर त्यांच्याबरोबर असलेल्या दोन्ही श्रीदत्तमूर्तींना स्नान घालून त्यांना ते भस्मलेपन करीत असत. यावेळी त्यांच्या बरोबर एक प्रसिद्ध कागलची मूर्ती व दुसरी प्रवासात बाळगण्यासाठी तयार केलेली अशा दोन मूर्ती होत्या. संन्याशांनी फुले, तुळशी इत्यादि तोडू नये अशी शास्त्राज्ञा असल्यामुळे कोणीतरी फुले, तुळशी इत्यादि आणून दिल्यास त्या ते देवांना वाहत असत. या गोष्टी मिळाल्या नाहीत तर नुसते भस्मावरच

भागवावे लागे. प्रथम प्रथम जोपर्यन्त लोकांना श्रीस्वामीमहाराजांचा खरा परिचय झाला नव्हता तोपर्यंन्त या पूजाद्रव्याची वाण होती; मग भरपूर तुळशी व फुले येऊ लागली. देवांना वंदन केल्यावर ते उपस्थित संन्याशांना वंदन करीत. सुरुवातीला श्रीस्वामीमहाराजांच्या विद्वत्तेबद्दल कोणालाच कल्पना नव्हती; पण त्यांच्या चेहऱ्यावर जे विद्वत्तेचे आणि परतत्त्वाचा स्पर्श झाल्याचे तेज होते ते थोडेच लपून राहणार ? जसजसा सहवास वाढत गेला, तसतसे त्यांच्यामधील अलौकिकत्व लोकांच्या नजरेला येऊ लागले. त्यांच्या मुखातून बाहेर पडलेले ज्ञान श्रोत्यांच्या बुद्धीच्या परसीमेला स्पर्श करून जात असे. त्यामुळे श्रोत्यांच्या हृदयाकाशात ज्ञानाचा प्रकाश पडून त्यांचे जीवन उजळून निघत असे. श्रीस्वामीमहाराजांच्या मुखातून निरनिराळे धार्मिक ग्रंथ ऐकून कितीतरी भाग्यवंतांनी आपले जीवन समृद्ध बनविले होते. श्रीस्वामीमहाराज लोकांना धर्मग्रंथ सांगत, तसेच त्यांना ते ब्रह्मकर्मही शिकवीत असत. श्रीविष्णुसहस्रनाम, पुरुषसूक्त, रुद्र, संध्या इत्यादीही शिकवीत असत. योग त्यांच्या आवडीचा विषय होता. ते मध्यरात्री उठून पहाटेपर्यंत समाधी लावून बसत असत. मात्र पहाटे स्वत: जिज्ञासू व अधिकारी लोकांना योग सांगत असत. श्रीस्वामीमहाराज श्रीमदाद्य शंकराचार्यांच्या अद्वैत मताचे पुरस्कर्ते होते. त्यांच्या शिकविण्यात शांकरभाष्य, गीताभाष्य, उपनिषदे हे अद्वैतवेदान्ताचे प्रतिपादन करणारे ग्रंथ असत. आचार्यांबद्दल त्यांच्या मनात अतीव आदर होता. आचार्यांविरुद्ध किंवा त्यांच्या मताविरुद्ध बोललेले त्यांना खपत नसे. आचार्यांच्या गीताभाष्याला "द्राविडी प्राणायाम" म्हणणाऱ्या एका विद्वान् पंडिताला नदीमध्ये फेकून द्या असे एकदा त्यांनी आपल्या शिष्यांना सांगितले होते. तो कथाभाग पुढे येईलच.

सकाळचे आह्निक उरकल्यावर ते लोकांना उपनिषदे वगैरे

सांगत. नंतर मध्याह्नी स्नान व आह्निक उरकून ते भिक्षेला जात. श्रीस्वामीमहाराज फक्त दक्षिणी ब्राह्मणांच्या आणि तीही फक्त तीनच घरची भिक्षा घेत असत. त्यामुळे तशी वस्ती नसल्यास त्यांच्यावर उपवासाचा प्रसंग येत असे. परन्तु असा उपवास घडला; तरी ठरल्याप्रमाणे त्यांचा दहा दहा कोसांचा प्रवास होत असे. तो कधीही चुकला नाही. त्यांच्या या नियमामुळे उत्तर आयुष्यात त्यांच्यावर उपवास काढण्याचे पुष्कळ प्रसंग आले.

तीन घरातून आणलेली भिक्षा ते एकत्र करीत. त्यांचे भिक्षा-ग्रहण करणे फक्त शरीर रक्षणासाठीच असे. जिव्हालौल्य व चव या गोष्टींना त्यांच्या अन्न ग्रहणात स्थान नव्हते. दुपारी कोणी काही विषय, ज्योतिष वगैरे समजावून घेण्यास आला; तर त्यास तो विषय सांगत व संध्याकाळचे नित्यकर्म आटोपल्यावर ते पुराण सांगत. श्रीस्वामीमहाराजांनी सांगितलेले पुराण ऐकून त्यांची अलौकिक बुद्धिमत्ता व सर्व शास्त्रांविषयीचे प्रगाढ ज्ञान या गोष्टी तेथील विद्वानांच्या नजरेला आल्या. त्यामुळे त्यांच्या अधिकाधिक सहवासाची अपेक्षा करणाऱ्या विद्वानांची आणि जिज्ञासू लोकांची संख्या दिवसेंदिवस वाढू लागली.

श्रीस्वामीमहाराजांचे वक्तृत्त्व अमोघ होते. त्यांच्यापाशी प्रकांड विद्वत्ता होती आणि विषय प्रतिपादनाची शैली अशी होती की, ऐकणारा त्यांच्या वक्तृत्त्वाच्या प्रवाहात वाहून जात असे. प्रति-पादन केलेल्या विषयावर मागाहून कोणी शंका काढून त्याचे समाधान करावे लागले असा प्रसंग येंत नसे. विषयाची हाताळणी अगदी सांगोपांग होत असे. कां होणार नाही ? श्रीदत्तप्रभूच्या कृपेने श्रीस्वामीमहाराजांच्या जिभेवर सरस्वती वास करीत होती. हळूहळू त्यांच्या कीर्तीचा सौरभ सगळीकडे पसरू लागला. प्रत्येक दिवशी पुराणाला गर्दी वाढतच होती. शास्त्र शिकणाऱ्यांचीही संख्य

वाढू लागली. श्रीस्वामीमहाराज ज्याप्रमाणे पुराण सांगत त्याप्रमाणे प्रवचनही करीत असत. उज्जयिनीमध्ये श्रीस्वामीमहाराज मराठी मधूनच निरूपण करीत; कारण त्यावेळी तेथे मराठी जाणणारी मंडळी पुष्कळ होती. वेळप्रसंगी ते विद्वान् श्रोत्यांसमोर अस्खलित संस्कृतमध्येही बोलत असत. श्रीस्वामीमहाराजांचे संस्कृत भाषें-वरील प्रभुत्व पाहून विद्वान् शास्त्रीमंडळी आश्चर्यचकित होत.

श्रीस्वामीमहाराजांच्या पुराणाचा, प्रवचनाचा आणि त्यांच्या संगतीचा आनंद लुटण्यासाठी येणाऱ्या लोकांची गर्दी दिवसेंदिवस वाढू लागल्यामुळे त्यांच्या या असामान्य लोकप्रियतेचा त्यांच्या श्रीगुरुस्वामींनाही अचंबा वाटला आणि त्यांच्या मनात आपल्या या शिष्याविषयी असूया जागृत झाली. परमेश्वराची माया किती अतर्क्य आहे पाहा ! एका संन्याशीगुरूच्या मनात आपल्या शिष्याच्या लोकप्रियतेबद्दल असूया जागृत व्हावी, याच्या इतकी दुसरी विलक्षण व अद्‌भुत गोष्ट कोणती असू शकेल ?

पुराण सांगताना अनेकदा वेदांचा भाग येत असे. श्रीस्वामी-महाराज श्रोत्यांसमोर वेदवाक्यांचा फक्त अर्थ सांगत असत. मात्र मूळ श्रुतिवचन उद्‌धृत करीत नसत; कारण पुराण वगैरे सांगताना वेदवाक्यांचा उच्चार करू नये, तसे केल्याने वेदपुरुष शाप देतो, असे ते म्हणत.

भाद्रपद पौर्णिमेला श्रीस्वामीमहाराजांचा पहिला चातुर्मास संपला. श्रीगुरुस्वामींची अनुज्ञा घेऊन यापुढे श्रीदत्तप्रभूंच्या आज्ञे-प्रमाणे सनातन धर्माच्या रक्षणासाठी व प्रसारासाठी त्यांनी आपला आसेतुहिमाचल प्रवास सुरू केला. श्रीस्वामीमहाराजांनी संन्यास-धर्माला अनुसरून कोणत्याही वस्तूचा संग्रह केला नाही. मात्र नियमांना अनुसरून चार भगव्या लंगोट्या, दोन तशाच छाट्या, दंड, वेळवाचा किंवा लाकडाचा एक कमंडलू, एखादी धावळी

उपनिषदांची पोथी, पंचायतनाचा संपुष्ट, दोन श्रीदत्तमूर्ती व पाणी काढण्याची एक दोरी अशा या एवढ्याच संन्यास– धर्माला आवश्यक वस्तू ते जवळ बाळगोत असत. ते कधीही कोणाकडून कसलीही सेवा करून घेत नसत. स्वत:ची वस्त्रे धुणे वगैरे कामे ते स्वत:च करीत. त्याचप्रमाणे ते कोणाचा स्पर्शही करून घेत नसत व कोणालाही स्पर्श करीत नसत. शौचाला गेल्यानंतर तसेच दुसऱ्याचा स्पर्श झाल्यास ते स्नान करीत. पुष्कळदा स्नान करण्याचे प्रसंग दिवसातून अनेक वेळा येत. योग साधनेच्या सामर्थ्यामुळे व श्रीदत्तप्रभूंच्या कृपेने श्रीस्वामीमहाराजांना अनेक सिद्धी प्राप्त झाल्या होत्या; पण त्यांचा त्यांनी स्वत:साठी कधी वापर केला नाही. त्यांचा सर्व संचार पायी व अनवाणीच होत असे. याप्रमाणे श्रीस्वामीमहाराज अत्यन्त कडकडीतपणे शास्त्रीय नियमांचे पालन करीत असत, त्यामुळे त्यांच्या सदुपदेशाचा जनमनावर तात्काळ परिणाम होऊन लोक स्वधर्माचरणास प्रवृत्त होत असत. "आधी केलें मग सांगितलें" असे श्रीस्वामीमहाराजांचे वागणे होते.

उज्जयिनीहून श्रीस्वामीमहाराज महत्पुरास आले. तेथे त्यांचा काही दिवस मुक्काम झाला. ज्या ठिकाणी त्यांचा मुक्काम होत असे तेथे पुराण सांगणे, प्रवचन करणे, सदुपदेश करणे व नित्य ब्रह्मकर्मादि शिकविणे या गोष्टी होत असत. त्यांचे व्यक्तिमत्वच असे होते की, त्यांना पाहता क्षणीच गावातील लोक आपल्या हातून या स्वामींची काही सेवा व्हावी अशी मनापासून इच्छा करीत. श्रीस्वामीमहाराजांचे आचरण पाहून लोक त्यांच्याकडे आकृष्ट होत. ज्यावेळी प्रवचन पुराणादिकांच्या रूपाने श्रीस्वामीमहाराजांच्या मुखातून अमृतवाणी स्रवू लागे, त्यावेळी लोक अक्षरश: त्यांच्या भजनी लागत असत. त्यांना माणसांचा मेळावा गोळा करावा लागत नसे. तो आपोआपच होत असे. तो काळ असा होता

की, काषायवस्त्रे पाहिली की, लोक त्यांच्यापुढे नतमस्तक होत. साधूला साधू म्हणूच मान देत. आजच्याप्रमाणे प्रथमदर्शनी भोंदू म्हणून साधुसन्याशांकडे पाहण्याची लोकांची प्रवृत्ती नव्हती. साधू तो साधू. भोंदूचे पितळ उघडे पडावयाला वेळ लागत नसे. संन्याशाने कोणत्याही एकाच ठिकाणी तीन दिवसांहून अधिक काळ मुक्काम करू नये असा शास्त्रीय नियम आहे; पण लोकांच्या आग्रहास्तव पुष्कळदा हा नियम श्रीस्वामीमहाराजांना मोडावा लागे. त्यामागील कारण लोकहित हेच असे. संन्याशाला स्वार्थ नसतो. त्याला स्वत:चे असे काही साधावयाचे नसते.

महत्पुरास श्रीस्वामीमहाराजांचा काही दिवस मुक्काम झाला. तेथे एके दिवशी एका वेडसर माणसाच्या मागून काही मुले हुर्यो-करीत दगड मारीत धावत असलेली श्रीस्वामीमहाराजांनी पाहिली. तो वेडा जवळ जवळ अर्धनग्न होता. त्याच्या हातात कसले तरी गाठोडे होते व ते सांभाळीत मुलांच्या दगडांचा मारा चुकवीत तो पळत होता. त्याच्या एकंदर वृत्तीवरून असे दिसून येते होते की, मुलांकडून अंगावर पडणाऱ्या दगड गोटयांची त्याला भीती वाटत नव्हती. त्याच्या दृष्टीने तो एक खेळच चालला होता. त्या वेडयाचे नाव काळूमैया होते. (कालीचा भक्त म्हणून कालीमिया. त्याचाच अपभ्रंश काळूमैया )

त्यांची हककत लोकांनी श्रीस्वामीमहाराजांना सांगितली ती अशी. " काळूमैया जातीने ब्राह्मण असून ते महत्पुरचेच रहिवासी आहेत. सुरुवातीला ते आचारसंपन्न असे कालीचे भक्त असून त्यांनी अनेक वर्षे कालीमातेची भक्ती करून मोठी तपश्चर्या केली होती. पुढे ते ज्ञाननिष्ठ होऊन सप्तम भूमिकेपर्यंत पोहोचले.

एकदा शिंदे सरकारने श्रावण महिन्यात एक लक्ष भोजन घातले. त्यावेळी पंक्तीमधील उष्टे अन्न काळूमैयांनी खाल्ले. तेव्हापासून ते

असे वेडे झाले आहेत. लोकांना शिव्या देणे, दगड मारणे, ब्राह्मणाघरचे अन्न मिळाले तर ते टाकून ब्राह्मणेतराच्या घरचे खाणे असे त्यांचे चाळे चालू आहेत. " श्रीस्वामीमहाराजांनी ते दृष्टीस पडताच हे ओळखले की, काळूमैया ही एक वरच्या अवस्थेला पोहोचलेली विभूती आहे. त्यांची गलितकर्म अशी अवस्था आहे; पण असा माणूस समाजाच्या दृष्टीने वेडा ठरतो. लोक त्याला दगड मारतात. पोरे त्याच्या मागून आरडा–ओरडा करीत धावतात. काळूमैयांची लोक संपर्कापासून दूर राहण्यासाठी पांघरलेली ही विदेही वृत्ती आहे हे श्रीस्वामीमहाराजांनी ओळखले. त्यांनी गावातील प्रतिष्ठित लोकांना समजावून सांगितले की, "ईश्वरभक्तीमध्ये उच्च अवस्थेला पोहोचलेली ही व्यक्ती आहे. त्यांना कोणी त्रास देऊ नये. त्यांना जो कोणी त्रास देईल त्याच्यावर परमेश्वराचा कोप होईल." श्रीस्वामी महाराजांच्या तोंडचे वाक्य म्हणजे वेदवाक्यच! त्यानंतर लोकांनी काळूमैयांना त्रास द्यावयाचे सोडून दिले व ते त्यांच्याशी आदराने वागू लागले.

या काळूमैयांचा रामजी नावाचा एक ब्राह्मण भक्त होता. तो त्यांची सर्व सेवा करीत असे. काळूमैयांना स्नान घालणे, खाऊ घालणे, त्यांची वस्त्रे धुणे, ते कोठे तरी भटकत गेल्यास त्यांना परत आणून त्यांच्या स्थानावर निजविणे अशी त्यांची सर्व सेवा हा रामजी करीत असे. मात्र त्याने काळूमैयांना ओळखले होते असे म्हणता येणार नाही. प्रत्येक महात्म्याची सेवा करण्यासाठी कोणातरी शरीर रक्षकाची योजना परमेश्वराने केलेली असते. ही गोष्ट आपणास श्रीरामकृष्ण परमहंसांच्या जीवनात दिसून येते. श्रीचैतन्य महाप्रभूंची महाभाव अवस्था झाली की, त्यांच्या देहाची काळजी घेण्यासाठी त्यांचे भक्त सदैव त्यांच्या बरोबर असत. अशा तऱ्हेची कितीतरी उदाहरणे आहेत.

एकदा रामजीचे सांप्रदायिक गुरू महत्पुरला आले होते रामजीला भेटावयाला ज्यावेळी ते त्यांच्या घरी गेले. त्यावेळी रामजी काळूमैयांची सेवा करीत होता. काळूमैयांना चालताना टेकण्यासाठी म्हणून रामजीने एक जाड काठी दिली होती. आता रामजीच्या गुरूंना पाहताच आपल्या सेवेत जणू काही न्यून राहिले असा बहाणा करून काळूमैयांनी गुरूच्या समक्ष त्या जाड काठीने रामजीला जोरजोरात बेदम मारण्यास सुरुवात केली. काळूमैयांचा तो उग्र अवतार पाहून रामजीचे गुरू तर तेथून पळूनच गेले आणि पाहणारे लोकसुद्धा भयभीत झाले. मारून मारून त्या काठीचे शेवटी तुकडे झाले. तेही गोळा करून काळूमैयांनी "ले तेरी लकडी" म्हणून रामजीच्या अंगावर ते फेकून दिले व ते कोठेतरी निघून गेले. हा तमाशा पाहावयाला तेथे जे लोक जमले होते त्यांना रामजीने असे सांगितले की, "आपल्याला काठीचा एकही फटका लागला नाही. ज्यावेळी काळूमैया मारीत होते तेव्हा त्या माराचा काहीही त्रास होत नव्हता; उलट काठीचे प्रहार फुलांच्या वर्षावाप्रमाणे मृदू लागत होते." मात्र ज्यावेळी त्या काठीचे प्रहार रामजीच्या शरीरावर बसल्याची कोणतीच खूण दिसेना त्यावेळी लोकांचे डोळे उघडले. मग काळूमैयांची शोधाशोध सुरू झाली; पण काळूमैया होते कुठे ? शेवटी रामजीलाच त्यांना शोधून आणावे लागले. रामजीला गुरुप्रसाद मिळाला होता. त्याने केलेल्या सेवेचे सार्थक झाले होते. त्या दिवसापासून रामजी जीवन्मुक्ताच्या अवस्थेत राहू लागला. काळूमैयांनी देहत्यागापूर्वी चाळीस दिवस अगोदर उन्मत्त अवस्था टाकून दिली व अन्नपाणी वर्ज्य करून ते ध्यानस्थ अवस्थेत राहू लागले. शके १८२२ मध्ये म्हणजे इ. स. १९०० मध्ये त्यांनी आपल्या मर्त्य शरीराचा त्याग केला.

महत्पूरच्या सत्पुरुषाची तेथील लोकांना ओळख पटवून

श्रीस्वामीमहाराज पुढील संचाराला निघाले. पुढील मुक्काम सारंगपूर या गावी झाला. श्रीस्वामीमहाराज सारंगपूरला येऊन पोहोचण्यापूर्वीच त्यांच्या कीर्तीचा सौरभ तेथे पसरला होता. तेथे एक नाट्य घडावयाचे होते. नव्हे एका नाटकाचा गोड शेवट व्हावयाचा होता. एका वाट चुकत असलेल्या जीवाचा श्रीस्वामीमहाराजांच्या शब्दोच्चारानेच उद्धार व्हावयाचा होता.

महत्पूरला एका देवालयामध्ये श्रीस्वामीमहाराजांचा मुक्काम होता. त्या मंदिरात एका बाजूला देव ठेवून तेथेच बसून ते आपले आह्निक करीत असत. त्या दिवशी देवांची सकाळची पूजा भस्मलेपनाने झाल्यावर सकाळचे आह्निक उरकून श्रीस्वामीमहाराज भेटावयाला आलेल्या लोकांना शास्त्रातील काही विषय समजावून देत होते; तर काही जणांच्या शंकांचे निरसन करीत होते. दिवसाचा पहिला प्रहर संपावयाला आला होता.

त्यावेळी समोरच्या रस्त्यावरून एक गृहस्थ येत होते. त्यांचे नाव श्री. केशवराव असून ते एक देवी डॉक्टर होते. श्रीस्वामीमहाराजांचा मुक्काम होता त्या मंदिराकडेच श्री. केशवराव वळले. श्रीस्वामीमहाराजांसमोर बसलेल्या लोकांच्या नजरा त्या नवागताकडे वळल्या. त्यावेळी सर्वांच्या कपाळावर आठ्या पडल्या. ही ब्याद येथे कशाला आली या भावनेने जो तो बसल्या जागी चुळबूळ करू लागला; कारण ते नेहमीच श्रीस्वामीमहाराजांची व त्यांच्याकडे जाणाऱ्या लोकांची निंदा करीत असत. इतकेच नव्हे; तर स्नान, संध्या, नैवेद्य, वैश्वदेव वगैरे आचारधर्मही त्यांनी सोडून दिले होते. त्यामुळे तेथे जमलेल्या लोकांना त्या गृहस्थांचे श्रीस्वामीमहाराजांकडे येणे योग्य वाटले नाही. श्री. केशवराव अत्यंत नास्तिक गृहस्थ होते. त्यांचे श्रीस्वामीमहाराजांकडे येणे नक्कीच चांगल्या हेतूने नसणार असे सर्वांना वाटले. देवाधर्माची व साधुसंतांची टवाळी करणारे हे गृहस्थ! त्यांचे

श्रीस्वामीमहाराजांकडे काय काम असणार? लोक आपापसात कुजबुजू लागले. त्यांचे कुजबुजणे श्रीस्वामीमहाराजांच्या कानी गेले होते; पण ते आपल्या नित्यकर्मामध्ये निमग्न होते. त्यांनी फक्त एक वेळ नजर वर करून त्यांच्याकडे पाहिले. इतक्यात श्री. केशवराव श्रीस्वामीमहाराजांच्या समोर आले व त्यांनी त्यांना उभ्यानेच नमस्कार केला व ते इतर लोकांपासून जरा दूर जाऊन बसले. श्रीस्वामीमहाराजांनी प्रश्नार्थक मुद्रेने त्यांच्याकडे पाहून येण्याचे कारण विचारले.

त्यावेळी ते त्यांना असे म्हणाले की, "मी पुण्याचा राहणारा असून माझे नाव केशव बळवंत भट असे आहे. मी कऱ्हाडे ब्राह्मण असून येथे सरकारी दवाखान्यात देवीचा डॉक्टर आहे. आमच्या मातुश्रींची अशी इच्छा आहे की, आज आपण आमच्याकडे भिक्षेला यावे."

अलर्क राजाला पाहिल्यावर भगवान् श्रीदत्तात्रेयांनी मनात असे म्हटले होते की, "हे मदालसा गर्भरत्न। येथें यत्न नलगेची ॥" श्री. केशवरावांना पाहताच श्रीस्वामीमहाराजांनी हे ओळखले की, यांचे प्रारब्ध संपत आले आहे. येथे विशेष यत्न करावा लागणार नाही; पण तसे काही न दर्शविता श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "तुम्ही ब्राह्मण आहात म्हणता; पण तुमच्या बोलण्या-चालण्यात व तुमच्या वेषात तुम्ही ब्राह्मण आहात असे दिसत नाही. ब्राह्मण धर्म तरी पाळता का? स्नान, संध्या, नैवेद्य, वैश्वदेव वगैरे घरी करता की नाही?"

"नाही, यांपैकी मी काहीसुद्धा करीत नाही. मला तसा वेळच मिळत नाही. आमच्या पेशाच्या लोकांना हे सर्व उपद्व्याप करून कसे चालेल?" श्री. केशवरावांच्या प्रत्येक शब्दात बेपर्वाईची वृत्ती दिसून येत होती.

"आपण ब्राह्मणधर्म पाळीत नाही असे सांगताना तुम्हाला काहीसुद्धा वाटत नाही ? तुमच्या सारख्या धर्मभ्रष्ट माणसाकडे आम्ही भिक्षेला कसे येणार ? " हे ऐकताच श्री. केशवराव त्यांना असे म्हणाले की, "तेवढ्यानेच जर आपले अडत असेल तर आपणासाठी आजच्यापुरता कोणाकडूनतरी नैवेद्य, वैश्वदेव करून घेतो. मग तर आमच्या घरचे भिक्षेचे आमंत्रण स्वीकाराल की नाही ? " पुन्हा त्याच उर्मटपणे त्यांनी विचारले.

या उत्तराने श्रीस्वामीमहाराजांचा मूळचा गंभीर दिसणारा चेहरा कठोर झाला व ते त्यांना रागाने असे म्हणाले की, "अशा तऱ्हेची भाषा येथे वापरावयाला तुम्हाला लाज वाटत नाही ? तुमच्यासारख्या धर्मभ्रष्ट माणसाचे तोंडही पाहण्याची माझी इच्छा नाही; मग भिक्षा तर दूरच राहिली. " ही सरबत्ती ऐकल्यावर श्री. केशवराव जळफळत निघून गेले.

श्रीस्वामीमहाराजांना भयंकर क्रोध आला होता; पण तो खरा क्रोध नव्हता. तो कृतककोप होता. श्रीस्वामीमहाराज कधीच कोणावर रागवत नसत. त्यांचा आताचा कोप हा श्री. केशवरावांच्या उद्धाराचे रसायन होते. श्रीस्वामीमहाराजांच्या एकेका शब्दाबरोबर श्री. केशवरावांच्या उरल्यासुरल्या प्रारब्धाचा लोप होत गेला. पण या गोष्टी लोकांना थोड्याच दिसून येणार ? मात्र दिसून आले ते क्रोधायमान श्रीस्वामीमहाराज. जणू हातात उदक घेऊन शाप द्यावयाला निघालेले दुर्वास ऋषीच ! पण लोकांना भीती वाटली ती श्रीस्वामीमहाराजांची नाही; तर श्री. केशवरावांची ! हा माणूस रागाने निघून गेला ही काही चांगली गोष्ट झाली नाही असे लोकांनी बोलूनही दाखविले. त्यावेळी श्री. केशवराव यांचा थोडा पूर्वेतिहास तेथील लोकांनी पुढीलप्रमाणे श्रीस्वामीमहाराजांना सांगितला. " श्री. केशवराव हे पुण्याकडचे कऱ्हाडे ब्राह्मण आहेत.

पुण्यात त्यांचे लग्न झाल्यावर व्यवसायानिमित्त ते सारंगपूर संस्थानामध्ये आले व येथेच देवीचे डॉक्टर म्हणून त्यांची नियुक्ती झाली. सारंगपूरच्या मामलेदारांच्या घरी ते राहत होते. आपला विवाह झाला असून आपली पत्नी पुण्यामध्ये आहे ही गोष्ट त्यांनी सर्वांपासून लपवून ठेवली होती. ज्या मुलीबरोबर त्यांचा विवाह झाला होता तिच्यामुळेच तर श्री. केशवरावांचा उद्धार व्हावयाची वेळ आली होती. श्री. केशवरावांच्या उद्धारासाठी आणि स्वत:च्या प्रारब्धाचा उरलासुरला भोग भोगून संपविण्यासाठी तिचा त्यांच्यासारख्या दुष्ट माणसाशी विवाह झाला होता. श्री. केशवरावांना मात्र ती पत्नी आवडली नव्हती. तिला टाळण्यासाठी ते एवढ्या दूर येऊन राहिले होते. श्री. केशवरावांनी तिला जवळजवळ टाकलीच होती. त्याकाळी मुलींची लग्ने लहान वयात होत. वयात आल्यावर ती पतिव्रता नवऱ्याचा शोध घेतघेत सारंगपूरला आली. आपला पती या गावी डॉक्टर असून तो मामलेदारांच्या घरी राहतो असे चौकशीअंती तिला कळले.

मामलेदारांच्या घरी ती पोहोचली तेव्हा मध्याह्न व्हावयाला आली होती. श्री. केशवरावांच्या पत्नीच्या चेहऱ्यावर एक प्रकारचे सात्त्विक तेज दिसून येत होते. मामलेदारांना तर भर मध्याह्नी लक्ष्मीच आपल्या दाराशी आली आहे, असे वाटले. "तू कोण आहेस ?" वगैरे चौकशी न करता त्यांनी तिला घरात घेतले व त्यांच्या पत्नीने तिला हातपाय धुण्यासाठी पाणी दिले. यथावकाश त्यांनी तिची चौकशी केली. आपण श्री. केशवरावांच्या पत्नी आहोत असे तिने सांगितल्यावर मामलेदारांना तिची कहाणी प्रथमदर्शनी खरीच वाटेना. श्री. केशवरावांसारखा एक प्रतिष्ठित माणूस एवढी वर्षे आपणाबरोबर राहतो आहे आणि त्याने आपला विवाह झाला आहे, ही गोष्ट आपणास कधी सांगितली नाही, याचे त्यांना

आश्चर्य वाटले; पण जेव्हा श्री. केशवराव यांच्या पत्नी वारंवार तीच गोष्ट सांगू लागल्या तेव्हा ही बाई खोटे बोलत असेल असेही त्यांना वाटेना. एवढ्यातच श्री. केशवरावही बाहेरून आले. पहिल्याने आपला विवाह झाला आहे ही गोष्ट ते कबूल करीनात; पण आपली पत्नी येथे आली आहे हे कळताच ते फार रागावले. तिने येथून निघून जावे वगैरे रागाचे उद्‌गार त्यांनी काढले. मामलेदारांना ही गोष्ट आवडली नाही. एका निरपराध असाहाय्य स्त्रीवर होत असलेला अन्याय त्यांना सहन झाला नाही. "माझ्या घरी भर दुपारी आलेल्या लक्ष्मीला मी यावेळी परत जाऊ देणार नाही. मी गृहस्थाश्रमी आहे. मुली तू आत जा. माझी मुलगी समजून मी तुला सांगतो आहे." असे म्हणून मामलेदारांनी तिला आपल्या घरी ठेवून घेतले. श्री. केशवरावांना चार समजुतीच्या गोष्टी सांगितल्यावर नाइलाज म्हणून त्यांनी आपल्या पत्नीबरोबर संसार करण्याचे मान्य केले. खरे म्हणजे तिने श्री. केशवरावांबरोबर लग्न झाल्यापासून आजपर्यंन्त जवळजवळ एक तप केलेल्या तपश्चर्येचे सात्त्विक तेज तिच्या चेहऱ्यावर दिसत होते. त्याच तेजाने श्री. केशवरावांना तिच्याबरोबर संसार करावयाला भाग पाडले होते.

संसाराला सुरुवात झाली आणि पत्नीच्या दैवी गुणांची श्री. केशवरावांना प्रचीती येऊ लागली. त्या बाईच्या चेहऱ्यावर असे दिव्य तेज होते की, लोक तिच्याकडे मोठ्या आदराच्या भावनेने पाहत असत. तिची वृत्ती नेहमी शांत असे. जे जे काही घडते त्याकडे साक्षित्वाने पाहावयाचे हा तिचा स्वभावधर्म होता. हे सर्व पूर्वजन्मीचे संस्कार होते. कालांतराने या दांपत्याला एक मुलगा झाला. जन्मतःच तो तेजस्वी, आजानुबाहू व मेधावी होता. वयाच्या तिसऱ्या वर्षापासून त्याने मनाचे श्लोक पाठ करून म्हणावयाला सुरुवात केली. घरी आलेल्या आतिथीबद्दल त्याला आदर वाटत असे. भिक्षेकरी

दाराशी आला तर तो त्याच्याशी प्रेमाने बोलत असे व त्याला काहीतरी देत असे. अशा गोड स्वभावाचा तो मुलगा होता. साऱ्या सारंगपूर गावाला त्याने वेड लावले होते. ज्याला त्याला तो हवासा वाटे. त्याला पाहण्यासाठी लोक मुद्दाम सरळ वाट सोडून श्री. केशवरावांच्या घरावरून जात असत.

या पुढील त्या मुलाची हकीकत तर अगदी विलक्षणच आहे. गुरांच्या शेणाच्या उकिरडयामध्ये बारा वर्षे वाढत असलेल्या बाळ गोरक्षाला श्रीमच्छिन्द्रनाथांनी "अलखनिरंजन" अशी हाक मारताच उक़िरडयातून वर आलेला तो बालयोगी श्रीमच्छिन्द्रनाथांच्या मागून चालू लागला होता. कोकणातील एक संत श्रीसोहिरोबानाथ आंबिये यांना रानातून प्रवास करीत असताना मार्गात श्रीगैबीनाथ भेटले. दोघांची दृष्टादृष्ट झाली आणि क्षणार्धात श्रीगैबीनाथांनी श्रीसोहिरोबांना तुरिया अवस्थेत नेले. अशा प्रकारचीच विलक्षण घटना सारंगपूरमध्ये श्री. केशवरावांच्या मुलाच्या बाबतीत घडली.

त्यांचा मुलगा आता पाच वर्षांचा झाला होता. एक दिवस एक जटाधारी योगी श्री. केशवरावांच्या घरी भिक्षेसाठी आला. नेहमी प्रमाणे त्या मुलानं दारी आलेल्या जटाधाऱ्यासाठी ओंजळभर धान्य आणले. त्याने धान्याची ओंजळ पुढे केली; पण जटाधाऱ्याने भिक्षा घेण्यासाठी आपली झोळी पुढे केली नाही. आपण आणलेली भिक्षा हा का स्वीकारीत नाही म्हणून प्रश्नार्थक मुद्रेने त्याने योग्याच्या चेहऱ्याकडे पाहिले. त्यावेळी साधूच्या दृष्टीला मुलाची दृष्टी मिळाली आणि एका ज्योतीने दुसरी ज्योत प्रज्ज्वलित झाली.

इतक्यात तो साधू त्या मुलाला असे म्हणाला की, "क्यो बेटा! और कहाँतक इस प्रपंचमें रहनेका इरादा है? इस अनित्य संसारमें रहनेसे क्या होता है यह अभीतक जाना नहीं? परमानंद भूल गये? परमानंद यहाँ नहीं मिलेगा."

ज्योत प्रज्ज्वलित झालीच होती. आता उशीर कसला, ही जाणीव होऊन तो मुलगा त्या साधूला असे म्हणाला की, "हां बाबा ! जान गया. मुझे मेरी पहचान हो गयी. मैं कलही आऊंगा." हा सर्व प्रकार श्री. केशवराव व त्यांच्या पत्नी यांच्या समक्ष घडला; पण श्री. केशवरावांना त्याचे काहीही वाटले नाही. त्यांच्या पत्नीला या घटनेचा अर्थ कळला असावा; पण आपणास काही कळले असल्याचे तिने दर्शविले नाही.

मुलाने आईवडिलांकडे आग्रह धरून गावातील लोकांना दुसऱ्या दिवशी सकाळी आपल्या घरी येण्याचे आमन्त्रण दिले. उद्या अशी कोणती गोष्ट घडणार होतीकी, ज्यासाठी सर्वांना श्री. केशवरावांच्या घरी सकाळीच येण्याचे आमंत्रण यावे ? दुसऱ्या दिवशी मामलेदारांच्या घरासमोरील अंगणात सर्व गाव जमा झाला. प्रत्येकाच्या चेहऱ्यावर कुतूहल व औत्सुक्य होते. डॉक्टरांचा मुलगा स्नान करून बाहेर आला आणि त्याने सर्वांना आदराने नमस्कार केला. त्याचा नेहमीचा हसरा व आनंदी चेहरा गंभीर आणि अधिक तेज:पुंज दिसत होता. त्याच्या शरीराभोवती एक प्रकारची अस्पष्ट आभा दिसत होती. लोकांना नमस्कार केल्यावर त्याने बोलावयाला सुरुवात केली. "आजपर्यंत तुम्ही सर्वांनी मला प्रेम दिले. तुमच्या या प्रेमाची मी परतफेड करू शकत नाही. हा संसार म्हणजे प्रेमाचाच एक खेळ आहे. यच्चयावत् सृष्टीवर प्रेम करणे हीच ईश्वरभक्ती आहे. हा प्रपंच अनित्य आहे. हा एक खेळ आहे. या खेळामध्ये आपापला खेळ खेळण्यासाठी आपण सर्वजण येथे आलो आहोत. आपला भाग खेळून संपला की, आपल्याला पुढील मार्गाला लागावयाचे आहे. प्रत्येकाचे गन्तव्य स्थान वेगवेगळे आहे." आणखीही पुष्कळ गोष्टी त्याने लोकांना सांगितल्या. आज बोलत होता तो

श्री. केशवरावांचा मुलगा नव्हता. त्याच्या मुखातून आज दुसरेच कोणीतरी बोलत होते. लोक आता एवढे चकित झाले होते की, तो काय बोलतो आहे याच्याकडे त्यांचे लक्षच नव्हते. आणि लक्ष असते तरी ते त्यांना कळले असते असे नाही; कारण त्याने जे सांगितले ते लोकांच्या आकलन शक्तीच्या पलीकडचे होते. शेवटी "सदासर्वदा योग तूझा घडावा। तुझे कारणी देह माझा पडावा। उपेक्षूं नको गूणवंता अनंता। रघूनायका मागणे हेचि आतां॥" हा श्रीसमर्थ-रामदासस्वामीमहाराजकृत करुणाष्टकातील श्लोक म्हणून त्याने सर्वांसमक्ष तेथेच देह ठेवला.

अशा रीतीने मुलाने देह ठेवला; तरी त्याच्या आईच्या चेहऱ्यावर दुःखाची छटासुद्धा दिसली नाही. ती स्थितप्रज्ञासारखी वागत होती. जणू तपस्विनीच! दुःख झाले ते साऱ्या सारंगपूर गावाला. त्यावेळी त्या मुलाची आई तर जमलेल्या लोकांना असे सांगू लागली की, "सर्व संसार अनित्य आहे. या जगातील नाती व स्नेहसंबंध हे प्रवाहात वाहणाऱ्या व दैवयोगाने क्षणभर एकत्र येणाऱ्या लाकडाच्या काष्ठासारखे असतात. ही काष्ठे प्रवाहाच्या अधीन असल्यामुळे अल्पकाळातच या काष्ठांची कायमची ताटातूट होते व ती पुन्हा कधीही एकत्र येत नाहीत. कोण कोणाचा मुलगा, कोण कोणाची आई, कोण कोणाचा पती व कोण कोणाची पत्नी? ऋणानुबंध असे पर्यन्तच सर्व संबंध असतात. जगात कोणाचाही संबंध खरा नाही." असा आपल्या बोलण्याचा समारोप करून पुढे ती असे म्हणाली की, 'मीसुद्धा आजपासून सहा महिन्यांनी पंढरपूर क्षेत्रामध्ये देह ठेवणार आहे." मुलाने सर्वांसमक्ष देह ठेवणे व त्याच्या आईने हे भाकित वर्तविणे या सर्वच गोष्टी विचित्र होत्या. त्यामुळे लोकांना एकामागून एक धक्के बसत होते.

या सर्व अलौकिक घटना घडूनही श्री. केशवरावांचे प्रारब्ध अजून

न संपल्यामुळे, त्यांच्या स्वभावामध्ये व वागणुकीमध्ये विशेष फरक पडला नाही. खरे म्हणजे श्री. केशवराव एक भाग्यवान् गृहस्थ होते; कारण त्यांच्या उद्धारासाठी दोन जीवांनी आपली जीवन-नौका त्यांच्या जीवनाशी निगडीत केली होती. त्यांच्या उद्धारासाठी प्रत्यक्ष श्रीदत्तावतार श्रीवासुदेवानंदसरस्वतीस्वामीमहाराज सारंगपूरला आले होते. वरील घटनेनंतर सहा महिन्यांनी आपणास पंढरपूरला घेऊन चला अशी श्री. केशवरावांच्या पत्नीने त्यांना विनंती केली. वास्तविक श्री. केशवराव हटवादी गृहस्थ होते. मात्र मुलाच्या आकस्मिक मृत्यूमुळे व त्याच्या आईने केलेल्या भाकितामुळे ते एक प्रकारे हतबुद्ध झाले होते. या सर्व घटनांच्या प्रवाहामध्ये ते वाहत चालले होते. पत्नीला घेऊन ते पंढरपूरला गेले. त्यांच्या सोबत मामलेदारही होते.

श्रीक्षेत्र पंढरपूर येथे आल्यावर एकादशीच्या दिवशी श्री. केशवराव आणि त्यांच्या सौ. मंडळींनी सकाळी चंद्रभागेमध्ये स्नान केले. पुंडलिकाचे दर्शन घेऊन सर्वजण विठ्ठल मंदिरामध्ये गेले. श्री. केशवरावांचया पत्नीने पांडुरंगाच्या चरणावर मस्तक ठेऊन दर्शन घेतले. नंतर तिने आपल्या पतीला नमस्कार केला. त्यानंतर तेथील सर्व लोकांना नमस्कार करून ती श्री. केशवरावांना असे म्हणाली की, "माझ्यापासून आपला वंश वाढला नाही; कारण आपले ऋणानुबंध तेवढेच होते. पुढे तुमचा द्वितीय संबंध श्री. मोरोपंत पराडकरांच्या कुटुंबातील एका मुलीशी होऊन तिच्यापासून तुमचा वंश वाढेल. तुम्ही माझे पतिदेव आहात. तुम्हाला मी काय सांगणार ? मी आज जाणार आहे. नेहमी परमेश्वराचे स्मरण ठेवा." असे म्हणून श्रीविठ्ठलाचे नाव घेत हरिस्मरणपूर्वक तिने पंढरपुरात देह ठेवला.

पत्नीचे और्ध्वदेहिक उरकल्यानंतर श्री. केशवराव पुण्याला गेले. त्यापूर्वीच त्यांच्या आयुष्यात घडलेल्या अघटित घटना पुण्याच्या

लोकांच्या कानी आल्या होत्या. श्री. मोरोपंतांना श्री. केशवराव पुण्याला आल्याचे समजताच ते स्वतःच त्यांना भेटावयाला गेले व त्यांनी विवाहाची बोलणी सुरू केली. प्रथम श्री. केशवरावांनी अगदी स्पष्ट शब्दात "मी पुन्हा लग्न करणार नाही." असे सांगून त्यांना परतवून लावले. आपल्या पत्नीने मृत्यूपूर्वी आपल्या लग्नासंबंधी जे भाकित करून ठेवले होते त्याप्रमाणे घडू नये म्हणून श्री. केशवरावांनी पुष्कळ प्रयत्न केले; पण नशिबात लिहिलेले थोडेच टळणार? अखेर श्री. मोरोपंतांच्या कुटुंबातील त्या मुलीशी श्री. केशवरावांचा दुसरा विवाह झाला लग्नानंतर श्री. केशवराव आईला व पत्नीला घेऊन पुन्हा सारंगपूरला आले. द्वितीय पत्नीपासून त्यांना श्रीपाद नावाचा एक मुलगा झाला. एवढे सगळे रामायण घडले; पण श्री. केशवरावांच्या स्वभावात म्हणण्यासारखा फरक पडला नाही. त्यांची मूळ प्रकृती वेळप्रसंगी डोके वर काढीत असते."

अशा रीतीने वर वर्णन केलेला प्रसंग घडल्यानन्तर वरीलप्रमाणे श्री. केशवराव यांच्या जीवनात आतापर्यन्त घडलेल्या घटना लोकांनी श्रीस्वामीमहाराजांच्या कानावर घातल्या व ते त्यांना असे म्हणाले की, "आम्ही सारंगपूरचे लोक त्यांना एक दुष्ट मनुष्य म्हणूनच ओळखत आहोत. ज्याअर्थी ते इतक्या रागाने येथून निघून गेले त्याअर्थी ते आपणाकडे पुन्हा परत येतील असे वाटत नाही."

श्री. केशवरावांची ही सर्व कथा ऐकून श्रीस्वामीमहाराज तेथील लोकांना असे म्हणाले की, "तुम्ही थोडा धीर धरा व काय घडते आहे ते पाहा. केशवराव येथे पुन्हा निश्चित परत येतील."

श्रीस्वामीमहाराजांकडून झालेला आपला अपमान श्री. केशवराव सहन करू शकले नाहीत. ते काही वेगळयाच मनस्थितीत घरी परत आले. आपल्याला असे काय होत आहे ते त्यांना कळेना. त्यांच्या मूळ स्वभावाची जळमटे आता हळूहळू गळून पडत होती. घरी

जाऊन घडलेली सर्व हकिकत त्यांनी आईच्या कानावर घातली. आईनेही त्यांची चांगलीच कानउघडणी केली. वास्तविक आईच्या आग्रहासाठी म्हणूनच त्यांनी श्रीस्वामीमहाराजांना भिक्षेचे आमंत्रण दिले होते. श्रीस्वामीमहाराज आपल्या घरी भिक्षेला येत नाहीत म्हणून त्यांच्या आईला फार वाईट वाटले. ती आपल्या मुलाला असे म्हणाली की, "श्रीस्वामीमहाराज आपल्या घरची भिक्षा घेणार नाहीत; तर मग आपण ब्राह्मण तरी कसले? माझ्या नशिबी एवढे-सुद्धा धर्मकार्य लिहिलेले नाही. आपले प्रारब्धच वाईट आहे, त्याला तू तरी काय करणार ? "

आईच्या तोंडचे हे शब्द कानी पडावयाला आणि श्री. केशव-रावांचे प्रारब्ध संपावयाला एकच गाठ पडली. आईच्या तोंडचे शब्द ऐकताच कसेही करून श्रीस्वामीमहाराजांना आपल्या घरी भिक्षेला आणावयाचेच असा निश्चय करून ते पुन्हा त्याच पावली मागे वळाले आणि जवळ जवळ धावतच ते मंदिरात परत आले. श्रीस्वामी-महाराजांसमोर येऊन त्यांनी साष्टांग नमस्कार घातला व ते अत्यंत नम्रतेने व काकुळतीने त्यांना असे म्हणाले की, "महाराज ! मी चुकलो. मी महादोषी आहे. मी पतित आहे. आपण पतितपावन आहात. आपणा शिवाय मला कोण पदरात घेणार ? यापुढे आपण सांगाल तसे मी वागेन. आता आपले हे चरण मी सोडणार नाही."

श्री. केशवरावांमध्ये झालेले हे परिवर्तन म्हणजे दहावे आश्चर्यच होते. हे नाट्य पाहण्यासाठी गावातील लोक अद्याप श्रीस्वामी-महाराजांजवळच बसून होते. झालेला हा प्रकार पाहून श्रीस्वामी-महाराज प्रत्यक्ष भगवान् श्रीदत्तात्रेयच आहेत अशी त्यांची भावना झाली आणि या नवीन दृष्टीने सर्वांनी श्रीस्वामीमहाराजांना साष्टांग नमस्कार घातला.

वेड्यासारखा धावत सुटलेला आपला रागीट मुलगा काही

भलतेच तर करणार नाही ना या आशंकेने घाबरलेली श्री. केशवरावांची आई त्यांच्या मागोमागच निघाली होती. तीही यावेळी तेथे जाऊन पोहोचली. आपल्या मुलामध्यं झालेले परिवर्तन पाहून तिला सुद्धा आश्चर्य वाटले; पण आश्चर्यापेक्षा तिला आनंदच अधिक झाला. ती श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाली की, "महाराज! आपण माझ्या मुलाला पदरात घ्या. त्याला ब्रह्मकर्म शिकवा. त्याला त्यातले काहीसुद्धा येत नाही. तो आपणाकडे ब्रह्मकर्म शिकून ते करू लागल्यावर आपण आमच्या घरी भिक्षेला येऊन माझी इच्छा पूर्ण करा."

श्रीस्वामीमहाराजांच्याच हातून श्री. केशवरावांचा उद्धार व्हावयाचा असल्यामुळे त्यांच्या आईची इच्छा मान्य करून श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना स्वतः संध्या, पूजा, वैश्वदेव इत्यादि नित्यब्रह्मकर्म शिकविले व त्याप्रमाणे ते वागू लागल्यावर त्यांच्या आईच्या इच्छेप्रमाणे ते त्यांच्या घरी भिक्षेस गेले. पुढे श्री. केशवराव अत्यंत आस्तिक होऊन मोठ्या नम्रपणे वागू लागले व नित्यकर्म झाल्याशिवाय पाणीसुद्धा प्यावयाचे नाही इत्यादि नियमांच्या पालनाने अत्यंत आचारसंपन्न बनले.

सत्संगतीचा महिमा किती अपार व अभूतपूर्व आहे, हेच या उदाहरणावरून स्पष्टपणे लक्षात येते. या दृष्टीने "महत्संगस्तु दुर्लभोऽगम्योऽमोघश्च ॥३९॥" असे जे एक सूत्र देवर्षी श्रीनारदांनी आपल्या भक्तिसूत्रात ग्रथित केले आहे, त्याचा अर्थ मनन करण्यासारखा आहे, यात शंकाच नाही. अहेतुकपणे कृपा करणाऱ्या महापुरुषांचा किंवा सत्पुरुषांचा सत्संग प्राप्त होणे अत्यन्त दुर्लभ म्हणजे सहजासहजी प्राप्त न होणारा, अगम्य म्हणजे सहजतेने न कळणारा अर्थात् अज्ञेय किंवा अचिंत्य आणि जर का तो लाभला; तर अमोघ म्हणजे व्यर्थ न जाणारा अर्थात् अचूक फल

किंवा सिद्धी देणारा आहे, असे जे देवर्षी श्रीनारदांनी सांगितले आहे ते किती यथार्थ आहे, ते आपणास वरील कथा वाचली की स्पष्ट होते. शिळा होऊन पडलेल्या अहिल्येचा उद्धार प्रभू श्रीरामचंद्राच्या चरणस्पर्शाने झाला आणि गौतम ऋषींच्या आश्रमात येण्याचे त्यांचे कार्यही पूर्ण झाले. श्री. केशवराव यांचा उद्धार केल्यावर सारंगपूरला येण्याचे श्रीस्वामीमहाराजांचे उद्दिष्टही पूर्ण झाले. कालमानाप्रमाणे व्यक्ती व प्रसंग निराळे दिसले; तरी त्यातील उद्धारकार्याचे अंतःसूत्र एकच असते, हे सत्य आहे व त्या व्यक्तींची पात्रताही एकसारखीच म्हणजे तितक्याच अलौकिक व लोकोत्तर दर्जाची असते, हेही नितांत सत्य आहे.

सारंगपूर येथील कार्यभाग पूर्ण झाल्यावर श्रीस्वामीमहाराजांनी पुढील मुक्कामाला जावयाचे ठरविले. पुढे जाण्यापूर्वीच त्यांच्या जवळची ती कागलची प्रसिद्ध श्रीदत्तमूर्ती त्यांना येथेच सोडून कायमची दुसरीकडे गेली.

श्रीस्वामीमहाराजांकडील कागलची मूर्ती ही देवकळा प्राप्त झालेली तेजस्वी मूर्ती होती. त्या मूर्तीने माणगावला सातवर्षे आपल्या भक्तीने लोकांना वेडे केले होते.त्या मूर्तीमधील प्रखर ईश्वरी तेज सहन करावयाला फक्त श्रीस्वामीमहाराजच समर्थ होते; कारण श्रीदत्तप्रभूंच्या इच्छेने श्रीस्वामीमहाराजांनी लहानपणापासून आपले आचरण अत्यंत शुद्ध ठेवले होते. शास्त्रांचा पारंपारिक दृष्टिकोनातून अभ्यास करून शास्त्रात सांगितल्याप्रयाणे ते आपले जीवन जगत होते. जी शुचिर्भूतता माणसाला देवाचिये द्वारी आणून पोहोचविते ती शूचिर्भूतता त्यांनी ब्रह्मचर्याश्रमात पाऊल टाकण्यापूर्वीपासूनच पाळावयाला सुरुवात केली होती आणि या सर्वांवर कळस म्हणून त्यांनी उग्र साधना केली होती. आता यावेळी श्रीस्वामीमहाराजांजवळ दोन श्रीदत्तमूर्ती होत्या. त्यातील एक ती प्रसिद्ध कागलची मूर्ती असून

दुसरी देवांच्याच सांगण्याप्रमाणे बनवून घेतलेली चांदीची अंगुष्ठमात्र प्रवासातील मूर्ती होती. कागलची मूर्ती आकाराने मोठी होती. ही मूर्ती आपणाला मिळावी अशी इच्छा श्रीस्वामीमहाराजांचे सारंगपूरमधील एक भक्त श्री. गोविंदराव यांना झाली; परंतु त्या मूर्तीचे सामर्थ्य व दाहकता इतकी विलक्षण होती की, आधारदुर्बलतेमुळे त्या मूर्तीचे हे असामान्यत्व कोणाही सामान्य व्यक्तीला सहन होणे शक्य नाही याची श्र स्वामीमहाराजांना पूर्ण कल्पना होती.

ती मूर्ती आपणापाशी असावी अशी इच्छा श्री. गोविंदराव यांना का झाली कोण जाणे ? ती संन्याशाकडची मूर्ती गृहस्थाश्रमी माणसाला फलदायी ठरेल की नाही हा प्रश्नच होता. श्रीस्वामीमहाराज त्या मूर्तीची जी पाळणूक करीत तशी पाळणूक आपल्या हातून होईल की नाही याचा विचार श्री. गोविंदरावांनी केला नाही; पण श्रीस्वामीमहाराजांना तो विचार करणे भाग होते. ज्वलन्त अग्नीचा गोळा दुसऱ्याच्या पदरात बांधावयाला ते तयार नव्हते. त्यामुळेच ते श्री. गोविंदरावांना असे म्हणाले की, "या दोन्ही मूर्तींपैकी एकही मूर्ती तुमच्या उपयोगाची नाही. त्यांची कोठेतरी स्थापना करावी असा आपला मनोदय होता; परन्तु या मनोदयाची पूर्ती होऊ शकली नाही; कारण देवांनी असे सांगितले की, ही मूर्ती जेथे जाईल त्या घराचा व गावाचाही नाश होईल. यामुळे या मूर्ती कोणीही घेत नाही व आपणही त्या कोणाला देत नाही. या मूर्तींची पाळणूक फार कडक आहे. तुम्हाला ती झेपणार नाही. अगोदर शुद्ध अंतःकरणाने साधना करून या मूर्तीची पूजा-अर्चा करण्याचा अधिकार प्राप्त करून घ्यावयाला पाहिजे. अनधिकारी माणसाला ती लाभणार नाहीच; पण त्याचा सर्वनाश करील."

आपणाला ती मूर्ती मिळू नये यासाठी श्रीस्वामीमहाराज अतिशयोक्ती करीत आहेत असे श्री. गोविंदरावांना वाटले. ज्याचा

विनाशकाळ जवळ आला आहे त्याला सुबुद्धी कोठून होणार आणि सदुपदेश तरी कसा पटणार ! ती मूर्ती आपणाला मिळालीच पाहिजे असा त्यांनी श्रीस्वामीमहाराजांजवळ हट्टच धरला. पुढे काय होणार हे श्रीस्वामीमहाराजांना ठाऊकच होते; परंतु हात पोळल्याशिवाय अग्नीची पारख माणसाला होत नाही हेच खरे आहे.

एके दिवशी श्री. गोविंदराव यांनी श्रीस्वामीमहाराजांच्या अनुमतीशिवाय ती मूर्ती नेली आणि गावात एक लहानसे देऊळ बांधून तेथे त्या मूर्तीची स्थापना केली. श्रीस्वामीमहाराजांकडची मूर्ती आपणास मिळाल्यावर आपणही महाराज होऊ असे तर श्री. गोविंदराव यांना वाटले नसेल ? मूर्तीची देवळात स्थापना झाल्यावर श्री. गोविंदरावांचा एकुलता एक मुलगा अल्प आजाराने तडकाफडकी मरण पावला. तरीही त्यांना श्रीस्वामीमहाराजांच्या शब्दांविषयी खात्री पटली नाही. नंतर ते स्वतःच फार आजारी पडले. काही दिवस ते अंथरुण धरूनच होते. अखेर एक दिवस त्याच मूर्तीने त्यांना स्वप्नात येऊन असे सांगितले की, "मला बढवाईला श्रीवासुदेवदत्त मंदिरात नेऊन पोहोचव."

इकडे बढवाईच्या श्रीवासुदेवदत्त मंदिराचे पुजारी श्री. लक्ष्मणबुवा ब्रह्मचारी यांनाही देवांनी स्वप्नात असे सांगितले की, "मला सारंगपुरातून बढवाईला घेऊन ये व माझी या श्रीवासुदेवदत्त मंदिरात स्थापना कर." श्री. गोविंदरावांनाही ते आजारी पडल्यापासून श्रीस्वामीमहाराजांच्या शब्दांची सारखी आठवण येत होती. श्रीदत्तमूर्तीच्या रूपाने आपल्या जवळ असलेला हा प्रदीप्त अग्नी आपल्यापासून जेवढा दूर असेल तेवढा चांगला असे त्यांना वाटू लागले. पुढे ज्यावेळी श्री. लक्ष्मणबुवा ब्रह्मचारी मूर्ती नेण्यासाठी आले व त्यांनी आपला स्वप्नदृष्टान्त श्री. गोविंदराव यांना सांगून

४

त्या मूर्तीची मागणी केली त्यावेळी अत्यंत आनंदाने त्यांनी ती मूर्ती श्री. लक्ष्मणबुवा ब्रह्मचारी यांच्या स्वाधीन केली. अशा रीतीने माणगावची ती प्रसिद्ध श्रीदत्तमूर्ती नर्मदाकाठी वढवाई येथे श्रीवासुदेवदत्त मंदिरात गेली.

**बजरंगगड :–**

सारंगपूर येथे श्री. केशवराव डॉक्टरांचा उद्धार करून श्रीस्वामीमहाराज पुढील मार्गाला लागले. "पुढां स्नेह पाझरे। मागां चालती अक्षरें। शब्द पाठीं अवतरे। कृपा आधीं ॥ १५.२६ ॥" या श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानेश्वरीत सांगितलेल्या न्यायाने श्रीस्वामीमहाराजांच्या कीर्तीचा सुगंध सर्वत्र दरवळून पसरत असे. सारंगपूरहून पुढील मुक्काम बजरंगगड येथे करण्याचे ठरले. श्रीस्वामीमहाराज बजरंगगडला जाताना आपल्या गावावरून जाणार ही गोष्ट त्या मार्गावरील गावातील एका श्री. अग्निहोत्री ब्राह्मणाला सारंगपूरच्या मंडळींनी पत्राने कळविली होती. श्रीस्वामीमहाराज निघाले त्यावेळी पाऊस पडत होता. रस्त्यात पाऊस पुष्कळच वाढला. त्यामुळे त्यांना त्या श्री. अग्निहोत्री ब्राह्मणाच्या गावी मुक्काम करावा लागला. दैवयोग असा विचित्र की, श्रीस्वामीमहाराज त्या ब्राह्मणाच्या घरी चालून आले; पण घरमालकच घरी नव्हते. ऐनवेळी ते काही कामानिमित्त बाहेर गेले होते. त्यांची पत्नी व १७/१८ वर्षांचा मुलगा घरी होता. श्रीस्वामीमहाराज त्यांच्या घराच्या पुढील ओटयावर येऊन थांबले होते. मुलाने त्यांना ओळखले नाही. आपल्या घरात एक आगंतुक संन्यासी येऊन बसला आहे ही गोष्ट त्या ब्राह्मणाच्या मुलाला आवडली नाही. वास्तविक तो अग्निहोत्री ब्राह्मणाचा मुलगा होता; पण अतिथी सत्कार करणे हा साधा गृहस्थधर्मही तो विसरला. तो रागाने श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाला की, "काहो महाशय! कोणालाही न विचारता असे घरात कसे घुसलात? हे घर काही

तुमच्या सारख्या संन्याशांकरिता बांधलेले नाही. आपण कोणाच्या परवानगीने येथे उतरला? तुमच्या सारख्या उपटसुभांना उतरण्यासाठी ही काय धर्मशाळा आहे? मुकाट्याने आत्ताच्या आत्ता चालते व्हा, नाहीतर दंड-कमंडलू फेकून देईन."

अशा प्रकारे तो मुलगा त्यांना खूपच अद्वातद्वा बोलला. आपल्या दारात उभी असलेली व्यक्ती ही काषायवस्त्र परिधान केलेली एक सन्यासी आहे, एवढा तरी विचार त्या मुलाने करावयाला पाहिजे होता; पण असा सुविचार त्याला कसा सुचणार? त्याचे प्रारब्धकर्म त्याच्या आड येत होते ना?

श्रीस्वामीमहाराज म्हणजे मूर्तिमंत सहनशीलता! त्या मुलाचे ते कठोर भाषण ऐकून ते तेथून उठले व अत्यंत शांतपणे घराबाहेर पडले. गावाबाहेरील एका मोठ्या झाडाखाली निवारा घेत त्यांनी ती रात्र तेथेच काढली आणि पहाटे ते पुढील मुक्कामाला निघाले. श्री. अग्निहोत्रीबुवांच्या घरी त्यांच्या मुलाचे कर्म दबा धरून बसले होते. ते श्रीस्वामीमहाराज निघून गेल्याबरोबर अकस्मात् त्या मुलाच्या डोक्यावर बसले. मुलाला भ्रम होऊन तो वेड्यासारखा बडबडू लागला होता. काही वेळाने मुलाचे वडील घरी येऊन पाहतात तो मुलाला वेड लागल्याचा विचित्र प्रकार त्यांच्या दृष्टीस पडला. घरात चौकशी केली तेव्हा त्यांच्या बायकोने त्यांना असे सांगितले की, "एक संन्यासीबुवा पावसामुळे घरात आसऱ्यासाठी येऊन थांबले होते. त्यांचा अपमान करून मुलाने त्यांना घराबाहेर हाकलून लावले. ते संन्यासी निघून गेल्यापासून हा असे वेड्यासारखे व भ्रमिष्टासारखे विचित्र वर्तन करीत आहे." संन्याशाचे वर्णन ऐकताच ते श्रीस्वामीमहाराजच असले पाहिजेत अशी त्या श्री.अग्निहोत्रीबुवांची खात्री होऊन त्यांना फार वाईट वाटले. सारंगपूरच्या पत्राप्रमाणे ते श्रीस्वामीमहाराजच असले पाहिजेत; पण आपल्या

दुर्दैवनें ऐनवेळी आपण बाहेर निघून गेल्यामुळे हा घोटाळा झाला, हे लक्षात येऊन ते फार अस्वस्थ झाले. आपल्या मुलाच्या हातून केवढा अपराध घडला आहे याची जाणीव होऊन त्यांचा जीव घाबरा झाला. आपल्या मुलाला वाचवावयाला श्रीस्वामीमहाराजांशिवाय दुसरे कोणीही समर्थ नाही याविषयी त्यांची खात्री झाली व ते दुसऱ्या दिवशी सकाळी सर्व आह्निक उरकून श्रीस्वामीमहाराजांच्या शोधार्थ बाहेर पडले; पण त्यापूर्वीच श्रीस्वामीमहाराजांनी ते गाव सोडले होते. मुलाचा भोग दीड वर्षांचा होता. त्यामुळे कसोशीने प्रयत्न करूनही दीड वर्षापर्यंन्त त्या श्री. अग्निहोत्री ब्राह्मणांना श्रीस्वामीमहाराजांची भेट झाली नाही.

अशी स्थिती असली तरी त्या श्री. अग्निहोत्री ब्राह्मणाने श्रीस्वामीमहाराजांना शोधण्याचे प्रयत्न चालूच ठेवले होते. दीड वर्षानन्तर त्या दुःखी पित्याला श्रीस्वामीमहाराजांचा पत्ता लागला धावाधाव करून त्यांनी श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन घेतले व त्यांच्या समोर साष्टांग नमस्कार घालून डोळ्यात अश्रू आणून दीनवाणीने ते त्यांना असे म्हणाले की, "महाराज! कृपा करा. माझ्या मुलाला क्षमा करा. त्याने अज्ञानाने आपणास न ओळखता आपला अपमान केला. दुर्दैव त्याचे नाही, माझे आहे. आपण आमच्या गावावरून जाणार हे कळले होते. आपण स्वतः होऊन या गरीबाच्या घरी पायधूळ झाडलीत; पण माझे दुर्दैव आड आले आणि नेमका त्याचवेळी मी थोडावेळ बाहेर गेलो. इतक्यात आपले येणे झाले. माझा अज्ञानी मुलगा आपणास न ओळखता वाटेल तसे अद्वातद्वा बोलला. तरी हा अपराध पोटात घालून गुरुमाउलीने कृपा करावी. तो आज दीडवर्ष झाले वेडयासारखा वागतो आहे. आपल्याशिवाय त्याला कोण तारणार ?"

दीडवर्षापूर्वी घडलेली गोष्ट श्रीस्वामीमहाराजांच्या पूर्णपणे

स्मरणात होतो. जरी मान व अपमान या दोन्ही गोष्टी श्रीस्वामी-महाराजांसारख्या महान् संन्याशाला सारख्या असल्या व मागे वळून पाहण्याची त्यांची वृत्ती नसली; तरीसुद्धा लोकशिक्षणाकरिता कृतककोप धारण करणे आवश्यक असल्याने तसा तो दाखवून ते त्या श्री. अग्निहोत्र्यांना असे म्हणाले की "तुम्ही स्वतःला ब्राह्मण म्हणविता आणि गृहास्थाश्रमाचे साधे नियमही तुम्ही पाळीत नाही. त्यावेळी तुम्ही घरात नव्हता; पण तुमच्या घरात कोणालाही अतिथीबद्दल आदर कसा नाही? तुम्ही त्यांना तसे शिक्षण द्यावयास नको काय? अतिथी सत्कार हे गृहस्थाचे मुख्य कर्तव्य आहे. संन्यासी, ब्रह्मचारी यांनी गृहस्थाच्या घरी जावयाचे नाही तर कोठे जावयाचे? गृहास्थाने त्यांचा योग्य तो सत्कार करावयास हवा. ब्राह्मण असून ही साधी गोष्ट तुमच्या कुटुंबात कोणालाही ठाऊक नसावी? तुमचे अग्निहोत्र म्हणजे लोकांना दाखविण्यासाठी नुसता देखावाच असून तो एक नुसता पोटपूजेचा प्रकार आहे, असे म्हटले तर त्यात काही चूक ठरणार नाही. आपण तुमच्या मुलाला वेडे केलेले नाही राग, द्वेष याना आपण अगोदरच तिलांजली दिलेली आहे. तुमचा मुलगा त्याच्या स्वतःच्या कर्माची फळे भोगतो आहे. आपण त्याला काय करणार? तुम्ही आता घरी जा" श्रीस्वामीमहाराजांचे हे सांगणे ऐकताच "पंच महापापे गृहस्थाची। भिक्षा देता ती जाती त्याची। जेथून अतिथी जाई फिरून। पुण्य घेऊन गृहस्थाचे ।।" अशी त्या श्री. अग्निहोत्र्यांची परिस्थिती झाली. त्यामुळे त्यांनी मोठ्या काकुळतीने व अत्यंत दीन होऊन वारंवार श्रीस्वामी-महाराजांची क्षमा मागितली व ते त्यांना असे म्हणाले की, "महाराज, असे म्हणू नका. आपण दयासागर आहात. आम्ही चुकलो. आपण क्षमाशील आहात. आपण क्षमा केल्याशिवाय मी आपले पाय सोडणार नाही."

श्रीस्वामीमहाराज मूर्तिमंत दयेचे अवतारच होते. या गृहस्थाला पश्चात्ताप व्हावा व आपले कर्तव्यकर्म त्याने आपल्या कुटुंबियांनाही शिकवावे, एवढीच त्यांची इच्छा होती. त्यांनी आपल्याजवळील देवांचा अंगारा त्या ब्राह्मणाला देऊन तो मुलाला लावण्यास सांगितले. नंतर तो अंगारा घेऊन ते श्री. अग्निहोत्रीबुवा घरी आले व त्यांनी मुलाला अंगारा लावताच तो मुलगा खडबडीत बरा झाला. दीडवर्ष आपल्या कर्माची फळे भोगून तो मुलगा पूर्वीप्रमाणे उत्तम झाला.

**पिछोरा :–**

धर्मजागरणासाठी आणि दीन-दुबळयांना दुःखमुक्त करून ईश्वरभक्तीकडे लावण्यासाठी श्रीस्वामीमहाराजांचा आसेतुहिमाचल प्रवास पुढे चालू झाला. पुढील मुक्काम पिछोरा नावाच्या गावी पडला. श्रीस्वामीमहाराजांची कीर्ती अगोदरच येथे येऊन पोहोचली होती. येथे जिज्ञासूंची, मुमुक्षूंची व व्याधिग्रस्तांची त्याच्या भोवती गर्दी झाली केवढीही गर्दी झाली; तरी श्रीस्वामीमहाराजांच्या नित्यकर्मामध्ये कधीच खंड पडत नसे. सकाळी सोवळयात ते अधिकारी व्यक्तींना उपनिषदे वगैरे सांगत असत व संध्याकाळी सर्व लोकांसाठी पुराण होत असे. फावल्या वेळात ते लोकांच्या शंकांचे निरसन करीत असत.

येथील मामलेदार श्रीस्वामीमहाराजांच्या नित्य दर्शनाला व पुराण ऐकावयाला येत असत. यांचे बंधू श्री भास्करराव यांना अपस्माराचा विकार होता. अनेक इलाज करूनही या त्रासातून त्यांची अद्याप कोणीही मुक्तता करू शकले नव्हते. एक दिवस मामलेदार श्री. भास्កररावांना घेऊन श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला व पुराणश्रवणाला आले त्यावेळी पुराण सुरू झाले होते; तरी श्री. भास्कररावांनी श्रीस्वामीमहाराजांची अशी प्रार्थना केली की, "मला अपस्माराची व्याधी असून ती बरी होण्यासाठीं मी

आजपर्यंन्त खूप प्रयत्न केले; परन्तु कशाचाही गुण आला नाही. तरी आपण माझ्यावर कृपा करून मला या व्याधीतून मुक्त करा. मी आता अगदी कंटाळलो आहे." ही विनंती केल्यावर श्री. भास्करराव पुराण श्रवणास बसले. इतक्यात ते वेडेवाकडे चाळे करू लागले व वडबडू लागले. त्यांच्या अंगात पिशाच्च संचार झाला होता. श्रीस्वामीमहाराजांनी पुराण थांबवून क्षणभर श्री. भास्कररावांकडे पाहिले. लगेच ते पिशाच्च श्री. भास्कररावांच्या तोंडून बोलू लागले. "हा ब्राह्मण दुष्ट आहे. याने माझा अपराध केला आहे." त्यावेळी त्या पिशाच्चाचे हे बोलणे ऐकून श्रीस्वामी-महाराज त्याला असे म्हणाले की, "आता येथे पुराण चालू आहे. पुराणात व्यत्यय आणू नकोस. तुझ्यासाठी काय करावयाचे ते उद्या पाहू." हे ऐकताच लगेच ते पिशाच्च शांत झाले व श्री. भास्कर-रावही साधारण स्थितीमध्ये येऊन पुराणश्रवण करू लागले.

दुसऱ्या दिवशी पुराण सुरू होण्यापूर्वी बराच वेळ अगोदर मामले-दार श्री. भास्कररावांना घेऊन श्रीस्वामीमहाराजांपाशी आले व हात जोडून त्यांना असे म्हणाले की, "काल आपण भास्करच्या प्रकरणात लक्ष घालू असे म्हटले होते. कृपा करून त्याची या व्याधीतून मुक्तता करा."

अशा प्रकारे मामलेदारांनी श्रीस्वामीमहाराजांना ही विनंती करताच श्री. भास्कररावांच्या शरीरामध्ये प्रवेश करून ते पिशाच्च बोलू लागले. "ज्या पिंपळावर मी राहतो त्या पिंपळाखाली हा लघुशंका करीत असल्यामुळे फार अस्वच्छता होते. त्यामुळे मी त्याला छळीत आहे." पिशाच्चाने असे सांगितले तरी श्रीस्वामी-महाराजांचे समाधान झाले नाही; कारण ते पिशाच्च खोटे बोलत आहे हे त्यांच्या तात्काळ लक्षात आले. त्यामुळे ते त्याला असे म्हणाले की, "एवढ्या क्षुल्लक अपराधाबद्दल तू याला एवढी

कठोर शिक्षा देतोस ! अरे ! याचा अपराध केवढा आणि शिक्षा केवढी! तू लबाड आहेस. सर्व पिशाच्चे नेहमीच खोटे बोलत असतात, तसा तूही खोटे बोलत आहेस. तेव्हा खरे काय ते सांग. तू या योनीत का व कसा आलास आणि तुला यालाच त्रास द्यावयाचे काय कारण आहे ? याला सोडून तू जातोस की नाही ?"

श्रीस्वामीमहाराजांच्या दृष्टीसमोर सत्य गोष्ट कधी लपून राहू शकत नसे. ते पिशाच्च घाबरलेल्या स्वरात त्यांना असे म्हणाले की, "महाराज! मी फार अभागी आहे. निपुत्रिक अवस्थेत मी मानव देहाचा त्याग केला. पुढे माझे और्ध्वदेहिक कोणीच केले नाही. पुष्कळ दिवस मी या योनीत आहे. हा भास्करराव श्रीमंत असल्यामुळं याच्याकडून माझी या योनीतून मुक्तता होण्यासाठी काहीतरी विधी होईल म्हणून याला मी धरले आहे व त्रास देत आहे. नारायणबळी केल्यास मी या योनीतून मुक्त होईन. आपण अनेकांचा उद्धार केला आहे. माझी या योनीतून मुक्तता होण्यासाठी याला नारायणबळी करण्याची आज्ञा व्हावी." त्याची ही विनंती ऐकताच दोघांचीही मुक्तता होणं आवश्यक आहे हे लक्षात येऊन श्रीस्वामीमहाराजांनी श्री. भास्कररावांकडून नारायणबळी करून घेतला. त्यामुळे श्री. भास्करराव पिशाच्च बाधेतून मुक्त झाले आणि पिशाच्च योनीतील तो आत्माही मुक्त होऊन वरच्या गतीला गेला.

**खरेरा :—**

आता असे होऊ लागले की, ज्या गावी श्रीस्वामीमहाराज जात असत तेथून त्यांना काही दिवस मुक्काम केल्याशिवाय पुढे जाताच येत नसे. शक्यतो नियमाला अनुसरून तीन दिवसांपेक्षा अधिक काळ ते कोठेही मुक्काम करीत नसत; पण काही ठिकाणी त्यांच्या भोवती व्याधिग्रस्तांची एवढी गर्दी होत असे की, त्या दीनदुबळ्यांना त्यांच्या व्याधीतून मुक्त करून, सन्मार्गाला लावल्याशिवाय श्रीस्वामी-

महाराजांचे पाऊल पुढे पडत नसे. त्यांचा पुढील मुक्काम खरेरा या गावी झाला. येथेही पिशाच्चबाधेचा असाच एक प्रकार घडला.

श्रीस्वामीमहाराजांकडे आता फक्त प्रवासात न्यावयाची एकच चांदोची श्रीदत्तमूर्ती होती. कागलची मूर्ती या पूर्वीच बढवाईच्या श्रीवासुदेवदत्त मंदिरात गेली होती. एके दिवशी श्रीस्वामीमहाराज सकाळचे आन्हिक उरकीत होते. श्रीदत्तमूर्तीची पूजा चालली होती. नेहमीप्रमाणे पुष्कळ मंडळी जमा झाली होती. श्रीस्वामी-महाराजांची पूजा चालू असताना त्यांच्यापुढे कोणी तुळशी, फुले, खडीसाखर, उदबत्ती वगैरे उपचार आणून ठेवीत असत. एका बाईने उदबत्त्या आणल्या होत्या. त्या पेटवून तिने श्रीदत्तमूर्तीला ओवाळून तेथेच समोर ठेवल्या. श्रीस्वामीमहाराज आपणाजवळ कोणालाही एका विशिष्ट मर्यादेच्या आत येऊ देत नसत. उदबत्त्या पेटवून समोर ठेवताच त्या बाईच्या अंगात पिशाच्च संचार झाला व ती असंबद्धपणे बडबडू लागली. ते ऐकून तेथे सर्व मंडळी जमा झाली.

ती असे बडबडत असताना "तू कोण आहेस ?" असे श्रीस्वामीमहाराजांनी पिशाच्चाला विचारले. त्यावेळी त्याने असे सांगितले की, "मी येथूनच जवळ असलेल्या मशिदीचा मालक जिंद आहे."

"तू या बाईला कशाकरिता पीडा देत आहेस ?"

"वाटेत या बाईने माझ्या मशिदीशेजारी लघुशंका करून माझा अपमान केला."

"न कळत या बाईकडून तसे घडले. तू आता तिला सोडून दे."

"नाही, मी हिला तसा सहजासहजी सोडणार नाही. माझी मशीद मोडकळीला आली आहे. हिचा नवरा चांगला श्रीमंत आहे. त्याने माझ्या मशिदीची डागडुजी करून ती चांगली बांधून द्यावी. त्याने तसे केले तरच मी हिला सोडीन."

"तू आपल्या मर्यादेचे अतिक्रमण करीत आहेस. तू म्हणतोस त्याच कारणासाठी तू हिच्या तीन गर्भांचा नाश केला आहेस का ? तुला काहीसुद्धा मिळणार नाही व तुझी मशीद दुरुस्त करून देण्याबद्दल आपण हिच्या नवऱ्यास सांगणार नाही. तू या बाईला मुकाट्याने सोडून जा. "

श्रीस्वामीमहाराजांची ती आज्ञायुक्त व कठोर अशी वाणी ऐकल्यामुळे व त्यांच्या आज्ञेचा भंग करण्याचे सामर्थ्य अंगी नसल्यामुळे तो जिंद त्यांची मोठ्या काकुळतीने विनवणी व प्रार्थना करू लागला शेवटी त्याची विनंती मान्य करून श्रीस्वामीमहाराजांनी त्या बाईच्या नवऱ्यास ती मशीद दुरुस्त करून देण्यास सांगितले. मशिदीची दुरुस्ती झाल्यावर ती बाई पिशाच्च बाधेतून मुक्त झाली आणि पुढे तिची संततीही वाचली.

**जालवण :–**

खरेराहून श्रीस्वामीमहाराज काशीच्या वाटेला लागले. येथून काशीला जाण्याचा मार्ग अतिशय खडतर होता. दोन-तीन दिवसांची वाट होती व तीही जंगलातून जात होती. श्वापदांची भीतीही होती. नुकतीच या भागातून काशीपर्यंन्त रेल्वे गाडीही सुरू झाली होती. त्यामुळे सर्व मंडळींनी श्रीस्वामीमहाराजांना असा आग्रह केला की, " रेल्वे झाल्यापासून या पायवाटेने कोणीही प्रवास करीत नाही. वाटेत घनघोर जंगल असून तेथे हिंस्र पशूंचा त्रासही होतो. शिवाय प्रवासात दोन-दोन दिवस एकही गाव लागत नाही. तरी आपण पायवाटेने प्रवास न करता रेल्वेनेच प्रवास करावा. "

खरेऱ्यातील सर्व मंडळींनी असा प्रेमाने आग्रह केला असला; तरी त्या सर्वांना श्रीस्वामीमहाराज असे म्हणाले की, " आत्तापर्यंन्तचा प्रवास श्रीदत्तमहाराजांच्या आज्ञेने पायीच झाला आहे. यापुढेही तो पायीच होईल. संन्याशांनी वाहनातून प्रवास करू नये अशी

शास्त्राज्ञा आहे. यापुढे श्रीदत्तप्रभूंच्या इच्छेला येईल तसेच घडेल." असे सर्व मंडळींना सांगून त्यांनी आपला पुढील प्रवास पायवाटेने सुरू केला. काशीची वाट बिकट होती; पण श्रीस्वामीमहाराजांना त्याचे काय ? त्यांनी भगवान् श्रीदत्तात्रेयांचे स्मरण करीत आपला मार्ग आक्रमण करण्यास सुरुवात केली होती. वाटेत घोर अरण्य लागले; पण श्रीस्वामीमहाराजांना भीति कशाची आणि कोणाची ? सर्व विश्वाशी एकरूप झालेल्या त्यांना अरण्य काय आणि वस्ती असलेले गाव काय ? त्यांच्या लेखी दोन्ही परमेश्वराचीच रूपे होती !

आपल्या भक्ताची काळजी भक्तवत्सल प्रभूला होती. त्यावेळी अरण्यातून प्रवास करीत असताना एक भिल्ल श्रीस्वामीमहाराजां-समोर आला आणि नमस्कार करून कोठपर्यंन्त प्रवास करणार अशी त्याने चौकशी केली. आपण काशीला जावयाला निघालो आहोत, असे श्रीस्वामीमहाराजांनी त्याला सांगताच तो भिल्ल त्यांना असे म्हणाला की, "स्वामीमहाराज ! काशी येथून फार दूर आहे. कमीत कमी तीनचार दिवस तरी तुम्हाला हे अरण्य तुडवीत जावे लागेल. माझ्या मागून या. मी तुम्हाला अगदी जवळची वाट दाखवितो. माझ्या पाठीमागून या म्हणजे झाले." असे म्हणून तो भिल्ल पुढे चालू लागला व श्रीस्वामीमहाराज त्याच्या पाठीमागून चालू लागले. दोनतीन तास त्या भिल्लाबरोबर चालून गेल्यावर एक लहानशी टेकडी उतरून ते दोघे खाली आले. तेथून समोर दिसणाऱ्या गावाकडे बोट दाखवून तो भिल्ल त्यांना असे म्हणाला की, "त्या समोर दिसणाऱ्या गावात गेल्यावर तेथून जो रस्ता पुढे जातो तो सरळ काशीला जातो." असे म्हणून तो भिल्ल मागे वळला व अरण्यात दिसेनासा जाला. श्रीस्वामीमहाराज पुढे चालू लागले व त्या गावात आले. तेथे आल्यावर त्यांना असे कळले की, तीन चार दिवसांची वाट आपण काही घटकांमध्येच चालून आलो

आहोत. तेव्हा त्यांना प्रभूची अतर्क्य लीला व त्याचे कौतुक पाहून फार आश्चर्य वाटले. तो भिल्ल म्हणजे प्रत्यक्ष श्रीदत्तमहाराजच असावेत असे त्यांना खात्रीने वाटले. प्रभूची माया एवढी अगम्य असते की, प्रत्यक्ष आपल्या लाडक्या भक्तालाही ते आपणा स्वतःची ओळख पटू देत नाहीत. असे असल्यामुळेच श्रीकृष्णांनी श्रीखंड्याच्या रूपाने श्रीसंत एकनाथमहाराजांची सेवा केली व त्यांच्या जवळ ते राहिले; तरी त्यांना श्रीखंड्या म्हणजे श्रीकृष्ण आहेत हे जाणवले नाही. ईश्वराची माया मोठी अद्‌भुत, अपार व अलौलिक असते हेच खरे !

वाटेत श्रीस्वामीमहाराजांचा मुक्काम जालवणला झाला. जालवण हे विद्वानांचे गाव होते. लोकांच्या आग्रहास्तव श्रीस्वामीमहाराजांना आपला येथील मुक्काम वाढवावा लागला. येथेही श्रीस्वामीमहाराजांचे नित्याप्रमाणे लोकांना शास्त्रे व उपनिषदे सांगण्याचे काम चालू होते. रात्री पुराण होत असे. याच मुक्कामात दासनवमीचा उत्सव झाला. श्रीस्वामीमहाराजांचे दंडगुरू श्रीनारायणानंदसरस्वतीस्वामीमहाराज हे रामदासपंथी होते म्हणून श्रीस्वामीमहाराज दासनवमीचा उत्सव साजरा करीत व दासबोधावर प्रवचन करीत असत. यावेळी सुद्धा दासबोधावर प्रवचन होणार असे कळताच गावातील एका श्री. शास्त्रीबुवांना ही गोष्ट पसंत पडली नाही. श्रीस्वामीमहाराजांची विद्वत्ता व त्यांचे संस्कृत भाषेतील प्रभुत्व सर्वांना माहीत होते आणि ते श्री.शास्त्रीबुवाही संस्कृत भाषेचे अत्यंत अभिमानी होते. त्यामुळे त्यांना असे वाटत होते की, "दासबोध हा प्राकृत ग्रंथ आहे. तो सर्वसामान्यजनांसाठी असून ज्यांना संस्कृतचा गंधही नाही, त्यांनी फार तर त्याचे वाचन करावे." त्यांनी जेव्हा आपले हे मत श्रीस्वामीमहाराजांजवळ बोलून दाखविले तेव्हा ते काही बोलले नाहीत; परन्तु त्या दिवशी रात्री दासबोधातील ७ व्या

दशकातील दुसरा समास वाचता वाचता त्यांनी "यतो वाचो निवर्तन्ते अप्राप्य मनसा सह। आनन्दं ब्रह्मणो विद्वान् न बिभेति कुतश्चनेति ॥ ९.१ ॥" या तैत्तिरीयोपनिषदातील श्रुतीचा अर्थ सांगून "जेथें वाचा निवर्वेती। मनासी नाहीं ब्रह्मप्राप्ती। ऐसी बोलिली श्रुती। सिद्धान्तवचन ॥७.२.१०॥ ही दासबोधातील ओवी वाचून दाखवून त्यांनी वरील श्रुतिवचनाच्या व दासबोधातील ओवीच्या एकरूपतेचे मोठ्या अपूर्वतेने विवेचन केले.

पुराण संपल्यावर श्रीस्वामीमहाराजांनी त्या श्री. शास्त्रीबुवांना असे विचारले की, "काय शास्त्रीबुवा! दासबोध ग्रंथ प्राकृत आहे की संस्कृत आहे, ते आपण आता नीट विचार करून सांगा." हे ऐकताच श्री. शास्त्रीबुवांना श्रीस्वामीमहाराजांचे म्हणणे मनाला फार लागले व आपली चूक त्यांना पटली. त्यामुळे त्यांनी लगेच श्रीस्वामी-महाराजांची क्षमा मागितली. श्रीशास्त्रीबुवांची अशा प्रकारची चूक कबूल करण्याची उदारवृत्ती पाहून त्यांना फार समाधान वाटले व त्यांना यासंबंधी समजावून सांगताना ते असे म्हणाले की, "ग्रंथ वाचीत असताना तो प्राकृत आहे की संस्कृत आहे, या बाह्यांगाचा विचार करू नये; कारण विषयप्रतिपादनाच्या दृष्टीने हा प्रश्न गौण आहे. जे सत्य श्रुतीने सांगितले आहे तेच सत्य सामान्यांच्या प्राकृत भाषेत संतांनी सांगितले आहे; कारण जे अंतिम सत्य आहे, त्याचे ज्ञान सामान्य माणसापर्यंत पोहोचविण्याची महान् कामगिरी या साधुसंतावर होती. त्यामुळे त्या ग्रंथातील विषयाच्या अर्थाकडे अनुसंधान ठेवावे. श्रीसमर्थ रामदासस्वामीमहाराज हे प्रत्यक्ष मारुती-रायांचे अवतार असून प्रभू श्रीरामचंद्रांचे निस्सीम भक्त होते. त्यांना संस्कृत येत नव्हते असे म्हणता येणार नाही. सर्वंही लोकांना समजण्या-करिता म्हणून त्यांनी दासबोध हा ग्रंथ प्राकृत भाषेत करून त्यात सर्व शास्त्रांची प्रमेये व्यवस्थित रीतीने मांडलेली आहेत. तो ग्रंथ

प्रासादिक आहे, हेच खरे आहे. "

अशा रीतीने दासबोधाची व प्राकृत भाषेची स्तुती करून शेवटी आपले म्हणणे सिद्धान्तरूपाने पटविताना श्रीस्वामीमहाराज त्या श्री. शास्त्रीबुवांना असे म्हणाले की, " कलियुगात आचारधर्म लुप्तप्राय झाल्याने नुसत्या वेदपठणाचा व्हावा तसा उपयोग होत नाही; मात्र साधुपुरुषांनी केलेल्या प्रासादिक प्राकृत ग्रंथांचा यावेळी फार मोठा उपयोग होण्यासारखा आहे. त्यामुळे हे ग्रथ वाचून त्यांचा काय उपयोग होतो याचा प्रत्यक्ष अनुभव घेऊनच पाहिले पाहिजे. "

इतके सांगून झाल्यावर ते त्या श्री. शास्त्रीबुवांना असे म्हणाले की, " आपला संस्कृत भाषेवरचा लोभ आदरणीय आहे, यात काहीच शंका नाही; परन्तु संस्कृत ग्रंथांचे पठण करूनही तुमच्या घरातील ब्रह्मसमंधाची बाधा अद्याप का दूर झाली नाही ? ती दूर होण्याकरिता आता आम्ही सांगतो त्याप्रमाणे आपण मराठी श्रीगुरुचरित्राचा सप्ताह करून पाहा. त्यामुळे तुमच्या कुटुंबातील सर्वांचा त्रास दूर होईल आणि तो समंधही मुक्त होईल. "

याप्रमाणे श्रीस्वामीमहाराजांनी श्रीज्ञानेश्वरमहाराज, श्रीरामदासस्वामीमहाराज, श्रीएकनाथमहाराज, श्रीतुकाराममहाराज इ. कितीतरी संत-सत्पुरुषांचा उल्लेख करून त्यांच्या त्यांच्या प्राकृत ग्रंथांविषयी विशेष प्रशंसोद्‌गार काढले. श्रीस्वामीमहाराजांच्या या सर्व बोलण्याचा श्री. शास्त्रीबुवांच्या मनावर मोठा तीव्र परिणाम झाला. त्यांनी श्रीस्वामीमहाराजांच्या आज्ञेप्रमाणे प्राकृत श्रीगुरुचरित्राचा सप्ताह केला. त्यामुळे त्यांच्या घरातील बरेच दिवसांचा ब्रह्मसमंधाचा त्रास नाहीसा झाला. घरातील सर्व लोक पीडेतून मुक्त झाल्यामुळे श्रीस्वामीमहाराजांच्या सांगण्यावर त्यांचा इतका विश्वास बसला की, ते पुढे रोज नियमाने श्रीगुरुचरित्र वाचू लागले. इतकेच नव्हे; तर इतरही संतांचे प्राकृत ग्रथ वाचण्याची त्यांना गोडी लागली.

त्या सर्व वाचनाचा त्यांच्या मनावर जो तीव्र परिणाम झाला व त्यांना जी अनुभूती आली त्यामुळे पुढे त्यांनी प्राकृत ग्रंथांची निंदा केली नाही.

जालवण येथेच श्री. गणपतराव गर्दे म्हणून एक आर्यसमाजीय वकील होते. त्यांची मते ही पहिल्यापासूनच नास्तिक होती; परन्तु श्रीस्वामीमहाराजांच्या प्रवचनांना उपस्थित राहिल्यामुळे त्यांच्या उपदेशाचा परिणाम त्यांच्या मनावर होऊन हळूहळू ते पूर्णपणे आस्तिक झाले.

अनन्तकोटी ब्रह्माण्डनायक परमहंस परिव्राजकाचार्य भगवान् श्रीवासुदेवानन्दसरस्वतीस्वामीमहाराज यांचा अखंड जयजयकार असो. त्यांच्या चरित्राच्या नित्य वाचनाने त्यांचे आपल्याला निरंतर स्मरण राहावे व त्यांनी आपणा सर्वांचे सर्व अपराध पोटात घालून आपले सर्वांचे जीवन धन्य व कृतार्थ करावे अशी त्यांच्या चरणी शतशत वेळा लोटांगण घालून पराकाष्ठेच्या शरणागतीपूर्वक नम्रातिनम्र प्रार्थना आहे. त्यांच्या शब्दाश्रयानेच त्यांच्या चरणी "श्रीगुरुस्तोत्ररूपी" पुढील प्रार्थना प्रस्तुत असो. या प्रार्थनेचा स्वीकार करून त्यांनी आपणा सर्वांना ज्ञानाचे वरदान द्यावे हीच त्यांच्या चरणी मागणी आहे.

## – श्रीगुरुस्तोत्र –

भावें नमूं श्रीगुरुच्या पदासी ।
जे आपदासी हरि दे पदांसी ॥
दासीपरी श्री नमि ज्या पदांसी ।
यासी भजे तो नमितों पदासी ॥ १ ॥

सततविगतगम्य श्रेष्ठ दुष्टां अगम्य ।
सदयहृदयलभ्य प्रार्थिती ज्यासि सभ्य ।।
समद विमद होती यत्प्रसादें न हो ती ।
कुगति सुगति देती त्या पदा हे विनंती ।। २ ।।

गुरुपदा विपदापहरा सदा ।
अभयदा भयदामयदारदा ।।
हृतवदान्यमदा तव दास्य दे ।
अमददा गहदा न कुदास्य दे ।। ३ ।।

नमस्ते भवारे नमस्ते शतारे ।
नमस्तेऽघवैरे प्रशस्तेष्टकर्त्रे ।।
नमस्ते खलारे विहस्तेष्टदात्रे ।
नमस्तेऽरिवैरे नमस्तेष्टसत्रे ।। ४ ।।

गुरुपद मद वारी सर्व भेदां निवारी ।
गुरुपद गद वारी सर्व खेदां निवारी ।
सतत विनत होतां वारि जें आपदांसी ।
सतत विनत होऊं आम्हीं ही त्या पदांसी ।। ५ ।।

भावें पठति जे लोक हें गुरुस्तोत्रपंचक ।
तयां होय ज्ञान बरें वासुदेव म्हणे त्वरें ।। ६ ।।

।। इति श्री. प. प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचितं
श्रीगुरुस्तोत्रपंचकं संपूर्णम् ।।

# – अध्याय दुसरा –

। श्रद्धे देहि मे ते दयालो
दासो दीनो भावतापेन तप्तः ।
सर्वैस्त्यक्तो द्वारि तेऽत्र प्रसंस्थोऽ
हं मां मातः पालयाद्य स्वबालम् ॥

**चातुर्मास दुसरा–शके १८१४– इ. स. १८९२– ब्रह्मावर्त :–**

श्रीस्वामीमहाराज जालवणहून पुढील संचाराला निघाले व हळूहळू ते ब्रह्मावर्त येथे येऊन पोहोचले. ब्रह्मावर्त हे गंगा किनाऱ्या-वरील साधुसंतांमुळे पुनीत झालेले गाव आहे. येथे श्रीवाल्मीकी ऋषींचा आश्रम व ब्रह्मेश्वराचे मंदिर आहे. हे येथील प्रमुख मंदिर असून ते पेशव्यांनी बांधलेले आहे. श्रीगंगासरस्वतीचे मंदिर व इतरही पुष्कळ मंदिरे व घाट येथे आहेत. श्रीगंगा म्हणजे मूर्तिमंत पावित्र्य ! ब्रह्मावर्तामध्ये श्रीगंगेच्या किनाऱ्यावर कित्येक साधुसंत व योगी झोपडचा बांधून साधना करीत असतात. श्री. अंबाजी-पंतांच्या घाटावर श्रीराममंदिराजवळ असलेल्या एका जुन्या पण पवित्र झोपडीत श्रीस्वामीमहाराज उतरले होते. श्रीस्वामीमहाराज वापरीत असलेली ही पुरातन झोपडी नंतर काळाच्या ओघात श्रीगंगेच्या पुरात वाहून गेल्यामुळे त्या जागी आता दुसरी पक्की झोपडी त्यांचे स्मारक म्हणून श्रीस्वामीभक्त श्री. सुभेदार यांनी बांधून ठेविली आहे.

श्रीगंगातीरी संन्याशाने कितीही दिवस वास केला; तरी त्यावर बंधन नाही व त्याचा त्याला दोषही नाही. त्यामुळे या ठिकाणी श्रीस्वामीमहाराजांचा जवळजवळ आठ महिने मुक्काम झाला; पण त्यावेळी त्यांनी स्वतःला पूर्णपणे लोकांपासून लपवून ठेविले होते. यावेळी त्यांचा नित्याचा कार्यक्रम पुढीलप्रमाणे होता. रोज सकाळी

शौच, मुखमार्जन व स्नान आटोपून ते झोपडीत जाऊन वसत व झोपडीचे दार आतून बंद करून घेत. दुपारी भिक्षेची वेळ झाली की, गंगेवर जाऊन मध्यान्ह स्नान करून आवश्यक ती नित्य कर्मे करून तीन घरी ते भिक्षेसाठी जात असत. भिक्षा घेईपर्यंन्त झोपडीचे दार खुले असे. नंतर पुन्हा संध्याकाळपर्यंत दरवाजा बंद असे. अशा रीतीने श्रीस्वामीमहाराजांची दिवसभर अखंड साधना चालत असे. असा हा कार्यक्रम आठ महिने चालला होता. यावेळी श्रीस्वामीमहाराज कोणत्या प्रकारची साधना करीत होते किंवा ते कोणते व्रत आचरीत होते हे कळावयाला साधन नाही. सदा सर्वकाळ ते समाधिलीन राहत असतील यात शंका नाही.

ब्रह्मावर्त या स्थानाला एक परंपरा व इतिहास आहे. या ठिकाणी साधुमहात्म्यांचे नेहमी वास्तव्य होत असल्यामुळे येथील लोक सुद्धा नेहमी साधुसंतांच्या दर्शनाला भुकेलेले असतात. साधुसंतांची यथामती व यथाशक्ती सेवा करावी आणि विद्वानांनी केलेली प्रवचने, कीर्तने व पुराणे ऐकावी हा लोकांचा स्वभावच बनून राहिला होता. या आठ महिन्यात येथील जिज्ञासू लोकांना जनसंपर्कापासून अलिप्त राहणारे हे नवीन संन्यासी कोण आहेत हे कळू शकले नाही. श्रीस्वामीमहाराज जेव्हा नित्यकर्मासाठी व भिक्षेसाठी बाहेर जात त्यावेळी त्यांची नजर नेहमी खाली असे. त्यामुळे त्यांच्या चेहऱ्यावरील ब्रह्मतेज लोकांपासून लपून राहिले होते.

अशा तऱ्हेने आठ महिने गेले आणि शके १८१४ चा आषाढ मास सुरू झाला. आषाढ पौर्णिमेपासून श्रीस्वामीमहाराजांचा दुसरा चातुर्मास सुरू झाला. लोकांसमोर लोकोद्धारासाठी प्रकट व्हावयाची वेळ आता आली होती. एवढे दिवस त्या पवित्र झोपडीमध्ये झाकून असलेल्या अद्वितीय रत्नाचे अनेक पैलू लोकांपुढे चमकण्याची वेळ आता आली होती. चातुर्मासामध्ये अनेक संन्यासी आपला चातुर्मास

येथे करीत असत. या दिवसांमध्ये प्राय: प्रत्येक देवळामध्ये दररोज सकाळ संध्याकाळ प्रवचन, पुराण, कीर्तन, भजन असा काही तरी कार्यक्रम होत असे.

ब्रह्मावर्ताच्या प्रसिद्ध श्रीराममंदिरामध्ये या दिवसात दररोज पुराण होत असे. पुराण श्रीमद्‌भागवतावर चाले. श्रीस्वामीमहाराज नियमितपणे श्रीराममंदिरात पुराण ऐकावयाला जात असत. एका ठराविक ठिकाणी खांबाला टेकून ते बसत व पुराण संपल्यावर आपल्या झोपडीमध्ये परत जात असत. कोणाशी बोलणे नाही की काही नाही. तिसऱ्या दिवशी पुराण संपल्यावर ते पुराणिकबुवां-जवळ जाऊन त्यांना असे म्हणाले की, "गेले तीन दिवस आपले पुराण ऐकून आनंद झाला. आपली अस्खलित वाणी ऐकून मी भारावून गेलो आहे आणि मला असे वाटू लागले आहे की उद्या आपले पुराण संपल्यावर मीही एखादा श्लोक सांगावा." पुराणिक-बुवा श्रीस्वामीमहाराजांच्या नम्र बोलण्याने प्रभावित झाले व त्यांना असे म्हणाले की, "उद्या आमचे पुराण संपल्यावर आपण श्लोक सांगा." असे म्हणून ते थांबले नाहीत; तर हजर असलेल्या श्रोतृवृंदास उद्देशून ते असे म्हणाले की, "सज्जन हो ! उद्या येथे आमचे पुराण संपल्यावर या व्यासपीठावरून हे नवीन स्वामी-महाराज एक श्लोक सांगतील."

दुसऱ्या दिवशी संध्याकाळी श्रीराममंदिरामध्ये नेहमीपेक्षा अधिक गर्दी झाली. आज काहीतरी नवीन ऐकावयाला मिळणार या अपेक्षेने प्रत्येकजण लवकर येऊन सभामंडपामध्ये जागा धरून बसू लागला. नेहमीच्या वेळेवर श्री. पुराणिकबुवा आले आणि त्यांचे पुराण आटोपल्यावर त्यांनी श्रीस्वामीमहाराजांना श्लोक सांगण्याची प्रार्थना केली. श्रीस्वामीमहाराजांची वाणी रसाळ होती. त्यांचे वक्तृत्व अस्खलित होते त्यांनी एकवेळा सर्वांकडे सुहास्य

मुद्रेने पाहिले व गीतेतील एक श्लोक घेऊन त्याच्या आधारावर पुराण सांगावयाला सुरुवात केली. श्रुतिवचनांचा प्रत्यक्ष उल्लेख न करता त्यांचा अर्थ सांगून आणि स्मृती, पुराण व विविध शास्त्रग्रंथांमधील नानाविध दाखले देऊन कर्म, भक्ती म्हणजे उपासना आणि ज्ञान यांचे विस्तृत विवेचन करीत त्यांनी पुराण सांगितले.

श्रीस्वामीमहाराजांच्या मुखातून ते दिव्य पुराण ऐकून जमलेले सर्व लोक विस्मयचकित झाले; कारण श्रीमत् सूतसंहितेतील ब्रह्मगीतेत महर्षी श्रीवेदव्यासांनी सांगितल्याप्रमाणे "अनधीतस्य शास्त्रस्य स्वत एव प्रकाशनम् ॥ ४.१२३ ॥" या न्यायाने पूर्वी कधीही न शिकलेली शास्त्रे स्वतःहून त्यांच्यासमोर प्रकट होऊन प्रकाशित होत होती. इतकेच नव्हे तर योगशिखोपनिषदात ऋषींनी म्हटल्याप्रमाणे "य इमां वैखरीं शक्तिं योगी स्वात्मनि पश्यति । स वाक्सिद्धिमवाप्नोति सरस्वत्याः प्रसादतः ॥ ३.१० ॥" या सिद्धान्ताप्रमाणे श्रीस्वामीमहाराजांसारख्या महायोग्याच्या ठिकाणी सरस्वती वेगवेगळ्या पदवाक्यादि रूपात प्रकट होत आहे व वैखरी वाणीच्या दिव्य शक्तीला ते स्वतःच्या आत्मस्वरूपात पाहत आहेत असे सर्वांना वाटत होते. त्यांना श्रीसरस्वतीदेवीच्या कृपाप्रसादाने वाक्सिद्धी प्राप्त झाल्याचे व ते वेदशास्त्रपुराणादिकांचे कर्तेच आहेत असे भासत होते. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानेश्वरीत म्हटल्या-प्रमाणे "तिये सिद्धप्रज्ञेचेनि लाभें। मनचि सारस्वतें दुभे। मग सकळ शास्त्रें स्वयंभें। निघती मुखें ॥ ६.४५४ ॥" असेच ते दिव्य पुराण आहे असे लोकांना वाटले. श्रीस्वामीमहाराजांच्या प्रत्येक शब्दामध्ये आत्मविश्वास होता; कारण ते जे काही प्रतिपादन करीत होते ते सर्व त्यांनी अनुभविले होते. अनुभवाच्या खाणीतून शब्दरूपी रत्ने बाहेर येत होती. त्या शब्दांच्या आधारे जे ज्ञान त्यांनी लोकां-समोर मांडले ते सर्व ज्ञान खरे तर शब्दांच्याही पलीकडचे होते;

पण श्रीस्वामीमहाराजांच्या वाणीतून ते शब्दरूप झाले. श्रीस्वामी-महाराजांचे पुराण ऐकून श्रोतृसमुदायच काय; पण स्वतः पुराणीक-बुवाही स्वतःला विसरले होते. काही काळ स्थळकाळाचे भान सर्वजण विसरले होते. ते अश्रुतपूर्व पुराण ऐकण्यासाठी काळ जणू काही थांबला होता. श्रीगंगेच्या किनाऱ्यावरून येणारा पवित्र वारा-सुद्धा श्रीस्वामीमहाराजांची पवित्र वाणी ऐकून स्तब्ध झाला. श्रीस्वामीमहाराजांची अगाध विद्वत्ता व अलौकिक योग्यता लोकांच्या लक्षात येऊन श्री. पुराणिकबुवांसकट तेथे बसलेली सर्वच मंडळी अत्यंत भारावून गेली होती.

श्रीस्वामीमहाराजांचे पुराण थांबल्यावर सर्वप्रथम श्री. पुराणिक-बुवा भानावर जाले. इतर श्रोते अद्याप आपल्या जागीच बसून होते. श्री. पुराणिकबुवा भारावलेल्या अवस्थेमध्ये पुढे आले आणि श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाले की, "आमचा चातुर्मास आजच संपला. आमचे पुराण सांगणे आम्ही आजपासूनच बंद केले आहे. आपल्या रसाळ वाणीतून आता जे ऐकले ते पुन्हा पुन्हा ऐकावे हीच आता इच्छा आहे. यापुढे दररोज या व्यासपीठावरून आपण पुराण सांगावे आणि आपण सर्वांना तृप्त करावे अशी आपल्या चरणी माझ्यातर्फे आणि या सर्व भाविक श्रोतृवृंदांतर्फे आपणास मी प्रार्थना करीत आहे. मी काही उद्यापासून या व्यासपीठावर बसणार नाही." असे म्हणून श्री. पुराणिकबुवांनी सर्व लोकांकडे पाहिले. सर्वांनी उत्स्फूर्तपणे "हो, हो, आमची सर्वांचीही हीच विनंती आहे," असे म्हणून आपला आनंद व्यक्त केला.

श्रीस्वामीमहाराजांनी लोकांपुढे येऊन पुराण सांगण्याचा जो प्रसंग वर वर्णन केला आहे त्याहून थोडी वेगळी अशी हकीकत माझे गुरुबंधू श्री. विष्णू रघुनाथ हळबे, भुसावळ, यांनी सांगितली आहे. ही हकीकतसुद्धा वरील कथाभागाप्रमाणे मनोरंजक असल्या-

मुळे पुढे देत आहे.

त्यावेळचे प्रसिद्ध कीर्तनकार श्री. आपटेबुवा यांचे ब्रह्मावर्ताच्या श्रीराममंदिरामध्ये चातुर्मासात सतत अकरा रात्री कीर्तन होत असे. श्री. आपटेबुवा पढीक विद्वान् होते. वेदान्त अगदी त्यांच्या जिव्हाग्री बसलेला होता. दर वर्षी चातुर्मासामध्ये कीर्तन करणे हा बुवांचा कित्येक वर्षांचा कार्यक्रम होता. त्यात कधी खंड पडला नव्हता. आपल्या अंगी असलेल्या विद्वतेची बुवांना जाणीव होऊ लागली होती. अशावेळी हा इतिहास घडला. त्यावर्षी चातुर्मासाला सुरुवात झाल्यापासून श्रीस्वामीमहाराज श्रीराममंदिरामध्ये जात असत. एके दिवशी श्री. आपटेबुवा यांचे कीर्तन ऐकण्यासाठी रात्री मंदिरामध्ये खच्चून गर्दी झाली होती. जो तो बुवांच्या विद्वतेची स्तुती करीत होता. इतक्यात श्री. आपटेबुवा उपरणे सावरीत सभामंडपात आले. त्यांनी सभोवार नजर टाकली आणि त्यांचे हृदय अभिमानाने भरून आले. "एवढा सर्व श्रोतृसमुदाय अस्मादिकांच्या वाणीवर व विद्वत्तेवर खूष होऊन येथे जमा झाला आहे. याला म्हणतात लोकप्रियता." असे विचार मनात येऊन त्यांना स्वतःलाच स्वतःची धन्यता वाटली. या विचारचक्रात त्यांचे मन गुंतलेले असतानाच समोर खांबाला टेकून एक कृश शरीराचे संन्यासी बसलेले त्यांना दिसले. त्यांची मुद्रा निर्विकार व शांत होती. जणू आजूबाजूच्या जनसागराची त्यांना जाणीवही नव्हती. त्यांना पाहून श्री. आपटेबुवांना जरा रागच आला." माझी उपेक्षा करून चालणार नाही." इत्यादि विविध विचार मनातल्या मनात घोळवीत त्यांनी पुन्हा एकदा त्या संन्याशाकडे पाहिले आणि हाती टाळ घेऊन ठेका धरला.

आजचे श्री. आपटेबुवांचे कीर्तन फारच रंगले. श्री. बुवांनी आपली सर्व विद्वत्ता आपल्या रसाळ वाणीमध्ये ओतली होती.

त्यामुळे श्रोत्यांची ब्रह्मानंदी टाळी लागली. लोकांच्या चेहऱ्यावर समाधान दिसत होते. श्री. बुवांचे कीर्तन त्यांच्या लौकिकाला साजेसेच झाले. 'हेचि दान देगा देवा' म्हणता म्हणता श्री.बुवांनी पुन्हा एकदा सर्व श्रोत्यांवरून नजर फिरविली. समोर बसलेल्या संन्याशांवर त्यांची नजर क्षणभर स्थिरावली व ते श्रोत्यांना उद्देशून असे म्हणाले की, "उद्या येथे दुसऱ्या कोणीतरी कीर्तन करावे असे मला वाटते. बोला ! उद्या येथे कोण कीर्तन करणार आहे ? " श्री. आपटेबुवांच्या बोलण्यात दर्पोक्ती होती; पण "जातीच्या विद्वानांना काहीही शोभते" या वचनाप्रमाणे श्रोत्यांनी त्यांच्या बोलण्यातील दर्पोक्तीकडे दुर्लक्ष केले. श्रोत्यांकडे पाहून श्री. बुवांनी पुन्हा अशी पृच्छा केली की, "बोला, उद्याचे कीर्तन कोण करणार ?'

कोण करणार म्हणजे ! श्री. आपटेबुवांशिवाय दुसरे कोण कीर्तन करणार ? आज एवढी वर्षे श्री. आपटेबुवाच दर चातु-र्मासामध्ये अकरा कीर्तनांची माळ गुंफत आले होते. त्यांचाच तो अधिकार होता. श्रोत्यांमधून कोणीच उत्तर दिले नाही. अर्थात् श्री. बुवांना याचीच अपेक्षा होती. स्वारी अगदी खूष झाली. एवढ्यात कुठून तरी शब्द आले– "उद्या मी कीर्तन करणार."

सर्व लोक अवाक् झाले. एवढे धैर्य कोणाला झाले ! जो तो मान उंचावून पाहू लागला. एक आठ–दहा वर्षांचा मुलगा उभा राहून दिमाखाने असे सांगत होता की, "उद्या मी कीर्तन करणार." त्याची आई त्याला मागे खेचीत होती. मुलाला पाहताच सर्वांच्या चेहऱ्यावर हास्य झळकले. ते उपहासाचे हास्य होते असे म्हणण्या-पेक्षा एक प्रकारच्या विनोदाने भरलेले हास्य होते. सर्वांना वाटले, "हा विनोद झाला." श्री. आपटेबुवांनाही असेच वाटले. त्यांनी हसत हसत मुलाला विचारले, "काय ? तुम्ही उद्या येथे कीर्तन

करणार? शाबास!" मुलानेही निर्भयपणे "हो" म्हणून सांगितले. श्रोतृसमुदाय हळूहळू ओसरू लागला. मुलाची आई मुलाचा हात धरून गर्दीतून वाट काढीत घरी जाण्याच्या प्रयत्नात होती. क्षण-भर तिची नजर खांबाला टेकून बसलेल्या संन्याशाकडे गेली. त्या संन्याशांनी हाताने खूण करून या मायलेकरांना आपल्याकडे बोला-विले आणि त्या मुलाला असे विचारले की, "मुला! उद्या तू खरेच कीर्तन करणार काय? तुला काय काय पाठ येते?"

हा प्रश्न ऐकताच तो मुलगा त्यांना असे म्हणाला की, "मना सज्जना भक्तिपंथेची जावे—हा श्लोक मला पाठ येतो." आणखीही काही श्लोक व स्तोत्रे वडिलांनी मला शिकविली आहेत.

ते संन्याशी म्हणजे श्रीस्वामीमहाराजच होते. त्यांनी मुलाच्या आईला असे सांगितले की, "मुलगा हुशार आहे. उद्या सकाळी याला गंगेवर नेऊन स्नान घाला आणि संध्याकाळी कीर्तनकाराच्या वेषात मंदिरात घेऊन या." त्या मुलाच्या आईने श्रीस्वामी-महाराजांना नमस्कार केला व ती मुलाला घेऊन आपल्या घरी गेली. दुसऱ्या दिवशी सकाळीच मुलाला झोपेतून उठवून तिने घाटावर नेले आणि त्याला स्नान घालून आणले.

संध्याकाळ झाली. दिवे लागले. हळूहळू भाविक लोक नित्या-प्रमाणे मंदिरामध्ये जमा होऊ लागले आज मंदिरामध्ये नेहमीपेक्षा जरा जास्तच गर्दी झाली. श्रीस्वामीमहाराजही मंदिरात आले आणि नेहमीच्या खांबाला टेकून बसले. सर्वजण श्री. आपटेबुवांची वाट पाहात होते. श्री. बुवा आपल्या नेहमीच्या वेळी आले आणि त्याच वेळी त्या बाल हरदासाची स्वारीही आली त्याच्या आईने आज त्याला कीर्तनकारासारखे सजविले होते. तिने त्याला धोतर नेसविले होते व त्याच्या अंगावर उपरणे पांघरले होते. त्याच्या कपाळावर चंदनाचा टिळा आणि मुखावर निरागस भाव होता. आपल्याकडून

काही विशेष घडणार आहे किंवा या सर्व जनसमुदायापुढे आपली टर उडविली जाणार आहे याची त्या बालमनाला काहीसुद्धा जाणीव नव्हती. आईचा हात धरून तो सभामंडपामध्ये आला. सव जनसमुदायाचे डोळे जसे श्री. आपटेबुवा येताच त्यांच्यावर खिळले तसे आता ते या बाल कीर्तनकारावर खिळले. मुलगा आला तो थेट श्रीस्वामीमहाराज जेथे वसले होते तेथे गेला. श्रीस्वामीमहाराज कोणाचा स्पर्श करून घेत नसत; पण हा बाल ब्रह्मचारी आला तो थेट त्यांच्या मांडीवर जाऊन बसला. श्रीस्वामीमहाराजांना मोठे कौतुक वाटले. सर्व लोक या घटनेकडे आ वासून पाहत होते. श्रीस्वामीमहाराजांनी आपला डावा हात त्याच्या कंबरेभोवती घालून त्याला आपल्याकडे ओढले व त्यांनी कौतुकाने त्याला असे विचारले की, "आज खरोखरच तुम्ही कीर्तन करणार काय?" "होय महाराज! मी आज खरेच कीर्तन करणार आहे." "कोणता श्लोक कीर्तनासाठी घेणार?" "मना सज्जना भक्तिपंथेची जावे, या श्लोकावर कीर्तन करण्याची माझी इच्छा आहे." पुन्हा म्हणा—" "मना सज्जना......असे म्हणून बालकाने श्लोक म्हणावयाला तोंड उघडताच श्रीस्वामीमहाराजांनी हळूच एक चिमूटभर भस्म उजव्या हाताने त्याच्या जिभेवर टाकले आणि श्लोकाची पूर्ती करीत असताना ते सहजगत्या त्याच्या पोटात गेले या सर्व गोष्टी एवढ्या झटकन् घडल्या की, अगदी जवळ बसलेल्या श्रोत्यांच्याच त्या नजरेला आल्या; पण ही कुजबुज पसरता पसरता सर्व लोकांपर्यंत्त गेली. आता काही तरी अघटित घडणार अशी लोकांची खात्री झाली; कारण श्रीस्वामीमहाराजांच्या चेहऱ्यावरचे तेज आता त्या बालकाच्या चेहऱ्यावर प्रतिबिंबित झालेले दिसत होते.

"आज कोण कीर्तन करणार?" स्वतः कीर्तन करावयाच्या

तयारीत आलेल्या श्री. आपटेबुवांनी पृच्छा केली. सर्वांच्या नजरा या बालकीर्तनकारावर खिळून राहिल्या होत्या. एक प्रकारच्या तंद्रीमध्ये चालत तो कीर्तनकाराच्या जागी आला आणि त्याने सुरुवात केली. "मना सज्जना भक्तिपंथेची जावे ......" तबलजीने आणि टाळकऱ्यांनी ठेका धरला आणि नंतर जो इतिहास घडला तो एवढ्या सहजतेने घडला की, साडेतीन तास काही जगावेगळे घडत आहे याची कोणाला जाणीवच झाली नाही. साडेतीन तास त्या बालकीर्तनकाराने न अडखळता कीर्तन केले. श्रीस्वामीमहाराजांची दैवीवाणी त्या बालकाच्या मुखातून बाहेर पडत होती. त्याचे शब्द हे ब्रह्मतत्त्वाचा स्पर्श झालेले शब्द होते. त्यांनी श्रोत्यांना मंत्रमुग्ध करून टाकले होते. तो असे सांगत होता की, "माणसाने आपल्या अंगी असलेल्या विद्वत्तेचा, ज्ञानाचा आणि इतर कशाचाही गर्व करू नये. कर्ता करविता एक परमेश्वरच आहे. त्याच्याच इच्छेने आकाशस्थ ग्रहांचे भ्रमण होते. गवताचे पानही त्याच्याच इच्छेने डोलते आणि त्याच परमेश्वराच्या इच्छेने विद्वत्ता प्राप्त होते. सर्वांचा बोलविता धनी तोच आहे." कीर्तन ऐकता ऐकता श्री. आपटेबुवांच्या नेत्रातून अश्रुधारा वाहू लागल्या. ते जातिवंत विद्वान् होते. त्यामुळे ते काय समजावयाचे ते समजले. कीर्तन आटोपताच धावत जाऊन त्यांनी श्रीस्वामीमहाराजांचे पाय धरले आणि ते त्यांना असे म्हणाले की, "आपण मला सावरले, आपणच माझा उद्धार करा." श्रीस्वामीमहाराजांनी ज्याप्रमाणे कीर्तनकाराच्या इच्छेप्रमाणे त्याला कृतार्थ केले त्याप्रमाणे श्री. पुराणिकबुवांनी प्रार्थना केल्याप्रमाणे ते रोज पुराणही सांगू लागले.

त्यानंतर श्रीस्वामीमहाराजांच्या झोपडीचे दार नेहमी उघडेच राहू लागले. आपले आन्हिक संपल्यावर फावल्या वेळात ते लोकांना याज्ञिक, वेदान्त, मीमांसा, ज्योतिष वगैरे शिकवू लागले. नित्यकर्म,

याज्ञिक वगैरे शिकणाऱ्यांची संख्याही काही कमी नव्हती. श्रीस्वामी-महाराजांकडे येणाऱ्या लोकांची संख्या उत्तरोत्तर वाढतच गेली. ते पात्रापात्र पाहून लोकांना शिकवीत असत. ब्रह्मावर्त या क्षेत्राची परंपराच अशी होती की, येथे नास्तिक अभावानेच सापडेल. सर्व लोक भाविक होते. त्यांच्या हृदयामध्ये श्रीस्वामीमहाराजांनी ईश्वर–भक्तीची ज्योत प्रज्ज्वलित केली.

श्रीस्वामीमहाराज श्रीदत्तप्रभूंनी घालून दिलेल्या मार्गानेच जात होते. जनतेला वर्णाश्रमधर्माचे शिक्षण देत–देत त्याची ईश्वरभावाने सेवा करावयाची हा त्यांचा अंतस्थ हेतू होता. त्यांच्या प्रत्येक कृतीमागे सेवाभाव दिसून येत असे. यामुळे लोकांच्या मनात त्यांच्या विषयी आत्यंतिक आदर निर्माण झाला होता. मात्र अशा स्थितीतही श्रीस्वामीमहाराजांनी स्वतःला लोकैषणेपासून दूर ठेवले होते, हे लक्षात ठेवण्यासारखे आहे.

अशा रीतीनें हा व्याप एवढा वाढला की, श्रीगंगेच्या काठी ब्रह्मावर्त येथे श्रीस्वामीमहाराजांचा दीड वर्षे मुक्काम झाला. त्यांच्या त्या पर्णकुटीला आता ऋषी–मुनींच्या आश्रमाची योग्यता प्राप्त झाली होती. लोक श्रीस्वामीमहाराजांच्या एवढे भजनी लागले होते की, ते त्यांना सोडावयाला तयार नव्हते. बऱ्याच मंडळींना सन्मार्गाचा उपदेश प्राप्त झाल्यामुळे त्यांचे कल्याण झाले. त्याचप्रमाणें वर्णाश्रमधर्माकडेही लोकांची प्रवृत्ती विशेष वाढली. श्रीस्वामीमहाराजांची कीर्ती आता पुष्कळ दूरपर्यन्त जाऊन पोहोचली होती. दूरदूरचे लोक त्यांच्या दर्शनाला येऊ लागले होते. कोणी ज्ञानलाभाच्या इच्छेने, कोणी ऐहिक दुःखातून बाहेर पडण्यास मार्ग मिळावा या लालसेने, तर कोणी श्रीस्वामी-महाराजांच्या व्यक्तिमत्वाने प्रभावीत होऊन त्यांच्याकडे येत असे. त्यांची कीर्ती एकून ग्वाल्हेरचे महापंडित श्री. गोपाळाचार्य

श्रीस्वामीमहाराजांच्या भेटीसाठी ब्रह्मावर्त येथे आले. काशीपासून रामेश्वरापर्यंन्त त्यांची कीर्ती पसरलेली होती. ते मोठे पंडित तर होतेच; शिवाय ते अधिकारी असून भगवद्‌भक्त व साधुवृत्तीचे महापुरुष होते. त्यांच्याबरोबर शिष्यांचा मोठा समुदाय होता. सायंकाळची वेळ होती. श्रीराममंदिरामध्ये श्रीस्वामीमहाराज पुराण सांगत होते. मंदिर श्रोत्यांनी भरून गेले होते. आत प्रवेश करावयाला श्री. गोपाळाचार्यांना मार्ग मिळाला नाही. ते तसेच श्रीस्वामीमहाराजांचे पुराण ऐकत बाहेर उभे राहिले. परतत्त्वाचा स्पर्श झालेले ज्ञान श्रीस्वामीमहाराज लोकांना समजेल अशा शब्दात सांगत होते आणि श्रोते जिवाचे कान करून ऐकत होते. ते दृश्यच वेगळे, दिव्य व स्वर्गीय होते. श्रीस्वामीमहाराजांचे अमोघ वक्तृत्व व शास्त्रप्रतिपादनाची शैली पाहून श्री. गोपाळाचार्य प्रभावित झाले. श्रीस्वामीमहाराजांची नजर समोर उभ्या असलेल्या श्री. गोपाळाचार्यांवर पडली. रत्नाचे तेज रत्नपारखीच ओळखतो. "शिष्टागमने अनध्यायः" असे म्हणून त्यांनी पुराण थांबविले व पोथी गुंडाळून ठेवली. श्री. गोपाळाचार्यांना घेऊन ते झोपडीमध्ये गेले. श्री. गोपाळाचार्यांचे शिष्य बाहेरच थांबले होते. आत या दोघा विद्वद्वर्यांची व भक्तश्रेष्ठांची काय चर्चा झाली कोणास ठाऊक? बराच वेळ दोघे झोपडीचे दार बंद करून आत बसले होते. आत श्री. गोपाळाचार्य व श्रीस्वामीमहाराज यांची काही चर्चा होऊन त्यांत आचार्यांचे समाधान झाले. दुसऱ्या दिवशी श्री. गोपाळाचार्य समाधानाने व तृप्त होऊनच परत गेले

ब्रह्मावर्तातील त्या दीड वर्षाच्या काळात श्रीस्वामीमहाराजांनी भगवान् श्रीदत्तात्रेयांच्या आज्ञेने श्रीदत्तपुराण हा संस्कृत ग्रंथ रचला. पुराण म्हटल्यावर सर्ग, अतिसर्ग, वंश, मन्वंतर वंशानुचरित अशी पाच लक्षणे त्या ग्रंथामध्ये आढळून यावी लागतात.

श्रीदत्तपुराण या ग्रंथामध्ये पहिल्या अष्टकात सर्गाचे वर्णन आहे. दोन ते सात या अष्टकांमध्ये वंश, मन्वन्तर इत्यादि विषय आहेत व आठव्यामध्ये प्रतिसर्गाचे वर्णन आहे. या सर्वांमुळे हा ग्रंथ पुराण या संज्ञेस पात्र आहे. या ग्रंथाची एकंदर श्लोकसंख्या साडेतीन हजार असून त्यावर श्रीस्वामीमहाराजांनी स्वतःच विस्तृत टीका केली आहे. संस्कृत भाषेतील हा एक अपूर्व ग्रंथ आहे. याचे एकंदर ६४ अध्याय असून त्यात आठ अष्टके आहेत या ग्रंथात ज्ञान, उपासना आणि कर्म यांचे विवेचन केलेले आहे. पहिल्या दोन अष्टकात ज्ञानकांड, तीन ते सहा अष्टकात उपासना कांड व शेवटच्या सात व आठ अष्टकात कर्मकांड, अशी या अष्टकांची विभागणी केलेली आहे. या ग्रंथाची रचना श्रीस्वामीमहाराजांकडून ऋक्संहितेप्रमाणे झाली आहे. या ग्रंथाचे आणखी एक वैशिष्टच म्हणजे ऋक्संहितेतील प्रत्येक अध्यायातील आरंभ व या ग्रंथातील प्रत्येक अध्यायाचा आरंभ हे सारखेच आहेत. पहिल्या वेदपादस्तुती या अध्यायात काही चरण वेदाच्या अक्षरांचे त्या त्या अध्यायातील घेतले असून साधारणपणे तिसरा व चौथा चरण, स्वरचित घालून ६४ श्लोक पुरे केले आहेत. शिवाय तीन श्लोक यजुः, साम व अथर्ववेदारंभीची प्रतिके घेऊन केले आहेत. वेदपादस्तुतीचा हा अध्याय श्रीस्वामीमहाराजांनी मध्यरात्री रचला असे सांगतात. वेदांमधील सहाही दर्शनातील ज्ञान त्यांनी प्रासादिक संस्कृत भाषेत लोकांपुढे ठेविले आहे. ज्याप्रमाणे "प्रस्थानत्रयीवरील भाष्याच्या" रूपाने श्रीमदाद्यशंकराचार्य, "ज्ञानेश्वरीच्या" रूपाने श्रीज्ञानेश्वरमहाराज, "नाथ भागवताच्या" रूपाने श्रीएकनाथमहाराज व "दासबोधाच्या" रूपाने श्रीसमर्थरामदासस्वामीमहाराज आपल्या समोर उभे राहतात त्याप्रमाणे या श्रीदत्तपुराण ग्रंथाच्या रूपाने प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीस्वामीमहाराज आजही विद्वानां-

समोर उभे आहेत. श्रीस्वामीमहाराजांनी रचलेले सर्वच ग्रंथ अप्रतिम आहेत; पण श्रीदत्तपुराणाची थोरवी काही वेगळीच आहे, असे विद्वान् मानतात. आचार्यांच्या सौंदर्यलहरी या तांत्रिक ग्रंथाप्रमाणेच श्रीदत्तपुराणातील वेदपादस्तुती मंत्रस्वरूप आहे आणि त्या स्तुतीचा नित्यपाठ फलदायी आहे असा पुष्कळांचा अनुभव आहे.

श्रीदत्तपुराण हा अपूर्व ग्रंथ पूर्ण झाल्यावर श्रीस्वामीमहाराजांनी ब्रह्मावर्त सोडण्याचे ठरविले व देवांचीही त्यांना तशी आज्ञा झाली. ही वार्ता लोकांमध्ये वाऱ्यासारखी पसरली. श्रीस्वामीमहाराजांना आग्रह करण्याएवढी ज्यांची प्रेमाची जवळीक होती, त्यांनी श्रीस्वामीमहाराजांना आग्रह करून पाहिले; परन्तु "येथील मंडळींच्या प्रेमाखातरच ब्रह्मावर्त येथे दीड वर्ष वास करावा लागला," असे सांगून त्यांनी आपला निघण्याचा दिवस मुक्रर केला. दीडवर्षामध्ये एक वर्ष त्यांचा अगदी जवळून सहवास लाभल्यामुळे लोकांच्या मनात त्यांच्याविषयी अपार प्रेम निर्माण झाले होते. त्यांनी येथील लोकांना अनंत हातांनी ज्ञान, भक्ती, प्रेम व माणुसकी दिली. प्रयाणाच्या दिवशी श्रीदत्तमंदिरापुढे शेकडोशे लोकांनी गर्दी केली. मार्गावर दुतर्फा लोक साश्रुनयनांनी हात जोडून उभे होते. श्रीस्वामीमहाराज बाहेर पडले. त्यांच्या उजव्या हातात परशुमुद्रा बांधलेला दंड, डाव्या हातात वेळूचा कमंडलू, काखेला देवांचा संपुष्ट असून अंगावर छाटी पांघरलेली होती. श्रीस्वामीमहाराजांची ती प्रेमळ मूर्ती पाहून व आता ते आपणापासून दूर जात आहेत या विचाराने लोकांचा गळा दाटून आला. दूरपर्यन्त ते श्रीस्वामी-महाराजांच्या बरोबर गेले. अखेर श्रीस्वामीमहाराजांनीच त्यांना आग्रह करून परतावयाला लावले.

**श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य भगवान् श्रीवासुदेवानन्द-सरस्वती श्रीदत्तात्रेयस्वामीमहाराज यांचा अखंड जयजयकार असो.**

सकल जीवांनी आपल्या उद्धारार्थ श्रीदत्तचरणी प्रार्थना करावी व आपले जीवन धन्य व कृतार्थ करून घ्यावे म्हणून त्यांनी "श्रीगुरुदत्तात्रेयाष्टक" स्तोत्राची रचना केली. आपणही त्यांच्या शब्दांच्या आधारे त्यांच्याच चरणी ही प्रार्थना प्रस्तुत करून आत्यंतिक शरणागतीपूर्वक व सर्व अहंकार निपटून काढून आपल्या जीवितधन्यतेसाठी व कृतार्थतेसाठी त्यांच्या परमपवित्र व परमकोमलचरणी प्रार्थना करू.

## – श्रीगुरुदत्तात्रेयाष्टक –

तापत्रयाने मम देह तापला। विश्रांति कोणी न च देतसे मला॥
दैवें तुझें हें पद लाधलें मला। दत्ता कृपासाउलि दे नमूं तुला ॥१॥
कामादि षड्वैरि सदैव पीडिती। दुर्वासना अंग सदैव ताडिती॥
त्राता दुजा कोण न भेटला मला। दत्ता कृपासाउलि दे नमूं तुला ॥२॥
देहीं अहंता जडली न सोडवे। गृहात्मजस्त्रीममता न सोडवे ॥
त्रितापदावानळ पोळितो मला। दत्ता कृपासाउलि दे नमूं तुला ॥३॥
अंगीं उठे हा अविचार दुर्धर। तो आमुचें हें बुडवीतसें घर॥
पापें करोनी जाळतों त्वरें मला। दत्ता कृपासाउलि दे नमूं तुला ॥४॥
तूंची कृपासागर मायबाप तूं। तूं विश्वहेतू हरि पापताप तूं॥
न तूजवांचूनि दयाळु पाहिला। दत्ता कृपासाउलि दे नमूं तुला ॥५॥
दारिद्र्यदावें द्विज पोळतां तया। श्री द्यावया तोडिसि वेल चिन्मया।
तया परी पाहि दयार्द्र तूं मला। दत्ता कृपासाउलि दे नमूं तुला ॥६॥
प्रेतासि तूं वाचविसी दयाघना। काष्ठासि तूं पल्लव आणिसी मना॥
हें आठवी मी तरि जीव कोमला। दत्ता कृपासाउलि दे नमूं तुला ॥७॥
ह्या अष्टकें जे स्तविती तयावरी। कृपा करीं हात धरीं तया शिरीं॥
साष्टांग घालूं प्रणिपात बा तुला। दत्ता कृपासाउलि दे नमूं तुला ॥८॥

# - अध्याय तिसरा -

आलोक्य मामच्युत ईश्वरोऽपि
भीतोगमत्सागरसूरशैलान् ॥
सत्यं तथा च तव हृत्कमले स्थितो यः ।
श्रान्तः स्व दर्शय यते गुरुवासुदेव ॥

**चातुर्मास तिसरा–शके १८१५– इ. स. १८९३– हरिद्वार :–**

श्रीस्वामीमहाराज ब्रह्मावर्ताहून निघून गोकुळ, मथुरा, वृंदावन इत्यादि स्थाने पाहत पाहत शके १८१५ म्हणजे इ. स. १८९३ च्या वैशाखी पौर्णिमेच्या आसपास श्रीक्षेत्र हरिद्वारला येऊन पोहोचले. हरिद्वार हे श्रीगंगेच्या पवित्र किनाऱ्यावर वसलेले असून येथे भगवान् श्रीशंकराच्या जटेतून मुक्त झालेली गंगा शांत झालेली आहे. लोकांची पापे नष्ट करण्यासाठी हरिद्वारपासून तिचा वेग मंद झाला आहे. हर म्हणजे शंकराकडे जाण्याचा मार्ग येथूनच सुरू होतो. म्हणून हे खरे तर हरद्वार होय ! नगाधिराज हिमालयाच्या कुशीत प्रवेश करणारी वाट येथूनच सुरू होते. श्रीस्वामीमहाराजांनी हरिद्वारला अहिल्याबाईच्या धर्मशाळेच्या जवळ असलेल्या श्रीदत्तमंदिरात मुक्काम केला. यावेळी शारदापीठाधीश शंकराचार्य श्रीराजराजेश्वरस्वामीमहाराज यांचाही हरिद्वारला मुक्काम होता. दोघा स्वामींची भेट झाली आणि श्रीस्वामीमहाराजांनी हा चातुर्मास हरिद्वारलाच करावा असा श्रीशंकराचार्यांनी प्रेमाचा आग्रह धरला. त्यांच्या आग्रहाला मान देऊन श्रीस्वामीमहाराजांनी आपला हा तिसरा चातुर्मास हरिद्वारला श्रीशंकराचार्यांच्या सहवासामध्ये करावयाचे ठरविले.

यावेळी श्रीस्वामीमहाराजांकडून उपनिषद्भाष्य ऐकण्याची इच्छा श्रीशंकराचार्यांनी व्यक्त केली. त्याप्रमाणे श्रीस्वामीमहा-

राजांनी त्यांना उपनिषद्भाष्य ऐकविले. शारदापीठाधीश शंकराचार्य श्रीराजराजेश्वरस्वामीमहाराज यांच्यासारख्या विद्वद्वर्य आचार्यांना उपनिषद्भाष्य सांगणे ही काही साधारण गोष्ट नव्हती; पण श्रीस्वामीमहाराजांचे संस्कृत भाषेवरील प्रभुत्व व उपनिषदांचा प्राज्ञ भूमिकेवरून केलेला अभ्यास यामुळे त्यांना श्रीशंकराचार्यांसमोर उपनिषद्भाष्य सांगावयाला कोणत्याही प्रकारची अडचण पडली नाही. हरिद्वारचा चातुर्मास संपताच श्रीस्वामीमहाराज श्रीबद्रीनारायणाच्या यात्रेस जाण्याकरिता निघाले. त्यांनी हरिद्वारहून हृषीकेशची वाट धरली. मार्गात त्यांची नर्मदातीरावरील भालोद गावच्या काही मंडळींशी गाठ पडली. ही मंडळी श्रीबद्रीनारायणाच्या दर्शनाला चालली होती. या मंडळींमध्ये श्री. बळवंतराव वगैरे काही मंडळी श्रीस्वामीमहाराजांच्या पूर्व परिचयाची होती.

श्री. बळवंतराव हे किरकोळ प्रकृतीचे गृहस्थ होते. त्यांना हिमालयातील थंडी सहन होत नव्हती. एकदा त्यांना फारच थंडी वाजू लागली म्हणून त्यांनी आपली प्रकृती तेथील स्थानिक डॉक्टरांना दाखविली त्यावेळी डॉक्टरांनी चुकून त्यांना सोमलच्या गोळ्या दिल्या. त्या गोळ्या त्यांनी घेतल्या व अतिशय अशक्तपणा वाटू लागल्यामुळे ते डोलीत बसून पुढे जाण्यास निघाले. पुढे थोड्याच वेळात त्यांनी घेतलेल्या गोळ्यांचा विपरीत परिणाम दिसू लागला. त्यावेळी त्यांच्या शरीरामध्ये उष्णता निर्माण होऊन त्यांच्या सर्वांगाचा दाह होऊ लागला व त्यांना सारखे जुलाब होऊ लागले. एका झऱ्याजवळ येताच त्यांनी डोलीवाल्याला थांबावयास सांगून आपणास झऱ्याजवळ नेण्यास सांगितले. शरीराचा दाह शांत व्हावा म्हणून श्री. बळवंतराव त्या कडक थंडीमध्येही झऱ्याच्या

पाण्यात जाऊन बसले. हे पाहताच डोलीवाले घाबरून गेले. उतारूचा व्यापार आटोपला असे समजून ते श्री. बळवंतरावांना तेथेच टाकून पळून गेले. श्रीस्वामीमहाराज मागून येत होते. श्री. बळवंतरावांची ही अवस्था त्यांच्या नजरेला आली. त्यांनी चौकशी केल्यावर डोलीवाले पळून गेल्याचे त्यांना समजले. त्याबरोबर प्रथम श्रीस्वामीमहाराजांनी पोलिसांमध्ये वर्दी दिली आणि पोलिसांच्या मदतीने डोलीवाल्यांना पकडून आणले व ती डोली घेऊन श्री. बळवंतराव जेथे पाण्यात बसले होते तेथे श्रीस्वामीमहाराज येऊन पोहोचले. नंतर त्यांनी त्यांना डोलीत बसवून जवळच्या चट्टीजवळ आणले. श्री. बळवंतरावांची अवस्था अतिशय गंभीर झाली होती. त्यांना बोलावयाचेही त्राण राहिले नव्हते. त्यांचा घसा पार सुकून गेला होता. श्री. बळवंतरावांची ती अवस्था पाहून श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, " बळवंतराव ! एकाकी तुमची अशी अवस्था का झाली ? काही औषध वगैरे खाल्ले का ? " श्रीस्वामीमहाराजांनी अशी चौकशी केली; तरी श्री. बळवंतरावांचा गळा सुजल्यामुळे त्यांना बोलताही येईना. त्यामुळे त्यांनी श्रीस्वामीमहाराजांना खुणांनी सर्व सांगितले आणि उपरण्याच्या पदरात बांधलेल्या डॉक्टरांनी दिलेल्या गोळ्या त्यांना दाखविल्या व त्या घेतल्यापासून आपली अशी अवस्था झाली आहे असे सुचविले. " या गोळ्या सोमल नावाच्या विषाच्या आहेत व ही पीडा दूर होण्यासाठी तूप खाणे हाच एक उतारा आहे, " असे श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना सांगितले; पण तेथील भागात खूप शोध करूनही तूप मिळाले नाही. इतके होईपर्यंत रात्र झालेली होती. पूर्ण निवाऱ्याची जागाही नव्हती. अशा अवस्थेमध्ये श्री. बळवंतराव बेशुद्ध पडले. त्या अत्यधिक थंडीमध्ये रात्रीच्या वेळी दुसरे कोणीही सहानुभूती दाखविणारे घरातील माणूस जवळ नसल्याने श्रीस्वामीमहाराज एकटेच रात्रभर

त्यांच्याजवळ बसून राहिले. त्या जीवघेण्या थंडीमध्ये रात्रीच्या वेळी दुसरा कोण बाहेर पडणार? श्री. बळवंतरावांना सारखे जुलाब होत होते. अशा स्थितीत त्यांची वस्त्रे तरी कोण धुणार? दीनदुबळ्यांचे वाली असलेल्या श्रीस्वामीमहाराजांनी श्री. बळवंतरावांची घाणीने भरलेली वस्त्रे स्वतः धुतली. मध्यरात्रीच्या सुमारास श्री. बळवंत-रावांना थोडी शुद्ध आली आणि ते काहीतरी खावयाला मागू लागले. आता यांना यावेळी मध्यरात्री खावयाला काय आणून द्यावयाचे असा श्रीस्वामीमहाराजांना पेच पडला. त्यांनी स्वतः कोणत्याही गोष्टीचा संग्रह केला नव्हता. त्यामुळे ते यावेळी श्री. बळवंतरावांना काय खावयाला देणार? शेवटी ते उठले व एका हलवायाच्या दुकानासमोर आले. अपेक्षेप्रमाणे दार बंदच होते. आतून हलवायाचे घोरणे स्पष्ट ऐकू येत होते. भिक्षेशिवाय कोणाकडे काहीही मागा-वयाचे नाही असा त्यांचा नियम असल्यामुळे श्री. बळवंतरावांसाठी का होईना, कोणाकडे काही जिन्नस मागणे त्यांच्या जिवावर आले; पण नाईलाजाने ते दुकानासमोर उभे राहून "नारायण" असे म्हणाले. तो आवाज ऐकताच हलवाई निद्रेतून जागा झाला. अशा अपरात्री दुकानासमोर कोण आले आहे हे पाहण्यासाठी त्याने दरवाजाची फळी थोडी सरकवून पाहिले. दरवाजासमोर एक संन्यासी उभा आहे हे पाहताच "इतक्या अपरात्री आपण का त्रास देता व आपणास अशा अवेळी काय हवे?" असे त्याने त्यांना विचारले. त्यावेळी श्रीस्वामीमहाराज त्याला असे म्हणाले की, "बाबा! जवळच एक गरीब ब्राह्मण आजारी आहे. त्याला फार भूक लागली आहे. यावेळी त्याचे कोणीही आप्तलोक त्याच्याजवळ नाहीत. मी संन्यासी असूनही त्या ब्राह्मणासाठी काहीतरी खाण्यासाठी मागावयाला आलो आहे कसेही करून थोडी मिठाई त्या ब्राह्मणा-साठी दे. मी संन्यासी आहे. माझ्यापाशी पैसा नाही; पण तुझे पैसे

देण्याची मी उद्या सोय करीन." श्रीस्वामीमहाराजांचे हे बोलणे ऐकून त्या हलवायाचे मन द्रवले. त्याने काही मिठाई बांधून त्यांच्याकडें दिली व तो त्यांना असे म्हणाला की, "आपण एक संन्यासी असून एका अनाथ ब्राह्मणासाठी मिठाई नेत आहात, याकरिता मला या मिठाईचे पैसे नको."

श्रीस्वामीमहाराजांनी ती मिठाई थोडी थोडी करून श्री. बळवंतरावांना भरविली. तुपात तयार केलेली मिठाई पोटात जाताच श्री. बळवंतरावांना हळूहळू बरे वाटू लागले. रात्र संपल्यावर श्रीस्वामीमहाराजांनी जवळच्या पोष्ट कचेरीत जाऊन तार करून श्री. बळवंतरावांच्या मुलाला बोलावून घेतले. मुलगा तेथे येऊन पोहोचेपर्यन्त श्रीस्वामीमहाराज श्री. बळवंतरावांची सेवा करीत तेथेच राहिले. मुलगा येताच त्यांनी श्री. बळवंतरावांना त्यांच्या स्वाधीन केले व त्यांचे सर्व सामानही त्यांच्या ताब्यात दिले. श्रीस्वामीमहाराज पुढील संचाराला निघण्याच्या तयारीला लागले. एवढ्यात हिमालयाच्या पवित्र भूमीवर श्रीस्वामीमहाराजांच्या सान्निध्यात श्री. बळवंतरावांनी देह ठेवला. हिमालयाच्या कुशीत व श्रीस्वामीमहाराजांच्या सान्निध्यात देहत्याग झाल्याने श्री. बळवंतराव सद्गतीला गेले असणार यात काहीच शंका नाही.

असा हा सर्व प्रकार घडल्याने व या प्रसंगात स्वल्पांशाने का होईना संन्यास धर्माला सोडून वागावे लागल्याने इतःपर यात्रेच्या वेळी प्रवासात कोणाचीही संगती करावयाची नाही असा श्रीस्वामीमहाराजांनी निश्चय केला. वास्तविकपणे मानवतेच्या उदार दृष्टिकोनातून व "जें जें भेटेल भूत। तें तें मानिजे भगवंत ॥ हा भक्तियोगु निश्चित। जाण माझा ॥ १०·११८ ॥" असा जो भक्तियोगाचा महासिद्धान्त श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानेश्वरीत मांडला आहे, त्याचे साक्षात् रूप जणूकाही श्री. बळवंतरावांच्या सेवेच्या रूपाने

दृश्यमान झाले असले; तरीही संन्यासधर्माच्या परमादर्शाला बाध येईल असे काहीही हातून घडू द्यावयाचे नाही, असा त्यांचा कृत-निश्चय असल्यामुळे त्याला विरोधी असणाऱ्या सर्व गोष्टींना त्यांनी कटाक्षाने, निश्चयाने, आग्रहाने व बुद्धिपूर्वक फाटा दिला होता. संन्यासधर्माचे आमरणान्त मोठ्या अभूतपूर्व धैर्याने पालन करण्याच्या कृतनिश्चयापोटीच त्यांनी प्रवासात कोणाशीही संगती करावयाची नाही असा उपरोक्त निर्णय घेतला असला पाहिजे, यात तिलःप्राय शंका नाही.

श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य भगवान् श्रीवासुदेवानन्द-सरस्वती श्रीदत्तात्रेयस्वामीमहाराज यांचा अखंड जयजयकार असो. श्रीस्वामीमहाराजांचे परमभक्त व त्यांचे धाकटे बंधू परमपूजनीय श्रीसीताराममहाराज यांनी श्रीस्वामीमहाराज हे श्रीमन्नृसिंह-सरस्वतीस्वरूप श्रीदत्तात्रेयच आहेत, ही लोकोत्तर एकरूपता अनु-भवून ज्या भक्तिप्रेमाच्या वर्षावाची विज्ञापना त्यांच्या परमपवित्र व परमकोमल चरणी प्रस्तुत केली आहे, ती त्यांच्याच शब्दात प्रस्तुत करून, आपणा सर्वांच्या अंतःकरणात भक्तिप्रेमाचा तीव्रातितीव्र उद्रेक होऊन जन्मजन्मान्तरीचे सर्व कलिमल धुऊन जाऊन आत्म-स्वरूपात रममाण करणारी आन्दविभोर अशी दिव्य अवस्था आम्हा सर्वांना द्या अशी मन व कल्पनानाशपूर्वक प्रार्थना करू.

— अभंग —

स्वामी वासुदेवा परिसा विज्ञापना ।
भक्तांवरी प्रेमा राखा नित्य ।।१।।
तारियेले भक्त न कळे तुझा अंत ।
मी काय पतीत कीर्ति वाणूं ।। २ ।।
जगाच्या कल्याणासाठी अवतार ।
हा माझा निर्धार सत्य असो ।। ३ ।।

तुमचि श्रीदावळी पतीतपावन ।
हें श्रुतिवचन सत्य करीं ।। ४ ।।
पतीतांकरवी वेद बोलविला ।
रेडा दुभविला भिक्षुरूपें ।। ५ ।।
तो तूं भिक्षुरूप होवोनियां येसी ।
सीतारामापाशीं वास तूझा ।। ५ ।।



## – अध्याय चवथा –

मा भीरिति वचनं मे देहि दयालो गुरो यतिश्रेष्ठ ।
नान्यो मे रक्षार्थं धावति भोः श्रीगुरोः जगन्मातः ।।

**चातुर्मास चवथा व पाचवा–शके १८१६–१७–इ. स. १८९३–९४–हिमालय :–**

श्रीस्वामीमहाराजांचा संचार आता नगाधिराज व देवतात्मा हिमालयामध्ये होत होता. हिमालयाबद्दल प्रत्येक भारतवासीयाच्या मनामध्ये अत्यंत आदर व हृदयामध्ये एक वेगळे स्थान आहे. हिमालयाचे सृष्टिसौंदर्य, त्याची उदात्तता, रमणीयता, भव्यता आणि भयानक रुद्रता यांचे वर्णन मानवी भाषेच्या पलीकडचे आहे. प्रत्येक हिन्दू जन्माला आल्यावर एकदा तरी हिमालयाच्या पवित्र भूमीमध्ये पाय ठेवण्याची इच्छा बाळगतो. कितीतरी योग्यांनी व संतमहात्म्यांनी या हिमालयाच्या भूमीवर मुक्त संचार केला आहे. त्या सर्वांना आलेले दिव्य अनुभव व झालेली दिव्य दर्शने यांची कधी नोंद झाली असती; तर स्वर्गाचीच वर्णने आपण वाचीत आहोत असे वाटले असते. कित्येक योग्यांच्या आणि साधुसंतांच्या भ्रमणगाथा सुदैवाने अजूनही कोठे कोठे वाचावयाला मिळतात. बंगालचे थोर साधू श्रीविजयकृष्ण गोस्वामी यांना त्यांच्या श्रीसद्गुरूंनी आकाश-

मार्गाने हिमालयामधील एका गुहेमध्ये नेऊन दीक्षा दिल्याचा उल्लेख त्यांचे सच्छिष्य श्रीकुलदानंद ब्रह्मचारी यांनी केला आहे. हिमालयातील गारठणाऱ्या थंडीमध्ये अशा गुहांमध्ये बसून ध्यान करणारे कौरवपांडवांच्या वेळचे भारतीय युद्धांतील योद्धे आपणास भेटल्याचा उल्लेख काही साधुसंतांनी केला आहे. हिमालय ही वेदकाळात देवभूमी होती आणि आजही ती देवभूमीच आहे.

काही योग्यांनी असे नमूद केले आहे की, हिमाचे आलय असलेल्या या पर्वताच्या पोटात अशा काही लहानमोठ्या गुहा आहेत की, त्यामध्ये राहणाऱ्या योग्यांना येथील जीवघेण्या थंडीची मुळीसुद्धा बाधा होत नाही. काही गुहा किंवा गुहांसारखे; पण विस्तीर्ण प्रदेश या नगाधिराजाच्या पोटात आहेत की, तेथे कित्येक माणसे वर्षानुवर्षे वास करू शकतात. सदासर्वकाळ आढळणारी रुचिर आणि दिव्य औषधी गुण असलेली फळे आणि कंदमुळे, स्वच्छ व गार पाण्याचे निर्झर, डोळ्यांना सुखविणारा मोतिया रंगाचा प्रकाश व भरपूर ऊब या वैशिष्ट्यांनी युक्त अशा या गुहांमध्ये वर्षानुवर्षे साधना करीत असलेले साधक आहेत. या गुहा सामान्य यात्रेकरूंच्या नजरेला पडणे शक्य नाही. श्रीस्वामीमहाराजांना त्यांच्या भ्रमणामध्ये अशा काही देवदुर्लभ गुहा आढळल्या असतील व त्यांनी तेथील सिद्धांच्या संगतीमध्ये काही दिवस घालविलेही असतील; परन्तु त्याचा तपशील सापडणे कठीण आहे. ज्या दिवसांमध्ये ते हिमालयामध्ये संचार करीत होते त्या दिवसात हिवाळा सुरू होईपर्यंन्त अनेक यात्रेकरूंचे तांडेच्या तांडे श्रीबद्रीनारायण, श्रीकेदारनाथ, श्रीगंगोत्री, श्रीजम्नोत्री वगैरे स्थानांना भेट देण्यासाठी जात असत. श्रीस्वामीमहाराज जर या यात्रेकरूंच्या बरोबर गेले असते, तर त्यांचा उल्लेख कोणीतरी कोठेतरी केला असता; परंतु त्यांच्या दोन वर्षांच्या हिमालय भ्रमंतीचा उल्लेख कोठेच सापडत नाही. श्रीस्वामीमहा-

राजांचा चवथा व पाचवा असे दोन चातुर्मास हिमालयात झाले; पण त्याचा विशेष तपशील कोठेच आढळत नाही.

काही ठराविक ठिकाणापर्यन्त श्रीस्वामीमहाराजांनी यात्रेकरूंच्या बरोबर प्रवास केला. या यात्रेकरूंमध्ये दक्षिणी ब्राह्मण होते. त्यामुळे त्यांच्या बरोबर असेपर्यन्त श्रीस्वामीमहाराजांच्या भिक्षेची सोय झाली होती. ही मंडळी स्वयंपाक करून श्रीस्वामीमहाराजांना भिक्षा देत असत; पण यात्रेचा हंगाम संपल्यावर व सर्व यात्रेकरू परत गेल्यानंतर श्रीस्वामीमहाराज कोठे गेले, कोठे राहिले आणि त्यांनी त्या निर्जन प्रदेशात आपले देहसंरक्षण तरी कसे केले, असे कितीतरी आश्यर्यकारक प्रश्न आपणासमोर उभे राहतात. त्यांचे एकच उत्तर संभवते की, हिमालयातील वर उल्लेख केलेल्या गुहांमधून वास करणाऱ्या साधुसंतांच्या आणि सिद्धांच्या संगतीमध्ये किंवा समाधी-मध्ये त्यांनी आपला काळ घालविला असेल. हिवाळ्यात येथील सर्व मार्ग बंद होतात. पाऊलवाटा पूर्णपणे बर्फाच्छादित होऊन पुढचे काही दिसत नाही. देवालयेसुद्धा बंद होतात. अशा थंडीमध्ये श्रीस्वामीमहाराजांनी मुक्त संचार केला, ही गोष्ट आश्चर्यचकित करून सोडणारी आहे. या संचारात त्यांनी योगसिद्धींचा वापर केला असल्याची शक्यता आहे. फक्त एक वेळ आपण संप्रदायाच्या नियमांचा भंग करून अग्नीचा शेक घेतला असा उल्लेख श्रीस्वामी-महाराजांनी केलेला आहे. देहाच्या इतर गरजा भागविण्यासाठी संन्यास धर्माला मान्य नसलेल्या कोणत्याच मार्गाचा अवलम्ब त्यांनी केला असणे संभाव्य नाही. आपणाला अज्ञात असलेला त्यांच्या संचारातील कालखंड वर उल्लेख केलेल्या सिद्धांच्या किंवा देवांच्या संगतीमध्ये गेला असणेच अधिक संभाव्य आहे. श्रीस्वामीमहाराज प्रसिद्धीपराङ्मुख असल्यामुळे आपल्या या यात्रेचा वृत्तान्त त्यांनी कोणालाच सांगितलेला नाही.

श्री. बळवंतरावांच्या मृत्यूनंतर श्रीस्वामीमहाराज पुढील संचाराला निघाले. वाटेत त्यांना पुष्कळ यात्रेकरू भेटले. त्यांच्यामध्ये दक्षिणी ब्राह्मण होते. त्यामुळे श्रीस्वामीमहाराजांच्या भिक्षेची सोय होत असे असा उल्लेख मागें केलाच आहे. या यात्रेकरूंबरोबर त्यांनी देवप्रयाग, रुद्रप्रयाग, कर्णप्रयाग वगैरे हिमालयातील सर्व संगमांच्या ठिकाणी प्रवास केला. जेथे जेथे श्रीगंगेच्या मूळ प्रवाहाला म्हणजे श्रीभागीरथीला, मंदाकिनी, अलकनंदा वगैरे उपनद्या येऊन मिळतात त्या स्थानांना येथे प्रयाग असे म्हणतात. या प्रयागांमध्ये स्नान करून श्रीस्वामीमहाराज गुप्तकाशी, श्रीबद्रीनारायण, श्रीकेदारनाथ वगैरे ठिकाणी गेल्याची नोंद सापडते. प्रत्येक ठिकाणी यात्रेकरूंबरोबर श्रीस्वामीमहाराजांचा एक किंवा दोन दिवस मुक्काम होत असे.

हिमालयातील श्रीवद्रीनारायणाचे देऊळ दुर्गम अशा ठिकाणी आहे. ज्या दिवसांमध्ये श्रीस्वामीमहाराजांचा हा प्रवास घडला त्या दिवसांमध्ये हिमालयाची यात्रा अतिशय खडतर होती.

श्रीवद्रीनारायणाच्या दर्शनाला जाण्यापूर्वी वाटेत लागणाऱ्या जोशीमठ या ठिकाणाला भेट दिल्याशिवाय श्रीस्वामीमहाराज पुढे गेले नसतील. त्यांच्या भेटीचा उल्लेख कोठे सापडत नसला; तरी काही काळ श्रीमदाद्यशंकराचार्यांच्या वास्तव्याने पुनीत झालेल्या या ठिकाणी श्रीस्वामीमहाराज नक्कीच गेले असतील. हिन्दूधर्माच्या चार पीठांपैकी उत्तरेचे पीठ श्रीमद् आद्यशंकराचार्यांनी ज्योतिर्मठ या नावाने येथे स्थापन केले आहे. येथे एका वृक्षाखाली बसून श्रीआचार्य तपश्चर्या करीत असत. इ. स. ८७५ मध्ये श्रीआचार्यांनी ज्योतिर्मठाची स्थापना केली. श्रीबद्रीनारायणाच्या मंदिरापासून हा मठ दूर असला; तरी श्रीबद्रीनारायणाची येथे गादी आहे.

सन १८५१ मध्ये झालेल्या भूकंपात येथील बराच भाग उध्वस्त झाला होता; पण त्या भूकंपामुळेच श्रीमदाद्यशंकराचार्यांच्या गुंफेचा व या वृक्षाचा शोध लागला. श्रीस्वामीमहाराजांनी या आदरणीय स्थानाला भेट देऊन एक रात्र येथे काढली असेल. श्रीआचार्यांच्या गुंफेला भेट देऊन काही वेळ तेथे समाधीत घालविला असेल. श्रीआचार्यांचा आदर्श समोर ठेऊन श्रीस्वामीमहाराज संन्यास धर्मांचे काटेकोर पालन करीत असत. एवढेच नव्हे; तर श्रीमद्‌भगवद्‌-गीतेच्या भाष्यात श्रीमद् आद्यशंकराचार्यांनी सुरुवातीलाच म्हटल्या-प्रमाणे "दीर्घेण कालेनानुष्ठातॄणां कामोद्‌भवाद्धीयमानविवेकविज्ञान-हेतुकेनाधर्मेणाभिभूयमाने धर्मे प्रवर्धमाने चाधर्मे जगतः स्थिति परिपिपालयिषुः स आदिकर्ता नारायणाख्यो विष्णुर्भौमस्य ब्रह्मणो-ब्राह्मणत्वस्य रक्षणार्थं देवक्यां वसुदेवादंशेन किल संबभूव। ब्राह्मण त्वस्य हि रक्षणेन रक्षितः स्याद्वैदिको धर्मस्तदधीनत्वाद्वर्णाश्रमभेदा-नाम् ॥" या न्यायानेच त्यांनी ब्राह्मण्याच्या रक्षणासाठी व वर्णा-श्रमधर्मांची पुनर्प्रतिष्ठापना करण्यासाठी भगवान् श्रीगोपालकृष्ण-नाथांप्रमाणे या भूलोकावर अवतार धारण केला होता. याचा अर्थ असा की, दीर्घकालाने कृत, त्रेता व जवळ जवळ द्वापर, एवढा मोठा काल मध्ये निघून गेल्यावर त्या धर्मांचे अनुष्ठान करणाऱ्या ब्राह्मणादिकांमध्ये कामाचा अर्थात् विषयतृष्णेचा उद्‌भव झाल्या-मुळे कमी होत जाणारा विवेक व विज्ञान यांना कारण होणाऱ्या अधर्माकडून धर्मांचा पराभव अर्थात् क्षय केला जाऊ लागला असता व अधर्मांची अतिशय वृद्धी होऊ लागली असता जगाच्या स्थितीचे परिपालन करण्याची इच्छा करणारा तो आदिकर्ता पहिला स्रष्टा—नारायणनावाचा विष्णू—व्यापक परमात्मा भूलोकाच्या ब्रह्माचे म्हणजे ब्राह्मणत्वाचे रक्षण करण्यासाठी देवकीच्या ठिकाणी वसुदेवा-पासून अंशरूपाने उत्पन्न झाला, हे पुराणप्रसिद्ध आहे. ब्राह्मण्याच्या

रक्षणाचेच कारण असे की, ब्राह्मणत्वाचे रक्षण केल्याने वैदिक धर्म सुरक्षित राहील; कारण वर्णभेद व आश्रमभेद ब्राह्मणाच्या अधीन आहेत. ( ब्राह्मण जिवत राहिले; तर वर्ण व आश्रम जगात राहणार; कारण वर्णाश्रमांची व्यवस्था त्यांच्या अस्तित्वावर अवलंबून असते. म्हणून वर्णाश्रमविभाग नाहीसा करू पाहणाऱ्या दानवांकडून प्रथम ब्राह्मणाचा नाश करण्याचाच यत्न केला जातो. हल्लीच्या सर्व धर्मविध्वंसकांचे प्रयत्नही याच दिशेने होत असतात, हे प्रसिद्ध आहे. )

अशा प्रकारे श्रीमदाद्यशंकराचार्यांना आदर्श मानून ब्राह्मण्याचे व सनातन वैदिक धर्माचे रक्षण करून वर्णाश्रमधर्माच्या पुनर्प्रतिष्ठापनाचे कार्य समाजात रुजविण्यासाठी जवळ जवळ दोन तीन वेळा आसेतुहिमाचल प्रवास करून श्रीस्वामीमहाराजांनी या भरतभूमीत तत्त्वरूप जागरणाचा एक महायज्ञच जणू काही आमरणान्त उपस्थित करून तद्वारा जे लोकोत्तर, अद्भुत, अलौकिक, असामान्य व एकमेवाद्वितीय असे न भूतो न भविष्यति कार्य ईश्वरी इच्छेप्रमाणे सिद्धीस नेले, ते पाहून आपणाला आदर्श मानून वागणाऱ्या या यतिवर्यांना साक्षात् भगवान् श्रीशंकराचेच अवतार असलेल्या श्रीमद्आद्यशंकराचार्यांनी प्रत्यक्ष दर्शन देऊन कृतार्थ केले असेल, असे अनुमान केल्यास ती अतिशयोक्ती ठरणार नाही; कारण पुढील संचारात त्यांना नर आणि नारायण ऋषींनी साक्षात् दर्शन दिले होते, याचा पुरावा सापडतो. काही असो, या तीर्थामध्ये श्रीस्वामीमहाराज स्वतःलाही विसरून गेले असतील, एवढे त्यांच्या दृष्टीने हे स्थान आदराचे आहे. येथून ते पांडुकेश्वरमार्गे श्रीबद्रीनारायणाला गेले.

श्रीबद्रीनारायणाचे किंवा श्रीबद्रीनाथाचे मंदिर पुराणप्रसिद्ध श्रीबद्रिकाश्रमाच्या परिसरात आहे. बद्री म्हणजे बोरीचे झाड

श्रीबद्रीकाश्रमाची निर्मिती झाली तेव्हा श्रीलक्ष्मीने पल्लवित बोरीच्या झाडाच्या रूपाने या आश्रमाचे रक्षण केले होते, अशी पुराणात कथा आहे. त्यानंतर काही शतके येथे बोरीची झाडे होतीही व असतीलही; पण आज मात्र बोरीचे एकही झाड येथे नाही. बद्रीला विशाल बद्री असेही एक नाव आहे. राजा विशाल याने येथे तपश्चर्या करून नरनारायणांना प्रसन्न करून घेतले होते. द्वापार युगात हे विशाला क्षेत्र म्हणून प्रसिद्ध होते; तर दुसऱ्या एका युगात हे नैमिषारण्य म्हणून ओळखले जाऊ लागले. कलियुगात याला श्रीवद्रीनाथ किंवा श्रीबद्रीनारायण म्हणतात.

भगवान् श्रीविष्णूने या भूमीमध्ये तपश्चर्या केली होती म्हणून येथे भगवान् श्रीविष्णूची पद्मासनस्थित चतुर्भुज मूर्ती आहे ही मूर्ती काळचा शाळिग्राम पाषाणाची आहे. मूर्तीच्या मानेवरील भाग व वरच्या भुजा आज अस्तित्वात नाहीत. त्याठिकाणी चंदनाचा मुखवटा बसविलेला असतो. हिन्दूधर्मावर परधर्मियांची जी अनेक आक्रमणे झाली त्यावेळी केव्हातरी या मंदिरातील मूर्ती बाहेर फेकून देण्यात आली होती. श्रीमदाद्यशंकराचार्यांनी ज्यावेळी सनातन वैदिक हिन्दू धर्माचे पुनर्जागरण केले त्यावेळी त्यांनी ही मूर्ती जवळच्या नारद कुंडातून बाहेर काढली व तिची स्थापना गरुड गुंफेमध्ये केली. या ठिकाणी ही मूर्ती ७००वर्षे होती. नंतर गढवालच्या राजाने सध्याचे मंदिर १३ व्या शतकात बांधून तेथे या मूर्तीची स्थापना केली. या मंदिराचे आतील व बाहेरील कोरीव काम नजरेत भरण्यासारखे आहे. मंदिराच्या भिंतींना ठिकठिकाणी रुप्याचे पत्रे बसविण्यात आले आहेत. मंदिराच्या शिखराजवळ सोन्याचा पत्रा लावलेला आहे. मंदिराचा कळस राणी अहिल्याबाई होळकर यांनी बसविलेला आहे.

या परिसरात पुष्कळ गुहा आहेत. व्यासगुंफा म्हणून प्रसिद्ध

असलेल्या गुहेमध्ये श्रीव्यासमुनींनी तपश्चर्या केली होती. याच श्रीबद्रीकाश्रम क्षेत्रात अनेक पुराणांची व महाभारताची रचना त्यांनी केली. काही वैदिक मंत्रांचे व पुष्कळ उपनिषदातील मंत्रांचे गायन येथेच प्रथम झाले. या क्षेत्रामध्ये व्यासमुनींनी वेदांचे संकलन करून त्यांचे चार भागामध्ये विभाजन केले.

श्रीबद्रीनाथाचे मंदिर हे हिन्दू लोकांचे आदराचे स्थान आहे. येथे अलकनंदा वाहते. श्रीव्यासमुनींच्या पदस्पर्शाने पावन झालेल्या त्या भूमीमध्ये आपण जावे व तेथील पवित्र वातावरणामध्ये वसून क्षणभर त्या पुराण काळात कल्पनेने प्रवास करावा अशी प्रत्येक यात्रेकरूची इच्छा असते. श्रीबद्रीनाथाच्या दर्शनाने थोड्या प्रमाणात का होईना त्याची ही इच्छा पूर्ण होते. क्षणभर तरी, आपण या दुनियेत नाही, असे त्याला वाटते. मंदिरामध्ये यात्रेकरूंना दुरूनच श्रीबद्रीनारायणाचे दर्शन घ्यावे लागते; कारण मंदिरातील मूर्ती परिसाची आहे असा लोकांचा समज आहे. त्यामुळे लोक लोखंडाचे दागिने बनवून आणतील व त्या मूर्तीला स्पर्श करून घेऊन त्या लोखंडाच्या दागिन्यांचे सोने होईल, अशी भीती पुजारीवर्गाला वाटत असावी; पण हा समज वृथा आहे. ही मूर्ती शाळिग्राम पाषाणाची आहे, हे पुजाऱ्यांना ठाऊक आहे. मंदिरातील पावित्र्य राखण्यासाठीच ते लोकांना मूर्तीला स्पर्श करू देत नसावेत. या ठिकाणी कडाक्याची थंडी असल्यामुळे प्रत्येक यात्रेकरूला ऊबदार कपडे आणावे लागतात. श्रीबद्रीनारायणाच्या रस्त्यात मध्ये मध्ये प्रवासी लोकांना उतरण्याच्या जागा बांधलेल्या आहेत. येथे येणाऱ्या ज्या लोकांपाशी पुरेसे ऊबदार कपडे नसतात त्यांना जवळच असलेल्या श्रीबाबा काळीकंबळीवाले यांच्या आश्रमातून कांबळी, घाबळ्या वगैरे ऊबदार कपडे तसेच अन्न, वहाणा, वगैरे वस्तू श्रीमंत लोक पुरवीत असतात. श्रीबाबा काळीकंबळीवाले या प्रसिद्ध साधु

पुरुषाने अनेक श्रीमंत लोकांना भेटून ही व्यवस्था करून ठेवली आहे.

श्रीबद्रीनारायणाच्या मंदिरापासून थोडचा दूर अंतरावर नर आणि नारायण अशा दोन टेकडचा आहेत. या टेकडचांवर नर आणि नारायण ऋषींचा वास आहे अशी सर्वांची श्रद्धा आहे. नरनारायणांच्या दर्शनाला जाण्याची श्रीस्वामीमहाराजांची इच्छा होती. ज्यावेळी त्यांच्या बरोबरचे काही लोक तिकडे जावयाला निघाले त्यावेळी आपणही या लोकांबरोबर तिकडे जाऊन प्रथम नरनारायणांचे दर्शन घ्यावे व नंतर श्रीबद्रीनारायणाच्या दर्शनाला जावे असा विचार करून ते इतर लोकांबरोबर तिकडे जावयास निघाले. काही अंतर चालून गेल्यावर वाटेत एका ठिकाणी एक कडा तुटून पडल्यामुळे पुढे जाण्याचा मार्ग बंद झाला आहे असे पाहून इतर लोक मागे फिरून निघून गेले; परन्तु श्रीस्वामीमहाराज मागे फिरले नाहीत. ते तेथेच थांबले.

एवढचात कडचावरून दोन ऋषितुल्य पुरुष येताना त्यांना दिसले. श्रीस्वामीमहाराजांना पाहून ते थांबले व त्यांना असे म्हणाले की, "स्वामी! पुढे हा कडा तुटलेला आहे आणि खाली खोलपर्यंन्त अद्याप घट्ट न झालेल्या बर्फाचा थर आहे. चुकून खाली पडलात; तर आपल्या देहाचा पत्ता सुद्धा लागणार नाही. तेव्हा पुढे न जाता आपण मागे परतावे." त्या दोघा पुरुषांच्या चेहऱ्यावरील अमानवी तेज पाहून श्रीस्वामीमहाराज अस्खलित देववाणीमध्ये त्यांना असे म्हणाले की, "नर आणि नारायण ऋषींच्या दर्शनाच्या इच्छेने आपले येथवर येणं झाले आहे. आता आपण मागे फिरणार नाही. पुढेच जाणार. त्यांच्या दर्शनापूर्वीच या देहाचे पतन झाले तर गोष्ट वेगळी. आपण ज्याअर्थी या रस्त्याने येथपर्यंन्त आलात त्याअर्थी जवळपास कोठे तरी वाट असलीच पाहिजे." श्रीस्वामीमहाराजांच्या तोंडचे हे निर्धाराचे भाषण ऐकून त्या दोघा पुरुषांच्या चेहऱ्यावर

हास्य चमकले. क्षणात त्यांचे रूप पालटून ते अनादि नरनारायणांच्या स्वरूपात श्रीस्वामीमहाराजांसमोर उभे राहिले. त्यांना पाहताच श्रीस्वामीमहाराजांना परमानंद झाला. त्यांनी परमादराने त्यांना दंडप्रणाम करून त्यांचे दर्शन घेतले. अशा प्रकारे आपल्या कृतनिश्चयाने कृतार्थ झालेल्या श्रीस्वामीमहाराजांच्या दृष्टीपुढून थोड्याच वेळात नरनारायणप्रभू त्यांना आशीर्वाद देऊन दिसेनासे झाले.

याच यात्रेमध्ये एकदा पुढीलमुक्कामाला जात असताना श्रीस्वामी महाराजांना मार्गात एक सरोवर लागले. त्यावेळी जरी अपार थंडी होती; तरी सरोवरातील पाणी गोठले नव्हते. श्रीस्वामीमहाराज त्या सरोवराच्या काठाजवळून जात असताना अकस्मात् एरवी शांत असलेल्या सरोवराच्या पृष्ठभागावर खळवळ निर्माण झाली. पाणी थोडे उसळल्यासारखे वाटले आणि त्या पाण्यातून सरोवरात तपश्चर्या करणारे व सिद्धासन घातलेले एक योगिराज वर आले. सिद्धासन घातलेल्या स्थितीमध्ये पाण्याच्या पृष्ठभागावर बसून त्यांनी श्रीस्वामीमहाराजांना वंदन करून त्यांचे दर्शन घेतले. श्रीस्वामीमहाराजांनीही "नारायण" म्हणून हात वर करून त्यांना आशीर्वाद दिला व ते योगिराज समाधानी मुद्रेने पुन्हा पाण्याखाली गेले. पाण्याखाली राहून ध्यानमग्न राहणाऱ्या व समाधिलीन असलेल्या त्या योगिराजांना अंतर्ज्ञानाने हे निश्चित कळले असावे की, साक्षात् श्रीदत्तप्रभूच श्रीवासुदेवानंदसरस्वती हे नाव धारण करून जगदोद्धारार्थ या भूतलावर अवतरित झाले असून तलावाच्या काठानें प्रवास करीत आहेत. त्यांचे दर्शन करण्यासाठीच त्यांनी आपला देह पाण्याच्या पृष्ठभागावर आणला होता.

अशा रीतीनें विविध देवतांची दर्शने घेत श्रीस्वामीमहाराज श्रीबद्रीनारायणाच्या दर्शनासाठी मार्गक्रमण करीत पुढे निघाले. हिमालयातील या प्रवासात अत्यंत कठोर थंडीमध्ये श्रीस्वामीमहा-

राजांच्याजवळ दोन छाटचा व एक धाबळी याशिवाय दुसरे वस्त्र नव्हते. मागे वर्णन केल्याप्रमाणे जरी या भीषण थंडीच्या निवारणार्थ कांबळचा इत्यादि वस्त्रे पुरविणारे लोक असले; तरी श्रीस्वामी-महाराजांनी आपल्या जवळील वस्त्रांशिवाय दुसऱ्या वस्त्रांचा सग्रह केला नाही. कोणाला काही मागितले नाही. इतक्या भीषण थंडीत ते आपल्या जवळील अगदी थोड्याशा वस्त्रानिशी कसे राहिले असतील हे एक आश्चर्यच आहे. तीव्र वैराग्याशिवाय हे कधीही निभणे शक्य नाही हेच खरे! ही वैराग्याची परमावधी आहे. देहासक्तिशून्यता याशिवाय अन्यत्र पाहावयास मिळणे केवळ दुर्मिळ आहे. वैराग्याची चर्चा करणे व प्रवचने देणे ही पांडित्याची बाब आहे; परन्तु त्याचे आचरण करून श्रीस्वामीमहाराजांनी सर्व मानव-जातीपुढे अपार धैर्याने व कठोर मनोनिश्चयाने वैराग्याचा व देहा-सक्तिशून्यतेचा एक परमादर्श उभा केला यात तिलःप्राय शंका नाही.

याप्रमाणे राहूनच त्यांनी हिमालयात प्रवास केला. दैवीशक्ती-वाचून हे केव्हाही शक्य होत नाही हेच खरे! ही दैवीशक्ती कठोर साधनाने, तीव्र वैराग्याने, उत्कट सदाचरणाने व ईश्वरावरील अढळ प्रेमाने किंवा भक्तीने मिळू शकते, हे श्रीस्वामीमहाराजांनी आपल्या दिव्य चरित्रावरून सर्वांना दाखवून दिले.

अशा रीतीने प्रवास करीत श्रीस्वामीमहाराज श्रीबद्रीनारायणाला येऊन पोहोचले. श्रीबद्रीनारायणाची मूर्ती परिसाची आहे अशी लोकांची समजूत असल्यामुळे तिच्या जवळ जाऊन कोणी लोखंडाचे सोने करतील या भीतीने देवळाच्या गाभाऱ्यात यात्रेकरूंना जाण्यास बंदी असली; तरी तेथील पुजाऱ्यांनी श्रीस्वामीमहाराजांना मंदिराच्या गाभाऱ्यात जाण्यास प्रतिबंध केला नाही. उलट त्यांनी त्यांना मोठ्या आदराने वागविले. त्यामुळे त्यांना श्रीबद्री-नारायणाच्या मूर्तीच्या जवळ जाऊन पूजन करून दर्शन घेता आले.

श्रीबद्रीनारायणाचे दर्शन घेऊन व काही दिवस तेथे राहून नंतर पायवाटेने श्रीस्वामीमहाराज श्रीगंगोत्रीला जावयाला निघाले. एरवी श्रीगंगोत्रीला जावयाचे म्हणजे चमोलीमार्गे किंवा रुद्रप्रयागला परत येऊन दुसऱ्या मार्गाने श्रीगंगोत्रीला जावे लागते. पण श्रीबद्रीनारायणाच्या मंदिरावरून एक सरळ पायवाट श्रीकेदारनाथला आणि श्रीगंगोत्रीला जाण्यासाठी आहे. ही वाट अतिशय दुर्गम असून कडक थंडीच्या प्रदेशातून जात असल्यामुळे या वाटेचा उपयोग यात्रेकरू करात नाहीत. योगी आणि संन्यासी लोकच या वाटेचा उपयोग करतात. श्रीस्वामीमहाराज याच वाटेने श्रीगंगोत्री व श्रीकेदारनाथ येथे गेले असणार. या पाऊलवाटेने जाताना प्रथम श्रीकेदारनाथाचे मंदिर लागते. त्यानंतर ही पाऊलवाट तशीच पुढे श्रीगंगोत्री व श्रीजम्नोत्रीला जाते. श्रीकेदारनाथला श्रीमदाद्यशंकराचार्यांनी समाधी घेतली. त्यांचे समाधी मंदिर येथे अद्यापही अस्तित्वात आहे. श्रीकेदारनाथाचे मंदिर पांडवांनी बांधले, अशी आख्यायिका आहे. बरीच वर्षे जीर्ण झालेल्या या मंदिराचा जीर्णोद्धार श्रीमदाद्यशंकराचार्यांनी केला. या मंदिरामध्ये स्वयंभू ज्योतिर्लिंग आहे. भारतीय युद्धानंतर, व्यासांच्या सल्ल्यानुसार, पांडव भगवान् श्रीशंकराचे दर्शन घेण्यासाठी येथे आले. ज्यांच्यामुळे फार मोठी मानव हत्या झाली त्या पांडवांना दर्शन देण्यास भगवान् श्रीशंकर नाखूष होते. त्यामुळे पांडवांना येताना पाहून त्यांनी महिषाचे रूप घेतले व ते भूमिगत होऊ लागले. भीमाला या गोष्टीचा सुगावा लागला किंवा संशय आला. त्याने भूमिगत होणाऱ्या त्या महिषाला पाठीमागून पकडले. भगवान् श्रीशंकराचे बळ या भक्ताच्या बळापुढे अपुरे पडले. महिषाचा पाठीमागचा भाग तेथेच राहिला. भूमिगत झालेला त्यांचा तोंडाकडील भाग नेपाळमध्ये आला. तोच श्रीपशुपतिनाथ होय.

मागे राहिला तो श्रीकेदारनाथ होय. अशी या ज्योतिर्लिंगाची कथा सांगतात. श्रीकेदारनाथ मंदिरातील या स्वयंभूलिंगाचा आकार महिषाच्या पाठीसारखा आहे. श्रीकेदारेश्वर मंदिराच्या पाठीमागील एका लहानशा टेकडीवर श्रीमदाद्यशंकराचार्यांची समाधी आहे. श्रीस्वामीमहाराज श्रीकेदारेश्वराचे दर्शन घेऊन या समाधी मंदिरात आले असणार. हे मंदिर म्हणजे समाधीवर बांधलेली लहानशी छाया आहे. आत श्रीशंकराचे लिंग व श्रीआचार्यांची पांढरी संगमरवरी दगडाची मूर्ती आहे. श्रीस्वामीमहाराजांनी निश्चितच समाधिलीन व चिंतनलीन होऊन एक रात्र या मंदिरामध्ये तेथील कडक थंडी सहन करून घालविली असेल.

यानंतर श्रीस्वामीमहाराज श्रीगंगोत्री व श्रीजम्नोत्रीच्या मार्गाला लागले असणार. तेथून पुढे त्रिजुगीनारायण, उखीमठ वगैरे पुराणप्रसिद्ध स्थळांना भेट देत देत पुन्हा रुद्रप्रयाग व देवप्रयागमार्गे ते ऋषीकेशला परत आले असतील.

श्रीस्वामीमहाराज प्रवास करीत करीत श्रीगंगोत्रीला आले. श्रीगंगोत्री म्हणजे श्रीगंगामातेचे मंदिर. एका हिमनदीपासून श्रीगंगेचा उगम झाला आहे. या हिमनदीचे पाणी एका गोमुखातून पडण्याची व्यवस्था केलेली आहे. हा श्रीगंगेचा खरा उगम अतिशय दुर्गम अशा थंड प्रदेशात आहे. सामान्य यात्रेकरूंना तेथपर्यंन्त जाता येत नाही म्हणून श्रीमदाद्यशंकराचार्यांनी स्वतः जेथे प्रथम स्नान केले तेथेच त्यांनी श्रीगंगोत्रीच्या मंदिराची स्थापना केली. श्रीगंगोत्री मंदिर गोमुखापासून जवळजवळ पंचवीस मैलांच्या अंतरावर आहे. या मंदिराजवळ जे कुंड आहे त्याला भगीरथ शिळा म्हणतात. यात्रेकरू याच कुंडामध्ये स्नान करतात; पण काही यात्रेकरू पुढे जाऊन गोमुखाजवळच्या प्रवाहात स्नान करतात. येथील प्रवाह मूळ हिमनदीचाच प्रवाह असल्यामुळे त्यातील पाणी अतिशय थंड असते.

श्रीस्वामी महाराजांनी गोमुखाजवळ स्नान केले. स्नान करताच त्यांचे शरीर हिमदंशाने बधिर झाले व ते पार गारठून गेले. त्यांना कसलीही हालचाल करता येईना. जणूकाही काष्ठवत् किंवा स्थाणुवत् अचेतन अवस्था त्यांना प्राप्त झाली. त्यांची ही अवस्था तेथील यात्रेकरूंच्या नजरेला येताच त्यांच्यापैकी कोणीतरी श्रीस्वामीमहाराजांच्या जवळ पेटलेली शेगडी आणून ठेवली. श्रीस्वामीमहाराजांचा देह यावेळी थंडीने एवढा गारठला होता की, त्याला चेतना आणण्यासाठी दिलेल्या आगीच्या शेकाने त्यांच्या शरीरावरील शेम जळून काही ठिकाणी कातडीसुद्धा भाजली. बऱ्याच वेळाने ते भानावर आले. त्यावेळी त्यांच्या कानावर असे शब्द आले की, " ऊठ अग्निजवळ बसून शेकतोस काय ? " हे शब्द कानी पडताच ते उठून शेगडीपासून दूर गेले. संन्याशाश्रम स्वीकारल्यानंतर संन्याशाने अग्नीला स्पर्श करावयाचा नाही असा नियम असल्यामुळे एवढाच एक नियमभंग आपल्या हातून घडला, असे श्रीस्वामीमहाराज आपल्या उत्तरायुष्यात सांगत असत. अशा प्रकारच्या कठोर थंडीतून श्रीस्वामीमहाराजांचा हिमालय प्रवास झाला.

त्यांच्या हिमालय यात्रेतील एक हकीकत श्री. गंगाधरपंत वैद्य यांनी पुढीलप्रमाणे लिहून ठेवली आहे. श्रीस्वामीमहाराज श्रीबद्रीनारायण आदि उत्तर यात्रेला गेले होते. एके दिवशी सोबतची मंडळी पुढे निघून गेली व त्यांनी चट्टीवर राहण्याची जागा वगैरेची आपापली तजवीज लावून घेतली. मात्र श्रीस्वामीमहाराजांना संध्याकाळचे आन्हिक उरकावयाचे असल्यामुळे ते प्रथम नदीकाठी गेले तेथे आपले सायंकाळचे आन्हिक उरकून जवळ जवळ दोन तासांनी ते चट्टीवर आले. त्यावेळी तेथील चट्टीवर राहण्यास तसूभरही जागा शिल्लक न राहिल्याने चौकीदाराने त्यांना असे सांगितले की "या ठिकाणी आता उतरण्यास एकाही माणसास जागा बाकी

राहिली नाही. आपण फार रात्र करून आला. यामुळे माझा नाईलाज आहे. आपण आपली सोय दुसरीकडे लावून घ्या." हे ऐकताच "ठीक आहे." एवढेच श्रीस्वामीमहाराजांनी त्याला उत्तर दिले. त्यानंतर त्यांनी चट्टीच्या बाहेरच कोठे बसता येईल का व कशाचा तरी आसरा घेता येईल का हे पाहिले. तेव्हा त्यांना भिंतीला बाहेरून एक कोनाडा असल्याचे व त्यात एका माणसाला सहज बसता येईल एवढा तो मोठा असल्याचे लक्षात आले. श्रीस्वामीमहाराज त्या कोनाड्यात बसले व रात्रभर त्यांनी सूर्यभेदी प्राणायाम करून त्या महाभयानक अशा कडक थंडीचे निवारण केले.

वास्तविकपणे हिमालयाच्या त्या कडक थंडीमध्ये उघड्यावर रात्र काढणे म्हणजे गारठून मरणेच होय, याची चट्टीतील सर्व लोकांची व चौकीदाराची खात्री झाली होती. त्यातही श्रीस्वामी-महाराजांच्या जवळ दोन छाट्यांशिवाय दुसरे वस्त्रही नव्हते, याचीही लोकांना कल्पना होती; परन्तु जागेच्या अभावी सर्वांचाच नाईलाज झाला होता.

जसजशी रात्र वाढू लागली तसतसा थंडीचा जोरही वाढू लागला व जोरदार बर्फही पडू लागले. त्या रात्री एवढी कडक थंडी पडली व चोहोकडे एवढे अपार बर्फ पडले की, धर्मशाळेत पाचपाच, सहा-सहा गरम ब्लँकेट पांघरून घेऊन झोपलेल्या लोकांनासुद्धा ती थंडी असह्य वाटत होती व झोप येत नव्हती. त्यामुळे या थंडीत निवारा व पांघरूण मिळूनही आपली ही स्थिती आहे; तर चौकीदाराने आत न घेतल्यामुळे बाहेरच राहिलेल्या श्रीस्वामीमहाराजांची काय स्थिती झाली असेल, या विचाराने सर्वांच्या अंगावर काटा उभा राहिला व श्रीस्वामीमहाराजांच्या मृत्यूच्या भीतीने सर्वांची मने अगदी स्तंभित होऊन गारठून गेली. अपुरी जागा, भीषण कडक थंडी, सर्वदूर चोहोकडे पसरलेले अपार बर्फ व रात्रीची वेळ अशा

स्थितीत एका संन्यासी श्रीस्वामीमहाराजांना बाहेर राहावे लागत आहे व आपण त्यांच्यासाठी काहीही करू शकत नाही, हे पाहून त्या धर्मशाळेतील सर्व लोकांना अत्यंत दुःख झाले.

ती रात्र सर्व लोकांनी कशीवशी काढल्यावर सकाळी सूर्योदय झाल्यानतर चट्टीच्या आत राहिलेले सर्व लोक मोठ्या भयभीत अंतःकरणाने श्रीस्वामीमहाराजांची काय अवस्था झाली आहे हे पाहण्यासाठी प्रथम बाहेर आले. त्यावेळी त्या लोकांना असे दिसले की, चट्टीच्या भिंतीतील एका कोनाड्यात श्रीस्वामीमहाराज मोठ्या आनंदाने बसलेले असून त्यांच्या सर्व शरीरावर घामाचे बिंदू जमा झालेले आहेत. सर्वांनी हे दृश्य पाहिल्यावर त्यांच्या आश्चर्याला पारावार राहिला नाही.

योगाच्या जोरावर श्रीस्वामीमहाराजांनी ही अतर्क्य गोष्ट अगदी सहजतेने व हा अपूर्व चमत्कार मोठ्या लीलेने केल्याचे पाहून श्रीमद्‌भगवद्‌गीतेत श्रीकृष्णनाथमहाराजांनी अर्जुनाला "तपस्विभ्योऽधिको योगी ज्ञानिभ्योऽपि मतोऽधिकः। कर्मिभ्यश्चाधिको योगी तस्माद्योगी भवार्जुन ॥ ६.४६ ॥", "तस्मात्सर्वेषु कालेषु योगयुक्तो भवार्जुन ॥ ८.२७ ॥" व "योगी परं स्थानमुपैति चाद्यम् ॥ ८.२८ ॥" असे म्हणून योगाची जी महती व अनिवार्यता पटवून दिली आहे, ती किती योग्य आहे, याची प्रचीती येते. कृच्छ्रचांद्रायणादि तप करणाऱ्या तपस्व्याहून, शास्त्रादींचा अभ्यास करून पंडित झालेल्या ज्ञानी पुरुषांहून व अग्निहोत्रादिक कर्मे करणारांहून योगाभ्यास करणारा योगी हा श्रेष्ठ आहे, म्हणून हे अर्जुना ! तू योगी हो ॥ ६.४६ ॥, हे पार्था ! सर्वकाली तू समाहितचित्त योगी हो ॥ ८.२७ ॥ व ध्यान, उपासना करणारा योगी मूळ कारणरूप ब्रह्मपदाला प्राप्त होतो ॥ ८.२८ ॥ हेच यावरून स्पष्टपणे दृग्गोचर होते. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानेश्वरीत "म्हणौनि

याकारणें। तूंते मी सदा म्हणे। योगी होईं अंतःकरणें।। पंडुकुमरा ।। ६.४८१ ।। ", अगा योगी जो म्हणिजे। तो देवांचा देव जाणिजे। आणि सुख सर्वस्व माझें। चैतन्य तो ।। ६.४८२ ।। " व " याकारणें पंडुसुता। तुवां होआवें योगयुक्ता। येतुलेनि सर्वकाळीं साम्यता। आपैसया होईल ।।८.२५६।।" असे म्हणून जो श्रीमद्‌भगवद्‌गीतेच्या श्लोकांचा भावार्थ लिहिला आहे, तो पाहिला म्हणजे श्रीस्वामी-महाराजांचे माहात्म्य किती अपार आहे, याची कल्पना येऊन मन अगदी भारावून जाते.

श्रीस्वामीमहाराजांच्या हिमालययात्रेमधील अशीच एक आश्चर्य-कारक घटना श्री. गंगाधरपंत वैद्य यांनी लिहून ठेवली आहे. रुद्र-प्रयाग, कर्णप्रयाग जवळील जंगलातून श्रीस्वामीमहाराज प्रवास करीत होते. ते नेहमी एकट्याने प्रवास करीत असत. त्या निर्जन प्रदेशात एके ठिकाणी रस्त्यात एक मोठा वाघ त्यांच्यासमोर येऊन उभा राहिला. या जंगलामध्ये पुष्कळदा नरमांसभक्षक वाघ फिरत असत. श्रीस्वामीमहाराजांना पाहताच वाघ गुरगुरत त्यांच्या अंगा-वर आला वाघ हल्ला करताना उडी मारून भक्ष्यावर झेप घेतो; पण हा वाघ श्रीस्वामीमहाराजांच्या अंगावर चालून आला व आपले पुढील दोन्ही पंजे त्यांच्या अंगावर ठेऊन तो गुरगुरू लागला. माणगावामध्ये राहत असतानाही एका वाघाने श्रीस्वामीमहा-राजांना एकदा वाटेत अडविले होते. त्या प्रसंगाची या ठिकाणी आठवण येते. त्या प्रसंगी श्रीस्वामीमहाराज घाबरून झाडावर चढून बसले होते; पण यावेळी श्रीस्वामीमहाराजांमध्ये सर्वात्मभाव जागृत झालेला होता. " हें विश्वचि माझें घर " अशी त्यांची वृत्ती झाली होती. त्यांच्या दृष्टीने त्या वाघाच्या शरीरातील आत्मा व आपल्या देहातील आत्मा दोन्ही एकच व अभिन्न होते. या वृत्तीमुळे ते वाघाला उद्देशून असे म्हणाले की, " तू सिद्ध परमेश्वर

आहेस तेव्हा तुला जे काही करावयाचे असेल ते आनंदाने कर. तू आणि मी एकच आहोत." असे म्हणून ते वाघाच्या डोळ्याला डोळा भिडवून उभे राहिले. श्रीस्वामीमहाराजांच्या हृदयात जागृत झालेल्या सर्वात्मभावाची स्पंदनें त्या वाघाच्या हृदयात शिरली आणि त्यालाही अशी जाणीव झाली असावी की, आपण आपल्या स्वत:वरच हल्ला करीत आहोत. त्यानंतर श्रीस्वामीमहाराजांच्या खांद्यावरून आपले पंजे काढून तो वाघ निमूटपणे बाजूच्या झाडा-मध्ये निघून गेला.

या प्रसंगावरून असे दिसून येते की, श्रीस्वामीमहाराजांच्या अंत:करणाची परीक्षा करण्यासाठी ईश्वरच वाघाचे रूप धारण करून आला होता. सिद्धांचीही परीक्षा घेण्याची लहर ईश्वराला येत असावी; कारण त्याला आपल्या भक्ताचे माहात्म्य सर्व लोकां-पुढे प्रकट करून त्याचा महिमा वाढावावयाचा असतो व त्याची कीर्ती सर्वदूर पसरवून त्याच्यावर आपणच सोपविलेले काय पूर्ण करवून घ्यावयाचे असते. अशा प्रसंगावरून साधकाने हे लक्षात घेतले पाहिजे की, अंतिम ध्येयाप्रत जाताना ईश्वर आपली पावला-वर कशी व कोणत्या रूपात परीक्षा घेत असेल, ते काही सांगता येणार नाही. यासाठी अखंड सावधान राहून आपल्या ठिकाणी सर्वात्मभाव जागृत होईपर्यंन्त सद्‌गुरूंनी दिलेल्या मार्गावरून मोठ्या धैर्याने साधन करीत व आपले मन बदलणार नाही याची क्षणा-क्षणाला काळजी घेत प्रयत्नशील राहिले पाहिजे. सर्वात्मभावाची विस्मृती व जागृती एवढाच साधक व सिद्ध यातील फरक आहे, हेच खरे !

श्रीस्वामीमहाराजांच्या जीवनातील या सर्व नानाविध घटना व प्रसंग पाहिले व त्यांच्या अंतरंगातील रहस्याचा भेद करण्याचा प्रयत्न केला की, श्रीसमर्थरामदासस्वामीमहाराजांच्या "सावधानता

प्रकरणाची" आठवण होते व या प्रकरणात त्यांनी जणूकाही श्रीस्वामीमहाराजांसारख्या लोकोत्तर व ईश्वर–अवतारी महापुरुषांचे तात्त्विक स्वरूप स्वात्मानुभूतीवरून रहस्यभेदासह पुढीलप्रमाणे रेखाटले आहे याची प्रचीती येते. "सावधानता प्रकरणात" ते असे म्हणतात की–

कोणाचा भरंवसा न धरावा। आपुला आपण विचार पहावा।
तकवा उदंड धरावा। हर एक विषयीं ॥ १ ॥
देहदुःखें कदरों नये। उदंडचि करावे उपाय।
मग सर्व सुखाला काय। उणें आहे ॥ २ ॥
एकांतीं चाळणा करावी। धारणा उदंड धरावी।
नाना विचारणा करावी। अरिमित्रांची ॥ ३ ॥
प्रयत्नीं चुको नये। सुखवासी कामा नये।
सुचावे नाना उपाय। अनेक विषयीं ॥ ४ ॥
धुरेनें धीर सोडूं नये। मुख्य प्रसंग चुको नये।
उद्योगरहित कामा नये। पशू जैसे ॥ ५ ॥
उपाधीस कंटाळला। विचाराचा आळस आला।
म्हणजे जाणावा चेवला। बुद्धीपासूनी ॥ ६ ॥
खबरदारी आणी वेगीं। तेणें सामर्थ्य चढे अंगीं।
नानाप्रसंगें कार्यभ.गीं। अंतरचि न पडे ॥ ७ ॥
कार्यकर्ते दूरी करावे। प्रसंगीं सर्वेचि हातीं धरावे।
परंतु शोधोनि पाहावे। कपटाविषयीं ॥ ८ ॥
जेथें बहु विचार। तेथें ईश्वरअवतार।
मागें झाले थोर थोर। धके चपेटे सोसोनी ॥ ९ ॥
आपुल्या मनासी रे.धावें। परांतर शोधावें।
क्षणक्षणां सांभाळावें। बदलेल म्हणूनी ॥ १० ॥

पाहिलेंचि पाहावें। केलेंचि करावें।
शोधिलेंचि शोधावें। राज्यकारण ॥ ११ ॥
इशारतीचें बोलतां नये। बोलायाचें लिहूं नये।
लिहावयाचें सांगूं नये। जबाबीनें ॥ १२ ॥

श्रीस्वामीमहाराजांचे तात्त्विक व रहस्यमय चरित्र किती लोकोत्तर असेल हे या ओव्यांवरून साधकभक्तांच्या लक्षात येईल. हे तात्त्विक चरित्र अंतरग व्हावे व अंशात्मकरीतीने तरी आपण सर्वांनी तसे होऊन, त्यांच्या चरणरज:कणाच्या कोटयांशाची तरी पवित्रता आपणा सर्वांना यावी व जीवित धन्य व कृतार्थ व्हावे म्हणून हा विस्तार केला.

श्रीगंगोत्रीवरून परत येत असताना वाटेत एका गावामध्ये रात्र झाली. त्या गावात मुसलमानांची बरीच वस्ती होती. श्रीस्वामी-महाराजांनी निवाऱ्यासाठी सोबतच्या लोकांना गावात पाठवून दिले व आपण मात्र रात्र गावाबाहेरच घालविण्याचे ठरविले. ते लोक-वस्तीपासून दूर अशा एका प्रशस्त दगडावर बसून राहिले. सगळीकडे सामसूम झाल्यावर त्याच दगडावर छाटी पांघरून ते निर्धास्तपणे झोपले. त्यांना अगदी गाढ झोप लागली. थोडया वेळात तेथे पाऊस पडू लागला. हिमालयात या उंचीवर पाऊस फार लहरी असतो. पाऊस केव्हा पडेल आणि आकाश पुन्हा केव्हा निरभ्र होईल ते सांगता येत नाही. पाऊस जोरात पडू लागल्यावर गावात गेलेल्या काही लोकांना शिलाखंडावर बसलेल्या श्रीस्वामीमहाराजांची आठवण झाली. पाऊस थोडा कमी झाल्यावर ते शोध घेत घेत त्या शिलाखंडाजवळ आले. त्यावेळी त्यांना असे दिसले की, शिळेच्या वरच्या बाजूने व खालच्या बाजूने पावसाचे पाणी वाहत आहे व शिळेवर हे श्रीस्वामीमहाराज शांतपणे झोपले असून त्यांना पावसाचे व पाण्याचे भानही नाही.

श्रीस्वामीमहाराजांची हिमालययात्रा येथेच संपली असणे शक्य नाही. त्यांचे दोन चातुर्मास हिमालयात झाले, म्हणजे जवळ जवळ दोन वर्षे त्यांनी हिमालयात भ्रमण केले. श्रीमदाद्यशंकराचार्यां-प्रमाणे त्यांनी काश्मीर वगैरे ठिकाणची यात्रा करून मग पुढे ते श्रीअमरनाथ, श्रीकेदारनाथ, श्रीबद्रीनाथला गेले की काय, ते सांगता येणे शक्य नाही. श्रीबद्रीनाथ, श्रीकेदारनाथ, श्रीगंगोत्री, श्रीजम्नोत्री या त्यांच्या प्रवासाची हकीगत थोडीफार का होईना उपलब्ध झाली आहे. उत्तरकाशीची यात्रा करून ते खाली उतरले असा उल्लेख सापडतो. या दोन वर्षांत त्यांनी काश्मीरची यात्रा केली असण्याची शक्यता आहे. श्रीस्वामीमहाराजांची श्रीमदाद्यशंकरा-चार्यांवरील भक्ती एवढी होती की, आचार्यांचा ज्या ज्या ठिकाणी पदस्पर्श झाला ती ती सर्व ठिकाणे श्रीस्वामीमहाराजांच्या भ्रमणात येऊन गेली असण्याची शक्यता आहे. म्हणूनच काश्मीरातील श्रीनगर जवळील शारदा क्षेत्रातील श्रीमदाद्यशंकराचार्यांच्या मंदि-रालाही त्यांनी भेट दिली असेल असे वाटते.

या शारदा क्षेत्राबद्दल अशी आख्यायिका सांगतात की, या ठिकाणी एक मनोहर मंडप होता. त्याला चार दिशांना चार दरवाजे होते. मंडपाच्या मध्यभागी एक रत्नजडित सिंहासन होते. या ठिकाणी भारतील सर्व भागातून विद्वान् लोक येऊन आपली विद्वत्ता प्रकट करीत असत. मंडपाचे पूर्व, पश्चिम व उत्तर हे दरवाजे उघडे होते. दक्षिण दरवाजा मात्र बंद असे; कारण भारतातील दक्षिण भाग सोडून इतर ठिकाणचे विद्वान् येथे आलेले होते. एकदा अशीच विद्वान् मंडळी तेथे जमली होती. त्यावेळी आकाशवाणी झाली की "येथे आता लवकरच दक्षिणेहून एक विद्वान् संन्यासी येणार आहेत. त्यावेळी दक्षिण दरवाजा उघडला जाईल." काही वेळाने श्रीमदाद्यशंकराचार्यांचे दक्षिण दरवाजातून आगमन झाले. त्यावेळी

तेथे उपस्थित असलेल्या विद्वानांनी श्रीआचार्यांना वादविवादाचे आव्हान केले. श्रीआचार्यांनी ते स्वीकारले आणि वादविवादात प्रतिपक्षाचा पराभव करून त्यांच्या गर्वाचे हरण केले. नंतर श्रीशारदादेवीच्या आज्ञेने श्रीआचार्यांनी तेथील सिंहासन भूषविले. नंतर आपल्या शिष्याला सिंहासनावर बसवून ते पुढील भ्रमंतीला गेले. आज या ठिकाणी रत्नजडित सिंहासन नाही; पण श्रीमदाद्यशंकराचार्यांचे स्मारक मात्र आहे. श्रीस्वामीमहाराज निश्चितच एक रात्र येथे राहून त्यांनी श्रीआचार्यांच्या स्मरणात तो काळ घालविला असेल.

तेथून श्रीस्वामीमहाराज श्रीअमरनाथच्या दर्शनासाठी गेले असतील. श्रीअमरनाथची वाट अमरगंगा नदीच्या किनाऱ्याने दोन पर्वतांमधून जाते. हा मार्ग अतिशय खडतर, निर्जन आणि कडक थंडीचा आहे. यात्रेकरू लोकांच्या तांड्याशिवाय येथे कोणी दिसणार नाही. येथील कडक थंडी आणि लहरी हवामान यात्रेकरूंना नेहमीच तापदायक ठरते. याही कडक थंडीमध्ये कौपीनधारी योगी व संन्यासी सर्वांगाला भस्म फासून आनंदामध्ये श्रीअमरनाथची वाट चालताना दिसतात, असे वर्णन प्रसिद्ध प्रवासी श्री. प्रबोधकुमार संन्याल यांनी केले आहे. श्रीस्वामीमहाराज ईश्वर कोटीतील योगिराज संन्यासी होते. त्यांनी आपली सर्व भ्रमंती दोन छाट्या व दोन लंगोट्या एवढ्या वस्त्रांवरच केली. श्रीस्वामीमहाराज या अमरनाथ गुंफेमध्ये पौर्णिमेपूर्वी काही दिवस अगोदर गेलेही असतील; कारण येथे निर्माण होणारी श्रीगणेश, श्रीपार्वती व श्रीअमरनाथ यांची बर्फाची लिंगे दररोज वाढत वाढत पौर्णिमेला पूर्णाकृती बनतात आणि नंतर तीच लिंगे वितळत वितळत अमावस्येला पूर्णपणे अस्तित्वरहित होतात. हीच या श्रीअमरनाथ लिंगाची महती आहे. निसर्गाचा हा एक चमत्कारच म्हणावा लागेल.

हिमालयाची एवढी यात्रा केल्यावर श्रीस्वामीमहाराज कैलास व मानससरोवर यात्रा केल्याशिवाय राहिले असतील हे संभवत नाही. कैलास यात्रेला ऑगस्ट, सप्टेंबर व ऑक्टोबर हा समय चांगला असतो. भाद्रपद महिन्यात आपला चातुर्मास संपवून श्रीस्वामीमहाराज कैलास मानससरोवराच्या यात्रेला गेले असतील. अर्थात् ही यात्रा त्यांनी यात्रेकरू लोकांबरोबरच केली असेल; कारण अन्यथा या मार्गावर भिक्षेची सोय नाही. साधारण २२५ मैलांची ही वाट चालण्यास ४५ ते ६० दिवस लागतात. एवढे दिवस देहसंवर्धन करण्यासाठी थोड्यातरी अन्नाची आवश्यकता भासणारच आणि म्हणून इतर यात्रेकरूंबरोबर प्रवास करणे त्यांना भाग पडले असणार. अलमोड्यापासून थोडे वरपर्यंन्त तुरळक वस्तीची कोठेकोठे खेडी लागतात; पण पुढील अर्ध्याहून अधिक प्रवास निर्जन प्रदेशातूनच करावा लागतो. मार्गात चिटपाखरूसुद्धा आढळत नाही, असे म्हटल्यास अतिशयोक्ती होणार नाही.

कैलासाच्या वाटेवर–यात्रा संपता संपता–तालकोट आणि खोचरनाथ ही ठिकाणे लागतात. या दोन्ही ठिकाणी त्या दिवसांमध्ये मोठे बुद्धविहार श्रीस्वामीमहाराजांच्या दृष्टीला पडले असतील. मानससरोवराच्या चारही बाजूंना बौद्धमठ आहेत. तसेच ठिकठिकाणी लहान लहान गुंफा आहेत. कडाक्याच्या थंडीमध्ये लोक या गुंफांचा आसरा घेतात. मानससरोवरापूर्वी राक्षसताल–राक्षससरोवर लागते. या सरोवरामध्ये ठिकठिकाणी पाण्यावर आलेले भूखंड आढळतात. या भूखंडांवर बसून साधना करीत असलेले कित्येक योगी व संन्यासी श्रीस्वामीमहाराजांच्या दृष्टीला पडले असतील.

या पुढे मांधाता पर्वताच्या पायथ्याशी वसलेले मानससरोवर लागते. त्यानंतर बर्फाच्छादित कैलासपर्वत आहे. सर्वांगाला राख

फासलेल्या एखाद्या ध्यानमग्न योग्यासारखे कैलासाचे अर्थात् त्यांच्या रूपाने श्रीशंकराचे श्रीस्वामीमहाराजांना दर्शन घडले असेल किंवा त्या नगाधिराजाच्या अत्युच्च शिखरावर प्रत्यक्ष ध्यानमग्न भगवान् श्रीशंकराचेच श्रीस्वामीमहाराजांना दर्शन झाले असेल. सूर्योदया-बरोबर कैलासाचे जे दर्शन घडते ती एक दिव्य अनुभूती असते. कैलास क्षणाक्षणाला हजारो रंगछटा पालटत जातो. कधी तो पूर्ण सुवर्णाचा भासतो तर कधी रुप्याचा. क्षणाक्षणाला रूप पालटणाऱ्या कैलासाचे समोरच्या मानससरोवरात पडणारे प्रतिबिंब पाहून यात्रे-करूला एक उच्च आध्यात्मिक अनुभूती येते. तो स्वतःचे अस्तित्व विसरून जातो. आपण मानव सृष्टीत नसून देवाच्या राज्यात आहोत असे त्याला वाटते; मग तो कोणत्याही धर्माचा, पंथाचा किंवा देशाचा असो. हा अनुभव जन्माला येऊन एकदा तरी घ्यावा. श्रीस्वामीमहाराज तर या दिव्य अनुभवामुळे सदासर्वकाळ समाधी अवस्थेमध्ये असतील यात शंकाच नाही.

श्रीमत् परमहंस परिव्राजकार्य भगवान् श्रीवासुदेवानंदसरस्वती स्वामीमहाराज यांचा अखंड जयजयकार असो. त्यांनी केलेले श्रीमत् आद्य शंकराचार्यांचे, भगवान् श्रीमहादेवशंकराचे व श्रीगंगेची स्तुतिस्तोत्रे त्यांच्या शब्दातच करून, त्यांनी त्यांच्या ठिकाणी धन्यतेच्या व कृतार्थतेच्या रूपात नांदणाऱ्या ब्रह्मानन्दात आम्हा सर्व जडजीवांना आपल्या अमोघ कृपाबलाने व अपार करुणेच्या उद्रेकाने समाविष्ट करून घ्यावे, अशी साष्टांग प्रणिपातपूर्वक प्रार्थना करू.

## ॥ श्रीशङ्कराचार्यस्तुतिः ॥

श्रीमद्भगवत्पूज्यपदेश्वर। वैदिकमार्गस्थापक शंकर।
शिवावतार श्रीमच्छंकर। किंकर हरहर त्राहि यतीश्वर ॥ १ ॥

शिवगुरुसद्गृहावतीर्णं मोहांतक । जनशिक्षक तारक दान्त ।
खण्डितपण्डितसंहतिमण्डित । मण्डनपण्डितदुर्मतशान्त ॥ २ ॥
विजितासंगतशास्त्रासंमतसौगतबौद्धादिकराद्धांत ॥
प्रस्थानत्रयभाष्यकृदद्वयमतसंस्थापक दृढसिद्धान्त ॥ ३ ॥
वृषभूकमठान्यो दिक्षु मठान् । कृत्वा चतुरस्तत्र चतुरः ।
सुरेश्वरार्यप्रमुखान् चतुरानयोजयद्यो शिष्यांश्चतुरः ॥ ४ ॥
श्रीमत्परमहंसपरिव्राजकश्रीमच्छंकराचार्यमशोकं ।
वासुदेवयतिर्भक्त्या नमति । स्तुत्वा यथामति पावितलोकम् ॥ ५ ॥

॥ इति श्री. प. प. श्रीवासुदेवानन्दसरस्वतीविरचिता
श्रीशंकराचार्य–स्तुतिः संपूर्णा ॥

## ॥ भगवान् श्रीशंकरमाहात्म्य ॥

ईशावास्यमिदं सर्वं चक्षोः सूर्यो अजायत ॥
इति श्रुतिरुवाचातो महादेवः परावरः ॥ १ ॥
अष्टमूर्तेरसौ सूर्यो मूर्तित्वे परिकल्पितः ॥
नेत्रं त्रिलोचनस्यैकमसौ सूर्यस्तदाश्रितः ॥ २ ॥
यस्य भासा सर्वमिदं विभातीति श्रुतेरिमे ॥
तमेव भान्तमीशानमनु भान्ति खगादयः ॥ ३ ॥
ईशानः सर्वविद्यानां भूतानां चेति च श्रुतेः ॥
वेदादीनामप्यधीशः स ब्रह्मा कैर्न पूज्यते ॥ ४ ॥
यस्य संहारकाले तु न किंचदवशिष्यते ॥
सृष्टिकाले पुनः सर्वं स एकः सृजति प्रभुः ॥ ५ ॥
सूर्याचन्द्रमसौ धाता यथापूर्वमकल्पयत् ॥
इति श्रुतेर्महादेवः श्रेष्ठोऽर्च्यः सकलार्चितः ॥ ६ ॥
विश्वं भूतं भवद्भव्यं सर्वं रुद्रात्मकं श्रुतम् ॥
मृत्युंजयस्तारकोऽतः स यज्ञस्य प्रसाधनः ॥ ७ ॥

विषमाक्षोऽपि समदृक्साशिवोऽपि शिवः स च ॥
वृषसंस्थोऽप्यतिवृषो गुणात्माप्यगुणोऽमलः ॥ ८ ॥
यदाज्ञामुद्वहन्त्यत्र शिरसा सासुराः सुराः ॥
अन्नं वातो वर्षं इतीषवो यस्य स विश्वपाः ॥ ९ ॥
भिषक्तमं त्वां भिषजां श्रृणोमीति श्रुतेरयं ॥
स्वभक्तसंसारमहारोगहर्तापि शंकरः ॥ १० ॥



## ॥ श्रीगंगातीर्थस्तोत्रम् ॥

गं गे द र्शय ते रूपं मु क्तिदं मु नि चिंतितम् ॥
गा य त्ता रिणि ते दृष्टया च्य वेत्को नि ज रूपतः ॥ १ ॥
गं गे ! त्रे धाघहंत्रीति ते किर्ति दि क्षु विस्तृता ॥
गे या यो गिमुनिध्येया स दा त्वं गं ग आधिहे ॥ २ ॥
ति ष्येंऽ ह स्तरणं मात र्वं रिष्ठे ब त नान्यतः ॥
यो वै रिः कामसंज्ञो मे पाह्यतो रो ष हेतुतः ॥ ३ ॥
ब्रू ते क्रु त्स्नश्रुतं त्रात्री पे योदा बा त्मिकेति यत् ॥
या तृ ष्णा या मतिर्भ्रष्टाऽऽ भ्यो भ्योबा लः पुनातु ताम् ॥ ४ ॥
द्यो त उ त्कृष्ट एवास्तु वि ष्णुजेऽ पि हितांतरे ॥
ज ग न्म ति क्षालके भू ष्णु स्सन्त्वां शा न्तिदेर्थये ॥ ५ ॥
ना स्म त्ता रक एवान्यो लो के वा चो मृषा न मे ॥
नां तो नं ते त्र मेऽघस्य कं ब्रूयां ज्ञा न देत्र तु ॥ ६ ॥
श त्रू न्द मय मे देवि स कला न मृतप्रदे ॥
तै र्हि दा न्तो विमुक्तःस्यां ग तैनाः सा ध्व्यसंशयं ॥ ७ ॥
र क्ष य द्यपि पापोहं च्छ न्दोचर्ये ग वि जान्हवि ॥
पि ता कः कापरांबा मे ति ष्ये ता रः परश्च कः ॥ ८ ॥

॥ इति श्री. प. प. श्रीवासुदेवानन्दसरस्वतीविरचितं
गंगास्तोत्रं संपूर्णम् ॥

## ॥ श्रीगंगाष्टकम् ॥

न जाणे मी धर्मा न च विहित कर्मा अवगमा ॥
न जाणे मी शर्मा न च विहित आधार महिमा ॥
कुकर्मासी कामाकुलित कृतकर्माचि सुभगे ।
मला तारीं गंगे सकलभयभंगे त्रिपथगे ॥ १ ॥
न केव्हांही येथें सुकृतलव संपादित असे ।
न पूर्वींचें कांहीं सुकृत पदरीं भासत असे ॥
पुढेंही श्रेयाची गति न च दिसे खास मज गे ।
मला तारीं गंगें सकलभयभंग त्रिपथगे ॥ २ ॥
न साधूच्या सगा क्षणभरि धरी भक्ति न करी ।
सुतीर्थाक्षेत्राची पदवि बरवी ती हि न धरी ॥
न देवाचे द्वारीं क्षणभर ठरे देवि सुभगे ।
मला तारीं गंगे सकलभयभंगे त्रिपथगे ॥ ३ ॥
न केलें बैसोनी क्षणभरि पुराणश्रवणही ।
कुकर्माच्या गोष्टी करुनि वय नेलें सकलही ॥
कदा काळीं नेणें हरिभजन तेंही न सुभगे ॥
मला तारीं गंगे सकलभयभंगे त्रिपथगे ॥ ४ ॥
असा हा मी पापी शरण तुज आलों हरिसुते ।
तुं या वारी पापा शमवि मम तापा सुरसुते ॥
तुवां हातीं घेतां मग मजसि कांहींच न लगे ।
मला तारीं गंगे सकलभयभंगे त्रिपथगे ॥ ५ ॥
महापापी तूझ्या अमृतजलपानेंचि तरले ।
सुकृत स्नानें गेले उपरि न च तेही उतरले ।
असें मी ऐकोनी अयि शरण आलोंचि तुज गे ।
मला तारीं गंगे सकलभयभंगे त्रिपथगे ॥ ६ ॥

त्रितापघ्नी ऐसें निजबिरुद तूं पाळि सदये ।
त्रितापघ्नी ऐसें यशहि तव सांभाळि सुनये ।।
अये योगिध्येये निगमगणगेये श्रितभगे ।
मला तारीं गंगे सकलभयभंगे त्रिपथगे ।। ७ ।।
महापापी नेले असिस जरि उद्धारुनि परे ।
तयाहूनि श्रेष्ठा अजि मग आई उद्धरि बरें ।।
तरीच प्रख्याती करिशि जगतीमाजि सुभगे ।
मला तारीं गंगे सकलभयभंगे त्रिपथगे ।। ८ ।।
।। इति० प० प० श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचितं
श्रीगंगाष्टकं संपूर्णम् ।।



# – अध्याय पाचवा –

त्वयि भक्ति मे वर्धय दुर्हृत्तम ईश नाशय अशेषं ।
यच्च तवेष्ट तत्कुरु मयि भोः सर्वज्ञ वक्तुमसमर्थः ।।

**चातुर्मास सहावा – शके १८१८ - इ. स. १८९६ – हरिद्वार :–**
श्रीस्वामीमहाराजांनी हिमालयाची यात्रा कशी केली हे आपण पाहिले; परन्तु त्यांचे हिमालयातील दोन चातुर्मास कोणत्या ठिकाणी झाले या संबंधी कसलीच माहिती मिळत नाही. श्रीस्वामीमहाराजांनीही या संबंधी स्वतःहून कोणाला माहिती सांगितली नाही व त्यांच्या संपर्कात आलेल्या लोकांनीही त्यांना या संबंधात काही विचारलेले दिसत नाही. कदाचित् देवतात्मा हिमालयातील दिव्य लोकात सूक्ष्म पातळीवरील अतिदिव्य स्थानातही हे दोन चातुर्मास झाले असणे शक्य आहे.

श्रीसरस्वतीगंगाधर यांनी श्रीमन्नृसिंहसरस्वतीस्वामीमहाराज यांचे दिव्य चरित्र ज्या "श्रीगुरुचरित्र" ग्रंथात कथन केले आहे त्यात

शेवटी ५३ व्या अध्यायात " ऐसें अपार श्रीगुरुचरित्र । अनंत कथा परम पवित्र । त्यांतील एकावन्न अध्याय मात्र । प्रस्तुत कथिले तुजलागीं ।। " असे म्हणून श्रीगुरूंचे कितीतरी चरित्र गुप्तच राहिले आहे, असे सूचित केले आहे. त्याप्रमाणेच श्रीस्वामीमहाराजांच्या हिमालयातील दोन चातुर्मासासंबंधीचे व इतरही त्या यात्रेतील चरित्र गुप्तच राहिले आहे. महात्मे, साधू व अवतारी पुरुषांच्या चरित्राचा फारच थोडा आणि तोही स्थूलात्मक भागच लोकांपुढे येतो व सूक्ष्म असे दिव्य चरित्र दृष्टिपथापलीकडे राहते हेच खरे !

आपली दोन वर्षांची हिमालय यात्रा पूर्ण करून श्रीस्वामीमहाराज खाली उतरले आणि ऋषीकेशमार्गे शके १८१८ मधील वैशाख पौर्णिमेच्या दिवशी हरिद्वारला परत आले. याही वेळी त्यांनी आपला मुक्काम पूर्वीच्याच श्रीदत्तमंदिरामध्ये ठेवला होता. श्रीस्वामी-महाराज परत आले असे कळताच पूर्वीची परिचित मंडळी दर्शनाला येऊ लागली. दोन वर्षे बंद असलेला शास्त्र पठण-पाठणाचा कार्यक्रम आता पुन्हा सुरू झाला. आपली नित्यकर्मे आटोपून श्रीस्वामीमहा-राज लोकांना त्यांच्या गरजेप्रमाणे शास्त्र, ब्रह्मकर्म, ज्योतिष वगैरे शिकवीत. श्रीस्वामीमहाराजांकडे ज्याप्रमाणे शास्त्रांचे शिक्षण घेण्यासाठी लोक येत त्याचप्रमाणे आपल्या प्रापंचिक अडचणी घेऊनही पुष्कळच लोक येत असत. त्यांचेही श्रीस्वामीमहाराज समाधान करीत. असा लोकोद्धाराचा कार्यक्रम करीत असताना आषाढ महिना आला. पौर्णिमेपासून चातुर्मास सुरू होणार होता. लोकांच्या आग्रहामुळे श्रीस्वामीमहाराजांनी हा चातुर्मास हरिद्वारला करावयाचे ठरविले. त्यांचा हा सहावा आणि हरिद्वारला दुसरा चातुर्मास होता. हिमालयात जाण्यापूर्वीचा त्यांचा तिसरा चातुर्मास येथेच झाला होता आणि आता हिमालयातून खाली उतरल्या-नंतरचा चातुर्मासनुद्धा येथेच झाला.

श्रीस्वामीमहाराजांचे श्रीनर्मदामातेवर जितके प्रेम होते, तितकेच श्रीगंगामाईवरसुद्धा फार प्रेम होते. श्रीगंगेच्या तटावर बसून वेदान्ताचा विचार करीत आनंदाने राहावे, असे उद्‌गार त्यांनी अनेक वेळा काढले होते. श्रीगंगेला ते एवढे पवित्र मानीत की, श्रीगंगेच्या काठावर असताना, शौचाचा वारंवार त्रास होत असूनही ते कधीसुद्धा श्रीगंगेच्या वाळवटावर बहिर्दिशेला गेले नाहीत. या दिवसांमध्ये श्रीगंगामाईच्या पवित्र जलात तिन्हीत्रिकाळ स्नान, घाटावर संध्या, संध्याकाळी देवदर्शन, नंतर कीर्तन, पुराण किंवा प्रवचन असा त्यांचा क्रम होता. या भरगच्च कार्यक्रमात सहा महिने कधी संपले ते कळलेच नाही.

आश्विन महिन्यामध्ये श्रीस्वामीमहाराजांनी हरिद्वार सोडले. हिमालयातून खाली उतरलेले सर्व यात्रेकरू अगोदरच पुढे गेले होते. वाटेत दक्षिणी ब्राह्मणांची वस्ती नव्हती. त्यामुळे श्रीस्वामीमहाराजांना भिक्षेची मोठीच अडचण निर्माण झाली. जवळ जवळ अठरा दिवस त्यांना उपवासच घडला असे म्हटले तरी चालेल. वाटेत काही गुजराथी ब्राह्मण भेटले. त्यांच्याकडून मिळालेल्या खारिक, खोबरे व फळांवरच श्रीस्वामीमहाराजांना हे अठरा दिवस राहावे लागले. एका गुजराथी बाईने त्यांना शेंगदाणे, चणे व गहू भाजून त्याचे पीठ काढून दिले. त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांचा आहार या पीठाचाच होता. हे पीठ पाण्यात कालवून प्यावयाचे व त्या आहारावर वीसपंचवीस कोस चालावयाचे असा श्रीस्वामीमहाराजांचा क्रम होता. श्रीस्वामीमहाराजांची चाल फारच जलद होती. सामान्य माणूस त्यांच्या बरोबर चालू शकत नसे. भिक्षा मिळो अथवा उपोषण घडो, ही वीसपंचवीस कोसांची त्यांची दररोजची मजल ठरलेलीच असे. अशा तऱ्हेचा प्रवास हीसुद्धा एक तपस्याच होती. ही अठरा दिवसांची उपाशी पोटी केलेली पदयात्रा

संपवून श्रीस्वामीमहाराज ब्रह्मावर्ताला येऊन पोहोचले. याही वेळी त्यांचा मुक्काम श्रीराममंदिरामध्ये झाला. येथेही पूर्वीसारखेच कार्यक्रम सुरू झाले. श्रीस्वामीमहाराज अगोदर पासूनच लोकांना परिचित झालेले होते. यावेळी त्यांच्या आश्रमाचे दरवाजे सदा उघडेच असत. आपले दैनंदिन आन्हिक उरकून ते दिवसभर लोकोद्धाराचे कार्य करीत असत.

श्रीराममंदिराजवळ श्री. गणपतीबुवा म्हणून एक महान् साधुपुरुष राहत होते. त्यांनी १८५७ सालच्या स्वातंत्र्य संग्रामामध्ये भाग घेतला होता. त्यांचा पुतण्या बाटून मुसलमान झाला होता. धर्मांतरापूर्वी त्याचा विवाह झाला होता व त्याला एक मुलगाही झाला होता. नवरा बाटून मुसलमान झाला; पण पत्नी हिन्दूच राहिली होती. ही बाई श्री. गणपतीबुवांबरोबर मुलाला घेऊन राहत होती. एक दिवस तिला घेऊन जाण्यासाठी तिचा बाटलेला नवरा श्री. गणपतीबुवांकडे आला. त्यावेळी त्या बाईने नवऱ्याबरोबर जाण्यास साफ नकार दिला. श्रीस्वामीमहाराजांचा आणि श्री. गणपतीबुवांचा स्नेह होता. या बाबतीमध्ये शास्त्राचा निर्णय काय आहे हे जाणून घेण्यासाठी त्या बाईला घेऊन ते श्रीस्वामीमहाराजांपाशी आले. "विवाहानंतर धर्मांतर केलेल्या पतीबरोबर संसार करावा की नाही ? याबद्दल शास्त्रनिर्णय काय आहे ते मला कृपा करून सांगा," असे त्या बाईने श्रीस्वामीमहाराजांना विचारले. त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांनी त्या बाईला असे सांगितले की, "धर्मांतर केलेल्या पुरुषाला जर कृतकर्मांचा पश्चात्ताप होत असेल; तर प्रायश्चित्त घेऊन तो शुद्ध होऊ शकतो. शुद्धीकरण झाल्यावाचून त्याच्याशी संबंध ठेवू नये अशी धर्माज्ञा आहे." श्रीस्वामीमहाराजांची ही आज्ञा ऐकून त्या बाईने आपल्या नवऱ्याला प्रायश्चित्त घेऊन शुद्ध होण्यास व आपल्या धर्मात परत येण्यास विनविले; पण त्या

पुरुषाला जेथे धर्मांतराबद्दल पश्चात्ताप झाला नव्हता, तेथे तो प्रायश्चित्त घ्यावयाला कसा तयार होणार ? त्याच्या बरोबर संसार करण्याऐवजी ब्रह्मावर्तामध्ये राहून ईश्वर चिंतनात, साधुसंतांच्या सेवेत व हरिभजनात उर्वरित आयुष्य घालविण्याचे त्या बाईने ठरविले.

त्या बाईचा मुलगा त्यावेळी पाच वर्षांचा झाला होता. त्याची प्रकृती चांगली नसे. तो वारंवार बेशुद्ध पडत असे. मुलाला श्रीस्वामीमहाराजांच्या पायावर घालून ती बाई त्यांना असे म्हणाली की, " महाराज ! आता हाच आमच्या कुळाचा वारस आणि माझा म्हातारपणीचा आधार आहे. हा असा नेहमी आजारी असतो. याच्यावर काही तरी इलाज करा. मी आपली जन्मभर ऋणी राहीन." श्रीस्वामीमहाराजांनी त्या मुलाकडे पाहिल्यावर त्यांच्या असे लक्षात आले की, त्या मुलाला पिशाच्च बाधा झालेली आहे. त्या धर्मनिष्ठ बाईच्या प्रार्थनेप्रमाणे त्यांनी भूर्जपत्रावर एक मंत्र लिहून एक यंत्र तयार केले व ते मुलाच्या दंडामध्ये बांधण्यास सांगितले. त्या दिवसापासून त्या मुलाची पीडा कमी झाली.

पुढे फाल्गुन महिना आला. होळीचे दिवस होते. होळीचा सण उत्तर हिन्दुस्तानात मोठ्या धामधुमीने साजरा केला जातो. म्हातारे-कोतारे, बायकामुले असे सर्वजण एकमेकांवर रंग उडवून होलिकोत्सव आनंदाने साजरा करतात. त्या वर्षी होळीच्या दिवसात त्या मुलाची आई अस्पर्श झाली असता मुलगा तिच्याजवळ जाण्याकरिता हट्ट धरून बसला. त्यामुळे त्याच्या दंडातील यंत्र काढून ते दुसरीकडे ठेवले. दुसऱ्या दिवशी सकाळी मुलगा आपल्या मामाबरोबर होलिकोत्सव पाहण्यास गेला. त्यावेळी त्याच्या दंडामध्ये यंत्र बांधावयाचे राहून गेले होते. रस्त्याने जाता जाता मुसलमानांचे एक कबरस्थान लागले. सुरक्षा यंत्र दंडामध्ये नसल्यामुळे मुलाला पूर्वीच्याच

पिशाच्चाने कबरस्थानाजवळ पकडले व त्याची मान मुरगळली. मुलगा रस्त्यात पडला व काही वेळातच त्याचे प्राणोत्क्रमण झाले. रस्त्यात अचानक घडलेल्या या प्रसंगाने मुलाचा मामा अगदी दिङ्मूढ होऊन गेला. तो मुलाला उचलून घेऊन घरी आला. आपला मुलगा गेल्याचे समजताच त्या मुलाच्या आईच्या शोकाला व दुःखाला पारावार राहिला नाही. अशा अवस्थेत त्या पिशाच्चाने मुलाच्या आईच्या अंगात संचार करून तिला असे सांगितले की, "मागील जन्मात तू माझा दीड रुपया दिला नाहीस म्हणून मीच तुझ्या या मुलाला मारले आहे. तुझ्या मोठ्या मुलाला मीच वेड लावले होते. एवढेच नव्हे; तर तुझा गर्भपातही मीच केला होता. आणि आता याही मुलाला मीच नेले आहे. तुझ्या नवऱ्यालाही मीच धर्मभ्रष्ट केले. माझे पैसे न दिल्याने मीच अशा प्रकारे तुझा सर्व संसार उध्वस्त केला आहे."

ही सर्व हकीकत वाचली म्हणजे कर्मविपाकामुळे मिळणारी फळे किती भयानक असतात याची कल्पना आल्याशिवाय राहणार नाही. "गहना कर्मणो गतिः ॥ ४.१७ ॥" असे जे श्रीमद्भगवद्गीतेत म्हटले आहे, ते अक्षरशः सत्य आहे, याची प्रचीती ही गोष्ट वाचल्यावर अवश्य येते. साधक भक्ताने जीवनात वागताना किती सावधान राहिले पाहिजे, किती नेकीने व सचोटीने व्यवहार केला पाहिजे व कोणाचेही एक पैचेही देणे चुकविता कामा नये, हे किती आवश्यक आहे, याचा सतत विचार करून वागले पाहिजे हेच खरे!

श्रीस्वामीमहाराज माणगाव सोडून उत्तरेच्या प्रवासाला निघाले त्यावेळी श्रीक्षेत्र नरसोबावाडीला जाताना देवांनी त्यांच्या मदतीला दिलेल्या गणांनी घाटामध्ये एका गाडीवाल्याला त्रास दिला होता. ही गोष्ट श्रीस्वामीमहाराजांना न आवडून त्यांनी श्रीक्षेत्र नरसोबावाडीला येताच देवांना आपले गण परत घ्यावयाला सांगितले होते.

ही हकीकत आपण मागे (प्रथम खण्डाच्या पृष्ठ २९० वर) पाहिलीच आहे. असे असले तरी सुद्धा देवांचे गण श्रीस्वामीमहाराचांच्या अवती भोवती नेहमीच असत. ब्रह्मावर्तामधील या मुक्कामात त्यांना या गणांची मदत घ्यावी लागली, असे दिसून येते.

एकदा एक ब्राह्मण आपल्या घरी झालेल्या चोरीचा तपास व्हावा म्हणून श्रीस्वामीमहाराजांकडे आला. त्याने काही ग्रंथ खरेदी करण्यासाठी पैसे जमा करून ठेवले होते. आपल्या घरी चोरी होणार नाही अशी त्याची खात्री असल्यामुळे त्याने हे पैसे कडी कुलपात बंद न ठेवता उघड्यावरच ठेवले होते. त्यामुळे एके दिवशी कोणीतरी पाळत ठेवून ते चोरून नेले. त्याने चोरांचा खूप तपास केला; परंतु कोठेही तपास लागला नाही म्हणून शेवटी तो श्रीस्वामी-महाराजांकडे आला. तो ब्राह्मण आला त्यावेळी संध्याकाळ झाली होती. बरीच मंडळी जमली होती. श्रीस्वामीमहाराजांनी देवाच्या गणांना चोरी करणारा माणूस शोधून काढण्यास सांगितले. तेथे जमलेल्या मंडळींमध्ये एका मुलाच्या शरीरामध्ये त्या गणाने प्रवेश केला. त्याबरोबर गर्दीतून हातवारे करीत तो मुलगा श्रीस्वामी-महाराजांसमोर आला व त्या ब्राह्मणाचे पैसे आपण चोरल्याचे त्याने कबूल केले. थोड्या वेळातच त्याने ते पैसे परत आणून दिले. हा सर्व प्रकार पाहून लोकांना फारच आश्चर्य वाटले; कारण तो मुलगा थोरामोठ्यांच्या घरातील होता. गावातील प्रतिष्ठित लोकांसमोर आपली चोरी उघडकीस आली याचा त्याला फार खेद झाला होता. त्यामुळे तो मान खाली घालून श्रीस्वामीमहाराजांसमोर उभा होता. त्यावेळी श्रीस्वामीमहाराज त्याला असे म्हणाले की, "अरे! तुझा मोठ्या चांगल्या घराण्यात जन्म झाला आहे अशावेळी तू चोरी-सारखे नीच कर्म करतोस हे चांगले नाही. पुन्हा असे कृत्य कधीही करू नकोस. सत्याने वाग म्हणजे तुझे इहपर अखंड कल्याण होईल."

श्रीस्वामीमहाराजांचे हे बोलणे एकून त्याच्या मनावर खूप चांगला परिणाम झाला व त्याला फार पश्चात्ताप झाला. त्याने श्रीस्वामी-महाराजांना साष्टांग नमस्कार घालून आपण यापुढे कधीही चोरी करणार नाही असे सांगून क्षमायाचना केली. पुढे तो मुलगा सद्-वर्तनाने वागून सन्मार्गगामी झाला.

एकदा कानपूरचा एक गौड ब्राह्मण श्रीस्वामीमहाराजांकडे आला. त्याला एक दहा वर्षाची मुलगी होती. त्यावेळच्या प्रथेप्रमाणे एक चांगलेसे स्थळ दृष्टिपथात येताच त्याने आपल्या मुलीचे लग्न तिला न विचारताच परस्पर ठरवून टाकले. आपल्या वडिलांनी आपले लग्न ठरविले आहे हे कळताच तिने त्यांना असे विचारले की, "तो मुलगा काय करतो ?" वडिलांनी "तो नोकरी करतो" असे तिला सांगितल्यावर ती त्यांना लगेच असे म्हणाली कीं, "अशा नोकरी करणाऱ्या ब्राह्मणाबरोबर मला लग्न करावयाचे नाही. त्याप्रमाणेच व्यापार व शेती करणारा ब्राह्मण वरही मला पसंत नाही. जो केवळ भिक्षा मागून तपश्चर्या करणारा ब्राह्मण असेल त्याच्या बरोबरच माझे लग्न करावे." आपल्या दहा वर्षाच्या मुलीचे हे विलक्षण विचार ऐकून तिच्या वडिलांना काय निर्णय घ्यावा हेच सुचेना. त्यामुळे श्रीस्वामीमहाराजांकडे आल्यावर त्याने त्यांना ही सर्व हकीकत सांगितली व यातून काहीतरी मार्ग सुचवावा म्हणून अतिशय भक्तिभावाने व काकुळतीने प्रार्थना केली. भिक्षा मागून तपश्चर्या करणारा माणूस आपल्या मुलीचा संसार करणार तरी कसा ? व असा ब्राह्मण वर मिळणार तरी कोठे ? ही त्या ब्राह्मणाच्या दृष्टीने मोठी अद्भुत समस्या होती व ती श्रीस्वामी-महाराज सोडवितील अशी त्याची खात्री होती.

त्या ब्राह्मणाची ही सर्व हकीकत ऐकल्यावर श्रीस्वामीमहाराज त्याची समजूत घालताना त्याला असे म्हणाले की, 'ही तुझी मुलगी

म्हणजे पूर्वजन्मीची कोणीतरी योगभ्रष्ट तपस्विनी तुमच्या कुळात जन्माला आली आहे. हिच्या जन्माने तुमच्या कुळाचा उद्धारच झाला आहे. हिच्या इच्छेविरुद्ध हिचा विवाह करण्याच्या फंदात तुम्ही पडू नका. तसे केल्याने तुमचे अनिष्ट होईल. हिच्या नशिबात हिच्या इच्छेप्रमाणे इष्ट वराशीच हिचे लग्न होईल असा योग आहे. तिच्या योग्यतेचा वर आपण होऊन तुमच्या घरी चालत येईल. तोपर्यन्त धीर धरा." श्रीस्वामीमहाराजांचे हे म्हणणे ऐकताच त्या ब्राह्मणाची समजूत पटली व तो आपल्या मुलीला घेऊन कानपूरला परत गेला. नशिबावर हवाला ठेवून राहावयाचे असे ठरवून तो निश्चिंत राहिला.

अशा प्रकारे काही दिवस गेल्यानंतर एके दिवशी त्या ब्राह्मणाच्या घराशेजारी असणाऱ्या धर्मशाळेत एक तपस्वी व तेजस्वी ब्रह्मचारी ब्राह्मण तीर्थयात्रा करीत येऊन उतरला. ब्रह्मचर्य आणि तप यांचे तेज त्याच्या मुखावर व देहावर दिसून येत होते. त्या मुलीने जेव्हा त्या ब्रह्मचाऱ्याला पाहिले तेव्हा तिने पित्याला येऊन असे सांगितले की, "आपण माझे या ब्रह्मचारी ब्राह्मणाबरोबर लग्न करून द्या. मला त्याच्या बरोबरच संसार करावयाचा आहे." तिचे हे म्हणणे ऐकताच "मुलीसाठी योग्य वर घरी चालून येईल." या श्रीस्वामीमहाराजांच्या शब्दांची त्या ब्राह्मणाला आठवण झाली. त्याने त्या तरुण ब्रह्मचाऱ्याला आपल्या घरी जेवावयाचे आमंत्रण दिले. भोजनोत्तर त्या ब्राह्मणाने आपल्या मुलीला त्या ब्रह्मचाऱ्याला दाखवून त्याला अशी विनंती केली की, "माझ्या या विवाहयोग्य मुलीला पदरात घेऊन आपण मला धन्य करावे. आपणाला ती पूर्णपणे अनुरूप आहे." या आकस्मिक मागणीने तो ब्रह्मचारी आश्चर्यचकित झाला. आपल्याला जेवावयाला बोलावून ब्राह्मणाने आपणास मुलीसाठी मागणी घातली

हे त्याला योग्य वाटले नाही. त्यामुळे त्याने "आपण ब्रह्मचर्याचे व्रत घेतले आहे ते आपणास मोडता येणार नाही." असे नम्र शब्दात त्या मुलीच्या वडिलांना सांगितले.

त्या ब्रह्मचाऱ्याने असे उत्तर दिले; तरी निराश न होता त्या ब्राह्मणाने त्याला असे विचारले की, "या नंतर आपण कोठपर्यंन्त प्रवास करणार आहात ?" हा प्रश्न ऐकताच तो असे म्हणाला की, "येथून पुढे ब्रह्मावर्ताला जाण्याचा माझा मानस आहे. तेथे काही दिवस राहून पुढे काशी, प्रयाग, हरिद्वार अशी यात्रा करावी ही इच्छा धरून मी घरा बाहेर पडलो आहे." हे ऐकताच तो ब्राह्मण त्यास असे म्हणाला की, "आनंदाची गोष्ट आहे. मलाही लवकरच ब्रह्मावर्ताला जावयाचे आहे. सध्या तेथे एक सत्पुरुष वास करून आहेत. मी अधून मधून त्यांच्या दर्शनाला जात असतो. आपली हरकत नसल्यास आपण बरोबरच प्रवास करू या. आपणही त्या सत्पुरुषांचे दर्शन घ्यावे अशी माझी इच्छा आहे."

ब्रह्मचारी या गोष्टीला कबूल झाला आणि ते दोघेही ब्रह्मावर्ताला श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला गेले. त्यावेळी ब्राह्मणाने त्यांना एकंदर सर्व हकीगत सांगून या विवाहासाठी आपण मध्यस्थी करावी व ब्रह्मचारी तरुणाची लग्नाला संमती मिळवावी अशी प्रार्थना केली. श्रीस्वामहाराजांनीही या लग्नासाठी मध्यस्थी करण्याची त्या ब्राह्मणाची प्रार्थना मान्य केली. त्यावेळी ते त्या ब्रह्मचारी तरुणास असे म्हणाले की, "तरुण माणसा ! हा सच्छील ब्राह्मण आहे. याच्या कन्येने मनानेच तुला वरलेले आहे. विधिलिखित असेच आहे की, तुमचा दोघांचा विवाह होऊन तुम्ही सुखाने संसार करावा. तुमचे घटित गोत्र सर्वकाही जमलेले आहे. तुला प्रपंचात अनुरूप अशी ही वधू आहे. या स्त्रीला जर तू अव्हेरलेस तर तुला स्त्रीहत्येचे पातक लागेल." श्रीस्वामीमहाराज हे सर्व बोलण्यापूर्वी त्यांच्या नजरेला

नजर लागताक्षणीच ते सांगतील ती गोष्ट करण्यास ब्रह्मचारी तयार झाला होता. श्रीस्वामीमहाराजांच्या शब्दांचा प्रतिकार करण्याची शक्ती आता त्याच्यामध्ये होतीच कोठे ? त्यामुळे त्यांनी आपली घातलेली समजूत हीच आज्ञा समजून व आपला हा प्रारब्ध-भोग आहे असे मानून त्या ब्रह्मचाऱ्याने लग्नास शेवटी संमती दिली. पुढे उत्तम मुहूर्त पाहून त्या दोघांचा विवाह झाल्यावर ती मुलगी आपल्या पतीबरोबर तीर्थयात्रेस निघून गेली.

श्रीस्वामीमहाराज ब्रह्मावर्त येथे असताना प्रयाग येथे एक धर्म-परिषद भरणार होती. धर्मशास्त्र परिषद भरविण्याची प्रथा भारता-मध्ये पुराणकाळापासून चालू आहे. काशी, प्रयाग वगैरे ठिकाणी वरचेवर धर्मपरिषदा भरत असत. अशा परिषदा भरविण्यात हिन्दु-स्थानातील राजे लोकांचा पुष्कळदा पुढाकार असे. कित्येक गुणग्राही संस्थानिक विद्वान् पंडितांना, कवींना, चित्रकार वगैरे कलावंतांना आपल्या दरबारी सन्मानाने आश्रय देत असत. धर्मपरिषदांचा पुष्कळसा खर्च हे संस्थानिक करीत असत. या परिषदेसाठी देशातून ठिकठिकाणचे शास्त्री पंडित प्रयागला चालले होते. इंदूर संस्थानच्या महाराजांतर्फे प्रतिनिधी म्हणून पंडित श्री. सखारामशास्त्री टिल्लू हे या परिषदेला जाण्यास निघाले होते. श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी ते ब्रह्मावर्त येथे आले होते. श्रीस्वामीमहाराजांची विद्वत्ता एव्हाना सर्वश्रुत झाली होती. त्यांचे दर्शन घेऊन श्री. टिल्लू-शास्त्र्यांनी परिषदेची हकीकत त्यांच्या कानावर घातली व इंदूर सरकारचे प्रतिनिधी म्हणून आपण या परिषदेला जात असल्याचे सांगितले. श्रीस्वामीमहाराजांना प्रथमपासूनच वाद-विवादाची आवड नव्हती आणि चतुर्थाश्रम स्वीकारल्यापासून तर वाद-विवादाचा प्रश्नच उद्भवत नव्हता. याहीपेक्षा महत्त्वाची गोष्ट अशी होती की, अशा प्रकारच्या धर्मपरिषदा इत्यादि "वादे वादे

जयते तत्त्वबोधः।" अशा न ठरता त्या "वादे वादे जयते कण्ठशोषः।" अशा होत असल्यामुळे त्यांचा त्यांवर काडीमात्र विश्वास नव्हता. त्यामुळे ते त्यांना असे म्हणाले की, "शास्त्रीबुवा ! भगवंताच्या निश्वासातून सर्व ज्ञानाचा सागर असलेले अपौरुषेय वेद निर्माण झाले आणि या ईश्वरानेच निखिल ब्रह्मांडांची व सृष्टीची रचना केली. सर्व जगताचा व्यवहार शास्त्रानुसार नीट चालविण्यासाठो व मनुष्यमात्राच्या इहपर कल्याणासाठी मोठमोठ्या मंत्रदृष्टया ऋषी-मुनींनी अनेक स्मृती-पुराणे करून त्यातून सर्व आचारधर्म, विधि-निषेधादि नियम सांगितलेले आहेत. ऋतंभरा प्रज्ञेच्या द्वारा द्रष्टेपणे कथन केलेल्या या सनातन धर्मात केव्हाही व कोणत्याही प्रकारे बदल करता येणार नाही. आजपर्यन्त होऊन गेलेल्या शंकराचार्यांसारख्या महात्म्यांनीही त्यात बदल केला नाही. उलट समाजामध्ये वर्णाश्रम-धर्माचे परिपालन उत्तम रीतीने कसे होईल याकडेच सर्व शंकरा-चार्यांनी जातीने लक्ष पुरविले. एवढेच नव्हे; तर ज्या ज्या वेळी आचारधर्म लुप्त होऊन धर्माला क्षीणता किंवा ग्लानी येते, त्या त्या वेळी श्रुतिस्मृतिपुराणातील नियमांच्या संरक्षणाकरिता व धर्माच्या पुनर्स्थापनेकरिताच भगवंत अवतार घेतो असे दृष्टीस पडते. अशा स्थितीत यात सुधारणा कोणीही करू शकणार नाही व तशा प्रकारचा प्रयत्न करणेही अगदी अयोग्य आहे. आपण निर्माण केलेल्या सृष्टीची काळजी त्या ईश्वराला नसून ती केवळ तुमच्यासारख्या पंडितांना मात्र आहे, असे म्हणता येणार नाही." अशा प्रकारे या विषयासंबंधी कितीतरी गोष्टी श्रीस्वामीमहाराजांनी श्री. टिल्लू-शास्त्री यांना सांगितल्या. श्री. शास्त्रीबुवांनीही या सर्व गोष्टी अत्यंत मुकाट्याने ऐकून घेतल्या. शेवटी ठरल्याप्रमाणे ते परिषदेला गेले. ती परिषद धर्मासंबंधीच्या निरनिराळ्या वादविवादांनी नुसती गाजली; परन्तु तेथे प्रत्यक्ष एकही निर्णय होऊ शकला नाही.

वास्तविक पाहता कोणत्याही निर्णयाप्रत न येता नुसता वाद-विवाद होऊन धर्मपरिषद संपेल असे भाकित श्रीस्वामीमहाराजांनी आधीच केले होते व ते तसेच झाले. श्रुतिस्मृतिपुराणातील वर्णाश्रमधर्माची पुनर्प्रतिष्ठापना करण्याकरताच श्रीस्वामीमहाराजांच्या रूपाने श्रीदत्तात्रेयांनी अवतार धारण केला असल्यामुळे सनातन-धर्माविरुद्ध केलेली कोणतीही गोष्ट त्यांना मान्य होणे शक्य नव्हते; कारण या दृष्टीने मनुस्मृतीत असे म्हटले आहे की,

एतद्धि जन्मसाफल्यं ब्राह्मणस्य विशेषतः।
प्राप्यैतत्कृतकृत्यो हि द्विजो भवति नान्यथा ॥ १२.९३ ॥
पितृदेवमनुष्याणां वेदश्चक्षुः सनातनम्।
अशक्यं चाप्रमेयं च वेदशास्त्रमिति स्थितिः ॥ ९४ ॥
या वेदबाह्याः स्मृतयो याश्च काश्च कुदृष्टयः।
सर्वास्ता निष्फलः प्रेत्य तमोनिष्ठा हि ताः स्मृताः ॥ ९५ ॥
उत्पद्यन्ते च्यवन्ते च यान्यतोऽन्यानि कानिचित्।
तान्यार्वाक्कालिकतया निष्फलान्यनृतानि च ॥ ९६ ॥
बिभर्ति सर्वभूतानि वेदशास्त्रं सनातनम्।
तस्मादेतत्परं मन्ये यज्जन्तोरस्य साधनम् ॥ ९९ ॥
तपो विद्या च विप्रस्य निःश्रेयसकरं परम्।
तपसा किल्बिषं हन्ति विद्ययाऽमृतमश्नुते ॥ १०४ ॥

याचा अर्थ असा आहे की, आत्मज्ञान, वेदाभ्यास इत्यादिकांच्या योगाने द्विजाच्या जन्माचे साफल्य होते व विशेषतः ब्राह्मणाचे तरी हेच जन्मसाफल्य होय; कारण याची प्राप्ती झाली असता द्विज कृत्यकृत्य होत असतो. पितर, देव व मनुष्य यांचा हव्य, कव्य व अन्नदान यांमध्ये वेद हाच एक अविनाशी नेत्र आहे; कारण वेदशास्त्र हे कोणालाही निर्माण करता येण्यासारखे नाही व मीमांसादि न्यायावाचून त्याचे प्रमेय समजत नाही, अशी स्थिती आहे. ज्या

वेदबाह्य स्मृती व असत्तर्कमूलक दृष्टी (अर्थात् चार्वाकादिकांची वेदविरुद्ध दर्शने) त्या सर्व परलोकी निष्फळ होत असतात; कारण त्यांचे नरक हे फल मिळत असते, असे मन्वादिकांनी सांगितले आहे. वेदावाचून इतर कोणत्यातरी पुरुषप्रणीत शास्त्राच्या आधारावर रचलेली जेवढी शास्त्रे आहेत ती सर्व पुरुषांनी आपल्या बुद्धीने रचलेली असल्यामुळे उत्पन्न होतात व काही कालाने नष्ट होतात. तशीच ती आधुनिक असल्यामुळे निष्फळ व असत्यरूप आहेत. सनातन वेदशास्त्र हेच सर्व भूतांचे धारण करते. यामुळे या वैदिक कर्माधिकारी पुरुषाचे वेदशास्त्र हेच उत्कृष्ट पुरुषार्थाचे साधन होय असे मी समजतो. आश्रमविहित कर्म म्हणजे तप व आत्मज्ञान हे ब्राह्मणाचे मोक्षसाधन आहे. विहितकर्मरूप तपाच्या योगाने तो आपल्या पापाचा नाश करतो व ब्रह्मज्ञानाने मुक्त होतो.

ब्रह्मावर्तास असताना एकदा श्रीस्वामीमहाराजांसमोर जारण-मारण वगैरे अघोरी विद्येबद्दल व मंत्रशास्त्राबद्दल विषय निघाला असताना त्यासंबंधी श्रीस्वामीमहाराज असे म्हणाले की, "या विद्या मंत्रशास्त्रात मोडतात. जारण-मारणाचा प्रयोग करून दुसऱ्यास त्रास देणे किंवा दुसऱ्याचा नाश करणे चांगले नाही. त्यामुळे या विद्येचा वापर करणाऱ्याचा अधःपात होतो." त्या वेळी तेथे जमलेल्या मंडळींनी त्यांना असे विचारले की, "ज्या शास्त्राबद्दल आम्ही अत्यंत आदर बाळगतो त्याच शास्त्रामध्ये या विद्या आहेत. अशा तऱ्हेच्या विद्येचा उल्लेख वेदात सापडतो. तंत्रशास्त्र तर अशा उपायांनी भरलेले आहे. नाथपंथामध्ये सुद्धा श्रीमत्स्येन्द्रनाथ श्रीगोरक्षनाथादि प्रभृतींनी या विद्या सांगितल्या आहेत. अशा अधिकारी व्यक्तींकडून आलेल्या या विद्या असल्यामुळे लोकांनी त्या घेतल्या व त्याचा वापर केला. जर हे उपाय लोकांपुढे नसते; तर या विद्यांकडे वळावयाला लोक कशाला प्रवृत्त झाले असते ?"

यावर श्रीस्वामीमहाराज असे म्हणाले की, "तुम्ही म्हणता ते बरोबर आहे. या विद्यांचा उल्लेख वेदांपासून तंत्रशास्त्रापर्यंन्त व नाथपंथापासून इतर अनेक पंथांपर्यंन्त सर्वत्र आला आहे. सूर्योदय झाल्यावर सर्व वाटा आपणाला दिसतात; पण आपण कोणत्या वाटेने जावयाचे ते आपण ठरविले पाहिजे. व्यापारी आपल्या दुकानात सर्व प्रकारच्या चांगल्या वस्तू ठेवतो. ज्याप्रमाणे तो साखर ठेवतो त्याप्रमाणे विषारी पदार्थही ठेवतो. मात्र घेणाऱ्याने अमुकच वस्तू किंवा पदार्थ घेतला पाहिजे असा आग्रह तो व्यापारी मुळीच धरीत नाही. घेणाऱ्याने आपण कोणता माल घेणे श्रेयस्कर होईल ते ठरविले पाहिजे व आपणास पाहिजे तीच वस्तू आपण खरेदी केली पाहिजे. या उदाहरणांप्रमाणेच वरील शास्त्रांमध्ये जरी अनेक साधना सांगितलेल्या असल्या; तरी आपणास रुचतील आणि पटतील त्याच साधना आपण करावयाच्या असतात. ज्या साधनांपासून अधोगती होते, अशा साधना करू नयेत. पण हे ठाऊक असूनसुद्धा काही लोक अघोरी साधनांचे प्रयोग करतात; कारण त्यांच्या पूर्वजन्मीचे वाईट संस्कारच त्यांना हे प्रयोग करावयाला प्रवृत्त करतात. त्यामुळे पुन्हा पाप घडून त्यांना कायमचीच नरकाची गती प्राप्त होते. सर्व साधनांमध्ये संयम हा महत्त्वाचा भाग असतो. ज्याच्यापाशी संयम आहे व ज्याचा आपल्या मनावर ताबा आहे असे साधक चांगली साधने करून आपले हित व कल्याण करून घेतात. अशांचे दुसऱ्यांचे अहित करण्याकडे लक्षच जात नाही."

सत्पुरुषांच्या दर्शनाला आपण मानवच हपापलेले असतो असे नसून देवसुद्धा त्यांच्या दर्शनाची इच्छा करतात. तीर्थक्षेत्रेसुद्धा तशीच इच्छा बाळगतात. एकदा श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाची इच्छा श्रीनर्मदामातेलासुद्धा झाली. श्रीस्वामीमहाराजांनी आपल्या तीरावर राहावे व आपल्या जलात स्नान करून आपल्याला

निर्मल व अधिक पवित्र करावे अशी इच्छा तिच्या मनात निर्माण झाली. ब्रह्मावर्तामधील पहिल्या चातुर्मासापासून श्रीस्वामीमहाराज श्रीगंगा किनाऱ्यावरच वास करीत होते. त्यामुळे श्रीनर्मदामातेला असे वाटले असेल की, त्यांना श्रीगंगा तर अधिक प्रिय नाही ना ? ते आपल्या किनाऱ्यावर कधी येणारच नाहीत का ? म्हणून तिनें श्रीस्वामीमहाराजांना स्वप्नदृष्टान्त देऊन असे सांगितले की, "आपण माझ्याही तीरावर वास करून मला धन्य करावे"; पण श्रीस्वामीमहाराजांनी त्या स्वप्नदृष्टान्ताकडे लक्षच दिले नाही. यथाक्रम श्रीनर्मदा तीरावर जाता येईल, आताच काय घाई आहे, असा विचार त्यांच्या मनात आला असेल. परन्तु आपल्या तीरावर लवकरात लवकर येऊन श्रीस्वामीमहाराजांनी वास करावा ही जी श्रीनर्मदामातेची इच्छा होती ती पुढीलप्रमाणे पूर्ण झाली.

ब्रह्मावर्तामध्ये एक माणूस त्वचारोगाने फार गांजला होता. पुष्कळ औषधोपचार, मंत्र, तंत्र वगैरे करूनही त्याची व्याधी जाईना. त्यामुळे कोणीतरी त्याला असा सल्ला दिला की, "तू श्रीस्वामी-महाराजांच्या दर्शनाला जा व त्यांच्या चरणांचे तीर्थ घे, म्हणजे तुझा रोग बरा होईल." त्याप्रमाणे तो श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला गेला. पण निव्वळ दर्शन घेऊन भागणार नव्हते; तर श्रीस्वामीमहाराजांचे चरणतीर्थ मिळवून ते प्राशन केले तरच त्याचा तो रोग जाणार होता. चरणतीर्थ मिळविण्याच्या आशेने तो माणूस श्रीस्वामीमहाराजांजवळ आला खरा; पण त्यांच्या चरणांचे तीर्थ मिळणे ही सहजसाध्य गोष्ट नाही, हे त्याला कळून चुकले. श्रीस्वामी-महाराज कोणाकडूनही स्पर्श करून घेत नसत; मग चरणतीर्थ देणे बाजूलाच राहिले. पण गरजवंताला मार्ग सापडतो. श्रीस्वामीमहा-राज मांडी मोडून लिहावयाला बसतात, हे त्या गृहस्थाने पाहिले होते. एक दिवस उजव्या पायाची मांडी मोडून श्रीस्वामीमहाराज

लिहावयाला बसले असताना, अनायासेच पाठीमागे वळलेल्या त्यांच्या उजव्या पायावर गंगाजल घालून व एकदम त्यांना शिवून ते तीर्थंजल ओंजळीमध्ये घेऊन त्या व्याधिग्रस्ताने ते प्राशन केले व सर्वांगाला लावले. काय घडते आहे हे श्रीस्वामीमहाराजांच्या ध्यानात येण्यापूर्वीच तो व्याधिग्रस्त ते चरणतीर्थं प्राशन करून त्यांच्या समोर हात जोडून नम्रपणे उभा राहिला. त्याला समोर उभे राहिलेले पाहताच श्रीस्वामीमहाराजांनी त्याला असे विचारले की, "तू हे असे का केलेस?" पण तो काहीच उत्तर देईना. तेव्हा थोड्या कडक शब्दात त्यांनी असे करण्याचे कारण काय असे विचारताच तो साष्टांग नमस्कार घालून, अत्यंत काकुळतीने त्यांना असे म्हणाला की, "महाराज! मला क्षमा करा. मी एक दीन, पीडित मनुष्य आहे. या चर्मरोगाने मला फार गांजले आहे. सर्व उपाय झाले. शेवटी माझ्या असंह्य व्याधीचा परिहार आपल्या चरणतीर्थाने होईल, असा एकाने मला सल्ला दिला म्हणून मी हे धाडस केले. मी स्वार्थी आहे, पापी आहे. आपण मला क्षमा केली नाही; तर मी दुसऱ्या कोणाकडे धाव घेऊ?"

त्या माणसाने असे सांगितल्यावर श्रीस्वामीमहाराज त्याला काहीच बोलले नाहीत. त्याने केलेल्या नमस्काराला "नारायण" असा आशीर्वाद देऊन ते श्रीगंगेवर स्नान करण्यासाठी निघून गेले; पण स्नान करून आल्यानंतरही त्यांच्या चित्तास समाधान वाटेना. झाली गोष्ट काही चांगली झाली नाही, असे लक्षात आल्यामुळे आपणास काहीतरी त्रास होणार असे त्यांना वाटू लागले. त्याच दिवशी रात्री स्वप्नामध्ये त्यांना एका चांडाळ स्त्रीने स्पर्श केला. श्रीस्वामीमहाराज झोपेतून उठले व त्यांनी देवाचे ध्यान करावयाला आरंभ केला. ज्यावेळी त्यांनी ध्यान विसर्जन करून उठून पाहिले

तेव्हा त्यांना आपल्या सर्वांगावर फोड उठलेले दिसले. त्यांचे चरण-तीर्थ घेणाऱ्या ब्राह्मणरोग्याचे अंग बरे झाले होते; पण त्याचा रोग मात्र श्रीस्वामीमहाराजांना येऊन चिकटला होता. हे पाहताच जो तो श्रीस्वामीमहाराजांना औषधोपचार सुचवू लागला. त्यावेळी सर्वांना ते असे म्हणाले की, " हा दुसऱ्याचा प्रारब्धभोग आहे. तो मला भोगूनच संपविला पाहिजे. याला औषधोपचारांचा उपयोग होणार नाही. " त्यानंतर त्यांनी " अयि भूषित " इत्यादि पाच संस्कृत श्लोकांनी श्रीगंगेची स्तुती केली. त्या दिवशी रात्री त्यांना असा दृष्टान्त झाला की, " अनधिकारी माणसाला चरणतीर्थ दिल्याचा हा परिणाम असून त्यामुळे हा त्रास भोगावा लागत आहे; पण हे कृत्य बुद्धिपूर्वक केलेले नसल्यामुळे नर्मदेचे तीन दिवस स्नान केल्यावर ही व्याधी जाईल व शरीर पूर्ववत् चांगले होईल. "

अशा प्रकारे स्वप्नदृष्टान्ताच्या द्वारा देवांनी श्रीनर्मदा किनारी जाण्याची आज्ञा केल्यामुळे श्रीस्वामीमहाराज श्रीगंगेची अनुज्ञा घेऊन श्रीनर्मदातीर गाठण्यासाठी ब्रह्मावर्ताहून निघून मार्गशीर्ष महिन्यात जालवण मुक्कामी आले. जालवणमधील मंडळी पूर्वी-पासूनच श्रीस्वामीमहाराजांना ओळखीत होती. त्यामुळे लोकांचा आग्रह मोडून त्यांना तावडतोब पुढें जाता येईना. येथे त्यांचा दीड महिना मुक्काम झाला. त्यांच्या पहिल्या मुक्कामात ज्या लोकांना श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शन व श्रवणसुखाचा आनंद घेता आला नव्हता ते सर्व लोक आता त्यांच्या भोवती गर्दी करू लागले. जालवणमध्ये श्रीस्वामीमहाराजांची ज्ञानगंगा पुन्हा एकदा पतितांचा उद्धार करीत वाहू लागली. या दीड महिन्यामध्ये त्यांनी पुष्कळ लोकांना आरण्यक ग्रंथ शिकविले. श्री. केशवराव डॉक्टरांना श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाचा पुन्हा एकदा लाभ व्हावयाचा होता. त्यामुळे श्रीस्वामीमहाराज जालवणहून सारंगपूरला आले. तेथून

महत्पूर व महत्पुरावरून हरणगावी त्यांचे आगमन झाले. या हरणगावी श्रीस्वामीमहाराजांना असा चमत्कार दिसून आला की, सर्व घरे आगीने जळूत भस्मसात झाली असून एक घर तेवढे चांगले शिल्लक राहिले आहे. या गावात असे का घडले, यासंबंधी श्रीस्वामी-महाराजांनी चौकशी केली, तेव्हा तेथील गावकरी मंडळीनी त्यांना असे सांगितले की, "एक दिवस एक साधुमहाराज आमच्या गावात भिक्षेसाठी आले होते. ते सर्व घरी फिरले व भिक्षान्नासाठी त्यांनी खूप याचना केली; पण कोणीही त्यांना भोजन दिले नाही किंवा भिक्षाही वाढली नाही. साधुमहाराज मूळचेच कोपिष्ट होते का जठराग्नी प्रज्ज्वलित झाल्यामुळे त्यांना राग आला होता ? कोण जाणे; पण गृहस्थाश्रमी माणसांना धडा घालून देण्यासाठी ते असे म्हणाले की, "मी तीन दिवसांचा उपाशी असताना या गावात एकाही घरातून मला भिक्षा मिळाली नाही व माझी कोणीही दखल घेतली नाही. हे लोक महापातकी आहेत. जळो हा गाव." असा शाप देऊन ते दुसऱ्या गावी जावयाला निघाले.

ते रस्त्याने जाऊ लागल्यावर वाटेत त्यांना एक गृहस्थ भेटला. त्याने साधुमहाराजांना साष्टांग नमस्कार घालून त्यांची चौकशी व विचारपूस केली. साधुमहाराजांनी घडलेली सर्व हकीगत या सात्त्विक माणसाला सांगितली. तेव्हा तो त्यांना असे म्हणाला की, "आपण थोडावेळ या वृक्षाखाली विश्रांती घ्या. मी दुसऱ्या गावी गेलो होतो. माझे घर जवळच आहे. मी आत्ताच घरी जाऊन आपल्या भोजनाची सोय करतो. कृपा करून येथेच थांबा." असे म्हणून तो गृहस्थ गावात शिरला. त्यावेळी सर्व गावच त्याला पेटलेले दिसले. प्रत्येक घर अग्नीच्या भक्ष्यस्थानी पडले होते व घरातील सर्व लोक बाहेर येऊन धाय मोकलून रडत होते. प्रत्येकाचेच घर पेटलेले, तेथे कोणाच्या घराची आग कोणी विझवावयाची ?

या गृहस्थाने पाहिले की, त्याचे घर मात्र अग्नीच्या भक्ष्यस्थानी पडले नव्हते. थोडयाच वेळात स्वयंपाक तयार करून त्याने ते अन्न साधुमहाराजांना नेऊन वाढले. तेही जेऊन तृप्त होऊन निघून गेले.

ही सर्व हकीकत गावातील मंडळींनी श्रीस्वामीमहाराजांना सांगताच ती ऐकून ते असे म्हणाले की, " दुपारी जेवणाच्या वेळी आपल्या घरी कोणीही अतिथी आला तर त्याला " अतिथि देवो भव " असे म्हणून सन्मानपूर्वक भोजनाला बसवावे. निदान त्याला अन्नदान केल्याशिवाय जाऊ देऊ नये. भोजनसमयी आलेल्या अतिथीला जातीपातीचा विचार न करता अन्नदान करावे. प्रत्येक गृहस्थाचे हे कर्तव्य असून अन्नदान हा गृहस्थाचा मुख्य धर्मच आहे." अशा प्रकारे श्रीस्वामीमहाराजांनी सर्व लोकांना गृहस्थधर्माचा उपदेश केला.

या प्रसंगानंतर तेथून निघून श्रीस्वामीमहाराज ब्रह्माणी गावात आले व तेथील श्रीनर्मदेच्या काठावरील ब्रह्माणी घाटावर त्यांनी मुक्काम केला.

एके दिवशी ब्रह्माणी घाटावरून चालताना श्रीस्वामीमहाराजांचा पाय घसरल्यामुळे त्यांच्या कंबरेमध्ये लचक भरली. त्यामुळे त्यांना चालता येईना व त्यांची हालचाल अगदी मंद झाली. शेवटी ते तेथील मंदिरामध्ये छाटी पांघरून निजून राहिले. भिक्षेची वेळ झाली तरी त्यांना उठता येईना. त्यामुळे ते तसेच पडून राहिले. एवढयात एक कुमारिका श्रीस्वामीमहाराजांच्या जवळ आली व त्यांना हाक मारून असे म्हणाली की, " महाराज ! उठा ! भिक्षेला जावयाची वेळ झाली आहे. अशावेळी पडून राहून कसे चालेल ? चला, मी तुमच्या कंबरेतील लचक बरी करते." असे म्हणून तिने थोडे भस्म मंत्र म्हणून अभिमंत्रित करून ते श्रीस्वामीमहाराजांच्या कंबरेला चोळले व " उभे राहून पाय खाली झटका ", असे तिने

यांना सांगितले. श्रीस्वामीमहाराजांनी तिने सांगितल्याप्रमाणे उभे राहून पाय झटकताच त्यांच्या कंबरेतील लचक गेली व त्यांना आराम वाटून उत्तम चालता येऊ लागले. त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांनी ती कुमारिका म्हणजे श्रीनर्मदामाताच आहे हे ओळखले. आपल्यावरील श्रीनर्मदेचे प्रेम पाहून त्यांचे हृदय भक्तिप्रेमाने भरून आले व त्यांनी तिची स्तुती केली. या मायलेकरामधील हे दिव्य संबंध अखेरपर्यन्त अतूट राहिले; कारण श्रीस्वामीमहाराजांनी शेवटची विश्रांती श्रीनर्मदामातेच्या अंकावरच घेतली

कंबर बरी झाल्यावर श्रीस्वामीमहाराज एक दैनंदिन कर्तव्य म्हणून भिक्षेसाठी बाहेर पडले; कारण आपल्यावरील श्रीनर्मदामातेच्या असीम कृपेचा अनुभव आल्यामुळे त्यांची तहानभूक हरपली होती. पण त्या दिवशी त्यांची भिक्षा व्हावयाची नव्हती. त्या गावामध्ये पुण्यातील एका ब्राह्मणाने आपल्या वर्णाला न शोभेल असे वर्तन केले होते. तो एक मोठा इतिहासच घडला होता. भिक्षेसाठी बाहेर पडल्यावर ही गोष्ट श्रीस्वामीमहाराजांच्या कानावर कशी आली कोण जाणे ? आपल्या धर्मापासून भ्रष्ट झालेले लोक ज्या गावात राहतात तेथील भिक्षा श्रीस्वामीमहाराज निषिद्ध मानीत असत. अशा निषिद्ध गोष्टी जणू कोणीतरी श्रीस्वामीमहाराजांना आगाऊ येऊन सांगत असे.

हा पुण्याचा ब्राह्मण आपल्या विवाहित कन्येला घेऊन या ब्रह्माणी गावात आला होता. हा माणूस फार द्रव्यलोभी होता. द्रव्याची हाव माणसाला कोणत्या खोल गर्तेत घेऊन जाईल ते सांगता येणार नाही. अपत्यावरील प्रेमापेक्षा याचे पैशावरच अधिक प्रेम होते. आपल्या मुलीचा अगोदर विवाह झालेला आहे ही गोष्ट या गावात कोणालाही कळू न देता द्रव्यलोभापायी एका श्रीमंत ब्राह्मणाशी त्याने मुलीचे पुन्हा लग्न लावून दिले. त्या मुलीचा त्यानें एक प्रकारे विक्रयच

केला. मुलगी बिचारी काय करणार ? मालकच जर कसाई झाला; तर गोठ्यात बांधलेल्या गायीने कोणाकडून मदतीची अपेक्षा करावयाची ? प्रथम पती जिवंत असताना तिचा हा दुसरा विवाह म्हणजे सरळ सरळ देहविक्रीच नाही का ? लग्नानंतर काही दिवसांनी तिचा दुसरा नवरा मरण पावला. पतिनिधनानंतर तिचे रीतसर केशवपन करण्यात आले. काही दिवसांनी तिच्या पहिल्या नवऱ्यास ही हकीकत कळली. तेव्हा तो तिला घेऊन जाण्याकरिता पुण्याहून त्या गावी आला. एक प्रकारे त्या लोभी पित्याचे दुर्दैव पहिल्या जावयाच्या रूपाने पुण्याहून ब्रह्माणी गावात आले होते. म्हातारा मोठ्या पेचात पडला. आता काय करावयाचे ? आपला सासरा मुलीचा दुसरा विवाह करण्याच्या विचारात आहे अशी कुणकुण जावयाला लागली म्हणूनच तो पुण्याहून येथे आला होता; पण आता फार उशीर झाला होता. जो विवाह टाळण्यासाठी तो येथे आला होता, तो विवाह तर होऊन गेलाच होता; पण त्याची पत्नी तो जिवंत असतानाच विधवा झाली होती. माणूस हट्टाला पेटला की, पुष्कळदा वाईट गोष्टी करतो. त्याच्या हातून धर्मबाह्य वर्तन घडते. या पुण्यातील जावयाने कोणत्याही परिस्थितीत आपल्या पत्नीला घरी घेऊन जाण्याचा निश्चय केला. त्याला गावातील श्री. गणूभैय्या नावाच्या माणसाचे साहाय्य झाले. श्री. गणूभैया गावातील एक नंबरचा आडदांड मनुष्य होता. त्याचे व त्या मुलीच्या दुसऱ्या नवऱ्याचे वैर असल्यामुळे त्याने पुण्याचा पहिला नवरा आलेला पाहून त्या मुलीस आपल्या ताब्यात घेतले आणि तिला पुन्हा केस ठेवावयास लावून काही दिवसानंतर तिच्या पहिल्या नवऱ्याच्या ताब्यात देऊन टाकले.

एवढी धर्मबाह्य गोष्ट आणि तीही एका दक्षिणी ब्राह्मणाकडून घडल्याचे कळताच श्रीस्वामीमहाराजांनी त्या गावी भिक्षा

घ्यावयाची नाही असे ठरविले व ते परत फिरले. ती भर दुपारची वेळ होती. यावेळी जाणार तरी कोठे ? दुपार टळल्यावर पुढल्या गावी जाऊ, आजचा दिवस उपासच घडणार, असा विचार करून ते नदी तटावर एका वटवृक्षाखालीं बसून राहिले. एवढ्यात तेथे एक कुमारिका आली व ती त्यांना असे म्हणाली की, " महाराज ! ही तर आपली दुपारची भिक्षेची वेळ आहे. अशा वेळी आपण या ब्रह्माणी गावात भिक्षा न घेता येथे झाडाखाली का बसून राहिला? " तिने असे विचारताच श्रीस्वामीमहाराज तिला असे म्हणाले की, " या गावचे लोक धर्मभ्रष्ट आहेत. अशा लोकांकडचे अन्न घेण्यापेक्षा आजचा दिवस नर्मदेचे पाणी पिऊन राहणे काय वाईट आहे ? " आजचा दिवस भिक्षेशिवायच घालवावा असे मी ठरविले आहे. " त्यावर ती मुलगी त्यांना असे म्हणाली की, " महाराज ! नेमावर नावाचे माझे गाव येथून जवळच आहे. तेथे तुम्ही आमच्या घरी भिक्षेस चला. "

त्या मुलीचे हे म्हणणे ऐकताच श्रीस्वामीमहाराज तिला असे म्हणाले की, " आपणास एकाच घरची भिक्षा चालत नाही. कमीतकमी तीन घरची आणि तीही दक्षिणी ब्राह्मणांच्याच घरची भिक्षा आपण घेत असतो. तुझ्या एकटीच्याच घरी येऊन मी भिक्षा कशी घेऊ ? "

श्रीस्वामीमहाराजांची ही अडचण ऐकताच ती मुलगी त्यांना असे म्हणाली की, " त्याची चिंता नको महाराज ! या गावात दक्षिणी ब्राह्मणांची सतरा घरे आहेत. आपण माझ्या मागून या." असे म्हणून ती मुलगी पुढे झाली. श्रीस्वामीमहाराज तिच्या मागून चालू लागले नेमावर गावात येताच मध्येच ती मुलगी कोठे दिसेनाशी झाली ते समजले नाही. श्रीस्वामीमहाराज तसेच पुढे गावात गेले व त्यांनी गावात जाऊन चौकशी केली. त्यावेळी त्या

मुलीने सांगितल्याप्रमाणे गावात दक्षिणी ब्राह्मणांची सतराच घरे असल्याचे समजले; पण ज्या मुलीने त्यांना नेमावर येथे आणले होते, ती मुलगी गावामध्ये कोणाच्याच परिचयाची नसल्याचे कळले. ती साक्षात् श्रीनर्मदाच कुमारिकेच्या रूपाने आपल्या लाडक्या भक्ताच्या मदतीला आली होती.

अशा रीतीने श्रीस्वामीमहाराज नेमावर क्षेत्री आले. नेमावर हे श्रीनर्मदेचे नाभिस्थान आहे. येथे एक पुरातन असे सिद्धेश्वराचे मंदिर आहे. प्राचीन भारतीय शिल्पकलेचा एक सुंदर नमुना म्हणून या शिवमंदिराकडे बोट दाखवता येईल. श्रीस्वामीमहाराज या सिद्धेश्वराचे दर्शन घेण्यास जेवढे उत्सुक होते तेवढेच ते श्रीनर्मदामातेला भेटावयाला उत्सुक होते. श्रीनर्मदामातेचे आणि श्रीस्वामीमहाराजांचे अतूट संबंध निर्माण व्हावयाचे होते. त्यांनी आपल्या उत्तर आयुष्यात श्रीनर्मदेच्या पवित्र जलामध्ये कितीही वेळा स्नान केले; तरी त्यांची तृप्ती होत नसे. एवढ्यासाठीच कदाचित् त्यांनी श्रीनर्मदेच्या कुशीत अखेरची चिरविश्रांती घेतली नसेल ना ? काही असो, त्यांचे श्रीनर्मदामातेवर फार प्रेम होते. श्रीनर्मदेच्या काठी वास करणाऱ्या माणसांमध्ये तीव्र वैराग्याचा उदय होतो अशी श्रीस्वामीमहाराजांची श्रद्धा होती.

श्रीस्वामीमहाराज नेमावर येथे आल्यावर ज्यावेळीं प्रथम ते स्नानासाठी नदीवर गेले तेव्हा श्रीनर्मदेच्या प्रवाहात उभे असताना त्यांना एकदम ब्रह्मावर्ताला घडलेल्या प्रसंगाची व देवांनी श्रीनर्मदाकाठी जाण्यासाठी केलेल्या आज्ञेची आठवण झाली. त्यावेळी ओंजळीमध्ये श्रीनर्मदेचे पवित्र जल घेऊन गद्गद् स्वरात श्रीनर्मदेची प्रार्थना करताना ते असे म्हणाले की, " न कळत घडलेल्या माझ्या एका लहानशा अपराधाबद्दल माते ! तू केवढी कठोर शिक्षा दिलीस मला ! तुझे महत्त्व वाढविणारा माझ्याशिवाय तुला दुसरा कोणीच

मिळाला नाही काय ?" असे म्हणून त्यांनी श्रीनर्मदेची प्रार्थना केली व तिच्या कृपाशीर्वादासाठी ते तेथेच राहिले. अशा प्रकारे तीन दिवस श्रीनर्मदामातेचे स्नान करताच श्रीगंगातीरावर उत्पन्न झालेला तो विस्फोटक रोग बरा होऊन श्रीस्वामीमहाराजांचे शरीर पूर्ववत् उत्तम झाले.

या प्रसंगी त्यांनी श्रीनर्मदेच्या स्तुतीपर–

"नर्मदे हरसंभूते हर्लिंगार्चनादृते ।
हर्लिंगांचिततटे जयाघं नर्मदे हर ॥"

इत्यादि २९ श्लोकांचे एक स्तोत्र रचले. तेच पुढे श्रीनर्मदालहरी म्हणून प्रसिद्ध झाले. श्रीजगन्नाथ पंडितांचे श्रीगंगालहरीस्तोत्र जसे सर्वांच्या मुखी झाले तसेच श्रीस्वामीमहाराजांनी रचलेले हे श्रीनर्मदालहरीस्तोत्र लोकांमध्ये मान्यता पावले. श्रीस्वामीमहाराजांना श्रीनर्मदेचे जे दर्शन घडले त्याचेच वर्णन त्यांनी या स्तोत्रात केले आहे. ही स्थूलाची स्तुती नाही. स्थूलाच्या पलीकडे त्यांना जे श्रीनर्मदेचे सूक्ष्म रूप दिसले त्या सूक्ष्माचीच ही स्तुती आहे.

श्रीस्वामीमहाराजांनी नेमावर येथे लोकाग्रहावरून काही दिवस मुक्काम केला. याही ठिकाणी त्यांच्याकडून धर्मशास्त्राचे शिक्षण घेण्यासाठी, त्यांचे पुराण ऐकण्यासाठी आणि त्यांचा कृपाप्रसाद लाभावा म्हणून त्यांच्याभोवती दररोज लोकांची गर्दी होत असे; परन्तु श्रीस्वामीमहाराजांनी येथील ब्राह्मण मंडळींना आचारधर्माचे शिक्षण देऊन लवकरच पुढे प्रयाण केले. नेमावरहून ते उज्जयिनीला जाण्यासाठी निघाले. उज्जयिनी येथे दंडग्रहण केल्यानंतर श्रीस्वामीमहाराज उत्तरखंडाची यात्रा करून आता पुन्हा जवळजवळ सहा वर्षांनंतर उज्जयिनीला आले. उज्जयिनीकर मंडळी त्यांना ओळखत होतीच. श्रीस्वामीमहाराज आल्याचे कळताच पूर्वीप्रमाणेच गर्दी

होऊ लागली व नित्याचे कार्यक्रम सुरू झाले. येथे श्री. गणपतीबुवा नावाच्या एका गणेशोपासक योग्याला योगामध्ये मार्गदर्शन करण्या. साठीच त्यांचे पुनरागमन झाले होते, असे म्हणावयाला हरकत नाही. मात्र येथे श्रीस्वामीमहाराजांचा फार दिवस मुक्काम झाला नाही

हे श्री. गणपतीबुवा गणेशभक्त व मोठे विद्वान् होते. श्रीसत्य-नारायणव्रताप्रमाणेच श्रीसत्यविनायकव्रत यांनीच प्रकाशित केले. या श्री. गणपतीबुवांना हठयोगातील काही क्रिया येत होत्या व त्यासंबंधीची थोडीफार माहिती त्यांना होती. परन्तु योगामध्ये आपण विशेष जाणकार आहोत असा त्यांना अभिमान वाटत होता. त्यांना श्रीस्वामीमहाराजांचा अधिकार माहीत नसल्यामुळे व आपले योगातील प्रावीण्य श्रीस्वामीमहाराजांना दाखविण्यासाठी एक दिवस श्री. गणपतीबुवांनी त्यांना आपल्या घरी येण्याचे आमंत्रण दिले. ते घरी आल्यावर श्री. गणपतीबुवांनी त्यांना आपल्या योगा-भ्यासाच्या खोलीमध्ये नेऊन योगातील काही क्रिया करून दाखविल्या व योग विषयावर ते बराच वेळ बोलत राहिले. श्रीस्वामीमहाराजांनी त्यांनी करून दाखविलेल्या सर्व क्रिया पाहिल्या व त्यांचे योगावरील "प्रवचनही" मुकाट्याने ऐकून घेतले. परंतु श्री. गणपतीबुवांचे योगाचे ज्ञान कच्चे होते. मात्र ज्या अर्थी श्रीस्वामीमहाराज आपले प्रवचन निमूटपणे ऐकत आहेत त्या अर्थी आपल्या ज्ञानाने तें दिपून गेले आहेत असे श्री. बुवांना वाटले.

श्री. गणपतीबुवांचे सर्व बोलणे झाल्यावर श्रीस्वामीमहाजांनी धौती करावयाचा एक कपडा श्री बुवांकडून मागून घेऊन तो गिळला व पुन्हा बाहेर काढून दाखविला तो कपडा रक्ताने भिजलेला होता. असे होण्याचे कारण काय म्हणून श्रीस्वामीमहाराजांनी श्री. बुवांना विचारले. श्री. बुवा हा प्रकार पाहून घाबरून गेले. योगविषयावर आतापर्यंन्त चाललेली त्यांची "अमोघवाणी" बंद झाली. श्री. बुवा

निरुत्तर झाल्यावर श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "तुमची योगसाधना अर्ध्याकच्च्या ज्ञानावर आधारित आहे. ती तुमचे कधीतरी नुकसान करील." असे म्हणून श्रीस्वामीमहाराजांनी धौती केल्यावर रक्त का आले याचे स्पष्टीकरण केले. ही सर्व चिकित्सा ऐकताच श्री. बुवांचा अभिमान पार गळून पडला. योग्य गुरूच्या मार्गदर्शनाशिवाय योगसाधना करू नये असे सांगून श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना योगामध्ये मार्गदर्शन केले, षट्क्रिया करावयाला शिकविल्या आणि योगविषयक पुष्कळ माहिती सांगितली.

उज्जयिनीहून फिरता फिरता श्रीस्वामीमहाराज पुन्हा श्रीनर्मदा-तटाकी आले. श्रीनर्मदेशी आणि श्रीकृष्णानदीशी त्यांचे एक वेगळेच नाते निर्माण व्हावयाचे होते. त्यामुळे ते वारंवार या पवित्र नद्यांच्या तीरावरून संचार करीत असत. श्रीस्वामीमहाराज ॐकारेश्वराला येऊन पोहोचले. ॐकारेश्वर हे भगवान् श्रीशंकराच्या बारा ज्योतिर्लिंगांपैकी एक आहे. श्रीनर्मदेकाठच्या या लिंगाला अमलेश्वराचे ज्योतिर्लिंग असे म्हणतात. येथे धावरी कुंड आहे. धावरी कुंडाला श्रीनर्मदेचे योनिस्थान मानतात. येथील सृष्टिशोभा अपूर्व आहे. श्रीस्वामीमहाराज येथील सौंदर्याने प्रसन्न झाले. या धावरी कुंडात बाणलिंगे सापडतात. एखादे बाणलिंग आपणास मिळावे म्हणून येथे येणारा प्रत्येक यात्रेकरू धावरी कुंडात वारंवार उड्या मारीत असतो. काही यात्रेकरू धावरी कुंडात बुड्या मारणाऱ्या लोकांना पैसे देऊन कुंडातून बाणलिंग काढावयाला सांगतात. येथे मिळालेले बाणलिंग आपल्या घरी पूजेमध्ये असावे असे लोकांना वाटते. फार थोड्या भाग्यवंतांना या लिंगाची येथे प्राप्ती होते.

एके दिवशी श्रीस्वामीमहाराजांनी स्नान करण्यासाठी धावरी कुंडात बुडी मारली. पाण्यातून वर येताना त्यांनी इतरांना अलभ्य

असे ओंजळभर बाण वर आणले. त्या बाणांच्या विविध रंगछटा पाहून श्रीस्वामीमहाराजांना आनंद झाला. त्या बाणांकडे श्रीस्वामी-महाराज कौतुकाने पाहत असताना भिल्ल वेषाने शंकर तेथे आले व ते श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाले की, " संन्यासी महाराज ! आपण भाग्यवान् दिसता. इतरांना क्वचित्च सापडणारे बाण तर आपण ओंजळभरून आणले आहेत. या सर्व बाणांची आपणच पूजा करणार आहात ना ? "

हा प्रश्न ऐकताच श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, " नाही. संन्याशाला बेल, तुळशी, फुले तोडता येत नाहीत. मग या बाणांची कोणत्या साहित्याने पूजा करणार ? हे बाण चांगले आहेत असे पाहून सहज कुतूहल म्हणून हे वर आणले. श्रीस्वामी-महाराजांचे हे उत्तर ऐकताच भिल्लरूपी शंकर त्यांना असे म्हणाले की, " तसे असेल तर आपण हे सर्व बाण पुन्हा कुंडात सोडून देणेच योग्य होईल. "

श्रीस्वामीमहाराजांनी त्या भिल्लाच्या सांगण्याप्रमाणे ते ओंजळ-भर बाण पुन्हा कुंडात सोडले; पण तेवढ्यात तो भिल्लही अदृश्य झाला. भगवान् श्रीशंकरच आपणास दर्शन देऊन गेले याची श्रीस्वामीमहाराजांना खात्री पटली. श्रीस्वामीमहाराज थोर भक्त होते, वेदान्ती होते, शास्त्रवेत्ते होते, त्यांच्या ठिकाणी प्रगाढ विद्वत्ता होती; पण परमेश्वराच्या मायेने त्यांना याही वेळी संमोहित केले. भगवान् श्रीशंकर त्यांच्या समोर उभे असताना श्रीस्वामीमहा-राजांनी त्यांना ओळखले नाही. ॐकारेश्वराला श्रीस्वामीमहा-राजांचा तेहतीस दिवस मुक्काम होता. येथे रोज जिज्ञासूंना वेद-वेदान्त सांगणे, शास्त्रे शिकविणे, अभ्यासू लोकांचे शास्त्रविषयक शंकासमाधान करणे, संसारी लोकांच्या प्रापंचिक अडचणीवर उपाय सांगून त्यांना ईश्वर भजनी लावणे व संध्याकाळी पुराण सांगणे

हे त्यांचे कार्यक्रम चालूच होते. येथील राजाचे कारभारी श्री. बळवंतराव यांना श्रीस्वामीमहाराजांनी स्वत: ब्रह्मकर्म व पंचमहायज्ञ शिकवून त्यांनी त्यांना खऱ्या ब्राह्मण धर्माची दीक्षा दिली.

श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य भगवान् श्रीवासुदेवानन्द-सरस्वती श्रीदत्तात्रेयस्वामीमहाराज यांचा अखंड जयजयकार असो. श्रीस्वामीमहाराजांचे परमभक्त व त्यांचे धाकटे बंधू परमपूजनीय श्रीसीताराममहाराज यांनी दयासागर श्रीस्वामीमहाराजांच्या चरणारविंदी आपले मस्तक ठेवून व नेत्रातून चाललेल्या प्रेमाश्रु-प्रवाहाने त्यांना स्नान घालून अष्टसात्त्विकभावसंपन्न अवस्थेत त्यांच्या चरणी अनन्य भावाने, ज्या अलौकिक व लोकोत्तर वर-दानाची मागणी केली आहे, ती मागणी आपण सर्वजण त्यांच्याच शब्दात श्रीस्वामीमहाराजांच्या परमकोमलचरणी प्रस्तुत करून, असे वरदान आम्हालाही देऊन कृतार्थ व धन्य करा, अशी प्रार्थना करू.

## अभंग

गुरुराया मज द्यावें वरदान । देहाचें हें भान नसो मज ।। १ ।।
कर्पुर अनळीं उदकीं सैंधव । तैसें मन तत्त्वीं लीन होवो ।। २ ।।
आत्माकार दृष्टी होऊनी रहावो । बाह्यवृत्ती जावी विरोनियां ।।३।।
समाधी तो द्यावा निर्विकल्प मज । जगापाशीं काज नाहीं आम्हां ।।४।।
तेव्हा माझा जीव होईल तो सुखी । काळचिया मुखीं घालूं निंब।।५।।
सदा घडो संग तुझ्या चरणांचा। निर्धार हा साचा सीतारामा ।।६।।



## - अध्याय सहावा -

भक्तिं च मे वर्धय भोस्त्वदीये । रूपे तथा नाशय हृत्तमश्च ।
दुर्वासनाश्च गुरुवर्य दयानिधे ते । यच्चेष्टमेव कुरु तन्मयि सार्वभिज्ञ ।।

चातुर्मास सातवा- शके १८१९-इ. स. १८९७- पेटलाद:-

ॐकारेश्वराला एक महिन्याहून थोडा अधिक काळ वास्तव्य करून श्रीस्वामीमहाराज मंडलेश्वर, महेश्वर वगैरे श्रीनर्मदेच्या तीरावरील विविध ठिकाणी संचार करीत इंदूर संस्थानात येऊन पोहोचले. इंदूर संस्थानात मही नदीच्या तीरावर पेटलाद म्हणून परगण्याचे एक मोठे गाव आहे. श्रीस्वामीमहाराजांनी यावेळी पेटलाद गावी मुक्काम केला. येथे ब्राह्मण वस्ती बरीच होती आणि दक्षिणी ब्राह्मणांची घरेही होती. त्यामुळे त्यांनी आपला शके १८१९ चा ७ वा चातुर्मास येथेच करावयाचे असे ठरविले. चातुर्मास सुरू होण्यापूर्वी आषाढ शुद्धात त्यांनी येथे "श्रीदत्तलीलामृताब्धिसार" हा एक हजार ओव्यांचा प्राकृत ग्रंथ रचला. या ग्रंथाची २८००० अक्षरे असून त्यात मंत्रही साधलेले आहेत. या ग्रंथाचे दहा अध्याय असून ग्रंथाच्या शेवटी "वासुदेवसरस्वती मुखें मालवदेशीं हा निजलीला सिंधु गुरुवदले. श्री क्षेत्रामध्यें गोविंद यतीश्वर प्रसादानें अवधूत रंगीं ज्याचें मन रमलें—अठराशे एकोणीस शकी दुष्काळ दव शांतये हा लीलामृतसिंधु शुचिमासी सित पक्षी होय—" असा उल्लेख केला आहे. चातुर्मासामध्ये येथे दररोज ज्ञानसत्र सुरू होते. त्यावेळी कित्येक जणांना श्रीस्वामीमहाराजांनी प्रापंचिक अडचणीतून मुक्त करून ईश्वरभजनी लावले व कित्येकांना स्वधर्मामध्ये प्रतिष्ठित केले. आता श्रीस्वामीमहाराज कोठेही गेले तरी त्यांच्या भोवती आर्त आणि जिज्ञासू लोकांची फार गर्दी व्हावयाची. त्यामुळे प्रसंगी श्रीस्वामी-महाराजांना विश्रांती मिळणेही कठीण होत असे; पण लोको-द्धाराच्या कार्यामध्ये त्यांनी कधीही खंड पाडला नाही.

पेटलादचा चातुर्मास संपवून श्रीस्वामीमहाराज चिखलद्याला गेले. चिखलदा हे गाव पूर्वीच्या होळकरांच्या राज्यात येत असून ते श्रीनर्मदेच्या उत्तर किनाऱ्यावर वसले आहे. पूर्वी महाल कचेरी चिखलद्यास होती. इ. स. १९०६ पासून ती निसरपूर गावी गेली.

पेटलादहून चिखलद्यास येत असताना श्रीस्वामीमहाराजांचा एका गावी मुक्काम झाला. तेथे ते भिक्षेला गेले असताना त्यांच्या असे निदर्शनाला आले की, एका ब्राह्मण कुटुंबातील एकुलता एक व कर्ता मुलगा पोटशूळाने नेहमी आजारी असून त्याला अन्न हे वैरी झाले होते. त्या घरात मुलगा आणि आई अशी दोनच माणसे होती. त्यांच्या घरची अत्यंत गरिबी होती. आईने मुलाची हकीकत श्रीस्वामीमहाराजांच्या कानी घालून त्याच्यावर काही तरी इलाज करण्याची विनंती केली. पोटशूळावर उपाय म्हणून श्रीस्वामीमहाराजांनी त्या मुलाला योगातील विपरीत करणी करावयाला शिकविली व दररोज एक घटका ही क्रिया करावयाला सांगितले. या योगक्रियेमुळे त्या मुलाचा पोटशूळ नष्ट होऊन जठराग्नी प्रदीप्त झाला. दररोज चतकोर भाकरी खावयाला कंटाळणारा मुलगा त्यानंतर एका खेपेस दोन दोन भाकरी खाऊ लागला. मुलाचा हा वाढलेला आहार, घरच्या गरिबीमुळे, आईला परवडणारा नव्हता. त्यामुळे तिने मुलाला योगाभ्यास बंद करावयाला सांगितले. मुलाने क्रमाक्रमाने विपरीत करणीचा अभ्यास कमी केल्यामुळे शेवटी त्याचा आहार सामान्य माणसाच्या आहाराएवढा झाला.

चिखलद्याला बरीच भक्त मंडळी श्रीस्वामीमहाराजांच्या भोवती जमा झाली होती. कोणी उपनिषदे ऐकावयाला, कोणी योग, ज्योतिष, वैद्यक शिकावयाला, तर कोणी श्रीस्वामीमहाराजांच्या मुखातून बाहेर पडणारा प्रत्येक शब्द शास्त्रवचन आहे, असे समजून तो श्रवण करण्यासाठी येत असत. अशा अनेक हेतूंनी जिज्ञासू साधक श्रीस्वामीमहाराजांभोवती जमा झाले होते. पुराण नित्य चालूच असे. येथे श्री. गंगाधरपंत वैद्य, त्यांचे बंधू श्री. बाळाभाऊ वैद्य, श्री. नानासाहेब वगैरे मंडळी श्रीस्वामीमहाराजांच्या नित्य सहवासात असत. या मंडळींना श्रीस्वामीमहाराजांनी योग शिकविला

व उपनिषद्‌भाष्याचे पाठ सांगितले. यांपैकी श्री. गंगाधरपंत वैद्य यांनी श्रीस्वामीमहाराजांच्या सहवासात त्यांना काय काय अनुभव आले, काय काय गोष्टी त्यांच्या निदर्शनाला आल्या व श्रीस्वामीमहाराजांच्या श्रीमुखातून काय काय गोष्टी त्यांनी ऐकल्या, त्या सर्व त्यांनी आठवणींच्या रूपाने लिहून ठेवल्या आहेत. प्रस्तुत चरित्र लेखनामध्ये या आठवणींचा पुष्कळच उपयोग झाला आहे.

श्री. व्यंकटराव नावाचे एक ब्राह्मण गृहस्थ पत्नीच्या मृत्यूनंतर विरक्त होऊन, रेल्वेतील नोकरी सोडून चिखल्द्यात कोटेश्वराच्या घाटावर, ईश्वरभजनात आपले उर्वरित आयुष्य घालवीत होते. यांना योगाची आवड होती. श्रीस्वामीमहाराजांचा योगातील अधिकार पाहून त्यांनी श्रीस्वामीमहाराजांना योग शिकविण्याची विनंती केली. श्रीस्वामीमहाराजांनी श्रीव्यंकटराव हे योग शिकण्यास अधिकारी व्यक्ती आहेत असे जाणून त्यांना योगातील षट्क्रिया व प्राणायाम शिकविला.

या वर्षीची दिवाळी श्रीस्वामीमहाराजांनी चिखलदा येथे घालविली. श्रीनर्मदेचा पवित्र किनारा, आर्त, मुमुक्षू भक्तांचा सतत मेळावा व विद्वान् मंडळींबरोबर शास्त्रचर्चा यांमुळे श्रीस्वामीमहाराजांचा वेळ येथे दिवसभर घाईगर्दीतच जात असे. दिवाळीमध्ये भगवान् श्रीदत्तात्रेयांनी देव आणि भक्त यांच्या नात्याचे एक सुंदर नाटय येथे घडवून आणले. ज्या भाग्यवंतांना हे नाटय प्रत्यक्ष पाहण्याची व त्यामध्ये सहभागी होण्याची संधी प्राप्त झाली ते धन्य होत! श्रीस्वामीमहाराजांकडे यावेळी प्रवासातील श्रीदत्तमूर्ती होती. श्री. गंगाधरपंत वैद्य यांच्या स्मरणिकेत या मूर्तीचा " अंगुष्ठप्रमाण, एकमुखी व द्विभुज अशी पंचधातूची मूर्ती " असा उल्लेख आहे. ज्या महाभाग्यवान् लोकांनी देवभक्तांची ती लीला प्रत्यक्ष डोळयांनी पाहिली व त्या लीलेत जे सहभागी झाले त्या लोकांपैकी श्री.

गंगाधरपंत वैद्य हे एक होते. काही चरित्रकारांनी ही मूर्ती माणगावला बनविलेली पितळेची मूर्ती होती असा उल्लेख केला आहे. मूर्ती कोणत्याही धातूची असो तिच्यामध्ये देवकळा होती; हीच गोष्ट अत्यंत महत्त्वाची आहे.

नरकचतुर्दशीच्या आदल्या दिवशी श्रीस्वामीमहाराजांना देवांनी स्वप्नात असा दृष्टान्त दिला की, "उद्या दिवाळी असल्यामुळे आपणास अभ्यंग स्नान घालावे." हे ऐकताच श्रीस्वामीमहाराज देवांना असे म्हणाले की, "आपण संन्यासी असल्यामुळे शास्त्राज्ञे-प्रमाणे आपणास अग्नीला शिवता येत नाही. त्यामुळे ऊन पाणी करून त्याने आपणास स्नान घालणे कसे शक्य होईल? शिवाय सुगंधी तेलही आपणाकडे नाही. अशा या सर्व परिस्थितीत अभ्यंग-स्नानाची सोय आपणाकडून होणार नाही. मात्र उद्या रोजच्या-प्रमाणे साध्या गार पाण्याने स्नान घालूनच दिवाळी साजरी करता येईल. यापेक्षा अधिक काही करता येईल असे वाटत नाही. आणि माणगावहून निघताना आपणच मला असे सांगितले होते की, "रोज थंड पाण्याने स्नान घालून भस्म लावले म्हणजे झाले. अधिक कोणत्याही उपचारांची आपणास आवश्यकता नाही." असे सर्व पूर्वीच ठरलेले असताना आपण आज ही मागणी कशी काय करीत आहात हेच कळत नाही? आपली कितीही इच्छा असली; तरी संन्यासधर्मामुळे मी आपली हौस भागवू शकत नाही आणि इच्छा पूर्ण करू शकत नाही. तरी त्याबद्दल आपण रागावू नये." इतके सर्व मोठ्या प्रेमाने श्रीस्वामीमहाराजांनी देवांना समजावून सांगितले. अशा प्रकारे देवांची समजूत घालण्याशिवाय त्यांच्याजवळ दुसरा कोणताही अन्य पर्याय नव्हता.

दुसऱ्या दिवशी नरकचतुर्दशीला श्रीस्वामीमहाराज श्रीनर्मदास्नान

करून आल्यावर रोजच्याप्रमाणे मूर्तीला थंड पाण्याने स्नान घालून त्यांनी भस्म लावूनच पूजा केली. आपल्या इच्छेप्रमाणे श्रीस्वामी-महाराजांनी आपणास मंगलस्नान घातले नाही हे पाहताच मूर्तीला अत्यंत राग आला व ती तेथून निघून श्रीनर्मदेच्या पाण्यात जाऊन बसली. परन्तु पूजेनंतर श्रीस्वामीमहाराज आपल्या नित्याच्या कार्यक्रमामध्ये निमग्न झाल्यामुळे त्यांना देव रुसून पाण्यात जाऊन बसल्याचे कळलेच नाही.

नित्याप्रमाणे दुपारी स्नान करून श्रीस्वामीमहाराजांनी भिक्षा मागून आणल्यावर हस्तपाद प्रक्षालन व आचमन करून जेव्हा ते देवांना नैवेद्य दाखविण्याकरिता मूर्तीजवळ गेले तेव्हा त्यांना नेहमीच्या जागेवर मूर्ती दिसली नाही. देव कोठे गेले असा मोठा प्रश्न त्यांच्यापुढे उभा राहिला. इतक्यात तोफेच्या स्फोटासारखा महाप्रचंड आवाज होऊन देव श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाले की, "आज दिवाळी असूनही व काल आपणाजवळ माझी इच्छा व्यक्त करूनही आपण मला मंगलस्नान घातल्यावाचून नैवेद्य दाखविता, हे मला बिलकूल पसंत नाही. मला नैवेद्य नको आणि काहीही नको. आपण मला नैवेद्य दाखवू नये."

एका साध्या मंगलस्नानाकरिता प्रभू आपणावर रागावले व ते नैवेद्य ग्रहण करण्यास तयार नाहीत हे पाहून श्रीस्वामीमहाराज अगदी दिङ्मूढ झाले व घाबरूनही गेले. हातातील नैवेद्य तेथेच सोडून पुन्हा ते श्रीनर्मदेच्या तीरावर आले. त्यावेळी त्यांना पाण्यातून लहान मुलाच्या रडण्याचा आवाज ऐकू आला. त्या आवाजाच्या अनुरोधाने श्रीस्वामीमहाराज पाण्यात शिरले. इतक्यात एका बाजूला पाण्यात लख्ख प्रकाश पसरला व त्यात त्यांना मूर्ती दिसली. त्याबरोबर त्या ठिकाणी एकदम पाण्यात बुडी मारून त्यांनी मोठ्या प्रेमाने देवाची मूर्ती हातात घेऊन ती हृदयाशी धरली व ते पाण्याच्या बाहेर आले.

इकडे नदीवर इतका सर्व प्रकार होत असतानाच श्रीस्वामीमहाराज भिक्षेच्या वेळी नदीवर कशाकरिता गेले हे नेहमीच्या लोकांना न समजल्यामुळे श्री. नानासाहेब वगैरे नित्याची सर्व मंडळी नदी किनाऱ्यावर जमा झाली होती. श्रीस्वामीमहाराज नदीतून मूर्ती घेऊन वर आल्याचे पाहून सर्व लोकांना मोठे आश्चर्य वाटले. मूर्ती पाण्यात कशी गेली व श्रीस्वामीमहाराज ती बाहेर कशी घेऊन आले याचा त्यांना काहीच उलगडा होईना. त्यामुळे मंडळींनी विचारणा करताच झालेल्या एकंदर सर्व प्रकाराचा त्यांना उलगडा करावा लागला.

श्रीस्वामीमहाराजांनी सर्व हकीकत सांगताच देव-भक्ताच्या प्रेमाच्या कलहाचे एक अपूर्व दर्शन सर्वांना होऊन आपण यामुळे कृतकृत्य व धन्य झालो आहोत असेच प्रत्येकाला वाटले. या हकीकतीमुळे श्रीदत्तप्रभूंची इच्छा सर्व मंडळींना समजली. ती पूर्ण व्हावी व आपली सेवा श्रीप्रभुचरणी रूजू व्हावी म्हणून ऊन पाणी, सुगंधी तेल, पंचामृत इत्यादि सर्व साहित्याची तयारी श्री. बाळाभाऊ वैद्य इत्यादींनी केली. ही सर्व तयारी होताच श्रीस्वामीमहाराजांनी अत्यंत प्रेमार्द्र चित्ताने श्रीदत्तप्रभूंची महापूजा केली.

वास्तविक पाहता अनंत कोटी ब्रह्मांड नायकाला वैभवात काही कमी असत नाही; पण सत्ययुगात घडलेली अशी एक घटना कलियुगात घडवून देवांनी आपले व भक्ताचे नाते त्यावेळी जसे होते तसेच ते आजही आहे हे लोकांना दाखवून दिले. शबरीच्या हातची उष्टी बोरे ज्या प्रभूंना मधुर लागली, मळकट वस्त्रात बांधलेले सुदाम्याचे मूठभर पोहे ज्यांनी आनंदाने खाल्ले, भक्तिरसात डुलत असलेल्या विदुराच्या पत्नीने दिलेल्या केळ्यांच्या सालीसुद्धा ज्यांना गोड लागल्या, त्यांना आजचा हा स्नानोत्तर भिक्षान्नाचा नैवेद्य तेवढाच गोड लागला. सत्य, त्रेता व द्वापार या युगांमध्ये जो मी होतो तोच

मी आजही कलियुगात तसाच आहे व भक्तीचा भुकेला आहे हे देवांनी दाखवून दिले. एवढे नव्हे; तर शबरी मला जेवढी प्रिय होती व सुदामा माझा जसा लडका होता त्याप्रमाणेच माझे हे भक्तोत्तम श्रीवासुदेवानंदसरस्वतीस्वामीमहाराज आहेत हे त्यांनी सर्वांना दाखवून दिले.

या सर्व प्रसंगावरून हेच दिसून येते की, "प्रेमळ भक्ताविण। देवा न पडे चैन। म्हणूनी लाज सोडून। राहे तदधीन भक्तापाशीं।।" हेच शेवटी खरे आहे. त्या दिवशी महापूजेनंतर आरती व मंत्रपुष्प झाल्यावर श्रीस्वामीमहाराजांचे अष्टसात्त्विक भाव जागृत झाले. देवांवर होणारे हे सर्व उपचार त्यांनी एका वेगळ्याच मनःस्थितीमध्ये केले होते. त्यावेळी त्यांच्या तोंडून पुढीलप्रमाणे उत्स्फूर्त काव्य रचना झाली.

मित्र मित्र जरी भांडती। तरी पुन्हा एक होती ।। १ ।।
दंपतीचा जो कलह। लवमात्र न तुटे स्नेह ।। २ ।।
देव भक्तांचे भांडणे। परा भक्तीचे ते होणे ।। ३ ।।
वासु म्हणे हा विनोद। देतो दत्ता परमानंद ।। ४ ।।

ज्या प्रभूंचे वर्णन "आनंदस्वरूप" असे शास्त्रकारांनी केले आहे त्या देवांना वरील लीला करून परमानंद झाला !

श्रीस्वामीमहाराजांनी त्या दिवशी लोकांना असे सांगितले की, "ब्रह्म निर्गुण निराकार आहे. निर्गुण निराकाराचा साक्षात्कार सगुणाच्या उपासनेवाचून कठिण आहे. जो निर्गुण निराकार आहे तोच भक्तांसाठी सगुण साकार झाला आहे. याकरिता सगुण परमेश्वराची उपासना करून मनुष्याने कृतार्थ व्हावे. सगुण उपासना केल्याशिवाय ब्रह्मसाक्षात्कार होणार नाही. ज्याप्रमाणे राजाला आपल्या शिक्कामोर्तबाचा आणि कायद्याचा अभिमान असतो तसाच देवाला आपल्या सगुणरूपाचा व वेदशास्त्रांचा अभिमान असतो.

अर्थात् शिक्कामोर्तब म्हणजे राजा नव्हे; पण शिक्कामोर्तबाशिवाय राजाचे व्यवहार होऊ शकत नाहीत आणि राजाशिवाय नुसत्या शिक्कामोर्तबालाही काही महत्त्व नाही. राजाचे कायदे प्रजाजनांनी पाळले म्हणजे ज्याप्रमाणे राजाला आनंद होतो, त्याचप्रमाणे आपण भगवन्ताचे कायदे, शास्त्रमर्यादा व नियम पाळल्याने परमात्मा संतुष्ट होतो. म्हणून शास्त्राज्ञेप्रमाणे ईश्वराची सेवा व भक्ती करून त्याला आपलेसे करून आत्मकल्याण करून घ्या.

" आत्मस्वरूप जाणणें। तरी शास्त्रप्रमाण घेणें।
शास्त्रांचें एक तत्त्व जाणणें। द्वैत न पाहणें सुविचारें ॥ "

याप्रमाणे सर्वांना उपदेश करून श्रीस्वामीमहाराजांनी आपला चिखलद्याचा मुक्काम संपवून ते पुढील प्रवासाला निघाले. यावेळी सोबत बरीच मंडळी होती. शके १८२० च्या वैशाख शुद्ध १० ला ते श्रीनर्मदातीरावरील तिलकवाडा या गावी येऊन पोहोचले. त्यावेळी ठिकठिकाणी प्लेगची साथ सुरू होती. त्यामुळे पुढे जाण्यास सरकारी प्रतिबंध होता. मात्र तिलकवाडा येथे बडोदा संस्थानचे कायदे चालत असत. त्यामुळे श्रीस्वामीमहाराजांनी काही दिवस तिलकवाडा येथेच मुक्काम करण्याचे ठरविले.

श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य भगवान् श्रीवासुदेवानन्द-सरस्वती श्रीदत्तात्रेयस्वामीमहाराज यांचा अखंड जयजयकार असो. " सद्गुरूचि सखा सोयरा जिवलग " या श्रीसंतनामदेवमहा-राजांच्या भूमिकेचा स्वीकार करून, त्यांचे धाकटे बंधू गुरुभक्त-शिरोमणी परमपूजनीय श्रीसीतारामहाराज यांनी ज्या उत्कंठित हृदयाने, तीव्र भक्तीने व अपूर्व प्रेमाने श्रीस्वामीमहाराजांच्या परमपवित्र व परमकोमलचरणी त्यांच्या भेटीची जी उत्कट व आर्त प्रार्थना केली आहे, ती त्यांच्याच शब्दात प्रस्तुत करून, कलीने गळल्या जाणाऱ्या व मायेत बुडणाऱ्या आम्हा सर्व जीवावर

कृपामृतप्रेमदृष्टीचा वर्षाव करून आत्मस्वरूपात अखंड रममाण करणारी अशी दिव्य सामरस्यावस्था आम्हा सर्वांना द्यावी म्हणून प्रेमानंदाने नाचत त्यांच्या चरणी अश्रुपातपूर्वक प्रार्थना करू.

## ॥ पद ॥

कधिं मजसी भेट देसी गुरुराया सांग बा ।
तुजविण या जगीं त्राता अन्य नसे कोणि बा ॥ ध्रु० ॥
तोयविना मत्स्य जैसा तडफडुनी राहतो ।
धेनुविना वत्स जैसा हंबरुनी पाहतो ।
चातक तो मेघमार्गा दिनरात्रीं लक्षितो ।
त्वद्विरहां न साहेचि दास तुला बाहतो ॥ १ ॥
भवडोहीं बुडुनि जातों घालिं उडी झडकरी ।
अजि सखया रुसुं नको तूं धरि आतां मज करीं ।
भक्तांचा सारथी तूं श्रुतिवाक्यां मनिं धरी ।
ब्रीद तुझें बा न सोडी या दीना उद्धरी ॥ २ ॥
मोहादी जळचरें हीं बहू मजला भक्षिती ।
तृष्णेच्या लहरी मोठ्या अज्ञजळीं बुडविती ।
शब्दादि विषय हेचि वायुरूपें पीडिती ।
नावाडी बनुनि ज्ञानोडुपिं मज तूं बैसवी ॥ ३ ॥
हो शास्ता षड्रिपूंसी दे मजला ज्ञान तें ।
तव चरणीं अर्पियेलें मन माझें सत्य तें ।
स्वरुपाचें लागलें मम चित्ताला ध्यान तें ।
प्रार्थि तुला सीताराम दर्शन दे लौकरी ॥ ४ ॥

# - अध्याय सातवा -

मा भीश्च भोस्तेऽस्त्वभयं सदैव। याचेऽहमेतद्वचनं गुरो ते।
अज्ञोऽहमीश करुणाघन वासुदेव। रक्षस्व मां सर्वत एव सर्वदा॥

**चातुर्मास आठवा – शके १८२० – इ. स. १८९८ – तिलकवाडा :–**

श्रीस्वामीमहाराजांचा मुक्काम तिलकवाडा येथे होता. त्यावेळी चालू असलेल्या प्लेगची साथ ओसरून पुढे कधी जाता येईल याची निश्चिती नव्हती. चातुर्मास दोन महिन्यावर आला होता. त्यामुळे तोपर्यन्त तिलकवाडा येथेच थांबावे असे श्रीस्वामीमहाराजांनी ठरविले व त्यांनी आपला मुक्काम श्रीमारुती मंदिरात केला. हे गाव त्यावेळच्या वडोदा संस्थानातील महाल कचेरीचे होते. त्यामुळे नोकरीसाठी आलेले सातआठ दक्षिणी ब्राह्मण, काही गुजराथी ब्राह्मण आणि इतर लोकांचीही येथे बरीच वस्ती होती. त्या दिवसांमध्ये मध्यप्रदेशातील काही गावात व गुजराथेतील काही प्रमुख शहरांमध्ये दक्षिणी ब्राह्मणांची मोजकीच वस्ती असे. श्रीस्वामीमहाराज फक्त दक्षिणी ब्राह्मणांच्या घरचीच भिक्षा घेत असल्यामुळे ज्या ठिकाणी त्यांचा मुक्काम व चातुर्मास वगैरे होत असे, तेथील बहुतेक सर्व दक्षिणी कुटुबांचा आणि त्यांचा विशेष परिचय होत असे. भेटीच्या वेळी ते प्रत्येक व्यक्तीची अगदी आस्थेनें चौकशी करीत असत.

या गावातील लोक भाविक होते. साधुसंतांचे दर्शन घेणे व त्यांची सेवा करणे हा आपला मुख्य धर्म आहे असे ते मानीत. श्रीस्वामीमहाराजांची कीर्ती येथील लोकांच्या कानी अगोदरच आली होती. त्यामुळे आसपासचे लोक श्रीस्वामीमहाराजांकडून ब्रह्मकर्म शिकण्यासाठी, त्यांच्या मुखातून धर्मग्रंथ श्रवण करण्यासाठी आणि विद्वान् मंडळी शास्त्रचर्चेसाठी श्रीस्वामीमहाराजांकडे

येत असत. संध्याकाळी पुराण होत असे. पुष्कळ लोक आपल्या प्रापंचिक अडचणी घेऊन येत. श्रीस्वामीमहाराज त्यांचेही समाधान करीत असत. कोणी रोगांवर औषध विचारण्यासाठी, कोणी पिशाच्चबाधा निवारण्यासाठी; तर कोणी आपणास संतती व्हावी या हेतूने येत असत. असे नाना प्रकारचे अनेक आर्त लोक श्रीस्वामीमहाराजांभोवती जमा होत असत. श्रीस्वामीमहाराज या सर्व लोकांना उपाय सांगत असत. ते लोकही श्रद्धा ठेवून उपाय करीत असत व सुखी होत असत. अशा रीतीने श्रीस्वामीमहाराजांचा येथील क्रम सुरू होता.

या दोन महिन्यांच्या काळात श्रीस्वामीमहाराजांनी अनेक लोकांना उपदेश करून आणि त्यांच्यावरील संकटे निवारण करून त्यांना भक्तिमार्गाकडे वळविले. देवांच्या आज्ञेने ते धर्मजागृतीच्या आणि लोकोद्धाराच्या कार्यासाठीच तर बाहेर पडले होते. श्री. मणिशंकर नावाचे एक गुजराथी ब्राह्मण दररोज श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला येत असत आणि संधी मिळेल त्यावेळी त्यांची सेवा करण्यासाठी ते धडपडत असत. त्यांची मुद्रा मात्र नेहमी उदास असे. एके दिवशी श्रीस्वामीमहाराजांनीच त्यांच्या उदासीनतेचे कारण विचारले. खरे म्हणजे ही गोष्ट श्रीस्वामीमहाराजांच्या कानावर घालण्यासाठी श्री. मणिशंकर अत्यंत उतावीळ झाले होते; पण तसे करण्यास त्यांना अद्याप धैर्य होत नव्हते. शेवटी भक्तवत्सल, भक्ताभिमानी श्रीस्वामीमहाराजांनीच अशा तऱ्हेने सुरुवात केली.

श्रीस्वामीमहाराजांचा प्रश्न ऐकताच ते त्यांना असे म्हणाले की, "महाराज ! काय सांगू ? लग्न होऊन बरीच वर्षे झाली. अद्याप आम्हाला संतान झाले नाही म्हणून आम्ही उभयता कष्टी आहोत. पुत्रमुख पाहिल्याशिवाय माणसाला सद्‌गती लाभत नाही म्हणतात. आमचे आयुष्य निपुत्रिक म्हणून जाणार काय ? कृपावन्त होऊन

पुत्रप्राप्तीसाठी काहीतरी उपाय सुचवावा अशी आपल्या चरणी नम्र प्रार्थना आहे. "

श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना त्यांची जन्मपत्रिका आणावयाला सांगितली. पत्रिका पाहून ते त्यांना असे म्हणाले की, " पूर्वजन्मी तुमच्या हातून सर्पहत्या घडली आहे. त्याच्या प्रतिबंधामुळेच तुम्हाला संतती होत नाही. तुम्ही नागपंचमीचे व्रत करून मग नारायणनागबळी करा म्हणजे तुम्हाला संतती होईल. "

श्री. मणिशंकरांचा आनंद गगनात मावेना. जी कामना मनात धरून ते इतके दिवस श्रीस्वामीमहाराजांची सेवा करीत होते, ती आज सफल झाली आहे असे त्यांना वाटले. त्यांना ठाऊक होते की, श्रीस्वामीमहाराजांच्या मुखातून श्रीदत्तमहाराजच बोलत असतात. त्यांचा शब्द कधीही वृथा जाणार नाही. त्यांनी तावडतोब श्रीस्वामीमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे नागापंचमीचे व्रत करून नारायणनागबळी केला. यथाकाळी या भाविक ब्राह्मण दांपत्याला पुत्ररत्नाचा लाभ झाला.

दोन महिने संपत आले तरी प्लेगची साथ संपली नव्हती. आषाढी पौर्णिमा जवळ येत होती. तेव्हा आपला आठवा चातुर्मास तिलकवाडा येथेच करावयाचे श्रीस्वामीमहाराजांनी ठरविले. नेहमीचे कार्यक्रम चालूच होते. या चातुर्मासात श्रीस्वामीमहाराजांनी श्रीरेवाखंडावर म्हणजे श्रीनर्मदाखंडावर पुराण केले. आंध्रलिपीमध्ये असलेला कूर्मपुराण हा ग्रंथही यावेळी त्यांनी देवनागरी लिपीमध्ये लिहून काढला.

तिलकवाड्यामध्ये गं. भा. वारुबाई करंजगावकर म्हणून एक विधवा बाई आपला मुलगा बाळकृष्ण याच्याबरोबर राहात असत. त्यांचा दुसरा मुलगा श्री. गोविंद आत्माराम करंजगावकर बडोद्याला

राहात असे. या श्री. गोविंदरावांना नोकरी किंवा अन्य काही उद्योग नव्हता. आपल्या या मुलाला चांगलीशी नोकरी मिळावी अशी त्याच्या आईची इच्छा होती तिलकवाडयातील गं. भा. वारुबाईंचे घर हे दक्षिणी ब्राह्मणांच्या घरांपैकी एक होते. गं. भा. वारुवाई स्वभावाने प्रेमळ व लाघवी होत्या. बाईंच्या आग्रहावरून श्रीस्वामी-महाराज मधून मधून त्यांच्या घरी भिक्षेसाठी जात असत. गं. भा. वारुबाई साधुसंतांची सेवा करण्यात तत्पर असत. आयुष्याच्या अखेरपर्यन्त त्या श्रीनर्मदा परिक्रमा करणाऱ्या साधुसंतांची आणि संन्याशांची सेवा करीत होत्या. श्रीनर्मदा परिक्रमा करणारा कोणीही माणूस तिलकवाडयास आल्यावर त्याला स्वयंपाकासाठी भांडी देणे, सरपण पुरविणे, आवश्यक असल्यास अन्नवस्त्र देणे व प्रसंगी त्यांना आपल्या घरी जेवावयाला घेऊन जाणे, अशी सेवा गं. भा. वारुबाई करीत असत.

गं. भा. वारुबाई आणि त्यांचा मुलगा बाळकृष्ण दररोज श्रीस्वामी-महाराजांच्या दर्शनाला जात असत. श्रीस्वामीमहाराज लोकांची दु:खे नाहीशी करण्यासाठी कशी मदत करतात हे या मायलेकरांच्या नेहमी नजरेला येत असे. एकदा गं. भा. वारुबाईंना वाटले आपला मुलगा गोविंदराव याच्याबद्दल श्रीस्वामीमहाराजांना सांगून पाहावे. संतकृपा झाल्यावर काय लाभणार नाही ! एक दिवस संधी साधून बाईंनी आपल्या मुलाचा विषय श्रीस्वामीमहाराजांपुढे काढला. सुरुवातीला श्रीस्वामीमहाराजांनी त्यांच्या बोलण्याकडे लक्ष दिले नाही व आपणास यासंबंधी काहीही समजत नाही असे त्यांनी त्यांना सांगितले. असे सांगण्यात कदाचित् बाईंची आर्तता केवढी आहे हे पाहण्याचा तर श्रीस्वामीमहाराजांचा विचार नव्हता ना ? कारण भविष्यकाळात श्री. गोविंदरावांचे आणि श्रीस्वामीमहाराजांचे अतूट संबंध निर्माण व्हावयाचे होते. श्री. गोविंदराव आपणापाशी येणार

हे त्यांना ठाऊक नसणार काय ? गं. भा. वारुबाई फारच गयावया करावयाला लागल्यावर श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "तुमच्या मुलाला इकडे घेऊन या. प्रत्यक्ष भेटीनंतर पाहू." गं. भा. वारुबाईंनी तातडीने श्री. गोविंदरावांना बडोद्याहून तिलकवाड्याला बोलावून घेतले. मुलाला घेऊन त्या सकाळीच श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला गेल्या. बाई आल्या त्यावेळी श्रीस्वामीमहाराज आन्हिकात गुंतलेले होते. बाईंनी श्रीस्वामीमहाराजांना दुरून नमस्कार केला. नंतर श्री. गोविंदरावांनीही नमस्कार केला. श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाने श्री. गोविंदरावांची अगदी विलक्षण मनःस्थिती झाली. श्रीस्वामीमहाराजांची ती तेजःपुंज मूर्ती पाहताच आणि त्यांच्या दृष्टीला दृष्टी भिडताच श्री. गोविंदरावांचे देहभान हरपले व त्यांचे अष्टसात्त्विक भाव जागृत झाले. जन्मोजन्मीचे संबंध असावेत त्याप्रमाणे त्यांना श्रीस्वामीमहाराजांची ओळख पटली. आपले मातापिता व हितकर्ता सर्वकाही श्रीस्वामीमहाराजच आहेत अशी श्री. गोविंदरावांची खात्री झाली. श्रीस्वामीमहाराजांनी श्री. गोविंद-रावांना दुसऱ्या दिवशी सकाळी नर्मदेवर स्नान करून ओलेत्याने आपणाकडे येण्यास सांगितले. श्री. गोविंदरावांना त्या रात्री झोप लागली नाही. श्रीस्वामीमहाराज आपणाला काय देणार आहेत या विचाराने त्यांनी सारी रात्र तळमळून काढली. दुसऱ्या दिवशीच्या सकाळची ते उत्कंठतेने वाट पाहत होते. सत्पुरुषाकडे मागावे ते मिळते आणि कधी कधी आपल्या अपेक्षेपेक्षा अधिक मिळते.

दुसऱ्या दिवशी श्रीनर्मदेमध्ये स्नान करून ओलेत्याने श्री. गोविंदराव श्रीस्वामीमहाराजांसमोर येऊन उभे राहिले. श्रीस्वामी-महाराजांनी कागदावर एक मंत्र लिहून तो श्री. गोविंदरावांच्या ओंजळीत टाकला व त्या मंत्राचा दररोज जप करावयाला सांगितले. श्रीस्वामीमहाराजांनी श्री. गोविंदरावांना तो मंत्र देऊन त्यांना

चांगली नोकरी मिळण्याची सोय केली आणि त्यांच्या आध्यात्मिक उन्नतीचा पायाही घातला.

श्रीस्वामीमहाराजांच्या आज्ञेप्रमाणे अत्यंत श्रद्धेने श्री. गोविंदरावांनी जप केला. त्याचे फळ म्हणून लगेच ८–१५ दिवसातच श्री. गोविंदरावांना चांगली नोकरी मिळाली. वयाच्या छपन्न वर्षेपर्यन्त त्यांनी ही नोकरी केली. तसेच मंत्र मिळाल्या दिवसापासून ५६ वर्षे वय होईपर्यन्त दररोज श्रीस्वामीमहाराजांचे चिंतन करण्याची साधना त्यांनी केली व वयाला छपन्न वर्षे झाल्यावर त्यांनी स्वेच्छेने नोकरी सोडून पेन्शन घेतले. त्यावेळी श्रीस्वामीमहाराज श्रीक्षेत्र गरुडेश्वराला होते. श्री. गोविंदराव गरुडेश्वराला गेले व आपण स्वेच्छेने सेवानिवृत्त झाल्याचे श्रीस्वामीमहाराजांना सांगून "आता कांहीतरी पारमार्थिक साधनेमध्ये मार्गदर्शन करावे," अशी त्यांनी त्यांना विनंती केली. ही इच्छा त्यांच्या हृदयात जागृत होण्यासाठी आवश्यक अशा वैराग्याचा पाया श्रीस्वामीमहाराजांनी तिलकवाड्याला प्रथम दर्शनाच्या वेळीच घातला होता. त्यावेळी ते त्यांना असे म्हणाले की, " आपल्या वर्णाश्रमधर्माप्रमाणे वागावे. तीच ईश्वर सेवा आहे. त्यामुळे ईश्वर आपले कल्याण करतो. आता यापुढे स्मार्ताग्नी ठेवा." श्रीस्वामीमहाराजांनी श्री. गोविंदरावांना जशी आज्ञा केली, त्याप्रमाणे पत्नी हयात असेपर्यन्त श्री. गोविंदरावांनी घरी अग्निसेवा केली.

या करंजगावकर कुटुंबावर श्रीस्वामीमहाराजांची फार कृपा होती असे म्हणावे लागेल. गं. भा. वारुबाईंच्या भक्तीने प्रसन्न होऊन श्रीस्वामीमहाराजांनी त्यांच्या सर्व कुटुंबावरच आपल्या कृपेचा वर्षाव केला. गं. भा. वारुबाईंना दोन मुली होत्या. त्यापैकी मोठी गं. भा. वेणूबाई ही विधवा होती. दुसऱ्या धाकट्या मुलीचे नाव नर्मदाबाई असे होते. हिचा विवाह श्री. गणेशपंत अनगरे

यांच्याशी झाला होता. श्री. गणेशपंतांना श्रीस्वामीमहाराजांच्या कृपेचा वाटा कसा मिळाला हे पाहण्याजोगे आहे. ते सरकारी नोकरीत असून अहमदाबादला बिऱ्हाड करून राहात होते. श्री. अनगरे दांपत्याचा विवाह होऊन बरीच वर्षे झाली होती; पण त्यांना मूलबाळ काही झाले नव्हते. आपल्या मुलीला अद्याप अपत्यसुख नाही याची गं. भा. वारुबाईंना खंत लागून राहिली होती. सौ. नर्मदाबाईच्या अंगाखांद्यावर मूल खेळलेले पाहावे, ही त्यांची अखेरची इच्छा होती. तिलकवाड्याला ज्या ज्या साधुसंतांची त्या सेवा करीत त्यांच्यापुढे आपले हे दुःख त्या बोलून दाखविल्याशिवाय राहात नसत.

तिलकवाड्याला दक्षिणी ब्राह्मणांची फारशी घरे नसल्यामुळे गं. भा. वारुबाईंच्या प्रेमाग्रहावरून श्रीस्वामीमहाराज मधून मधून त्यांच्या घरी भिक्षेसाठी जात असत. एक दिवस असेच श्रीस्वामी-महाराज भिक्षेसाठी आले असता, त्या मोठ्या अस्वस्थपणे त्यांना असे म्हणाल्या की, "महाराज ! आपल्यासारख्या साधुसंतांची मी एवढी सेवा करते, नर्मदामातेची मनोभावाने भक्ती करते; पण सर्व व्यर्थ आहे. माझ्या हृदयातील दुःख काही जात नाही." त्यावर श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "असे कसे म्हणता वारुबाई ? साधुसेवा कधीच फुकट जात नाही. परमेश्वराच्या भक्तांची सेवा ही परमेश्वराचीच सेवा आहे." गं. भा. वारुबाई त्यावेळी अधिक काही बोलल्या नाहीत आणि तो विषय तसाच राहिला. पुढे चातुर्मासात गं. भा. वारुबाई श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला दररोज येत असत. यावेळी चातुर्मासानिमित्त श्रीस्वामी-महाराजांचा मुक्काम दोन महिने तिलकवाडा येथे होणार आहे असे कळल्यावर गं. भा. वारुबाईंनी सौ. नर्मदाबाईला अहमदाबादेहून तिलकवाड्याला बोलावून घेतले. दररोज मायलेकी श्रीस्वामी-

महाराजांच्या दर्शनाला जात असत. या चातुर्मासामध्ये गं. भा. वारुबाईंचा आणि श्रीस्वामीमहाराजांचा अधिक परिचय झाला व एक प्रकारचा घरोबा निर्माण झाला. सौ. नर्मदाबाई दर्शनाला आली तेव्हा पहिल्याच दिवशी श्रीस्वामीमहाराजांनी तिची प्रेमाने चौकशी करताना तिला असे विचारले की, " मुली, तुझे सासर कुठे आहे ? यजमान काय करतात ? "

अशा तऱ्हेने काही दिवस गेले. चातुर्मास संपावयाला साधारण आठवडा राहिला असेल. एक दिवस गं. भा. वारुबाई एकटयाच दर्शनाला आल्या. सोबत सौ. नर्मदाबाई नव्हती. श्रीस्वामीमहाराजांचा स्वभाव प्रेमळ तसाच विनोदी होता. अशा रीतीने तीन चार दिवस गेले व जेव्हा सौ. नर्मदाबाई दिसली नाही तेव्हा त्यांनी गं. भा. वारुबाईंना असे विचारले की, " हल्ली नर्मदा येत नाही. आमच्यावर रागावली की काय ? आम्ही काय बुवा तिचे वाकडे केले ?" श्रीस्वामीमहाराजांनी प्रेमळपणाने केलेली ही चौकशी ऐकून आपण ज्या संधीची वाट पाहात होतो ती आता आली आहे, असे असे समजून गं. भा. वारुबाई अत्यन्त प्रेमाने, विश्वासाने व किंचित् रागाने त्यांना असे म्हणाल्या की, " महाराज ! नर्मदेला आपण आपली मुलगी मानता; पण तिला अद्याप काहीच संतान नाही. हे आपणास बरे वाटते का ? आज ती २६–२७ वर्षांची आहे. लग्न होऊन बरीच वर्षे झाली; पण अद्याप तिला मूल झाले नाही. मुलीच्या हृदयातील दु.ख आईच्या हृदयाला टोचणार नाही तर कोणाच्या हृदयाला टोचणार ? म्हणून तर आपल्यासमोर तिचे गाऱ्हाणे मी वारंवार मांडते आहे. " यावर श्रीस्वामीमहाराज विनोदाने हसून त्यांना असे म्हणाले की, " माझ्याजवळ काय मुलांची झाडे थोडीच आहेत ? फांदी हलविली की ती टपाटपा थोडीच पडणार आहेत ? फांदीला हात लावून फळे तोडून देतात तशी थोडीच मुले देता

येतील? तिला उद्या घेऊन तर या. श्रीदत्तप्रभूंची जशी इच्छा असेल व त्यांच्या मनात जसे असेल तसेच घडेल."

दुसऱ्या दिवशी सौ. नर्मदाबाई आपल्या आईबरोबर श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला आल्या. त्या दिवशी गुरुवार होता. त्यांना पाहून श्रीस्वामीमहाराज विनोदाने असे म्हणाले की, "काय ग नर्मदा! आमच्यावर रागावली होतीस की काय? इतके दिवस आली नाहीस ती?" हा प्रश्न ऐकताच सौ. नर्मदाबाई त्यांना असे म्हणाल्या की, "आपणावर कसे काय रागावणार! आपण आमचे मायबाप! अडचणीमुळे मी चार दिवस आपल्या दर्शनाला येऊ शकले नाही." तेवढ्यात गं. भा. बारुबाई पुढे झाल्या आणि त्या श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाल्या की, "महाराज! काल मी जे काही म्हणाले ते आपणास आठवत असेलच." गं. भा. बारुबाई असे म्हणताच श्रीस्वामीमहाराज थोडावेळ शांत बसले व मग त्यांना असे म्हणाले की, "मुली! तुला एकच मुलगा होईल; पण सात वर्षे ठेव म्हणून त्याचा तुला सांभाळ करावा लागेल. मात्र पाचव्या महिन्यात शूळपाणीश्वराच्या देवळात त्याची गव्हाच्या कोंड्याने तुला करून मग त्याला घ्यावे म्हणजे सर्व कल्याण होईल." पुढे श्रीदत्तप्रभूंची जशी इच्छा असेल तसे होईल. श्रीस्वामीमहाराजांचे हे उद्गार ऐकून गं. भा. बारुबाईंना फार आनंद झाला. सौ. नर्मदाबाईंनाही हे ऐकून मनोमन अत्यंत आनंद झाला. पुढे श्रीस्वामीमहाराजांचे बोल खरे झाले. शके १८२९ मध्ये, मार्गशीर्ष वद्य द्वितीयेला म्हणजे २१।१२।१९०७ रोजी सौ. नर्मदाबाईंना पुत्ररत्नाचा लाभ झाला; परन्तु त्यांनी मुलाचे नाव ठेवले नाही; कारण श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना या मुलाचा "ठेव" म्हणून सांभाळ करावयाला सांगितले होते.

मुलाला चौथे वर्ष लागले आणि गं. भा. बारुबाईंनी श्रीस्वामी-

महाराजांचे चिंतन करीत सुखाने डोळे मिटले. अनगरे कुटुंब आता नोकरीनिमित्त मुंबईला गेले होते. सौ. नर्मदाबाईंची बहीण म्हणजे मुलाची मावशी गं. भा. वेणूबाई तिलकवाड्यालाच राहात होत्या. श्रीस्वामीमहाराज चातुर्मास संपल्यावर नेहमी एका ठिकाणावरून दुसऱ्या ठिकाणी असा संचार करीत असत. अमुक वेळेला ते अमक्या ठिकाणी सापडतील असे हमखासपणे सांगणे कठीण असे. वर्षातून फक्त एकदाच त्यांचा चातुर्मासानिमित्त दोन महिने मुक्काम कोणत्या-तरी नदीकाठावरील तीर्थक्षेत्रामध्ये होत असे. शके १८३५ मध्ये ते श्रीक्षेत्र गरुडेश्वराला आले आणि त्याच ठिकाणी त्यांनी आपला त्या वर्षाचा चातुर्मास केला. तिलकवाडा ते गरुडेश्वर हे अंतर अवघे तीन मैलांचे असल्यामुळे या चातुर्मासात गं. भा. वेणूबाई वारंवार श्रीक्षेत्र गरुडेश्वरला श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला जात असत. या वेळचा चातुर्मास गरुडेश्वरालाच होणार हे कळताच गं. भा. वेणूबाईंनी ही हकीकत पत्राने बहिणीला मुंबईला कळविली. या पत्रात त्यांनी श्रीस्वामीमहाराज तुझ्या मुलाला पाहावे असे म्हणत आहेत असे आवर्जून लिहिले होते. हे पत्र मिळताच विलंब न लावता सौ. नर्मदाबाई मुलाला घेऊन गरुडेश्वरला आल्या. मुलाच्या वयाला आता सात वर्षे होऊन गेली होती. सौ. नर्मदाबाईंनी आपल्या मुलाला श्रीस्वामीमहाराजांच्या पायांवर घातले. मुलाला जवळ घेऊन श्रीस्वामीमहाराज सौ. नर्मदाबाईंना असे म्हणाले की, "नातवाला पाहून तुझ्या म्हाताऱ्या आईला फार आनंद झाला होता ना? जे भगवन्ताच्या मनात असते तेच घडत असते. मुलाचे नाव काय ठेवले आहेस?" हे ऐकताच त्या श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाल्या की, "महाराज! ही आपली ठेव. त्याचे नाव मी ठेवून त्याच्यावरचा आपला हक्क कसा गाजवू? अद्याप मी त्याचे काहीही नाव ठेवलेले नाही."

मुलाकडे पाहात श्रीस्वामीमहाराज सौ. नर्मदाबाई आणि गं.भा. वेणूबाईंना असे म्हणाले की, " याच्या वजनाचा रवा घेऊन या व याला तराजूत बसवून याची तुला करा. मगच याचे नाव ठेवू या. "

श्रीस्वामीमहाराजांच्या सांगण्याप्रमाणे मुलाची रव्याने तुला केल्यावर त्याला पुन्हा श्रीस्वामीमहाराजांच्या पायावर घालण्यात आले. त्यावेळी मुलाचा हात धरून श्रीस्वामीमहाराज सौ. नर्मदाबाईंना असे म्हणाले की, " हा तुझा वासुदेव घे ! वसंतपंचमीस याची मुंज लाव. "

सौ. नर्मदाबाईंनी श्रीगुरुमहाराजांच्या आज्ञेप्रमाणे वसंतपंचमीच्या शुभमुहूर्तावर चि. वासुदेवाची मुंज लावली व त्या त्याला घेऊन श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी आल्या. ज्यावेळी चि. वासुदेवाने श्रीस्वामीमहाराजांना नमस्कार केला तेव्हा ते त्याला असे म्हणाले की, " काय वासुदेव ! ब्राह्मण झालास ना ? आता यापुढे नियमित स्नान, संध्या व गायत्रीमंत्राचा जप करीत जा म्हणजे तुला कधीही त्रास होणार नाही आणि हेही लक्षात ठेव की, जर तुला कधी त्रास झालाच तर गायत्री मंत्रच तुला सहनशक्ती देईल. त्याचप्रमाणे मी तुला दुसरा एक मंत्र देतो. तो बिनचूक रोज १० वेळा म्हणत जा म्हणजे तुला विद्यादेवी सरस्वती प्रसन्न राहील." इतके चि.वासुदेवाला सांगून श्रीस्वामीमहाराजांनी चि. वासुदेवाला आपल्या मांडीवर बसून घेतले व त्यांनी त्याच्याकडून पुढील मंत्र तीन वेळा म्हणवून घेतला.

नमस्ते शारदे देवि सरस्वती मतिप्रदे ।
वस त्वं मम जिव्हाग्रे सर्वविद्याप्रदाभव ॥

श्रीस्वामीमहाराजांच्या कृपाप्रसादाने झालेला मुलगा, अलौकिक निपजला नाही तरच नवल ! या मुलाला संगीताची आवड होती आणि त्याने पुढे श्रीस्वामीमहाराजांनी दिलेल्या सरस्वतीमंत्राचा

व गायत्रीमंत्राचा नियमित जप करून त्यांच्या आशीर्वादाने संगीता-सारख्या दैवी विद्येत प्राविण्य व यश मिळविले. या मुलाला म्हणजे श्री. वासुदेवराव अनगरे यांना पुढे गायनाचार्य हा किताब मिळाला. पुढे काठेवाडच्या चूडानरेशांनी आपल्या दरबारी गायनवादनाचे शिक्षक म्हणून त्यांची नेमणूक केली. तसेच जोधपूर, बिकानेर, अल्वार, पोरबंदर, जामनगर, भावनगर व म्हैसूर येथील राजे-महाराजांनी संगीतातील प्राविण्यावद्दल त्यांचा सत्कार केला.

म्हैसूरच्या महाराजांनी तर त्यांना तीन सव्वातीन तोळे सोन्यात मढविलेले शिवलिंग बक्षीस दिले. या शिवलिंगाच्या आजूबाजूला हिरे, माणिक आणि मोती बसविलेले आहेत. सन १९३२ मध्ये ग्वाल्हेर येथे भरलेल्या अखिल भारतीय संगीत परिषदेमध्ये श्री. वासुदेवराव अनगरे यांना पहिल्या क्रमांकाचे सुवर्णपदक मिळाले. माझे गुरुदेव परमपूजनीय श्रीगुळवणीमहाराज यांना पाठविलेल्या एका पत्रामध्ये श्री. वासुदेवराव अनगरे यांनी काही हृद्य आठवणी लिहून कळविल्या आहेत.

श्रीक्षेत्र गरुडेश्वराला श्रीस्वामीमहाराजांना भेटावयाला अनगरे कुटुंब वारंवार जात असे. त्यावेळी श्री. वासुदेवराव वयाने लहान होते. एकदा त्यांच्या मातोश्री सौ. नर्मदाबाई, आपले बंधू व मोठी वहीण यांना घेऊन श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला गेल्या होत्या. सौ. नर्मदाबाईंचे वय त्यावेळी ४१-४२ असेल. श्रीस्वामीमहाराज या मंडळींशी मोकळेपणाने बोलत असत. तसे ते सर्व परिचित मंडळींशी मोकळेपणाने बोलत; पण प्रत्येकाला वाटे "महाराज माझ्याशीच मोकळेपणाने बोलतात; कारण मीच त्यांच्या मर्जीतील आहे."

एकदा श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे श्री. वासुदेवराव अनगरे यांच्या मातुश्री सौ. नर्मदाबाई, मावशी गं. भा. वेणूबाई व मामा श्री. बाळ-

कृष्ण आत्माराम करंजगावकर हे श्रीस्वामीमहाराजांशी अत्यंत प्रेमाने बोलत असताना बोलण्याच्या ओघात सौ.नर्मदाबाई श्रीस्वामी-महाराजांना असे म्हणाल्या की, "आपण इतर लोकांना त्यांचे आयुष्य किती आहे ते सांगता; मग माझे आयुष्य किती आहे ते सांगा ना ?" श्रीस्वामीमहाराज थोडा वेळ विचार करून त्यांना असे म्हणाले की, "पाहा हो ! मागाहून पस्तावा करणार नाहीस ना ? तुझ्या मुलाच्या सोळाव्या वर्षी तुला मृत्यू आहे." श्रीस्वामीमहा-राजांच्या तोंडचे वाक्य हे ब्रह्मलिखित असल्यामुळे व ते कधीच खोटे ठरणार नाही याची खात्री असल्यामुळे सौ. नर्मदाबाईंना फार वाईट वाटले. मुलाच्या सोळाव्या वर्षी म्हणजे जणू काही आत्ताच मृत्यू आपल्यासमोर उभा ठाकला आहे असे त्यांना वाटले. तो धक्का एवढा विलक्षण होता की, त्यामुळे सौ. नर्मदाबाई लगेच श्रीस्वामी-महाराजांना असे म्हणाल्या की, "असे जर असेल तर आपण मला मुलगा तरी कशाला दिला ? नसता दिला तर बरे झाले असते. सोळाव्या वर्षी त्याचे काय सुख मी पाहणार आहे ! आणि त्याचा संसार तरी मी कसा पाहणार ?"

सौ. नर्मदाबाई असे म्हणताच श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "तुझी इच्छा मुलाचा संसार पाहावयाचीच असेल तर तसे होईल. तुझे आयुष्य आणखी वाढवून मिळेल; पण त्यासाठी आयुष्यातील शेवटचे एक वर्ष तुला त्रास सोसावा लागेल. हे तुला कबूल असेल तर पाहा."

हे ऐकताच सौ. नर्मदाबाई त्यांना असे म्हणाल्या की, "हो, आहे कबूल. महाराज ! ही अट मला मान्य आहे. मुलाचा संसार या डोळ्यांनी पाहात असताना अखेरचे एक वर्ष कष्टाचे गेले ; तर ते कष्ट मी आनंदाने सहन करीन."

त्यांची ही संमती ऐकताच श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले

की, "ठीक आहे! तुला तुझ्या आयुष्याची आणखी सोळा वर्षे वाढवून देतो. या मुलाच्या बत्तीसाव्या वर्षी तुला मृत्यू येईल. मात्र त्यापूर्वी शेवटचे एक वर्ष तुला वैधव्यात काढावे लागेल आणि त्यावर्षी तुला आजारपणही भोगावे लागेल."

त्याप्रमाणे श्रीवासुदेवराव अनगरे यांचे वडील ३ मार्च १९३८ (टीप) मध्ये वारले व त्यानंतर एक वर्षाने त्यांच्या मातुश्री, गं. भा. नर्मदाबाईंचे, एका वर्षाच्या आजारानन्तर देहावसान झाले. याच पत्रामध्ये श्री. वासुदेवराव अनगरे यांनी श्रीस्वामीमहाराजांच्या अचूक भविष्यवाणीबद्दल पडताळा देणारी आपल्या मामेवहिणीची हकीगत कळविली आहे. त्यांचे मामा श्री. बाळकृष्ण आत्माराम करंजगावकर यांची मुलगी चि. गंगूताई हिचा विवाह वयाच्या १७ व्या वर्षी श्री. शकरराव देशपांडे यांच्याशी झाला होता. ही देशपांडे मंडळी अत्यंत नास्तिक होती. भूतभविष्य असल्या गोष्टींवर त्यांचा विश्वास नव्हता. त्यांच्या या नास्तिकपणाचे परिणाम सौ. गंगूताईंना भोगावे लागले. सौ. गंगूताईंच्या विवाह-

---

टीप – श्रीस्वामीमहाराजांचा आठवा चातुर्मास तिलकवाड्याला शके १८२० मध्ये म्हणजे इ. स. १८९८ मध्ये झाला. त्यावेळी सौ. नर्मदाबाईंचे वय गं भा. वारुबाईंच्या सांगण्याप्रमाणे २६ वर्षे होते. म्हणजे त्यांचा जन्म इ. स. १८७२ चा असावा. श्रीस्वामीमहाराजांचा पहिला व अखेरचा मुक्काम श्रीक्षेत्र गरुडेश्वरी १९१३–१४ साली झाला. यावेळी म्हणजे १९१४ साली त्यांनी सौ. नर्मदाबाईंना (यावेळी त्या ४२ वर्षांच्या होत्या.) सोळा वर्षे वय वाढवून दिले. (श्रीवासुदेवराव अनगरे यांच्या पत्राप्रमाणे) म्हणजे १९१४ + १६ = १९३० सालापर्यन्त त्यांचे आयुष्य असले पाहिजे; पण श्री. वासुदेवराव अनगरे यांच्या पत्राप्रमाणे त्यांचे वडील १९३८ मध्ये व नंतर एक वर्षाने म्हणजे १९३९ मध्ये गं. भा. नर्मदाबाई वारल्या. त्यावेळी त्यांचे वय ६७ वर्षांचे असावे. त्यामुळे असे अनुमान काढावे लागते की, जरी त्यांना १६ वर्षे वय वाढवून मिळाले; तरी त्या आठ वर्षे अधिक जगल्या.

नंतर वर्षासव्वावर्षांनंतरची ही गोष्ट आहे. श्रीक्षेत्र गरुडेश्वरला श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी सौ. गंगूताई, गं. भा. वेणूबाईं-बरोबर गेल्या होत्या. त्यावेळी गं. भा. वेणूबाई श्रीस्वामीमहा-राजांना असे म्हणाल्या की, "महाराज! ज्याप्रमाणे आपण नर्मदेला मुलगा दिला, त्याप्रमाणे या गंगूलाही मुलगा द्या ना." सहज बोलता बोलता त्यांनी हा विषय काढला होता. त्यावर श्रीस्वामी-महाराज त्यांना असे म्हणाले की, "ज्यावेळी नर्मदा मुलासाठी प्रश्न विचारावयाला आली होती, त्यावेळी तिचे लग्न होऊन बरीच वर्षे झाली होती. या गंगूचे लग्न होऊन नुकतेच कोठे वर्ष सव्वावर्ष होत आहे. त्यामुळे यावेळी हिच्याबद्दल प्रश्न विचारण्याचे काहीच कारण दिसत नाही. मला वाटते हा प्रश्न या वेळी अगदी अयोग्य व अप्रस्तुत आहे." पण गं. भा. वेणूबाईंनी सौ. गंगूताईंचे भविष्य जाणून घ्यावयाचा विशेष आग्रह धरला म्हणून श्रीस्वामीमहाराजांनी प्रश्न कुंडली मांडली व गंभीर होऊन ते त्यांना असे म्हणाले की, "या मुलीच्या नशिबात एक मुलगा आहे; पण तो बापाच्या मुळावर आहे. त्यासाठी त्याच्या जन्मापासून पुढे सहा महिनेपर्यन्त बापाने मुलाचे तोंड पाहता कामा नये. जर बापाने सहा महिन्याच्या आत पुत्रमुख पाहिले; तर मुलाच्या आईला वर्षाच्या आत वैधव्य येईल." असे म्हणून श्रीस्वामीमहाराज गप्प बसले इ. स. १९१३ मध्ये सौ. गंगूताईंना मुलगा झाला. त्यावर्षी श्रीस्वामीमहाराज गरुडेश्वरला होते. सौ. गंगूताईंचे हे प्रथम बाळंतपण त्यांच्या आईच्या घरी तिलकवाड्यासच झाले. ही गोड वातमी सौ. गंगूताईंचे यजमान श्री शंकरराव यांना कळविण्यात आली व मुलाच्या बारशासाठी श्री. शंकरराव यांनी स्वत: न येता त्यांनी आपल्या वडिलांना पाठवावे अशी विनंती करताना असे सांगितले होते की, "श्रीस्वामीमहा-राजांनी मुलाच्या जन्मानंतर त्याच्या वडिलांनी सहा महिन्यापर्यन्त

मुलाचे तोंड पाहू नये असे स्पष्टपणे बजाविले आहे. जर त्यांनी सहा महिन्याच्या आत मुलाचे तोंड पाहिले; तर त्याचे परिणाम चांगले होणार नाहीत असे सांगितले आहे."

असा निरोप मिळूनसुद्धा, सर्व देशपांडे कुटुंबच पूर्णपणे नास्तिक असल्यामुळे, श्री. शंकररावांच्या वडिलांनी आपणास नातू झाला या आनंदामध्ये वरील सूचनेकडे मुद्दाम दुर्लक्ष केले. असल्या भाकड कथांवर आपला विश्वास नाही हे आपल्या व्याह्यांना दाखवून देण्यासाठी त्यांनी श्री. शंकरराव यांनाच तिलकवाड्यास बारशासाठी पाठवून दिले. त्यावेळी श्री. शंकरराव यांना पाहून श्री. करंजगावकर यांच्या घरात कोणालाच आनंद झाला नाही. श्री. शंकरराव यांनी पुत्राचे मुख पाहू नये म्हणून सौ. गंगूताईंच्या माहेरच्या मंडळींनी पराकाष्ठेची दक्षता बाळगली; पण श्री. शंकररावसुद्धा हट्टालाच पेटले होते. "विनाशकाले विपरीत बुद्धिः" या न्यायानेच सर्व घटना घडत होत्या.

एक दिवस जवळपास कोणी नाही असे पाहून श्री. शंकरराव घरात गेले व त्यांनी मुलाला पाळण्यातून उचलून घेऊन ते त्याचे कौतुक करू लागले. ही गोष्ट सौ. गंगूताईंच्या निदर्शनाला येताच आपल्यावर आकाशाची कुऱ्हाड कोसळली असे त्यांना वाटले. पुढील दुःखाच्या भयाने जरा रागातच रडतरडत त्या नवऱ्याला असे म्हणाल्या की, "ही तुम्ही फार वाईट गोष्ट केली. याचे परिणाम काही चांगले होणार नाहीत." यथाकाळी सौ. गंगूताई सासरी गेल्या. सहा महिन्यातच श्री. शंकररावांना क्षयाची भावना झाली व वर्षभरात त्यांचे देहावसान झाले.

अशा रीतीने श्रीस्वामीमहाराजांच्या शब्दांचा अनादर केल्यामुळे गं. भा. गंगूताईंना वैधव्य प्राप्त झाले. मुलाची शांती केल्यावर त्याच्या वडिलांनी त्याचे मुखावलोकन करावे अशी श्रीस्वामी-

महाराजांची आज्ञा होती व ही शांती मुलाच्या वयाला सहा महिने पूर्ण होण्याच्या आत करावी असे त्यांनी सांगितले होते; पण श्री. देशपांडे मंडळी नास्तिक असल्याकारणाने त्यांचा घात झाला. पुढे गं. भा. गंगूताईंचा मुलगा चि. श्री. चिंतामण शंकर देशपांडे यांचे लग्न झाल्यावर व त्यांना एक कन्या झाल्यावर त्यांचाही क्षयातच शेवट झाला.

श्रीस्वामीमहाराजांची भविष्यवाणी किती अचूक व अमोघ होती याचा प्रत्ययच या गोष्टीवरून येतो. मनुष्यमात्राला अहंकार असतो व कोणत्यातरी गोष्टीबद्दल ताठा असतो. श्री. शंकरराव व त्यांच्या वडिलांचा जो नास्तिकतेचा गर्व होता त्यामुळे त्यांना त्याचे भीषण परिणाम भोगावे लागले. जगात महापुरुषांचा संश्रय प्राप्त होऊनसुद्धा कधीकधी बलवत्तर प्रारब्धामुळे मोठे दुष्कर भोग भोगावे लागतात हेच खरे. त्यामुळेच शास्त्रकारांनी असे म्हटले आहे की, जर अवश्य घडणाऱ्या अशा भावी गोष्टींचा प्रतिकार करता आला असता; तर नल, राम व युधिष्ठिर यांना दुःख भोगावे लागले नसते.

श्रीस्वामीमहाराजांना संग्रहणीचा विकार अखेरपर्यंत होता. अखेर अखेर त्यांना कोणतेच अन्न चालत नसे. दिवसातून तीनचार वेळा ते थोडे थोडे ताक घेत असत. त्यांच्यासाठी श्री. वासुदेवराव अनगरे यांच्या मावशी गं. भा. वेणूबाई यांचा एक दिवसाआड सकाळी स्नान करून, ओलेत्याने डोक्यावर ताकाचे मडके घेऊन तिलकवाड्याहून श्रीक्षेत्र गरुडेश्वराला जाण्याचा नियम होता.

एकदा एका गुरुवारी एकादशी होती. त्या दिवशी इष्टमित्रांसह श्रीगुरुमहाराजांच्या दर्शनाला जावे असे गं. भा. वेणूबाईंनी ठरविले. तेथील फौजदार श्री. हर्डीकर यांच्या सौ. पत्नी व त्यांच्या मुलांना घेऊन त्या दुपारी गरुडेश्वराला जावयाला निघाल्या. "गरुडेश्वरी वारंवार दर्शनाला येऊ नये" असे श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना यापूर्वी

अनेक वेळा बजावून सांगितले असतानाही त्या दिवशी श्रीस्वामी-महाराजांच्या दर्शनाची विशेष ओढ लागल्यामुळे गं. भा. वेणूबाई त्यांची आज्ञा मोडून वरील सर्व मंडळींसह तिकडे निघाल्या. ही सर्व मंडळी चालत निघाली असताना वाटेतच अंधार पडावयाला सुरुवात झाली. शेवटी दाट काळोखामुळे सर्व मंडळी रस्ता चुकली. जरा पुढे गेल्यावर तेथे तुटलेला कडा असून रस्ता बंद झाला आहे असे दृष्टीस पडले. त्यामुळे घाबरून जाऊन मुले रडू लागली. आता श्रीस्वामीमहाराजांचा धावा करणे हाच उपाय होता. त्यावेळी गं. भा. वेणूबाईंना श्रीस्वामीमहाराजांच्या "वारंवार दर्शनाला येऊ नये," या शब्दांची आठवण झाली. तिलकवाडा ते गरुडेश्वर या निर्जन प्रदेशातील प्रवास एकटचा दुकटचा माणसाला व बायका-मुलांना त्रासदायक होता, हे श्रीस्वामीमहाराजांना ठाऊक होते, म्हणून तर त्यांनी गं. भा. वेणूबाईंना वारंवार गरुडेश्वरला न येण्या-बद्दल बजावले होते. गं. भा. वेणूबाई आता काकुळतीला आल्या आणि मनात श्रीस्वामीमहाराजांची प्रार्थना करून त्यांना असे म्हणाल्या की, "महाराज! मी चुकले. आपल्या आज्ञेचा मी अवमान केला. ही चूक माझ्याकडून पुन्हा होणार नाही. यावेळी आपणाशिवाय मला आणि या मुलांना कोण साहाय्य करणार? कृपा करा आणि आम्हाला निर्विघ्नपणे आपल्या चरणाशी घेऊन चला" असे म्हणून त्यांनी श्रीस्वामीमहाराजांच्या नावाचा जप सुरू केला. मुलांनीसुद्धा त्यांच्या नावाचा जप करावयाला सुरुवात केली. एवढचात थोडचा अंतरावर एका बाजूला "श्रीगुरुदेवदत्त" असा श्रीस्वामी-महाराजांचा आवाज सर्वांना ऐकू आला. श्रीस्वामीमहाराजांनी आपली प्रार्थना ऐकली व आपल्याला साहाय्य करण्यासाठी ते स्वत: आले आहेत या आनंदामध्ये गं. भा. वेणूबाई व सौ. हर्डीकरबाई मुलांना घेऊन आवाजाच्या रोखाने त्या दिशेला निघाल्या. पण काय,

श्रीस्वामीमहाराज तेथे नव्हते. पुन्हा सर्वांच्या हृदयात भीतीने थरकाप उडाला ; पण पुन्हा दुसरीकडे "श्रीगुरुदेवदत्त" असा श्रीस्वामीमहाराजांचा स्पष्ट स्वर ऐकू आला. त्यामुळे ती सर्व मंडळी त्या आवाजाच्या अनुरोधाने चालत जात; पण तेथे सुद्धा श्रीस्वामीमहाराज दिसत नसत. परन्तु पुढे पुनःपुन्हा तसाच आवाज ऐकू येऊ लागला. श्रीस्वामीमहाराजांच्या त्या आवाजाच्या अनुरोधाने ही मंडळी चालत चालत शेवटी श्रीक्षेत्र गरुडेश्वरी सुरक्षितपणे येऊन पोहोचली. यावेळी श्रीस्वामीमहाराजांच्या पर्ण-कुटीसमोर भजन चालले होते. गं. भा. वेणूबाईंनी कृतज्ञतेने व भारावलेल्या डोळ्यांनी श्रीस्वामीमहाराजाकडे पाहून त्यांना नमस्कार केला. श्रीस्वामीमहाराज गं. भा. वेणूबाईंकडे पाहून थोडा रागावल्याचा सूर आणून त्यांना असे म्हणाले की, "वाट चुकत होतीस ना! तरी मी येथे वारंवार न येण्याबद्दल बजावले होते. आज एक वेळ श्रीदत्तमहाराजांनी वाट दाखविली. पुन्हा अशी चूक झाल्यास त्याच्या परिणामाची जबाबदारी आपणावर नाही." गं. भा. वेणूबाईंना काय वाटले असेल ते त्यांचे त्यांनाच ठाऊक ? भजनी मंडळींमध्ये तिलकवाड्याची मंडळीसुद्धा होती. त्यांच्या सोबतीन गं. भा. वेणूबाई मग दुसऱ्या दिवशी घरी परतल्या.

श्री. अनगरे कुटुंब मुंबईला राहात होते. त्यावेळची श्रीस्वामी-महाराजांच्या अपूर्व अनुभवाची ही अलौकिक कथा आहे. ठाण्यातील मोतीलालशेठच्या चाळीत श्री. गणेशपंत अनगरे व त्यांची कुटुंबीय मंडळी राहात होती. त्यांच्या समोरच्या बंगल्यात श्री. प्राणशंकर दवे म्हणून एक गुर्जर गृहस्थ राहात होते. ते मूळचे गुजराथेतील गोधरा या गावा जवळील शेहेरा गावचे निवासी होते. ते एका ब्रिटिश फर्ममध्ये मॅनेजर होते. श्री. अनगरे मंडळी पुष्कळ दिवस

गुजराथेत राहिली असल्यामुळे सर्वांनाच गुजराथी भाषा उत्तम प्रकारे बोलता येत होती. श्री. अनगरे व श्री. दवे ही कुटुंबे समभाषी असल्यामुळे एकमेकांच्या अधिक जवळ आली. एका सुट्टीच्या दिवशी श्री. गणेशपंत अनगरे यांनी श्री. प्राणशंकर दवे यांना आपल्या घरी चहासाठी बोलावले. श्री. दवे मॅनेजरच्या हुद्यावर होते म्हणून श्री. गणेशपंतांनी त्यांना विशेष आदराने वागविले. श्री. अनगऱ्यांच्या घरी खुर्चीवर बसल्यावर श्री. प्राणशंकर दवे यांनी आजुबाजूला दृष्टी फिरविली. त्यावेळी त्यांना श्री. अनगरे कुटुंबातील काही व्यक्तींचे फोटो भिंतीवर टांगलेले दिसले. त्यात एक भगवान् श्रीदत्तात्रेयांची तसबीर होती. तिला ताजा पुष्पहार चढविला होता. उदवत्तीचा मंद सुगंध सगळीकडे दरवळला होता. शेजारीच श्रीस्वामीमहाराजांचा फोटो होता. त्या फोटोकडे नजर जाताच श्री. प्राणशंकर एकदम चमकून उठले व त्या फोटोजवळ जाऊन उभे राहिले. त्यांच्या सर्वांगाला कंप सुटला व कंठ रुद्ध झाला. सकाळीच पूजेच्या वेळी ताजा पुष्पहार घालून तो फोटो सजविण्यात आला होता. श्रीस्वामीमहाराजांच्या पावलावर चंदनमिश्रित अष्टगंधाचे टिळे लावलेले होते. श्री. प्राणशंकर कंप पावलेल्या आवाजात श्री. गणेशपंत यांना असे म्हणाले की, "हे स्वामीमहाराज कोण आहेत ? या महाराजांना मी पाहिलेले आहे. यांचे मला दर्शनही झाले आहे कोण आहेत हे महाराज ? "

श्री. गणेशपंतांना आश्चर्य वाटले. मुंबईमध्ये राहणाऱ्या या माणसाला श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन झाले असेल हे कसे शक्य आहे, असे विचार जरी त्यांच्या मनात आले; तरी श्री. प्राणशंकर यांनी विचारलेल्या प्रश्नांना उत्तर देताना ते असे म्हणाले की, "हा आमच्या श्रीगुरुदेवांचा फोटो आहे. त्यांचे नाव "श्रीवासुदेवानन्दसरस्वतीस्वामीमहाराज" असे असून ते आमच्या कुटुंबाचे

गुरुदेव व हितकर्ते आहेत. आपण मुंबईमध्ये राहात असूनही आपली व त्यांची भेट झाली म्हणता; पण हे कसे शक्य आहे ? हे स्वामी कधीसुद्धा मुंबईमध्ये आलेले नाहीत. सध्या गुजराथमध्ये नर्मदा तटाकी श्रीक्षेत्र गरुडेश्वरला यांचा मुक्काम आहे."

"गणेशपंत ! काय सांगू तुम्हाला. माझे गमावलेले सर्वस्व मला परत मिळवून देणाऱ्या या महात्म्याकडे मला घेऊन चला. यांनी माझी अब्रू, माझी इस्टेट, माझा गमाविलेला आत्मविश्वास आणि माझे जीवन मला परत मिळवून दिले. हे माझे प्राणदाते आहेत. यांच्या भेटीशिवाय मी आता अन्न ग्रहण करणार नाही."

श्री. प्राणशंकर यांचे हे बोलणे ऐकून श्री. गणेशपंतांची आई त्यांना असे म्हणाली की, "दवे साहेब ! श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला आपण जरूर जाऊ या; पण दर्शन होईपर्यन्त अन्नग्रहण न करण्याचा विचार मनातून काढून टाका. येथून श्रीक्षेत्र गरुडेश्वर खूप लांब आहे व प्रवासही फार दूरचा असल्यामुळे तेथे पोहोचावयास खूपच वेळ लागेल. तरी तेथे जाईपर्यन्त अन्न- पाणी न घेता आपण उपाशी राहू नये. आपणाला श्रीस्वामीमहाराजांचे खात्रीने दर्शन होईल. आमच्या कुटुंबावर त्यांची फार कृपा आहे. मी आपल्यावरोबर आनंदाने गरुडेश्वरला येईन. अगोदर आपला व श्रीस्वामीमहाराजांचा संबंध केव्हा, कोठे आणि कसा आला ते कृपा करून सांगा."

हा वेळ पावेतो श्री. प्राणशंकर यांच्याभोवती श्री. गणेशपंतांच्या घरची सर्व मंडळी गोळा झाली होती. त्यांना पाहून ते असे म्हणाले की, "सांगतो ! गणेशपंत, सर्व काही सांगतो; पण श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन झाल्याशिवाय मी अन्न ग्रहण करणार नाही, हा माझा निर्धार कायम आहे; मग कितीही दिवस मला उपोषण करावे लागले तरी मला त्याची पर्वा नाही. आपण जाणताच की, मी सध्या एका विलायती कंपनीमध्ये मॅनेजर आहे. माझ्या हुशारीमुळे व

सचोटीमुळे मला कंपनीनें मॅनेजर म्हणून बढती दिली आहे. काही वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. त्यावेळी मी येथे राहात नव्हतो. मुंबईमध्ये राहात होतो. कंपनीचे भागीदार इंग्रज होते. त्यांचा माझ्यावर पूर्ण विश्वास होता. त्यावेळी मी मॅनेजर नव्हतो; पण मोठ्या हुद्यावर होतो. माझे दूरचे एक नातलग व अगदी जवळचे स्नेही या कंपनी-मध्ये असून त्यांचे मला फार साहाय्य होत असे. त्यांच्या नावाचा मी आता येथे उल्लेख करीत नाही. या माझ्या मित्रावर मी पूर्ण विश्वास ठेवला होता. माझे सर्व व्यवहार त्याला सांगूनच मी करीत असे. त्याचाही माझ्यावर विश्वास होता.

एकदा काही कामानिमित्त मला चार महिने माझ्या गावी जाऊन राहावे लागले. आपल्या गैरहजेरीत कंपनीच्या कामामध्ये व्यत्यय येऊ नये म्हणून मी माझ्या या मित्राच्या सल्ल्यावरून व त्याच्यावर पराकाष्ठेचा विश्वास ठेवून काही कोऱ्या कागदावर सह्या करून ते त्याच्या ताब्यात दिले. विनाशकाली माणसाला विपरीत बुद्धी होते. तसेच याहीवेळी माझे झाले; कारण माझ्या सह्यांचे कोरे कागद हाती पडल्यावर त्याची बुद्धी फिरली. या कागदांचा उपयोग करून माझ्या या मित्राने लाखो रुपयांच्या उलाढाली केल्या व लाखो रुपयांचे खोटे-नाटे हिशेब करून ठेवले. माझ्याशी कपट करून लाखो रुपये कमविण्याकडे त्याची जी स्वार्थबुद्धी व वृत्ती वाढली, त्यामुळे त्याने बिनदिक्कत माझा विश्वासघात केला.

चार महिन्यांची मुदत संपताच मी पुन्हा कामावर रुजू झालो. मी कामावर येताच आपण केलेले खोटे करारनामे, कारस्थानें, लाखो-रुपयांचे खोटे व्यवहार इत्यादि काहीही उघडकीस येऊ नये व आपण दोषी ठरून पकडले जाऊ नये म्हणून माझा मित्र विश्रांती घेण्यासाठी दोन-चार महिन्यांची रजा काढून आपल्या गावी निघून गेला.

काही दिवसांनी कंपनीची वार्षिक हिशेब तपासणी सुरू झाली. त्यावेळी या तपासणीमध्ये कंपनीच्या हिशेबात लाखो रुपयांचे घोटाळे व बनावट व्यवहार माझ्या सहीने झाल्याचे आढळून आले. वास्तविकपणे मी निर्दोष असलो; तरी या तपासणीमुळे दोषी ठरलो. कंपनीच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांना मी सर्व खरी हकीकत सांगितली. ती त्यांना पटलीही; कारण मी गैरव्यवहार करणार नाही, याची सर्व वरिष्ठ अधिकाऱ्यांना खात्री होती. परन्तु मी ज्या कोऱ्या कागदांवर सह्या केल्या होत्या, ते सर्व कागद मला दोषी ठरवीत होते. त्यामुळे माझ्या साहेबांचा नाइलाज झाला. सत्य हकीकत माहीत असतानाही ते मला कोणत्याही प्रकारे साहाय्य करू शकत नव्हते.

हे सर्व पाहून मी आश्चर्यचकित झालो आणि घाबरलोही. माझी आता बेअब्रू होणार, लोकांना मी आता तोंड कसे दाखविणार व माझा निरपराधीपणा कसा सिद्ध करणार या विचाराने मी अगदी वेडा होण्याच्या पंथाला लागलो. काय घडले असावे ते मी जाणले. माझ्या मित्राने माझा केसाने गळा कापला होता; पण ज्या कागदापत्रां-मुळे हा गैरव्यवहार झाला त्यांच्यावर माझी सही होती. सही बनावट नव्हती. पुरावा माझ्या विरुद्ध होता. माझा सर्वनाश करून मित्र म्हणविणारा माझा तो शत्रू पळून गेला होता. माझ्या सांगण्या-वर कोणाचा विश्वास बसणार ? मोठ्या हुद्याच्या जागेवर अस-लेला माणूस कोऱ्या कागदांवर सह्या करून दुसऱ्याकडे देतो हे कोणाला खरे वाटणार ? उलट लोक म्हणतील, दोघा मित्रांनी कट करून कंपनीला लुबाडण्याचा प्रयत्न केला. कागदावर सह्या माझ्या होत्या. त्यामुळे शिक्षा मलाच होणार होती.

एकंदर सर्व परिस्थितीचा विचार केल्यावर माझा कयास खरा ठरला. लाखो रुपयांच्या पैशाच्या घोटाळ्यात सहीशिक्क्यानिशी

पुरावे मिळाल्यामुळे कंपनीनें माझ्या विरुद्ध तक्रार दाखल केली. त्यामुळे सरकारने मला पकडण्याचा निश्चय केला. हे सर्व मला कळल्यावर मी पकडला जाऊन माझी बेअब्रू होऊ नये म्हणून मी गृहत्याग करण्याचे ठरविले. अशा परिस्थितीत लोकांना तोंड दाखविण्याऐवजी गृहत्याग करणे अधिक बरे असेच त्यावेळी मला वाटले.

ज्या दिवशी मी घर सोडण्याचा निश्चय केला त्या दिवशी रात्री मी माझ्या पत्नीस एक व ऑफीसरला एक अशा एकाच अर्थाच्या दोन चिठ्ठ्या लिहून ठेवल्या. त्यात मी असे लिहिले होते की, "या सर्व प्रकारात मी अगदी निर्दोषी आहे. या व्यवहारात माझा हात मुळीच नाही; पण मित्रावरचा अतिविश्वास हा आज माझा घातक बनला आहे. त्यामुळे सर्वांचाच नाईलाज झाला आहे. माझ्या सह्या मला दोषी ठरविण्यास पर्याप्त आहेत. त्यामुळे आता यापुढे माझ्या अब्रूचे धिंडवडे निघू नयेत म्हणून मी घर सोडून जात आहे. माझा कोणीही तपास करू नये."

अशा प्रकारे चिठ्ठ्या लिहून मी त्याच रात्री घर सोडून निघून गेलो. त्यामुळे माझ्या मनात असे विचार आले की, मी गुजराथेत गेलो; तर मी गुजराथी असल्यामुळे पोलीस मला नक्कीच शोधून काढतील. तेव्हा तिकडे न जाता मी मध्यप्रदेशात वेष पालटून राहू लागलो.

मी घर सोडून निघून गेल्यामुळे हिशेब तपासणाऱ्या सर्व माणसांना माझ्याबद्दल अधिकच अविश्वास उत्पन्न होणार व माझ्या या पलायनाच्या वृत्तीमुळे मी अधिकच दोषी ठरणार याची मला पूर्ण जाणीव होती व झालेही तसेच. त्यावेळी सरकारी पोलीस जसा माझा तपास करीत होते त्याप्रमाणे मी ज्या कंपनीत कामाला होतो त्यातील माणसेही माझा शोध घेत हिंडू लागली. स्थानिक वर्तमानपत्रातही केव्हा केव्हा या केसची तुटक हकीकत येत असे. एक

दिवस वर्तमानपत्रातील एका बातमीमुळे मला असे कळून आले की, "मध्यप्रदेशचे पोलीस माझ्या मागावर आहेत. त्यामुळे माझी पाचावर धारण बसली. पोलीस मला नक्कीच पकडणार असे वाटू लागले. मित्र म्हणविणाऱ्या एका अधम माणसावर मी पूर्ण विश्वास टाकला. त्याचा परिणाम म्हणून निपराधी असूनही माझी बेअब्रू झाली. घरदार, पत्नी व मुले यांना मी अंतरलो. निर्दोष असूनही मी हे सर्व भोगीत होतो. ईश्वराच्या घरचा हा उलटा न्याय पाहून माझ्या डोळ्यातून अश्रुधारा वाहू लागत. ज्या ठिकाणी मी लपून राहिलो होतो ते ठिकाण नर्मदा काठावर ॐकारेश्वराच्या जवळ होते. ॐकारेश्वर हे प्रसिद्ध ज्योर्तिलिंग असल्यामुळे तेथे नेहमीच साधुसंत, बैरागी व भिकाऱ्यांची गर्दी असते त्या गर्दीमध्ये वेषांतरामुळे एवढे दिवस मी खपून गेलो होतो; पण नंतर माझी धडगत राहिली नाही. प्राणत्यागाशिवाय आता दुसरा मार्ग न उरल्यामुळे शेवटी मी आत्महत्त्या करण्याचे ठरविले. आत्महत्त्या करावयाला नदीसारखे सोईस्कर दुसरे ठिकाण नाही असे वाटून नर्मदातीरावर एक निर्जन जागा शोधून मी तेथे गेलो. दिवस मावळावयाला आला होता. अजून थोडा प्रकाश होता. घडलेला सर्व खरा इतिहास एका कागदावर लिहून तो मी खिशात ठेवला. मग कपडे काढून एका लहान खड्ड्यात ठेवले व ते वाऱ्याने उडून जाऊ नयेत म्हणून त्यांच्यावर एक धोंडा ठेवला. कंबरेला एक दगड बांधला व नदीच्या पात्रात विशेष खोल अशी जागा अंदाजाने हेरून आता पाण्यामध्ये उडी मारणार एवढ्यात पाठीमागून...एका संन्यासी बाबांनी येऊन मला मागे ओढले व ते संन्यासी बाबा मला असे म्हणाले की, "अरे मूर्खा ! मला सर्व काही ठाऊक आहे. सत्याचा नेहमीच विजय होतो. तू निर्दोष असून आत्महत्त्या करावयाला निघाला आहेस ! खरा गुन्हेगार तर केव्हाच सापडला आहे. तो आपल्या कर्मांची फळे

भोगणार आहे. तू निर्दोष आहेस हे तुझ्या कंपनीला पटले आहे. तुझे निर्दोषित्व सिद्ध झाले आहे. तुझ्या शोधासाठी कंपनीने आपली माणसे सगळीकडे पाठविली आहेत. तू आत्ताच मोरटक्का स्टेशन-वर जा. तेथे तुझ्या शोधात असलेले तुझे वरिष्ठ अधिकारी व त्यांच्या ताब्यात असलेला खरा गुन्हेगार हे तुला भेटतील. त्यांना भेटून झालेली सर्व हकीकत सांग."

त्या संन्याशी बाबांच्या शब्दावर प्रथम माझा विश्वास बसेना. असे अघटित घडले तरी कसे ? माझे एक मन असे म्हणाले की, आपली वंचना होत आहे ? पण दुसरे मन असे सांगत होते की, नाही ! संन्यासी कधी खोटे बोलत नाहीत खोटे सांगावयाचे त्यांना काही कारणच नाही. मला भेटलेले संन्यासी खोटे सांगणार नाहीत असे मला वाटू लागले. त्यांच्या प्रत्येक शब्दामध्ये आत्मविश्वास आणि नि:स्वार्थीपणा भरलेला होता. त्या अवस्थेत त्या संन्याशांना नमस्कार करण्याचेही भान मला राहिले नाही. मी दगडाखाली ठेवलेले माझे कपडे घेऊ लागलो. कपडे घेऊन मी मागे वळून पाहतो; तर ते संन्यासी बाबा दिसेनासे झाले. जवळपास कोठेही त्यांचा ठावठिकाणा लागेना. भ्रमिष्टासारखा मी त्यांना इकडे तिकडे शोधण्याचा प्रयत्न केला; पण व्यर्थ. ते जसे आले तसे कोठे तरी निघून गेले होते.

संन्यासी बाबा एकाएकी नाहीसे झाल्यावर मोरटक्का स्टेशनवर जाता जाता माझ्या मनात असे विचार आले की, 'आपण आत्महत्त्या करण्यास गेलो खरे; परन्तु आपली दैवगती काही वेगळीच दिसते. आपली बेअब्रू होऊन आत्मघाताचा अपमृत्यू आपल्या दैवास मान्य नाही हेच खरे ! असे जर नसते; तर सन्यासी-बाबांनी अकस्मात् प्रकट होऊन आपणास मृत्यूच्या मुखातून परत खेचून आणले नसते व आपणास असे मोरटक्का स्टेशनवर धाडलेही नसते." शेवटी या विचारांच्या तंद्रीमध्येच त्या संन्याशीबाबांच्या वचनावर विश्वास ठेवून मी मोरटक्का स्टेशन गाठले.

स्टेशनावर गर्दी होती. मुंबईला जाणारी गाडी येण्याची वेळ झाली होती. माझे जवळ जवळ संपूर्ण वेषांतर झाले होते. अंगावरील कपडे मळके व जीर्ण झाले होते. दाढी व मिशा मुद्दामच वाढविलेल्या होत्या. त्यामुळे माझी अवस्था एखाद्या बैराग्यासारखीच झाली होती. परिचित माणसानेही मला त्या वेषात ओळखले नसते. तरीसुद्धा मी भीतभीतच स्टेशनमध्ये प्रवेश केला व फलाटावर जाऊन उभा राहिलो. मुंबईची गाडी येऊन थांवल्यावर मी प्रत्येक डब्यामध्ये डोकावून पाहू लागलो. अखेर शेवटच्या डब्यात जेव्हा बेडचा घातलेल्या अवस्थेमध्ये माझ्या एकवेळच्या जिवश्च कंठश्च आरोपी मित्राला पाहिले तेव्हा माझा संन्यासीबाबांच्या वचनावर विश्वास बसला व माझा आनंद गगनात मावेना. त्या अवस्थेत मित्राला पाहताच माझ्या डोक्यावरील सर्व ओझे उतरले गेले. मी एकदम निर्धास्तपणे पहिल्या वर्गाच्या डब्यासमोर फलाटावर येरझारा घालू लागलो. त्या डब्यामध्ये माझे वरिष्ठ अधिकारी बसले होते. त्यांचे माझ्याकडे लक्ष गेले; परन्तु माझ्या वेषभूषेमुळे व माझा बदलेला अवतार पाहून मी प्राणशंकरच आहे असा त्यांना प्रथम विश्वासच वाटेना. त्यामुळे प्रथम त्यांनी मला ओळखले नाही. परन्तु शेवटी माझ्या चालीवरून माझ्या अधिकाऱ्यांनी मला ओळखले व ते डब्यातून खाली उतरले. त्यांनी ज्यावेळी पुन्हा एकदा माझ्याकडे निरखून पाहिले, त्यावेळी त्यांना माझ्याबद्दल खात्री पटली व त्यांनी मला प्रेमातिशयाने मिठी मारली.

त्यानंतर त्यांनी मला हाताला धरून डब्यात नेले व आपल्या शेजारी बसवून घेऊन मी निर्दोष असूनसुद्धा गृहत्याग केला म्हणून मला दोष दिला. त्यानंतर मी लगेच त्यांच्या बरोबर मुंबईला परतलो. पुढे माझ्या मित्रास माझ्या नजरेसमोरच सजा झाली. "करावे तसे

भरावे" या न्यायाने त्याला शिक्षा होऊन माझ्यावरील सर्व किटाळ दूर झाले. पुढे माझ्या फर्मच्या अधिकाऱ्यांनी मला आमच्या फर्मचे भागिदार बनविले. अशा तऱ्हेने एका शोकांतिकेचा आनंदपर्यवसायी शेवट झाला. या नाटयमय प्रसंगामुळे मी त्या संन्यासी महाराजांना विसरू शकत नव्हतो. त्यांचा शब्दन् शब्द खरा ठरला होता. ईश्वर दयाळू आहे. सत्याचा विजय झाला आहे; पण ते संन्यासी महाराज मला पुन्हा कधी भेटणार? संन्यासी कुठचे! "सत्यमेव जयते" हे चिरंतन तत्त्व मला पटवून देण्यासाठी संन्याशाच्या वेषात प्रत्यक्ष परमेश्वरच आला होता. मी अभाग्याने त्यांचे त्यावेळी पाय धरले नाहीत. ईश्वर दोन वेळा दर्शन देतो का?

मी पूर्वीची जागा सोडून या नवीन जागेत राहावयाला आलो. त्या संन्यासी महाराजांचा तो करारी; पण दयाळू चेहरा मी कधीच विसरू शकणार नाही. ज्या ज्या वेळी मी माझ्या गत-आयुष्याचा विचार करतो त्या त्या वेळी त्या महाराजांचा चेहरा माझ्या अंतःचक्षूंसमोर उभा राहतो. गणेशपंत! देवच आज आपल्या रूपाने मला भेटला. माझा प्राणदाता या फोटोच्या रूपाने तुमच्या घरात आज मला दिसला. काही करा पण मला त्यांच्या पायाशी घेऊन चला."

श्री. प्राणशंकर दव्यांची ही कळकळीची प्रार्थना ऐकून व श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन घेतल्याशिवाय अन्नपाणीही न घेण्याचा त्यांचा कृतनिश्चय पाहून लगेच दुसऱ्या दिवशी गं. भा. नर्मदाबाई श्री. प्राणशंकर दव्यांच्या बरोबर गरुडेश्वराला जावयाला निघाल्या. ते दोघेजण श्रीक्षेत्र गरुडेश्वरी श्रीस्वामीमहाराजांच्या पर्णकुटीजवळ येताच श्रीस्वामीमहाराज असे म्हणाले की, "काय ग नर्मदा! कोणाला बरोबर घेऊन आली आहेस? त्या आत्महत्याऱ्याला ना? कोठे आहे तो? बोलव त्याला इकडे." श्रीस्वामीमहाराजांनी असे

सांगताच गं. भा. नर्मदाबाई श्री. प्राणशंकर यांना घेऊन श्रीस्वामीमहाराजांकडे गेल्या. त्यांना पाहताच श्रीस्वामीमहाराज असे म्हणाले की, "आपण आत्महत्येसारख्या महापातकातून बचावला ही ईश्वराची मोठी कृपाच झाली. आत्महत्या हे महापातक असून देह न राहिल्यामुळे त्याचे प्रायश्चित्त घेऊन त्यातून मोकळेही होता येत नाही. उलट त्यामुळे अधम योनी प्राप्त होऊन त्यात वर्षानुवर्षे खितपत पडावे लागते. यासाठी संकटांमुळे डगमगून न जाता आपल्याकडून आत्महत्येसारखे महापाप कधीही घडणार नाही याकरिता नेहमी जागृत राहिले पाहिजे व आयुष्यात अखंड विवेकाच्या आणि विचाराच्या आश्रयानेच चालले पाहिजे. असे केले तरच माणसाचे आयुष्य सुखी व आनंदी होते."

श्रीस्वामीमहाराजांनी केलेला हा उपदेश श्री. प्राणशंकर यांनी मनाचे कान करून त्यात साठवून ठेवला व मोठ्या कृतज्ञ अंतःकरणाने त्यांना साष्टांग नमस्कार घातला.

वास्तविकपणे आत्महत्येच्या प्रसंगानंतर कितीतरी वर्षांनंतर श्री. प्राणशंकर यांनी श्रीस्वामीमहाराजांचे प्रत्यक्ष दर्शन घेतले होते. त्यावेळी पूर्वीच्या सर्व स्मृती जागृत झाल्यामुळे श्रीस्वामीमहाराजांसमोर लोटांगण घालून जेव्हा ते उभे राहिले तेव्हा त्यांच्या डोळ्यातून अश्रूंचा पूर वाहत होता व त्यांच्या चेहऱ्यावर अपरंपार कृतज्ञता व्यक्त होत होती. खरे तर अश्रूंनी डोळे भरून गेल्यामुळे काही क्षण ते श्रीस्वामीमहाराजांना नीट पाहूही शकले नाहीत. एक प्रकारे या प्रत्यक्ष दर्शनाच्या वेळी त्यांची भावसमाधीच लागली होती.

पुढे श्री. प्राणशंकर दवे हे श्रीस्वामीमहाराजांचे निष्ठावंत भक्त बनले. श्रीस्वामीमहाराजांच्या कृपेने त्यांची उत्तरोत्तर भरभराटच झाली. कालौघात त्यांचा मुलगा अमेरिकेमध्ये जाऊन इंजिनियर झाला व आनंदाने त्याने आपले उर्वरित जीवन व्यतीत केले.

पुढील हकीकतसुद्धा श्री. वासुदेवराव अनगरे यांनी परमपूजनीय श्रीगुळवणीमहाराज यांना पत्राने कळविली होती.

सन १९३१ मध्ये श्री. वासुदेवराव अनगरे संगीताचे पुढील शिक्षण घेण्यासाठी गायक शिरोमणी राजगायक पं. श्री. कृष्णराव शंकरराव पंडित यांच्याकडे ग्वाल्हेरला गेले होते. त्यांचा अभ्यासक्रम तीन वर्षांचा होता. श्री. अनगरे जेथे शिकावयाला गेले होते, त्या विद्यालयातच सुरुवातीला ते उतरले; पण तीन वर्षे तेथे राहावयाचे असल्यामुळे राहण्याची स्वतंत्र सोय असणे उत्तम असे त्यांना वाटत होते. चौकशीअंती विद्यालयाच्या समोरच्याच घरात उत्तम जागा भाड्याने मिळण्यासारखी आहे असे त्यांना कळले. घरमालक श्री. गंगाधरपंत आळंदीकर महाराष्ट्रीय ब्राह्मण असून सज्जन गृहस्थ आहेत असे त्यांना माहीत झाले. जागेसंबंधी चौकशी करावयासाठी दुसऱ्या दिवशी श्री. वासुदेवराव अनगरे श्री. आळंदीकरांच्या घरी गेले. त्यांचे घर ऐसपैस व दुमजली होते. घरासभोवार झाडे लावलेली होती. समोर एक औदुंबराचे झाडही होते. ते पाहून श्री. वासुदेवराव यांना आनंद झाला. श्री. आळंदीकरांना भेटून त्यांनी जागेविषयी चौकशी केली. जागा भाड्याने मिळण्यासारखी होती. भाडे दोन रुपये महिना असे होते. श्री. वासुदेवराव यांना जागा पसंत पडली. त्यांनी एक महिन्याचे भाडे आगाऊ देऊन जागेची साफसफाई करण्यासाठी आठ आणे दिले व आपण दुसऱ्या दिवशी सकाळी सामान घेऊन राहावयाला येतो असे सांगितले.

एवढे बोलणे होऊन श्री. वासुदेवराव निघाले, तेव्हा त्यांना श्री. आळंदीकरांनी असे विचारले की, "आपणाबरोबर कोण कोण मंडळी आहेत ?" त्यावेळी श्री. वासुदेवराव त्यांना असे म्हणाले की, "मी एकटाच आहे. येथे कृष्णराव पंडित यांच्याकडे गायन शिकावयाला आलो आहे. तसे आमच्या घरी मोठे कुटुंब आहे. आई,

वडील, पत्नी, आजी, मुलगा आणि इतर नातलग अशी २५।३० माणसे घरी आहेत; पण शिक्षणासाठी मी एकटाच येथे तीन वर्षे राहाणार आहे."

हे उत्तर ऐकताच घरमालक श्री. गंगाधरपंत आळंदीकर हे एकदम संतापले व अद्वातद्वा बोलताना श्री. वासुदेवराव यांना असे म्हणाले की, "संगीत शिकावयाला तीन वर्षे तुम्ही एकटेच येथे राहाणार तर? तुमचे आमचे जमायचे नाही. तुमच्यासारख्या उपटसुंभांना राहावयाला देण्यासाठी माझ्यापाशी जागा नाही. माझ्या घरी तरण्याताठ्या लेकीसुना आहेत. आपले पैसे परत घ्या व चालू लागा. उद्या येथे येण्याची तसदी घेऊ नका." श्री. गंगाधरपंत आळंदीकर श्रीमंत होते आणि श्रीमंतीच्या तोऱ्यातच ते बोलत होते.

त्यावेळी श्री. वासुदेवराव अनगरे यांचे वय २४–२५ वर्षांचे असेल. श्रीस्वामीमहाराजांच्या कृपेमुळे त्यांचा जन्म झाला असल्या-मुळे त्यांच्या अंगी सहनशीलता व शालीनता होती. त्यामुळे ते शांतपणाने श्री. गंगाधरपंतांना असे म्हणाले की, "आपण माझ्या वडिलांसारखे आहात; पण एक गोष्ट आपण लक्षात घेतली पाहिजे की, परदेशातून आलेली सर्वच मुले वाईट असतात हा आपला गैरसमज आहे. तसे जर आपल्या मनात असेल तर ते काढून टाका. हाताची पाचही बोटे सारखी नसतात."

श्री. वासुदेवराव अनगरे असे म्हणताच श्री. गंगाधरपंतांच्या तळपायाची आग मस्तकाला गेली व ते त्यांना असे म्हणाले की, "मला तत्त्वज्ञान शिकवू नकोस व जास्त शहाणपणा करू नकोस. प्रथम घराबाहेर हो, नाहीतर भैय्याला बोलावून धक्के मारून तुला घराबाहेर काढावे लागेल."

त्यावेळी श्री. वासुदेवराव त्यांना शांतपणे एवढेच म्हणाले की, "पंत! तशी वेळ मी येऊ देणार नाही. मी जातो. आपणास त्रास

दिला याबद्दल क्षमा करा." असे म्हणून श्री. वासुदेवराव अनगरे विद्यालयात परत आले व खिन्न होऊन बसले त्यांना विद्यालयात जास्त दिवस राहता येणे शक्य नव्हते आणि ग्वाल्हेरला ओळख नसल्यामुळे भाड्याची जागा लवकर मिळणेही शक्य नव्हते. आता काय करावयाचे ? त्यावेळी त्यांच्या शेजारीच त्यांचे सहाध्यायी श्री. सोनूभैय्या मोरघोडे वसले होते. त्यांनी श्री. वासुदेवरावांना सचिंत बसण्याचे कारण विचारले. त्यावेळी त्यांनी थोड्याच वेळापूर्वी श्री. गंगाधरपंत आळंदीकरांच्या घरी घडलेली सर्व हकीकत श्री. सोनूभैय्यांना सांगितली.

ही सर्व हकीकत ऐकताच श्री. सोनूभैय्या त्यांना असे म्हणाले की, "चिंता कसली, मी सोय करतो तुमची ! गावात आमच्या मालकीचे राममंदिर आहे. वडिलांना सांगून मी तुमची जागेची सोय करीन. मंदिराच्या पडवीत तुम्ही स्वखर्चाने बांबूची एक लहानशी खोली तयार करून घेतली; तर उत्तम जागा होईल. शुभस्य शीघ्रम. आत्ताच जाऊन पाहू या का ? "

"चला" म्हणून श्री. वासुदेवराव श्री. सोनूभैय्यांच्या बरोबर गावात श्रीराममंदिरात गेले. श्रीराममंदिर विद्यालयापासून दीड मैलावर होते. जवळच श्रीस्वामीमहाराजांनी स्थापन केलेले श्रीदत्तमंदिरही होते. यापेक्षा अधिक चांगली सोय ती काय असणार ? श्री.सोनूभैय्यांच्या वडिलांच्या परवानगीने त्यांनी पाच रुपयात उत्तम लांबलचक अशी बांबूची खोली बनवून घेतली व ते तेथे राहू लागले.

भल्या पहाटे उठून श्रीस्वामीमहाराजांचे ध्यान करून संगीत साधना करावयाची व मग स्नान आटोपून देवदर्शन करावयाचे असा श्री. वासुदेवराव यांचा सकाळचा कार्यक्रम होता. श्रीस्वामीमहाराजांनी स्वतःच स्थापन केलेल्या श्रीदत्तमंदिरामध्ये ते दररोज जात. श्रीस्वामीमहाराजांचे त्या मंदिरामध्ये अस्तित्व आहे अशी

त्यांची भावना होती. असे चार महिनें गेले आणि श्रीरामनवमीचा उत्सव आला. या श्रीराममंदिरात श्रीरामनवमीचा उत्सव धूम-धडाक्याने साजरा होत असे. त्या उत्सवात उत्तम गवई श्रीराम-मंदिरामध्ये संगीत सेवा करून जात. श्रीरामनवमीच्या दिवशी नेहमीप्रमाणे पहाटे श्री. वासुदेवराव आपल्या खोलीत तंबोरा घेऊन रियाज करीत होते. त्यांचा आवाज थोडा बारीक होता. दुरून ऐकणाऱ्याला कोणीतरी बाईच गात आहेत असे वाटत असे. श्रीरामनवमीच्या निमित्ताने श्री. गंगाधरपंत आळंदीकर सकाळीच देवदर्शनासाठी श्रीराममंदिरात आले होते. त्यांचा व श्री. मोरघोडे यांचा चांगलाच परिचय होता. रियाज करीत असलेल्या श्री. वासुदेवरावांचा आवाज ऐकून श्री. गंगाधरपंत आळंदीकर श्री. मोरघोडे यांना असे म्हणाले की, " गेली ऐंशी वर्षे श्रीरामनवमीचा उत्सव येथे साजरा होत आहे. मोठमोठे पंडित व खाँसाहेब गाऊन गेले; पण या वर्षी ही नायकीण कोण आणली आहे गावयाला ?

हे ऐकताच श्री. गंगाधरपंत यांची थोडी चेष्टा करावी असे वाटून श्री. मोरघोडे त्यांना असे म्हणाले की, " काय करावे बुवा ! एक बाई आली आणि आज आपले गायन ठेवा असा आग्रह करू लागली. देवांची सेवा ! नाही कसे म्हणता येणार ? आज तिचेच गायन होणार आहे. " त्यावेळी श्री. गंगाधरपंत त्यांना असे म्हणाले की, " बाई कशी आहे ती तरी पाहू या "

" अहो नायकीणच आहे. खात्री करून घ्यावयाची असेल तर पाहून या " असे म्हणून श्री. मोरघोडे यांनी श्रीगंगाधरपंतांना श्री. वासुदेवराव यांच्या खोलीजवळ नेले. श्री. गंगाधरपंतांना बाई ऐवजी एक तरुण पुरुष गात असलेला दिसला. चेहरा कोठे तरी पाहिला आहे असे त्यांना वाटले. ते अधिक जवळ गेले आणि त्यांनी श्री. वासुदेवराव यांना ओळखले. चार महिन्यांपूर्वी आपण ज्यांना घरातून

काढून लावले तोच हा तरुण होय, याची त्यांना खात्री पटली.

श्री. वासुदेवराव अनगरे रोज श्रीस्वामीमहाराजांच्या फोटो-समोर बसून संगीत साधना करीत असत. त्या दिवशीही त्यांची नेहमीप्रमाणेच फोटोसमोर वसून गाण्याची मेहनत चालू होती. कोणाच्या फोटोसमोर बसून हा तरुण साधना करीत आहे, यासंबंधी श्री. गंगाधरपंत यांना कुतूहल वाटून तो पाहण्यासाठी ते आणखी पुढे गेले. तो फोटो प. प. श्रीवासुदेवानंदसरस्वती टेंबेस्वामी-महाराजांचा आहे हे लक्षात येताच त्याला साष्टांग नमस्कार घालून श्री. गंगाधरपंत श्री. वासुदेवराव यांना असे म्हणाले की, "मी तुझा अपराधी आहे. मला क्षमा कर." त्यावेळी श्री. वासुदेवराव डोळे मिटून गात होते. हे शब्द ऐकताच त्यांच्या तंद्रीचा भंग झाला. त्यांनी डोळे उघडून पाहताच त्यांना श्री. गंगाधरपंत आळंदीकर श्रीस्वामीमहाराजांच्या फोटोसमोर साष्टांग नमस्कार घालीत असलेले दिसले."

श्री. वासुदेवराव यांचे आपल्याकडे लक्ष गेले असे पाहून ते पुन्हा त्यांना असे म्हणाले की, "मला क्षमा कर! मी तुला घरातून हाकलून दिले होते. माझ्या हातून अक्षम्य अपराध घडला आहे. खरोखर, हाताची पाचही बोटे सारखी नसतात, हे जे तू त्या दिवशी मला म्हणालास, ती गोष्ट आज मला पूर्णपणे अनुभवास आली व पटली.

या प्रकारामुळे श्री. वासुदेवराव क्षणभर हतबुद्ध झाले. खरे म्हणजे चार महिन्यांपूर्वी श्री. गंगाधरपंतांच्या घरी घडलेला प्रकार ते विसरूनही गेले होते. त्यामुळे श्री. गंगाधरपंत श्रीस्वामी-महाराजांच्या फोटोसमोर साष्टांग नमस्कार घालताना पाहून त्यांना फार आश्चर्य वाटले. त्या दिवशी श्री. गंगाधरपंत श्री. वासुदेवरावांना एकेरी नावाने संबोधित होते. त्या एकेरी संबोधनात जिव्हाळा व जवळीक होती. श्री. अनगरे यांना हा हृदयपालट जाणवला.

त्यावेळी श्री. वासुदेवराव त्यांना असे म्हणाले की, “क्षमा कशाची मागता ? तुमच्या जागी दुसरा कोणी असता; तर तो सुद्धा असाच दक्षतेने वागला असता. खरे म्हणजे मी तो प्रसंग विसरूनही गेलो होतो.”

हे ऐकताच श्री. गंगाधरपंत त्यांना असे म्हणाले की, “आता यापुढे तू या खोलीत राहावयाचे नाही. माझ्या घरातील जागा तुझ्यासाठी तयार आहे. मी आजच मुलाला गाडी घेऊन पाठवतो. तू त्याच्या बरोबर सर्व सामान घेऊन घरी ये.”

त्यांचे हे म्हणणे ऐकून श्री. वासुदेवराव त्यांना असे म्हणाले की, “ही तसदी का घेता ? येथे माझी चांगली सोय झालेली आहे. सोनूभैय्या आणि त्याचे वडील मला परकेपणाने वागवीत नाहीत. माझ्या सर्व सोयी-गैरसोयींकडे ते जातीने लक्ष देतात. शिवाय हा या मंदिराचा परिसरही अत्यंत पवित्र असा आहे. संगीत साधना करावयाला याहून दुसरे अधिक चांगले ठिकाण मिळणार नाही. शिवाय मी येथे एकटा आहे हे आपणास माहीत आहे. त्यामुळे आपण मला आपल्या घरी नेण्याचा आग्रह का धरीत आहात हेच मला कळत नाही.”

श्री. वासुदेवरावांचे हे म्हणणे ऐकताच श्री. गंगाधरपंत एकदम त्यांना असे म्हणाले की, “ते काहीही असले; तरी एक क्षणभरही मी तुला येथे राहू देणार नाही आणि हे पाहा याहून उत्तम जरी नसले; तरी एवढेच पवित्र ठिकाण माझ्या घरी आहे. श्री. मोरघोडे पितापुत्रांच्या चांगुलपणाबद्दल प्रश्नच नाही. श्रीस्वामीमहाराजांच्या या फोटोने तुझ्या माझ्यात जवळचे नाते निर्माण केले आहे. त्या नात्याने तुझ्या वडिलांचा अधिकार स्वतःकडे घेऊन मी तुला असे सांगतो की, या पुढे तू माझ्या घरी राहावयाचे. आता तू कोणत्याही

प्रकारे अनमान करू नकोस. या सर्व गोष्टींचे कारण तू घरी आल्यावर तुला सांगीन. ते येथे सांगण्यासारखें नाही."

श्री. वासुदेवरावांना त्यांचा शब्द मोडणे जिवावर आले. श्रीस्वामीमहाराजांच्या नावाचा उल्लेख ही श्री. गंगाधरपंतांनी त्यांना घातलेली एक प्रकारे शपथच होती.

श्री. गंगाधरपंतांनी मुलाला गाडी घेऊन पाठविले व श्री. वासुदेवराव यांना घेऊन आपल्या घरी गेले. अशा रीतीने श्री. वासुदेवरावांचा पुन्हा एकदा श्री. गंगाधरपंतांच्या घरात प्रवेश झाला. हा प्रवेश मानाचा व प्रेमापोटी होता. श्री. वासुदेवराव यांना माडीवर खोली देण्यात आली. दोन दिवसांनी श्री. गंगाधरपंतांनी आपल्या घरच्या सर्व मंडळींचा श्री. वासुदेवराव यांच्याशी परिचय करून दिला. त्यांचे बारापंधरा माणसाचे कुटुंब होते. तीन मुलगे, तीन सुना, दोन मुली, दोनतीन नातवंडे, स्वतः ते व त्यांच्या सौभाग्यवती अशी सर्व मंडळी घरात होती. त्यानंतर आपल्या सौ. मंडळींकडे व घराशेजारील औदुंबराच्या वृक्षाकडे बोट दाखवून ते असे म्हणाले की, "काही वर्षांपूर्वी माझ्या पत्नीस जेव्हा ब्रह्मसमंधाने पछाडले होते, तेव्हा त्या ब्रह्मसमंधास मुक्ती देऊन श्रीस्वामीमहाराजांनी हा औदुंबराचा वृक्ष आम्हा उभयतांना दिला व त्याचे पूजन करून त्याला प्रदक्षिणा घालण्याची आज्ञा माझ्या पत्नीस केली. त्यामुळे हा वृक्ष म्हणजे आम्हा उभयतांवरील श्रीस्वामीमहाराजांच्या असीम कृपेची खूणच आहे."

श्री. गंगाधरपंत आळंदीकर यांनी असे सांगताच श्री. वासुदेवराव अनगरे यांनी त्यांना असे विचारले की, "आपल्या मंडळींना ब्रह्मसमंधाने कशाकरिता पछाडले होते?" हा प्रश्न ऐकताच श्री. गंगाधरपंत त्यांना असे म्हणाले की, "थांब! तुला त्या संबंधीची सर्व सत्य हकीकत सांगतो."

ही सर्व हकीकत सांगताना श्री. गंगाधरपंत श्री. वासुदेवराव यांना असे म्हणाले की, " माझे लग्न लहानपणीच झालेले होते. माझा व्यवसाय भिक्षुकीचा असल्या कारणाने मला सरदार लोकांच्या घरी भिक्षुकीसाठी वारंवार जावे लागत असे. मी वयाच्या २० व्या वर्षी एका पौर्णिमेच्या रात्री श्रीसत्यनारायणाची पूजा सांगावयाला ग्वाल्हेरच्या किल्ल्यावर एका सरदाराच्या घरी गेलो होतो. पूजा वगैरे सर्व उरकून घरी परतण्यास मला रात्रीचे साडे दहा वाजले. घरी परतण्याचा मार्ग राजवाड्याच्या पाठीमागून होता. त्यावेळी माझी पत्नी माहेरी गेली असल्यामुळे मी घरी एकटाच होतो. घरी जावयाची तशी काही घाई नसल्यामुळे मी सावकाश घरी चाललो होतो. राजवाड्याचा परिसर सोडल्यावर वाटेत एक टांगा उभा असलेला मला दिसला. टांग्याकडे सहज नजर टाकली तेव्हा त्यात तीन माणसे बसलेली मला दिसली. मी टांग्याजवळ येताच तीन धिप्पाड लोक टांग्यातून खाली उतरले व त्यांनी मला पकडून दरडावून असे विचारले की, " काय रे बामणा ! तुला चंडीपाठ येतो का ? " भिक्षुकीचा व्यवसाय असल्यामुळे सप्तशतीची पोथी माझ्या नेहमीच्या वाचनामध्ये होती. जवळजवळ सर्व पाठच झाली होती. त्यामुळे मी त्यांना " हो " म्हणून उत्तर दिले. माझे होय असे उत्तर ऐकताच त्या तिघांनी माझे डोळे बांधले व ते मला असे म्हणाले की, " घाबरू नकोस, तू फक्त आमच्याबरोबर चल. आम्ही काही तुला मारणार नाही आम्हाला रेड्याचे बलिदान करावयाचे आहे म्हणून आम्ही तुला नेत आहोत. तरी तू आम्हाला बलिदानाचे मंत्र सांगून आमची पूजा यथासांग पूर्ण करून दे. तू जर हे आमचे काम केलेस; तर आम्ही तुला सुखी करू. "

मला असे सांगून टांगा चालू झाला. साधारणपणे एक-दीड तास प्रवास केल्यावर टांगा थांबला. त्यातून डोळे बांधलेल्या अवस्थेतच

त्यांनी मला खाली उतरविले व ते मला एका भुयारात घेऊन गेले. तेथे गेल्यावर जेव्हा त्यांनी माझ्या डोळ्यावर बांधलेले फडके सोडले तेव्हा डोळे उघडताच मला माझ्या समोरच काळ्या पाषाणाची व अष्टभुजा असलेली अशी कालिकेची मूर्ती दिसली. त्या मूर्तीच्या दोन्ही बाजूंना दोन मशाली जळत होत्या. त्या पलित्यांच्या प्रकाशात ती मूर्ती मला फारच उग्र व भयानक अशी वाटली; कारण त्या मूर्तीच्या मुखातून लाल जीभ बाहेर लोंबत होती व तिचे विशाल नेत्र चमकत होते.

त्या भुयारात सगळीकडे पूजा द्रव्यांच्या आणि पलित्यांच्या धुराचा एक उग्र दर्प भरून राहिला होता. कसला तरी चमत्कारिक, भुंग्यांच्या आवाजासारखा आवाज गुहेच्या भिंती भिंतीतून येत आहे असे वाटत होते. मी एव्हाना स्वतःला सावरले होते. मूर्ती पाहून जरी मी प्रथम दचकलो होतो ; तरी बलिदानाची आगाऊ सूचना असल्यामुळे मी घाबरलो नाही. देवीसमोर एक मोठा रेडा खांबाला बांधलेला होता. त्याच्या डोक्याला शेंदूर फासला होता. दरोडेखोरांच्या सूचनेप्रमाणे मी बलिदानाचे मंत्र नजर खाली घालून म्हटले. प्राणीहत्येचे ते अघोर कृत्य मला पाहवले नसते. मंत्र संपले आणि "जयकाली" च्या घोषात मारेकऱ्यांनी महिषाचे डोके एका घावात धडावेगळे केले. मी मान वर करून पाहिले तेव्हा रेडयाचे डोके देवीच्या पायाजवळ पडले होते आणि पाय झाडत धड एका बाजूला पडले होते. तेथे बरेच डाकू उभे होते. सर्वांनी बळीच्या रक्ताचा टिळा आपल्या कपाळी लावला. अगोदरच धूप आणि पलिते यांच्या उग्रवासाने ती गुहा कोंदटली होती, त्यात आता मारलेल्या रेडयाच्या रक्ताचा चमत्कारिक दर्प भरून राहिला होता. ते दृश्य पाहताच मोबदल्याची अपेक्षा न बाळगता मी आसनावरून उठलो.

त्यानंतर त्यांनी माझे डोळे पुन्हा बांधले व त्याच गाडीतून राजवाड्याच्या मागे आणून सोडले. मग त्यांनी माझे डोळे सोडले व मला १२५ = ०० रु. दक्षिणा दिली आणि ते मला असे म्हणाले की, " आम्ही सर्व दरोडेखोरे आहोत. दर पौर्णिमेला आम्ही देवीला रेड्याचा बळी देतो. त्याकरिता आपण दर पौर्णिमेला येथे येऊन आम्हाला भेटत चला व आमच्या बरोबर आजच्याप्रमाणे येऊन पूजा सांगत जा. दरवेळी आम्ही आपणाला ही एवढी रक्कम दक्षिणा म्हणून देऊ. मात्र यासंबंधी आपण कोणासही काहीही सांगितले; तर त्याचे परिणाम चांगले होणार नाहीत, हे लक्षात ठेवा. शेवटी आम्ही डाकू आहोत हे कधीही विसरू नका."

त्या पैशांच्या मोहाने पुढे मी दर पौर्णिमेला दरोडेखोरांच्या गुहेत जावयाचे ठरविले. शिवाय माझ्या जीवाला धोका नाही म्हणून त्यांनी मला देवीसमोर आश्वासन दिले होते. तेव्हा हे साहस करावयाला काहीच हरकत नाही असे मला वाटले. साहसाशिवाय लक्ष्मी प्राप्त होत नाही, अशीच त्यावेळी माझी मनोधारणा होती. दर पौर्णिमेला मला सव्वाशे रुपये दक्षिणा व चांदी–सोन्याची काही तरी मूल्यवान वस्तू भेट म्हणून मिळत होती.

असा हा क्रम बारा वर्षे चालला. मी त्या पैशावर श्रीमंत झालो. बाराव्या वर्षाच्या शेवटी दरोडेखोरांनी मला असे सांगितले की, " पुढील महिन्यातील पौर्णिमा ही आमची येथील शेवटची पौर्णिमा आहे. त्यानंतर आम्ही हे ठिकाण सोडून दुसरीकडे जाणार आहोत; कारण १२ वर्षांपेक्षा जास्त काळ आम्ही एका ठिकाणी राहू शकत नाही. येत्या पौर्णिमेला आपण आपल्या मंडळींना बरोबर घेऊन या. घाबरू नका. जसा तुम्हाला आम्ही धोका दिला नाही तसेच तुमच्या मंडळींनाही आमच्या पासून धोका होणार नाही. कालिमातेच्या भावनेने त्यांना पण काही देण्याची आमची इच्छा आहे; तरी

संकोच व अनमान करू नका." त्यांच्या म्हणण्याप्रमाणे पुढील महिन्याच्या पौर्णिमेला मी आपल्या पत्नीला घेऊन दरोडेखोरांच्या गुहेत गेलो. दरोडेखोरांनी माझ्या पत्नीची कालिमातेच्या भावनेने पूजा करून तिला पुष्कळ सोन्याचे दागदागिने, रत्नांचे बहुमूल्य अलंकार, चांदीची भांडी व इतर हजारो रुपये किमतीचा माल दिला. तिच्या बरोबर त्यांनी माझीही भरपूर संभावना केली. त्या पैशावरच मी गर्भश्रीमंत झालो व आत्ताचे माझे सर्व ऐश्वर्य त्याचेच आहे.

अशा रीतीने जरी मला पैसे मिळत होते; तरी भीतीचे दडपण शिरावर घेऊन मी वावरत असे. अखेर बारा वर्षांचे ते भीतीचे पर्व एकदा संपले. आता भिण्याचे काही कारण नव्हते आणि पोटासाठी धडपड करण्याचीही गरज नव्हती. एक एक करता करता माझ्या पत्नीच्या अंगाखांद्यावर नेहमी मूल्यवान अलंकार व वस्त्रे दिसू लागली. भिक्षुकीच्या निमित्ताने माझा सरदार घराण्यांशी संबंध येत असल्यामुळे माझ्या श्रीमंतीबद्दल लोकांना आश्चर्य वाटले नाही.

एकदा घरातील एका कार्याच्या निमित्ताने माझ्या मंडळींनी त्यातील काही ठेवणीतील सुंदर व मूल्यवान अलंकार अंगावर घातले. यापूर्वी ते अलंकार त्यांनी कधी वापरले नव्हते. बरीच पाहुणे मंडळी जमली होती. माझी पत्नी अंगावरील त्या दागिन्यांमुळे सर्वांमध्ये उठून दिसत होती; पण नवीन अलंकार घातल्याबरोबर ती वरळू लागली व हातवारे करू लागली. सगळीकडे एकच गोंधळ उडाला सर्वांनी ओळखले की, हिला पिशाच्चबाधा झाली आहे.

त्यानंतर माझ्या पत्नीची ही पिशाच्चबाधा कशी दूर करावयाची हीच एक मोठी विवंचना मला लागून राहिली. वास्तविक पाहता नुकताच कोठे मी एका काळजीतून मुक्त होत होतो, तेवढ्यात हा दुसरा घोर मला लागला ! "जगीं सर्व सुखी असा कोण आहे ?" असे जे म्हटले आहे, तशी, माझी स्थिती झाली. पत्नीला पिशाच्च

बाधेतून मुक्त करण्यासाठी मी विपुल पैसा खर्च करून अनेक उपाय केले. ठिकठिकाणी यात्रा केल्या. ज्या जागी गेल्यावर पिशाच्चबाधा जाते असे स्थानमाहात्म्य आहे, अशा सर्व ठिकाणी मी पत्नीला घेऊन गेलो. बाधा झालेल्या माझ्या या पत्नीच्या मानसिक आरोग्यासाठी मी दहा वर्षे नाना उपाय केले; परन्तु इतके उपाय करूनही माझ्या मंडळींना बरे वाटले नाही व तिला पिशाच्चबाधा कोणत्या कारणामुळे झाली तेही मला कळले नाही. शेवटी मी पत्नीला घेऊन श्रीक्षेत्र गाणगापूर येथे गेलो व काही दिवस तेथे सेवेत राहिलो.

त्यावेळी एका रात्री मला स्वप्नात असा दृष्टान्त झाला की, "मी स्वतः वासुदेवानंदसरस्वती ह्या नावाने नर्मदाकिनारी वास्तव्य करीत आहे. तरी उद्या पहाटे सूर्योदयाच्या पूर्वी पत्नीसह माझी हद्द सोड; नाहीतर पत्नी गमावून बसशील." त्यावेळी माझ्याजवळ पुढील प्रवासासाठी पुरेसे पैसे नसल्यामुळे गाणगापूर सोडून जाण्यास चोवीस तासांची तरी मुभा मिळावी म्हणून मी मोठ्या आर्ततेने श्रीनृसिंहसरस्वतीस्वामीमहाराजांच्या म्हणजे श्रीदत्तात्रेयांच्याच चरणी प्रार्थना केली; परन्तु त्यांनी माझी विनंती मान्य केली नाही. उलट श्रीदत्तात्रेयांनी मला असे सांगितले की, "उद्या सूर्योदयापूर्वीच तू माझी लवकर हद्द सोड. पुण्याला तुझी सोय केली आहे."

अशी श्रीनृसिंहसरस्वतीमहाराजांची आज्ञा झाल्यामुळे त्याप्रमाणे दुसऱ्या दिवशी सूर्योदय होण्यापूर्वी मी पत्नीला बरोबर घेऊन गाणगापूर सोडले. नंतर मी पत्नीस घेऊन गाडीने पुण्यापर्यंत्त आलो व आता पुण्याला आपली देव काय सोय करणार हा विचार करीत गाडीतून उतरून स्टेशनवर उभा राहिलो. इतक्यात समोरच्या गाडीत त्यावेळी राज्य करीत असलेले देवास संस्थानचे संस्थानिक दिसले. त्यांचे नातलग ग्वाल्हेरला राहत असल्यामुळे त्यांनी मला ओळखले व मला जवळ बोलावून असे विचारले की, "पंत! आपण

ग्वाल्हेरला केव्हा जाणार ? " त्यांचा हा प्रश्न ऐकताच मी त्यांना असे म्हणालो की, " पुढच्या आठवड्यातच मी ग्वाल्हेरला जाणार आहे. " त्यावेळी ते मला असे म्हणाले की, " वा ! फारच उत्तम ! माझे एक काम करा. हे ३०० = ०० रुपये घ्या व आमच्या घरी पोहोचते करा. " अशा प्रकारे दृष्टान्ताप्रमाणे मला पैसे मिळून माझी पूर्ण सोय देवांनी करून दिल्यामुळे दृष्टान्तावर माझा पूर्ण विश्वास बसला.

त्यावेळी माझ्या मनात असा विचार आला की, " श्रीक्षेत्र-गरुडेश्वरी असलेली श्रीवासुदेवानंदसरस्वतीस्वामीमहाराजांची मूर्ती ही प्रत्यक्ष श्रीदत्तावतारीच आहे व आपण पत्नीला घेऊन त्यांच्याकडे गेलो की, आपल्या पत्नीची पिशाच्च बाधा दूर झाल्याशिवाय राहणार नाही. " असा विचार मनात उद्भवताच मी पुण्यास न उतरता सरळ श्रीक्षेत्रगरुडेश्वरी आलो.

राजपिपळ्याहून निघून मी पत्नीला घेऊन नर्मदाकिनारी आलो. तेथे अलीकडच्या किनाऱ्यावर होडी केली व नर्मदा पार करून गरुडेश्वरच्या किनाऱ्यावर आलो ; पण तेथे गेल्यावर माझी पत्नी काही केल्या होडीतून खाली उतरेना. विनंत्या, धाकधपटशा इत्यादि सर्व उपाय करून पाहिले; पण माझी पत्नी काही केल्या होडीतून खाली उतरावयाला तयार होईना. शेवटी नावाड्यांना माझ्या पत्नीकडे लक्ष ठेवावयाला सांगून मी नावेतून उतरून वर श्रीस्वामी-महाराजांच्या दर्शनाला गेलो व त्यांना साष्टांग नमस्कार घालून सर्व हकीकत त्यांच्या कानी घातली.

त्यावेळी श्रीस्वामीमहाज मला असे म्हणाले की, " नर्मदेच्या हद्दी-मध्ये मी काही करू शकत नाही. बाईंना येथे वर घेऊन या. मगच इलाज होईल. " असे म्हणून श्रीस्वामीमहाराजांनी तेथे असलेल्या लोकांना मला साहाय्य करण्यास सांगितले. माझ्या पत्नीला होडीतून

धरून वर आणावयाला सव्वीस'माणसे लागली. ते पाहताच माझी अशी खात्री झाली की, प्रतिकाराची ताकद माझ्या पत्नीची नसून ती तिला छळणाऱ्या पिशाच्चाची आहे. दत्तावतार प. प. श्रीवासुदेवानंद-सरस्वतीस्वामीमहाराज यांच्या समोर यावयाला ते पिशाच्च घाबरत होते. त्याला काय कल्पना की, श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाने त्याला सुद्धा मुक्ती मिळणार आहे म्हणून ! माझ्या पत्नीला श्रीस्वामीमहाराजांसमोर आणल्यावर त्यांनी आपल्या कमंडलूमधील पाणी तिच्या अंगावर शिंपडले. तावडतोब ते पिशाच्च माझ्या पत्नीच्या तोंडून बोलू लागले.

त्यावेळी ते पिशाच्च असे म्हणाले की, "या बाईंनी आपल्या अंगावर जे दागिने घातले आहेत, ते दागिने माझे आहेत. त्यामुळेच मी तिला धरले आहे. आपल्या हातून मला या योनीतून मुक्ती मिळावी अशी माझी फार तीव्र इच्छा आहे; परन्तु त्यापूर्वी आपण ह्या गृहस्थाकडून असे वचन घ्या की, त्याने दरवर्षी माझ्यासाठी काहीतरी करावयास हवे. असे केले म्हणजे मी तिला पुन्हा कधीही त्रास देणार नाही." असे म्हणून त्या पिशाच्चाने त्या दागिन्यांचा सर्व इतिहास श्रीस्वामीमहाराजांपुढे निवेदन केला व मला पैसा कसा मिळाला तेही श्रीस्वामीमहाराजांना सांगितले. हे ऐकताच श्रीस्वामी-महाराज त्या पिशाच्चास असे म्हणाले की, "जे झाले ते झाले. यांनी काही तुझ्या दागिन्यांचे अपहरण केलेले नाही. तेव्हा तू आता या बाईंना सोडून जा. तुझी जी काही इच्छा असेल ती या बाईंचे यजमान पूर्ण करतील."

पिशाच्चाला त्या योनीतून मुक्ती पाहिजे असल्यामुळे त्याने श्रीस्वामीमहाराजांचे सर्व म्हणणे कबूल केले. त्यामुळे श्रीस्वामी-महाराजांनी त्याला मुक्त करण्याचे आश्वासन दिले.त्यानंतर तेथील

सर्व मंडळींना श्रीस्वामीमहाराज असे म्हणाले की, "तुम्ही सर्व-जण खाली नर्मदेत जाऊन उभे राहा. या बाईच्या अंगावर पाणी शिंपडताच ती धावत जाऊन नर्मदा नदीत पडेल. त्यावेळी तिला इजा होणार नाही, याची खबरदारी घ्या व तिला नीट व्यवस्थित धरून नंतर वर घेऊन या." श्रीस्वामीमहाराजांच्या आज्ञेप्रमाणे बरीच मंडळी खाली नर्मदेमध्ये जाऊन उभी राहिली. श्रीस्वामी-महाराजांनी माझ्या पत्नीच्या अंगावर पाणी शिंपडताच ती तीरासारखी नदीकडे धावत सुटली व तिने पाण्यात उडी टाकली. खाली लोक तयारच होते. त्यांनी तिला पकडून किनाऱ्यावर आणले. आता माझी पत्नी शांत झाली होती. स्वतःच्या पायांनी चालत ती श्रीस्वामीमहाराजांपाशी आली. त्यावेळी तिच्या अंगातील पिशाच्च गेले होते.

श्रीस्वामीमहाराजांच्या आज्ञेप्रमाणे पुढे दोनतीन दिवस श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे राहून त्या पिशाच्चाच्या मुक्तीसाठी श्रीस्वामीमहा-राजांच्याच देखरेखीखाली त्यांनी सांगितलेला विधी मी केला. ग्वाल्हेरला परतण्याच्या वेळी श्रीस्वामीमहाराजांनी मला आपल्या हाताने एक औदुंबराचे रोपटे दिले होते व ते ग्वाल्हेरला स्वतःच्या राहत्या घरासमोर लावावयाला सांगितले होते. तोच हा औदुंबर वृक्ष आता माझ्या घरासमोर आहे. अशी ही माझी एकंदर हकीकत आहे. हा फोटो तुझ्याजवळ पाहिल्यानंतर मला आतून एकाएकी अशी प्रेरणा झाली की, ही व्यक्ती हाताची पाच बोटे सारखी नसतात, असे जे सांगत होती, ते खरे आहे."

वरील दोन्ही गोष्टी जरी वेगवेगळ्या काळी व वेगवेगळ्या स्थळी घडलेल्या असल्या व दोन्ही गोष्टींचा शेवट सन १९१३-१४ मध्ये श्रीक्षेत्र गरुडेश्वरला झाला असला; तरी त्या कथांमधील सूत्र तुटू नये व त्या एकसलग वाचता याव्यात म्हणून येथे दिल्या आहेत.

त्यानंतर श्री. गंगाधरपंत आळंदीकर यांनी श्री. वासुदेवराव अनगरे यांना असे विचारले की, " श्रीस्वामीमहाराजांचा व तुझा संबंध कसा काय आला ? " श्री. गंगाधरपंतांचा हा प्रश्न ऐकताच श्री. वासुदेवराव त्यांना असे म्हणाले की, " माझा जन्मच श्रींच्या कृपेमुळे झाला असून माझ्या मातुश्रींना तर त्यांनी आपल्या मुली-प्रमाणे मानले आहे. इतकेच नव्हे; तर माझ्या मातृकुटुंबावर श्रींचे अत्यंत प्रेम होते." माझी ही सर्व हकीकत ऐकताच श्री. गंगाधर-पंतांना माझ्याबद्दल बरेच प्रेम वाटले व पुढे सतत तीन वर्षे त्यांनी माझा अभ्यास चालू असेपर्यंन्त माझे पुत्रवत् पालन केले व मला घरची आठवण येऊ दिली नाही.

यावेळी श्रीस्वामीमहाराज आश्विन महिन्यापर्यंन्त तिलक-वाड्याला होते. आश्विनात तिलकवाड्याहून ते मणिनागेश्वर, कुंभेश्वर, गंगानाथ महादेव वगैरे देवतांचे दर्शन घेऊन वरकाळ जवळ अत्रिमुनींच्या आश्रमात येऊन पोहोचले. वाटेत त्यांनी कर्नाळी, चांदोद, व्यास, शुक्र इत्यादि क्षेत्रे पाहिली. अनसूया मातेच्या पोटी, तिच्या पातिव्रत्याच्या तेजाने मोहित होऊन, ज्या पवित्र आश्रमा-मध्ये ब्रह्मा, विष्णू व महेश या तीन देवांनी श्रीदत्तरूपाने जन्म घेतला त्या ठिकाणी बसून श्रीस्वामीमहाराजांनी अनसूया मातेच्या स्तुतीपर एक स्तोत्र व एक पद रचले. तेथून कार्तिक महिन्याच्या वद्य पक्षात ते शिनोर या गावी येऊन पोहोचले. शिनोरला प्रथम त्यांनी भुसाफलिया मोहोल्ल्यातील श्रीविठ्ठल मंदिरात मुक्काम केला. तेथे त्यांची थोडी गैरसोय होत होती म्हणून या मंदिराच्या पंचांपैकी एका गुजराथी ब्राह्मणाने अधिक सोईस्कर अशी श्रीमार्कंडेय मंदिराच्या माडीवर श्रीस्वामीमहाराजांना राहण्याची विनंती केली व तेथे त्यांची सर्व सोय त्यांनी केली. शिनोरला दुसऱ्या खेपेलाही श्रीस्वामीमहाराज याच मंदिरामध्ये उतरले होते.

"आणखी एक खेप इकडे होईल." असे या दुसऱ्या वेळी श्रीस्वामी-महाराज म्हणाले होते.

शिनोरला श्रीस्वामीमहाराज आले त्यावेळी त्यांना दक्षिणी ब्राह्मणांची घरे दाखविण्याचे काम श्री. कृष्णराव पेंढारकर या साधुवृत्तीच्या माणसाने केले. श्रीस्वामीमहाराज भिक्षेला निघाले की, श्री. कृष्णराव कळशीने त्यांच्या मार्गावर पाणी शिंपडीत पुढे जात व त्या मार्गावरून श्रीस्वामीमहाराज चालत जात असत. असा या दोघांचा दररोजचा कार्यक्रम असे. भिक्षा आणल्यावर भिक्षेची झोळी ते श्रीनर्मदेच्या पाण्यात तीन वेळा बुडवीत व मग अष्टग्रास खात असत. असे करण्याचा हेतू जिभेला लालचावणारे रस श्रीनर्मदेच्या पवित्र जलाने धुऊन निघावे हाच होता. त्यामुळे फक्त रसहीन व शरीरामध्ये प्राणसंवर्धन करण्यास आवश्यक असे अन्नच जात असे. जिव्हालौल्यासाठी ज्या अन्नामध्ये काहीसुद्धा रस शिल्लक राहत नाही व असे अन्न जो सेवन करतो त्याने रसना जिंकली व सर्व काही जिंकले.

> समस्त साधनाहून । प्राणवृत्तीने संतोषून ।
> रहाणे हे उत्तम साधन । नित्य सोडून रसासक्ती ।।
> सुविद्य अथवा अविद्य नर । सर्व रस जिंको तर ।
> तोची जाणावा ईश्वर । हो का नर देहाने ।।

श्रीस्वामीमहाराज भिक्षेची झोळी घेऊन श्रीनर्मदेवरून परत येई-पर्यन्त इकडे श्री. कृष्णराव श्रीस्वामीमहाराजांची वसण्याची जागा गाईच्या शेणाने सारवून ठेवीत असत. गोमयाने सारवून शुचिर्भूत केलेल्या जागेवर भिक्षा ठेऊन त्या अन्नाचे श्रीस्वामीमहाराज तीन भाग करीत. एक भाग श्रीनर्मदेचा, एक भाग श्रीगोमातेचा व अवशिष्ट तिसरा भाग ते स्वतः सेवन करीत असत. भिक्षा आणताना एखादे, दिवशी विटाळ वगैरे झाल्यास भिक्षेचे अन्न श्रीनर्मदेमध्ये

सोडून त्या दिवशी ते उपोषण करीत. मात्र त्यामुळे त्यांच्या दैनंदिन कार्यक्रमामध्ये व्यत्यय येत नसे. दररोजचे आन्हिक, पाठ – पठण, प्रवचन, पुराण इत्यादि नेहमीप्रमाणेच चालू असे. श्री. कृष्णराव पेंढारकरांच्या सात्त्विक वृत्तीने प्रसन्न होऊन श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना एक मंत्र दिला व त्याचे दररोज निष्ठेने अनुष्ठान करण्यास सांगितले. पुढे श्री. कृष्णरावांना सरकार दरबारी चांगली नोकरी मिळाली व यथाक्रम मामलेदारांच्या जागेपर्यंत त्यांना बढतीही मिळाली. या नोकरीत एक वेळ श्री. कृष्णरावांवर काही आरोप आला होता; पण श्रीस्वामीमहाराजांच्या कृपेने त्या आरोपातून ते मुक्त झाले व शेवटी पेन्शन मिळून सेवानिवृत्त झाले.

श्रीस्वामीमहाराजांचा हा शिनोरचा मुक्काम भगवान् श्रीदत्तात्रेयांच्या आज्ञेने एका मुमुक्षू भक्ताला शास्त्रपारंगत करून योग्य मार्गावर नेण्यासाठी झाला होता. या गावात श्री. रामचंद्रशास्त्री प्रकाशकर म्हणून एक तरुण ब्राह्मण आपले मामा श्री. विनायकभटजी गौतम यांच्याकडे राहत होते. ते नुकतेच नाशिक पंचवटीहून तेथे आले होते. श्रीस्वामीमहाराज शिनोरला आल्यावर प्रथम श्री. विनायकभटजी गौतम यांच्या घरी भिक्षेला गेले. त्या दिवशी श्री. विनायकभटजींच्या घरी त्यांचे मेव्हणे श्री. रामचंद्रशास्त्री यांच्या वडिलांचे वर्षश्राद्ध होते; परन्तु श्रीस्वामीमहाराजांना याची काहीच कल्पना नव्हती. त्यामुळे ते भिक्षा मागावयाला आल्यावर श्री. रामचंद्रशास्त्री त्यांना असे म्हणाले की, " आज वडिलांचे वर्षश्राद्ध आहे. त्यामुळे आपणास भिक्षा घालता येणार नाही." परन्तु श्रीस्वामीमहाराजांसारख्या महापुरुषाला आपण भिक्षा न घालता आपल्या द्वारातून परत पाठवीत आहोत याची खंत व विषाद श्रीरामचंद्रशास्त्र्यांच्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसत होता. श्रीस्वामीमहाराजांनी त्यांच्या चेहऱ्यावर त्यांच्या अंतःकरणाचे भाव व व्यथा जाणली व ते त्यांना असे म्हणाले की, " सूनृत ( सत्य व प्रिय )

भाषणाने यती विन्मुख गेल्यास गृहस्थाला दोष लागत नाही.” इतके सांगून झाल्यावर श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना त्यासंबंधी एक शास्त्रवचनही म्हणून दाखविले.

श्रीरामचंद्रशास्त्र्यांचे थोडे वेदाध्ययन, कौमुदी, काव्य वगैरे शिक्षण झाले होते; पण तेवढ्याच शिक्षणाने त्यांचा अहंकार जागृत झाला होता. आपणापेक्षा अधिक विद्वान् कोणी नाहीच अशा वृत्तीने ते वागत व त्यातच तरुण असल्यामुळे त्यांच्या ठिकाणी साहजिकच ताठा आला होता. आपल्या गावात हे नवीन संन्यासी आलेले आहेत, हे भिक्षा घालतानाच श्री. रामचंद्रशास्त्री यांच्या लक्षात आले होते. त्यांना भेटण्यासाठी याच ताठ्याने ते श्रीमार्कंडेश्वराच्या मंदिरात गेले.

श्री. रामचंद्रशास्त्री मंदिरात आल्यावर त्यांनी श्रीस्वामीमहाराजांना उभ्याउभ्याच नमस्कार केला व ते एका बाजूला कसलीही मर्यादा न ठेवता कसेतरी बसले. त्यांचे ते बसणे हे श्रीगुरुजनांची अमर्यादा करणारे असले व त्यांची वागणूक उद्धट असली; तरीपण श्री. रामचंद्रशास्त्र्यांचा उद्धार करण्यासाठीच श्रीदत्तप्रभूंच्या आज्ञेने श्रीस्वामीमहाराजांचे तेथे आगमन झाले असल्याने, त्यांनी त्यांची वरीलप्रमाणे दिसणारी वृत्ती व स्वभाव लक्षात येऊनही, त्यांच्या वागणुकीकडे विशेष लक्ष दिले नाही. श्रीदत्तप्रभूंच्या कृपेला पात्र झालेल्या भाग्यवान् माणसाला काय बोलावयाचे म्हणून ते स्वस्थ बसले.

श्रीस्वामीमहाराज आपल्या पूजेमध्ये मग्न होते. आपल्या जवळच्या श्रीदत्तमूर्तीकडे ते एकाग्रतेने पाहात होते. जणू काही ते श्री. रामचंद्रशास्त्री प्रकाशकरांविषयी देवाशी बोलत होते. श्रीस्वामीमहाराज आपणहून काही बोलत नाहीत असे पाहून श्री. रामचंद्रशास्त्री त्यांना असे म्हणाले की, “ काय स्वामीमहाराज ! कोणीकडंन

येणे झाले ? " उत्तरादाखल श्रीस्वामीमहाराजांनी अमुक दिशे-कडून येणे झाले असे अंगुलीनिर्देश करून सांगितले.

त्यानन्तर श्री. रामचंद्रशास्त्र्यांनी त्यांना पुन्हा असे विचारले की, " तुमचे पूर्वाश्रमातील नाव काय आहे ? तुम्ही पूर्वी कोणत्या गावी राहात होता ? तुम्ही तेथे काय उद्योग करीत होता ? तुमचे शिक्षण कोठपर्यन्त झाले आहे ?" अशा प्रकारे श्रीरामचंद्रशास्त्र्यांनी श्रीस्वामीमहाराजांना एकसारखे बरेच प्रश्न विचारले. वास्तविकपणे संन्याशाला पूर्वाश्रमीचे नाव इत्यादि काहीही व कधींही विचारू नये, हा साधा शास्त्रनियमही श्री. रामचंद्रशास्त्री यावेळी विसरले. या सर्व प्रश्नांना श्रीस्वामीमहाराजांनी काही प्रत्युत्तर केले नाही. त्यामुळे त्याच प्रश्नांची सरबत्ती त्यांनी पुन्हा सुरू केली. त्यावेळी श्रीस्वामी-महाराज कृतककोपाविष्कार धारण करून त्यांना असे म्हणाले की, " तुमचा कोणी संबंधी किंवा सगासोयरा बेपत्ता झाला असल्यास तो आपण नाही. " श्रीस्वामीमहाराजांचे हे रागाचे उत्तर ऐकून श्री. रामचंद्रशास्त्री रागाने गरम झाले व उठून तडक आपल्या घरी निघून गेले.

अशा रीतीने काही दिवस मध्ये निघून गेले; परन्तु त्या काळात श्रीरामचंद्रशास्त्री श्रीस्वामीमहाराजांकडे परत आले नाहीत. श्रीस्वामीमहाराजांना श्रीरामचंद्रशास्त्र्यांचा उद्धार करावयाचा होता. त्यासाठीच तर ते शिनोरला आले होते. त्यामुळे त्यांना मध्येच सोडून देऊन चालण्यासारखे नव्हते. श्रीरामचंद्रशास्त्र्यांची पुन्हा भेट होणे आवश्यक होते. तो योग लवकरच जुळून आला. श्रीमार्कंडे-श्वराच्या मंदिरापासून जवळच खालच्या भागात श्रीलीलानंदसर-स्वती म्हणून एक स्वामी जवळ जवळ ६/७ वर्षे वास्तव्य करून राहात होते. त्यांचे चातुर्मास अधिक झालेले असल्यामुळे श्रीस्वामी-महाराज त्यांना वंदन करीत असत; पण श्रीलीलानंदसरस्वती-

स्वामींना ते आवडत नसे. त्यामुळे पुष्कळ वेळा ते श्रीस्वामी-महाराजांना असे म्हणत असत की, "आश्रमाला अनुसरून मुद्रा, दंड, कटिसूत्र इत्यादि संन्याशाच्या आश्रमधर्मास अनुसरून आमच काहीच नसल्याने आपणाकडून वंदन करून घेण्यास संकोच वाटतो."

हे ऐकताच श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना जानवी जमविण्यास सांगितले. ती जमल्यावर कटिसूत्र, दंडसूत्र, इत्यादि सर्व त्यांनी त्यांना व्यवस्थित करून दिले व त्यासंबंधीची सर्व माहिती त्यांना सांगितली. या दोघांचाही दिवसातून एकदोन वेळा तरी एकमेकांशी बोलण्याचा प्रसंग येत असे. एक दिवस बोलण्याच्या ओघात श्रीस्वामी महाराज श्रीलीलानंदस्वामींना असे म्हणाले की, "काय करावे काही कळत नाही. रामचंद्रासाठी आपले येथे येणे झाले. तो तर फक्त एकदाच इकडे येऊन गेला. पुन्हा इकडे फिरकलासुद्धा नाही." एवढे बोलून श्रीस्वामीमहाराज गप्प बसले. त्यावेळी श्री. रामचंद्र शास्त्री आपल्याशी उद्धटपणे वागल्याचे मात्र श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना सांगितले नाही. श्रीलीलानंदसरस्वतीस्वामीमहाराजांचा आणि श्री. रामचंद्रशास्त्र्यांचा पूर्वपरिचय होता. त्यांनी श्रीरामचंद्रशास्त्र्यांना बोलावून घेतले व "तुम्ही नवीन स्वामींच्या दर्शनाला का जात नाही?" म्हणून विचारले.

हा प्रश्न ऐकताच श्री. रामचंद्रशास्त्री त्यांना असे म्हणाले की, "मी एकदा त्यांच्याकडे गेलो होतो. टेंबेस्वामी फार विद्वान् असले; तरी ते फार संतापी आहेत. त्यामुळे त्यांचे आमचे जमणार नाही. मी त्यांच्याकडे जाणार नाही." असे म्हणून श्री. रामचंद्रशास्त्री घरी निघून गेले. श्री. रामचंद्रशास्त्री मूळचे बडोद्याचे राहणारे होते. त्यांचे वडील बडोद्याला राहत असत. श्री. रामचंद्रशास्त्री वेदाध्ययन करण्यासाठी शिनोरला त्यांचे मामा श्री. विनायकभटजी गौतम यांच्याकडे येऊन राहिले होते. त्यांच्या मामांच्या घरी एक पोक्त

व बहुश्रुत बाई राहत होत्या. श्रीस्वामीमहाराज शिनोरला प्रथम आले तेव्हापासून त्या बाई नेहमी त्यांच्या दर्शनाला जात असत. अगदी थोड्याच दिवसात शिनोरला श्रीस्वामीमहाराजांचा "एक विद्वान् आणि साक्षात्कारी संन्यासी" असा लौकिक पसरला होता. त्या बाईंना श्रीस्वामीमहाराजांच्या विद्वत्तेचा उत्तम परिचय व माहिती झाली होती. त्यामुळे त्यांना श्रीस्वामीमहाराजांबद्दल व त्यांच्या विद्वत्तेबद्दल पराकाष्ठेचा आदर वाटत होता. श्रीरामचंद्रशास्त्र्यांवरही या बाईंचे फार प्रेम होते. श्री. रामचंद्रशास्त्र्यांनी श्रीस्वामी-महाराजांकडे काहीतरी शिकावे अशी त्यांची फार इच्छा होती. बाईंच्या आग्रहामुळे आणि त्यांच्या मामांनीसुद्धा बाईंच्या आग्रहाला दुजोरा दिल्यामुळे श्री. रामचंद्रशास्त्री स्वतःच्या मनाविरुद्ध पुन्हा एकदा श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला गेले; पण याही वेळी त्यांचे वागणे उद्धटपणाचेच होते. साधू, संन्यासी व विद्वान् यांचा मान कसा राखावा हे जणू काही त्यांना ठाऊकच नसावे. ते श्रीस्वामीमहाराजांकडे आल्यावर कसातरी नमस्कार करून एका बाजूला बेफिकीरपणे बसले; पण श्रीस्वामीमहाराजांना ते आल्याचे पाहून फार आनंद झाला. श्रीरामचंद्रशास्त्र्यांच्या औद्धत्याकडे लक्ष न देता, श्रीस्वामीमहाराजांनी स्वतःहूनच त्यांच्याशी बोलावयाला सुरुवात केली. त्यांनी श्री. रामचंद्रशास्त्र्यांना असे विचारले की, "तुझे शिक्षण कोठपर्यंन्त झाले आहे ?"

श्रीस्वामीमहाराजांनी विचारलेला हा प्रश्न ऐकताच श्रीराम-चंद्रशास्त्री त्यांना उत्तर देताना असे म्हणाले की, "वेदाध्ययन; कौमुदी, काव्य इतके शिकलो आहे. सध्या गावात एका ठिकाणी भागवत सांगतो."

"जर तू भागवत सांगत असशील; तर मग "जन्माद्यस्य यतोन्वयात्." हा श्लोक सांग पाहू."

श्रीस्वामीमहाराजांनी या श्लोकाचे विवेचन करावयास सांगताच श्रीरामचंद्रशास्त्री त्यांना असे म्हणाले की, " मला अशा वेदान्त-श्लोकाचे विवेचन करता येत नाही ; त्यामुळे हा विषय आला की, मी ते श्लोक कसेतरी सांगतो. वेदान्त मला योग्यप्रकारे आकलन होत नसल्यामुळे वेदान्त विषयक भागाचे व्याख्यान मी सर्वसाधारणपणे यथातथाच करतो. "

हे उत्तर ऐकताच श्रीस्वामीमहाराज श्री. रामचंद्रशास्त्र्यांना असे म्हणाले की, "अरे ! जे समजले पाहिजे तेच जर तुला समजले नाही ; तर मग भागवत वाचण्याचा उपयोग काय ? आणि लोकांना तू समजून तरी काय सांगणार ? "

एका संन्याशाने आपल्यासारख्या व्युत्पन्न माणसाला असे बोलावे याचा श्री. रामचंद्रशास्त्र्यांना राग आला. आपला राग लपविण्याचा थोडासुद्धा प्रयत्न न करिता श्री. रामचंद्रशास्त्री आतल्या आत धुमसत आढ्यतेने बसून राहिले. त्यांच्यामधला अहंकार सळसळत होता. त्यांच्यातल्या " मी " ने अद्याप स्वतःला ओळखले नव्हते. त्यांना स्वतःला स्वतःची ओळख पटवून द्यावयाची हीच वेळ होती. त्यांच्या मुद्रेवरचे सर्व भाव पाहत श्रीस्वामीमहाराज शांतपणे त्यांना असे म्हणाले की, " मात्रे अध्यात्म निवेदनम् । किं तदध्यात्मम् । जीव ब्रह्मणोरैक्य प्रतिपादनम् । तदहं कथं विजानीयाम् । यावत्पूर्णो न वत्सरः । "

श्रीस्वामीमहाराजांच्या मुखातून ही वाक्ये ऐकल्याबरोबर श्री. रामचंद्रशास्त्र्यांना एक वर्षापूर्वी पडलेल्या स्वप्नाची आठवण झाली व एका क्षणात त्यांचा सर्व राग शांत झाला. ते आपली आढ्यता व अहंकारच काय ; पण स्वतःलाच पूर्णपणे विसरून गेले. त्यावेळी त्यांचा कंठ दाटून आला. त्यांच्या अंगावर रोमांच उभे राहिले व नेत्रातून अश्रुधारा वाहू लागल्या. या अवस्थेतच ते एकदम उठले

व पुढे येऊन त्यांनी श्रीस्वामीमहाराजांना साष्टांग नमस्कार घातला. आपणास नेहमी स्वप्नात दिसणारी, शिकविणारी, सूचना देणारी, आज्ञा करणारी व प्रसंगी मारणारीही ती हीच मूर्ती होय याबद्दल त्यांची खात्री झाली.

अशा रीतीने काहीवेळ गेल्यावर श्री. रामचंद्रशास्त्री शांत झाले. त्यावेळी श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "आता घरी काही उद्योग न करता माझ्यापाशी राहून अभ्यास सुरू कर. पंचदशी व भागवताचा पहिला श्लोक उद्यापासून सुरू करू." श्रीस्वामी-महाराजांची आज्ञा त्यांनी शिरसावंद्य मान्य केली. ते त्या दिवशी जेव्हा घरी आले व स्वस्थ बसले तेव्हा त्यांना एकदम एक वर्षा-पूर्वीचा प्रसंग आठवला. त्यावेळी श्री. रामचंद्रशास्त्री यांचे वडील बडोद्यास राहत असून ते स्वतः वेदाध्ययनाकरिता शिनोरला त्यांचे मामा श्री. विनायकभटजी गौतम यांच्याकडे राहत असत. त्यावेळी ते अठरा वर्षांचे होते. त्याच वर्षी त्यांचे वडील प्लेगने वारल्यामुळे त्यांना अत्यंत दुःख झाले व त्या दुःखाच्या भरात घरातून कोठेतरी निघून जावे असे विचार त्यांच्या मनात तीव्रतेने घोळू लागले. त्यावेळी एके दिवशी रात्री श्री. रामचंद्रशास्त्र्यांच्या स्वप्नात एक संन्याशी आले आणि ते त्यांना असे म्हणाले की, "तू अशा तऱ्हेने घरातून निघून गेल्यास तुझ्या आईला किती दुःख होईल याचा तू विचार केला आहेस काय? आपल्या आईचा तूच आता आधार आहेस. अशा वेळी तिला धीर द्यावयाचा सोडून अशा प्रकारे तिला अधिक दुःखात लोटून निघून जाणे कितपत योग्य आहे? कर्दमऋषी घर सोडून वनात निघून गेले; तरी कपिळमुनी आपल्या मातेला सोडून न जाता त्यांनी तिला अध्यात्माचा उपदेश करून शोकरहित केले."

श्रीस्वामीमहाराजांनी केलेला हा उपदेश ऐकताच स्वप्नातच श्री. रामचंद्रशास्त्री त्यांना असे म्हणाले की, "अध्यात्म म्हणजे

काय ? " श्री. रामचंद्रशास्त्र्यांनी हा प्रश्न विचारताच श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, " जीवब्रह्माचे ऐक्य प्रतिपादन करणे हेच अध्यात्म होय. " त्यावर श्री. रामचंद्रशास्त्र्यांनी त्यांना पुन्हा असे विचारले की, " ते अध्यात्म मला कसे समजेल ? " या प्रश्नाचे उत्तर देताना श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना असे सांगितले की, " तू सध्या उपदेशाला अयोग्य असल्यामुळे एक वर्षानन्तर हे सर्व तुला कळेल. " हा सर्व संवाद एक वर्षापूर्वी संस्कृतात झाला होता, हे तर त्यांना यावेळी आठवेलेच; पण एक संन्यासी वारंवार स्वप्नात येऊन आपणास सूचना करीत असत व त्यांच्या आज्ञनेप्रमाणे घडून न आल्यास चांगले मारीतही असत याचेही त्यांना स्मरण झाले.

यात्रमाणे श्री. रामचंद्रशास्त्र्यांना शिकविण्याबद्दल व उपदेश करण्याबद्दल देवांचे सांगणे झाल्यावरून श्रीस्वामीमहाराज शिनोरला आले होते. दुसऱ्या दिवसापासून श्री. रामचंद्रशास्त्र्यांनी श्रीस्वामीमहाराजांच्या जवळ अभ्यास सुरू केला. दिवसातील सर्ववेळ त्यातच जात असे. फक्त आन्हिक व भिक्षा यासाठी काही तास जात असत. एकदा असाच पाठ चालू असताना श्रीस्वामीमहाराजांनी आपली पाणी पिण्याची नरोटी प्रसाद म्हणून श्री. रामचंद्रशास्त्र्यांना दिली. या अकल्पित कृपाप्रसादामुळे त्यांना फार आनंद झाला हा प्रसाद त्यांनी आपल्या घरी ठेवला.

अशा प्रकारे अभ्यास चालू असताना एक दिवस कोणासही काहीही न सांगत श्रीस्वामीमहाराज अकस्मात् शिनोर सोडून निघून गेले. ते कोठे व कधी गेले याचा कोणाला काहीसुद्धा पत्ता लागला नाही. दुसऱ्या दिवशी श्री. रामचंद्रशास्त्री नेहमीप्रमाणे अभ्यासासाठी श्री. मार्कंडेश्वराच्या मंदिरात आले; पण मंदिर सुने झाले होते. श्रीस्वामीमहाराज एकाएकी काहीही न सांगता निघून गेल्यामुळे श्री. रामचंद्रशास्त्र्यांना फार वाईट वाटले. नरोटीच्या अकल्पित

प्रसादामुळे त्यांना जेवढा आनंद झाला होता त्यापेक्षा अधिक दुःख त्यांना आज श्रीस्वामीमहाराजांच्या विरहामुळे झाले होते. दिवसभर त्यांनी श्रीस्वामीमहाराजांचा शोध घेण्याचा प्रयत्न केला; पण व्यर्थ. रात्री ज्यावेळी त्यांचा थकला भागला जीव निद्राधीन झाला त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना स्वप्नात दर्शन देऊन असे सांगितले की, " आम्ही निघून गेलो म्हणून उद्विग्न न होता व खेद न करता प्रारब्धवशात् योगायोगाने जेवढे मिळाले आहे तेवढे सांभाळावे व उपासना चालू ठेवावी. दंडाचे लक्ष्मीवस्त्र व कटीसूत्र कोनाड्यात राहिले आहे. या दोन्ही वस्तू नर्मदेच्या प्रवाहात सोड किंवा स्वतः-पाशी ठेऊन दे. " या सर्व वस्तू व श्रीस्वामीमहाराजांकडून मिळालेल्या काही पोथ्या अद्याप श्री. प्रकाशकरशास्त्र्यांच्या घरी वडोद्याला जतन करून ठेवण्यात आल्या आहेत.

शिनोरच्या या मुक्कामात श्रीस्वामीमहाराजांनी श्री. रामचंद्र-शास्त्र्यांप्रमाणे त्यांचे मामा श्री. विनायकभटजी गौतम यांच्यावरही कृपा केली.

श्री. रामचंद्रशास्त्र्यांच्या आणि त्यांच्या मामांच्या घरी पूर्वी दत्तो-पासना नव्हती. श्री. रामचंद्रशास्त्र्यांच्या जन्मानन्तर श्री. विनायक-भटजी गौतम यांना एका ब्राह्मणाने श्रीगुरुचरित्राची एक पोथी आणून दिली व ती नित्यनेमाने वाचण्यास सांगितले. त्या दिवसापासून त्यांच्या घरात श्रीदत्तोपासना सुरू झाली. श्रीस्वामीमहाराजांचे शिनोरला आगमन झाले त्यावेळी या कुटुंबामध्ये श्रीगुरुचरित्राचे दररोज नित्यनेमाने वाचन होत असे. त्यावर्षी मार्गशीर्षात श्रीदत्त-जयंतीचा उत्सव झाला. त्यावेळी श्रीगुरुचरित्राचा सप्ताह करण्या-साठी श्रीस्वामीमहाराजांनी श्री. विनायकभटजींना श्रीगुरुचरित्राची त्यांच्या घरची पोथी आणावयाला सांगितले. श्री. विनायकभटजींनी पोथी आणून दिल्यावर श्रीस्वामीमहाराज सहज विनोदाने व थट्टेने

त्यांना असे म्हणाले की, "तुम्ही वैदिक मंडळी ! प्राकृत गुरुचरित्राकडे पाहणार सुद्धा नाही, तेव्हा वाचन तरी कोठले !"

श्रीस्वामीमहाराज असे म्हणताच श्री. विनायकभटजी त्यांना मोठ्या नम्रतेने व विनयाने असे म्हणाले की, "महाराज ! गेली कित्येक वर्षे मी दररोज नेमाने या पोथीचे वाचन करतो." त्यांचे हे उत्तर ऐकताच श्रीस्वामीमहाराज फार सन्न झाले. व त्यांनी समाधानाने आपली मान हलविली. त्यानंतर एक दोन दिवसात श्री. विनायकभटजींना श्रीदत्तमंत्राचा उपदेश करून श्रीस्वामीमहाराजांनी कृतार्थ केले.

श्रीरामचंद्रशास्त्र्यांचे श्रीस्वामीमहाराजांजवळ अध्ययन चालू असताना एक दिवस एक वृद्ध गुजराथी बाई श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला आली. तिने एक मोठा द्रोण भरून खडीसाखर श्रीस्वामीमहाराजांच्या पुढे ठेवली व ती खडीसाखर श्रीस्वामीमहाराज आता स्वीकारतील मग स्वीकारतील या अपेक्षेने ती बाई बाजूला बसून वाट पाहू लागली; परंतु श्रीस्वामीमहाराजांनी खडीसाखरेच्या द्रोणाकडे थोडेसुद्धा लक्ष दिले नाही. इतकेच नव्हे; तर त्यांनी ती खडीसाखर इतर कोणासही घेण्यास सांगितले नाही. शेवटी कंटाळून तो खडीसाखरेचा द्रोण तेथेच ठेऊन ती बाई निघून गेली. दोन तीन दिवस तो द्रोण तेथेच पडलेला होता. अध्ययन करीत असलेल्या श्री. रामचंद्रशास्त्र्यांच्या ध्यानात ही गोष्ट आली. त्यामुळे खडीसाखर न स्वीकारण्याचे कारण त्यांनी श्रीस्वामीमहाराजांना विचारले. त्यावेळी श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "गेले तीन दिवस हा द्रोण येथे पडलेला आहे. या तीन दिवसात एखादी माशी तरी या खडीसाखरेवर बसलेली तू पाहिलीस का ?" श्रीस्वामीमहाराजांनी असे विचारताच श्री. रामचंद्रशास्त्र्यांनी त्या द्रोणाकडे निरखून पाहिले व त्याच्याकडे लक्ष ठेवले. तेव्हा त्यांना असे दिसून आले की,

आजूबाजूला अनेक माशा फिरत असतानाही एक सुद्धा माशी त्या द्रोणातील खडीसाखरेवर बसत नाही. ही आश्चर्य करण्यासारखीच गोष्ट आहे. श्रीस्वामीमहाराजांचे म्हणणे खरे आहे, हे लक्षात येताच याचे कारण काय असावे असे वाटून ते श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाले की, "महाराज ! असे का बरे व्हावे ?" श्रीरामचंद्रशास्त्र्यांचा हा प्रश्न ऐकताच ते त्यांना असे म्हणाले की, "तुला ते समजून काय करावयाचे आहे? जिची खडीसाखर तिने न्यावी." पुढे ती बाई तीन दिवसांनी ज्यावेळी पुन्हा मंदिरात आली त्यावेळी आपला खडीसाखरेचा द्रोण अद्याप तेथेच पडलेला आहे हे पाहून तिला फार वाईट वाटले. खिन्न होऊन तिने तो द्रोण परत नेला. कालौघात श्री. रामचंद्रशास्त्र्यांनी त्या बाईसंसंधी चौकशी केल्यावर त्यांना असे कळले की, पूर्व वयात ती बाई फार दुराचारी होती. त्यामुळे तिच्या खडीसाखरेला माशीसुद्धा शिवत नव्हती; मग श्रीस्वामीमहाराजांनी त्या खडीसाखरेला स्पर्श करणे तर दूरच राहिले.

या प्रसंगामुळे श्रीस्वामीमहाराजांची सर्वज्ञता सर्वांना पटली. हा प्रसंग वाचला म्हणजे "अत्युत्कटैः पापपुण्यैः इहैव फलमश्नुते" असे जे शास्त्रकारांनी म्हटले आहे ते खरे आहे याची खात्री पटू लागते. अति उत्कट अशा पापाचे किंवा पुण्याचे फल या जन्मीच मिळते हे खरे आहे.

श्रीस्वामीमहाराजांची श्री. रामचंद्रशास्त्र्यांवर एवढी कृपा असूनही त्यांच्यावरील पूर्व संस्कार अद्यापही शिल्लक होते की काय अशी शंका मनात यावी असे वर्तन एकवेळ त्यांच्याकडून घडले. श्रीस्वामीमहाराजांच्या मार्गदर्शनाखाली श्री. रामचंद्रशास्त्र्यांचे अध्ययन व्यवस्थित चालू होते. शिष्याची धारणाशक्ती पाहूनच श्रीस्वामीमहाराज त्याला पचेल आणि रुचेल अशा पद्धतीने शिकवीत असत. श्रीमद्भागवतातील वेदस्तुतीसारखे कठिण विषयसुद्धा सुबोध

करून शिकविण्याची श्रीस्वामीमहाराजांची हातोटी अगदी अपूर्व अशी होती. एकदा अल्पशा अध्ययनानंतर श्री. रामचंद्रशास्त्र्यांच्या मनात असे आले की, "श्रीस्वामीमहाराज शिकवीत असताना काही अवघड प्रश्न विचारून त्यांना निरुत्तर करावे." नित्याच्या पाठास जाण्यापूर्वी आपल्या बुद्धीप्रमाणे एक विषय मनात तयार करून ते श्रीस्वामीमहाराजांपाशी गेले. पाठ घेण्यासाठी ते श्रीस्वामी-महाराजांपुढे बसताच श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "विद्या शिकणाऱ्याने आपला सर्व विद्याभ्यास पूर्ण होईपर्यन्त तरी शिकविणाऱ्याला मी प्रश्न विचारून निरुत्तर करीन असे विचार मनामध्ये आणता कामा नये." एवढे सांगून पुढे नित्याच्या पाठाला सुरुवात झाल्यावर त्या दिवशी श्री. रामचंद्रशास्त्री जो विषय विचारणार होते तो विषय त्यांना न विचारताच आपण स्वतःच विषयाच्या ओघात उपस्थित करून त्याचे अत्यंत सोपपत्तिक विवेचन त्यांनी केले. आपल्याला आपल्या मनातील विषय न विचारताच त्याचे अत्यंत सोपे विवेचन श्रीस्वामीमहाराजांनी केलेले पाहून श्री. रामचंद्रशास्त्र्यांचा सर्व गर्व पूर्णपणे विरून गेला.

श्री. रामचंद्रशास्त्र्यांच्या संबंधीच्या सर्व प्रसंगांचा विचार केला म्हणजे त्याचे रहस्य हाती आल्याशिवाय राहणार नाही. श्रीस्वामी-महाराजांचे आपल्या शिष्यावर किती उत्कट प्रेम होते, ते तर यावरून दिसतेच; परन्तु त्यांचे सर्व दोष दूर व्हावेत म्हणून आपल्या दिव्यदृष्टीचा व सामर्थ्याचा वापर करून त्यांनी त्यांच्या मनातील प्रश्न ओळखले. इतकेच नव्हे; तर त्यांनी आपल्या अपार बुद्धि-सामर्थ्याने त्यांचे सोपपत्तिक विवेचन सहजासहजी करून त्याबद्दलही त्यांचे समाधान केले. शिष्याला पैलतीराला नेण्यासाठी सद्गुरूला किती अपरंपार कष्ट घ्यावे लागतात, त्याचे किती दुर्गुण सहन करावे लागतात, ते दूर करण्याकरिता किती उपाय योजावे लागतात व

शेवटी आपल्या आत्मिक सामर्थ्याच्या बळावर त्याचा उद्धार कसा करावा लागतो, ह्या सर्व गोष्टी या प्रसंगातून दृग्गोचर होतातच; परन्तु याहूनही कितीतरी रहस्यमय गोष्टी यात दडलेल्या आहेत, असे लक्षात येते. जो साधक श्रीस्वामीमहाराजांच्या चरित्रातील हे किंवा इतर प्रसंग वारंवार वाचील त्याला श्रीस्वामीमहाराजांच्या कृपाप्रसादामुळे यातील रहस्य प्राप्त होईल, यात संशय नाही. सारांश संन्यासगीतेत या अर्थानेच असे म्हटले आहे की–

ऋषयो मुनयः सिद्धा महात्मानश्चरन्ति यत् ।
तज्जगन्मंगलायेति निश्चितं तत्त्वदर्शिभिः ॥ १.७ ॥
सन्तः कारुणिका नित्यं तीर्थव्याजेन संगताः ।
दुष्कृतानि व्यपोहन्ति दिव्यज्ञानोपदेशिनः ॥ ८ ॥
नानाशास्त्रकथाव्याख्यानकथनश्रवणादिभिः ।
उद्धरन्ति जनान् सर्वान् पावयन्ति परस्परम् ॥ ९ ॥
तस्मात्सर्वात्मना नूनं संगं कुर्वीत साधुभिः ।
सर्वोपकारनिरताः सन्तः संसारतारकाः ॥१०॥

याचा अर्थच असा आहे की, ऋषी, मुनी, सिद्ध आणि महात्मे जो विचार करतात तो जगताच्या अभ्युदयाकरिताच आहे, असे तत्त्वज्ञानी लोकांना पूर्णपणे पटलेले आहे. सत्पुरुष दयाळू असतात. ते नेहमी तीर्थाच्या ठिकाणी निवास करून, उत्तम ज्ञानोपदेश करून अनेकविध पापांचा नाश करतात. ते अनेक शास्त्रादिकांच्या श्रवणाने, निरूपणाने व व्याख्यानाने सर्व मनुष्यांचा उद्धार करतात आणि परस्परांस पावन करतात. याकरिता मोठ्या आस्थेने साधुजनांचा सहवास केला पाहिजे; कारण सर्व जीवांवर उपकार करून त्यांना या भवसमुद्रातून तारण्यास तेच समर्थ आहेत.

शिनोरच्या या मुक्कामामध्ये श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला

एक संग्रहणीग्रस्त रोगी आला होता. श्रीस्वामीमहाराजांना पूर्वाश्रमात माणगावला असल्यापासून संग्रहणीच्या व्याधीने उपद्रव द्यावयाला सुरुवात केली होती. त्यामुळे या रोगापासून केवढा त्रास होतो याची त्यांना कल्पना होती, म्हणूनच हा रोगी जेव्हा त्यांच्या दर्शनाला आला तेव्हा त्याच्याविषयी श्रीस्वामीमहाराजांना विशेष सहानुभूती वाटली. तसे पाहावयाला गेले तर कोणाही दुःखग्रस्त माणसाबद्दल श्रीस्वामीमहाराजांना सहानुभूती वाटत असे; पण का कोण जाणे या माणसाची त्यांनी आस्थेने चौकशी केली व ते त्यास असे म्हणाले की, " आपणावरही पूर्वाश्रमातच कोणीतरी अभिचारिक प्रयोग करून ही संग्रहणीची व्यथा कायमची आपल्यामागे लावली आहे. या व्याधीवर ताक, सुरण व जायफळ यांचा उपयोग केल्यास हा रोग काबूत राहतो. एखादे वेळी या रोगावर उतारा म्हणून अल्प प्रमाणात अफू खाल्ली तरी बरे वाटते."

या मुक्कामामध्ये काही ब्राह्मणांमधील आचारभ्रष्टता श्रीस्वामीमहाराजांच्या नजरेला आली. रोज संध्याकाळी दक्षिणी ब्राह्मणवर्ग सायंसंध्येसाठी श्रीनर्मदेच्या घाटावर जमत असे. श्रीस्वामीमहाराजही त्यावेळी तेथे जात असत. त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांच्या असे नजरेला आले की, ब्राह्मणमंडळी घाटावर कपडे काढून ठेवून पाण्याशिवायच लघुशंकेला जातात. या लोकांना आचारधर्म शिकवावा म्हणून एकदा पुराणाच्या वेळी श्रीस्वामीमहाराजांनी " आचारः प्रथमोधर्मः " हा विषय काढला व त्या विषयाचे सांगोपांग विवेचन केले. विशेषतः ब्राह्मणांनी पाळावयाच्या आचाराची त्यांनी सर्व लोकांपुढे जणूकाही उजळणीच केली. या विवेचनामुळे जे लोक आचारधर्म पाळण्यात चुकत होते त्यांना आपली चूक समजून आली. त्या वेळेपासून सर्व ब्राह्मण मंडळी लघुशंकेस जाताना पाणी नेऊ लागली व नित्य नैवेद्य, वैश्वदेव करू लागली.

एकदा असेच श्रीस्वामीमहाराज श्रीलीलानंदसरस्वतीस्वामीमहाराजांबरोबर घाटावरून संध्या आटोपून परत येत होते. वाटेत काही मुलें पतंग उडवीत होती. त्यांच्या पतंगाचा दोरा दोघांनाही लागला. आता पुन्हा स्नान करावे लागणार म्हणून श्रीलीलानंदसरस्वतीस्वामीमहाराज थोडे त्रासून असे म्हणाले की, "संन्याशांनासुद्धा ही मुले किती त्रास देतात! यांची ही दांडगाई नेहमीचीच चाललेली असते." श्रीस्वामीमहाराज म्हणजे शांततेचे मेरुमणीच होते. ते त्यावेळी त्यांना असे म्हणाले की, "ही आपलीच मुले आहेत. त्यांचा त्रास कसला मानावयाचा!" श्रीस्वामीमहाराजांचे हे शांत बोलणे ऐकून श्रीलीलानंदसरस्वतीस्वामीमहाराज गप्प बसले. या प्रसंगावरून त्यांनी जो घ्यावयाचा तो बोध घेतला.

या शिनोरच्या मुक्कामात श्रीस्वामीमहाराजांनी ज्याप्रमाणे श्री. रामचंद्रशास्त्र्यांवर कृपा केली तशी दुसऱ्याही एका आर्त आणि मुमुक्षू माणसावर कृपा करून त्याला आपला पट्टशिष्य केले. या मुक्कामात श्रीस्वामीमहाराजांची व त्यांचे पुढे पट्टशिष्य झालेले श्रीयोगानंदसरस्वती अर्थात् श्रीगांडामहाराज यांची गाठ पडली. एक दिवस नेहमीचा पाठ चालू असताना श्रीस्वामीमहाराज श्री. रामचंद्रशास्त्र्यांना असे म्हणाले की, "लवकरच येथे एक नेहमी भटकत फिरणारा अक्षरशत्रू मनुष्य येणार आहे." श्रीस्वामीमहाराजांचे हे वाक्य ऐकून श्री. रामचंद्रशास्त्र्यांना असे वाटले की, "असेल कोणीतरी श्रीस्वामीमहाराजांची पूर्वीची ओळख असलेला माणूस." हा विचार करून त्यांनी श्रीस्वामीमहाराजांच्या वाक्याकडे दुर्लक्ष केले.

श्रीस्वामीमहाराजांनी असे सांगितल्यावर दोन-तीन दिवसांनी दुपारच्या वेळी श्रीमार्कंडेश्वराच्या मंदिरात "मनाची एकाग्रता" या विषयावर गीतेच्या आधारे श्रीस्वामीमहाराजांचे प्रवचन चालू होते. त्यावेळी मध्येच विषयांतर करून श्रीस्वामीमहाराज बोलू

लागले. वास्तविक प्रवचनामध्ये श्रीस्वामीमहाराज कधीच विषयांतर करीत नसत. परन्तु आज जणू काही भगवान् श्रीदत्तात्रेयच त्यांच्या तोंडून असे वदले की, "आता अगदी थोड्याच वेळामध्ये येथे एक वेडसर दिसणारा भटक्या मनुष्य येणार आहे. तो सद्गुरूंच्या शोधार्थ येथे येत आहे. शिष्य म्हणून आजवर येथे कोणी टिकला नाही; पण हा टिकेल." एवढे बोलून त्यांनी प्रवचन पुढे चालू केले. थोड्याच वेळात समोरून एक रोडावलेला मध्यम वयाचा तरुण गुजराथी ब्राह्मण झपाटल्याप्रमाणे धावत पुढे आला. त्याच्या अंगावरचे कपडे मळकट व फाटलेले असून त्याच्याजवळ फक्त दोन पंचे, तांब्या व काठी इतकेच सामान होते. प्रवचन चालू असताना श्रीस्वामीमहाराजां-पुढे असा उद्दामपणा करण्याचे धैर्य कोणाला झाले नसते. सर्वजण अवाक् होऊन पाहत राहिले. श्रीस्वामीमहाराजांनी प्रवचन थोडा-वेळ थांबविले. तो तरुण पुढे आला व श्रीस्वामीमहाराजांना साष्टांग नमस्कार घालून तेथेच निश्चेष्ट होऊन पडला. त्याच्या शरीराला कंप सुटला होता व सर्वांगातून घामाच्या धारा वाहत होत्या. त्याचा कंठ दाटून आला होता. त्याचे अष्टसात्त्विक भाव जागृत झाले होते. त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांच्याही चेहऱ्यावर कोमल भाव दिसत होते. एरवी निर्विकार भासणाऱ्या त्यांच्या दृष्टीमध्ये आज प्रेमाचा ओलावा दिसत होता; पण त्यावेळी श्रीस्वामीमहाराज काही बोलले नाहीत. उलट त्या तरुणाकडे त्यांनी दुर्लक्ष केले. तो बाजूला हात जोडून उभा राहिला; पण श्रीस्वामीमहाराजांनी त्या दिवशी त्याची उपेक्षाच केली. काही वेळापूर्वी श्रीस्वामीमहाराजांनी ज्याचा उल्लेख केला होता, तोच हा वेडसर तरुण असेल असे कोणाच्या लक्षात आले नाही; परन्तु ज्यावेळी लोकांनी त्याच्याकडे निरखून पाहिले त्यावेळी हा माणूस आपल्या ओळखीचा असून पूर्वी वारंवार इकडील भागात गुळाचा व्यापार करण्यासाठी येत असे याची त्यांना खात्री

पटली. बहुधा श्रीस्वामीमहाराजांनी प्रवचनात ज्याचा उल्लेख केला तोच हा माणूस असून अत्यंत विरक्त बनून तो त्यांच्याकडे आला असावा असे लोकांना वाटले.

रोज सकाळी स्नान करून तो श्रीस्वामीमहाराजांच्या माडी-वरील खोलीत येऊन एका बाजूला स्वस्थ बसून राहत असे. श्रीस्वामीमहाराज भिक्षेसाठी बाहेर गेले की, तो बाहेर जाऊन कोठें तरी भोजन उरकून ते परतण्यापूर्वी पुन्हा आपल्या जागेवर येऊन बसत असे. त्याला आपल्या जवळ घेण्यापूर्वी श्रीस्वामीमहाराजांनी त्याची परीक्षाच चालविली होती. त्यामुळे श्रीस्वामीमहाराज त्याच्याकडे दुर्लक्ष करीत होते. असे आठ दिवस गेले. नवव्या दिवशी श्रीस्वामीमहाराजांनी त्याला असे विचारले की, "तू असा येथे दररोज का बरे बसून राहतोस ?"

हा प्रश्न ऐकताच त्या ब्राह्मण गृहस्थाला खूप आनंद झाला व तो त्यांना असे म्हणाला की, "सद्गुरू लाभासाठी मी दाही दिशा भटकत फिरलो. अखेर हेच समर्थ चरण माझा उद्धार करतील या विश्वासाने मी आपल्या चरणी शरण आलो आहे."

हे ऐकताच श्रीस्वामीमहाराजांनी त्याला असे विचारले की, "तू कोण ? कोठचा ? आणि सद्गुरुलाभासाठी असा का बरे भटकत आहेस ?"

श्रीस्वामीमहाराजांनी दाखविलेल्या या आस्थेने त्याला फार आनंद झाला. श्रीस्वामीमहाराजांच्या दारी आठ दिवस तिष्ठत राहून केलेल्या तपाचे आपणास चांगले फळ लाभत आहे असा मनाशी विचार करून तो त्यांना असे म्हणाला की, "महाराज ! मी आपणास माझा सर्व पूर्ववृतान्त व माहिती सांगतो. सुरतेपासून दहा मैलावर असलेल्या तेलंगपूर या गावी माझा जन्म झाला. माझ्या वडिलांना पहिल्या तीन मुली झाल्यामुळे त्यांनी आपल्याला मुलगा

व्हावा म्हणून नवस केला. त्यामुळें मी नवसा-सायासाने झालेला मुलगा आहे. माझे मूळ नाव कल्याण असे आहे; परन्तु लहानपणी मी अत्यंत अल्लडपणाने व हूडपणाने वेड्यासारखा वागत असल्या-मुळे लोक मला गांडा म्हणजे वेडा असे म्हणत असत.

माझे लग्न वयाच्या आठव्या वर्षीच झाले. माझे प्राथमिक शिक्षण झाल्यावर मी काही दिवस एका शाळेत शिक्षकाची नोकरी केली. परन्तु पुढे तेथे माझे मन रमेना म्हणून एका व्यापाऱ्याकडे मी नोकरी धरली; पण माझा जात्याच ओढा अध्यात्माकडे असल्यामुळे व आपल्याला मनःशांती लाभावी अशी माझी तीव्र इच्छा असल्यामुळे मी त्या व्यापाऱ्याकडील नोकरी सोडली आणि माझ्या अध्यात्म-लाभाच्या आणि मनःशांतीच्या ध्येयपूर्तीसाठी साधुपुरुषांच्या. सत्पुरुषांच्या व महात्म्यांच्या शोधार्थ मद्रासपर्यन्त फिरलो; पण मला कोणाही संताची भेट झाली नाही. मद्रासमध्ये मी इब्राहिमभाईंच्या पेढीवर नोकरी धरली; पण बहिणीचे यजमान निवर्तल्याचे कळल्या-मुळे मी पुन्हा तेलंगपूरला परत आलो. नंतर माझ्या वडिलांनी मला एक कापडाचे दुकान काढून दिले; परन्तु उधारीमुळे ते दुकान तोटयात गेले. त्यावेळी मला असे वाटू लागले की, उद्योग-व्यापार काय आणि नोकरी काय, दोन्हीही काही माझ्या नशिबात नाहीत. ज्यावेळी संसाराची जबाबदारी काही अंशाने तरी आपल्या शिरावर घेऊन कुटुंबाच्या पालनपोषणास हातभार लावावयाचा त्यावेळी प्रत्येक क्षेत्रामध्ये येणाऱ्या अपयशामुळे मी अगदी निराश झालो.

माझ्या मनाला अशी निराशा आली; तरीसुद्धा मी पुन्हा नोकरीच्या शोधार्थ भटकत भटकत नाशिक येथे आलो. येथे एका साधूने मला श्रीरामेश्वराची यात्रा पायी करण्यास सांगितले. त्याप्रमाणे मी दक्षिणेला जावयाला निघालो; पण तिकडे जाण्यापूर्वी

मी वडिलांना रामेश्वराला जात आहे असे पत्राने कळविले. दक्षिणेमध्ये वलवपूर येथे इब्राहिमभाईंच्या दुकानाची शाखा होती. श्रीरामेश्वराच्या दर्शनाऐवजी मी या दुकानात नोकरीला राहिलो; पण येथे माझे दैव आड आले आणि ही नोकरी सोडून मला पुन्हा तेलंगपूराला जावे लागले. भटकत असलेला आपला मुलगा पुन्हा घरी आला याचा माझ्या वडिलांना फार आनंद झाला. त्यांनी मला निकोरा येथे तंबाखूचे दुकान घालून दिले. मग मी सपत्नीक निकोऱ्याला राहून हे दुकान चालवू लागलो. याही धंद्यामध्ये पूर्वीच्या कापड-धंद्याचीच पुनरावृत्ती झाली व उधारी वाढली. त्यावेळी माझ्या मंडळींनी वडिलांना माझी धंद्यातील प्रगती कळविली. ते कळताच वडील निकोऱ्याला आले व त्यांनी माझी खूप कानउघाडणी केली. नैराश्य आणि त्यापोटी निर्माण झालेले वैराग्य यांनी ज्यावेळी परम सीमा गाठली त्यावेळी चित्ताच्या तळमळीमुळे मला अन्नपाणीही गोड लागेना आणि माझे आईवडील जिवंत असल्याने मला तपश्चर्येकरिता बाहेरही पडता येईना. माझ्या घरची चांगली श्रीमंती होती; पण कोणत्याही विषयापासून मला सुख व समाधान मिळेना. यामुळे व्यापाराचे निमित्त करून नर्मदातीरावर राहून मी तेथील ब्राह्मणांची सेवा करण्यात काळ घालवू लागलो; परन्तु माझ्या वडिलांना हे पसंत पडले नाही. ते मला त्याबद्दल फार कटू बोलले. त्यामुळे मी व्यापार बंद केला व वसुलीच्या निमित्ताने एक दिवस माझ्या पत्नीचा त्याग करून एका रात्री घराबाहेर पडलो आणि भटकत भटकत नर्मदा किनारी आलो. त्यावेळी माझ्या ठिकाणी कडकडीत वैराग्य निर्माण झाले होते. त्यामुळे मी शूळपाणीश्वराच्या अरण्यात पर्णकुटी बांधून तप करावयाला सुरुवात केली; पण तेथे दुसरेच एक संकट माझ्या पुढे उभे राहिले. तेथे भिल्लांची वस्ती आहे. माझी तपश्चर्या पाहून हे भिल्ल लोक मला देव मानू लागले. साधनेमधील हे मोठ्यात

मोठे विघ्न होते. ते टाळण्यासाठी मी पुन्हा प्रवास सुरू केला.

त्यानंतर बैराग्याच्या वेषात फिरत फिरत मी ॐकारेश्वराच्या झाडीत एका वडाच्या झाडाखाली राहू लागलो. त्यावेळी सद्‌गुरू केव्हा भेटतील व आपले जीवन केव्हा कृतार्थ होईल अशी मला सारखी उत्कंठा लागली होती. तेव्हापासून लोक मला ब्रह्मचारी म्हणू लागले. पुढे प्रवास करताना बागदी संगमाजवळ माझी श्री. पाडुरंग-बाबा या नावाच्या एका समर्थ अधिकारी पुरुषाशी गाठ पडली. काही लोक त्यांना श्रीपांडुरंगमहाराज असे म्हणत असत. ते नर्मदा परिक्रमा करणाऱ्या यात्रेकरूंची सेवा करीत असत. ते स्वतः भिक्षा मागून धान्य आणीत असत व स्वतः दळून पीठ काढून त्याचे अन्न शिजवून परिक्रमा करणाऱ्या लोकांना ते देत असत. लोकांची ही सेवा हीच श्रीपांडुरंगबाबांची साधना होती. एका रात्री काही चोरट्यांनी श्रीपांडुरंगबाबांकडील तयार केलेल्या अन्नाची चोरी केली व रात्री त्या चोरांनी ते अन्न स्वतःच खाल्ले. परिणामतः रातोरात पोट फुगून ते चोर मरणोन्मुख झाले. औषधाने त्यांना काही गुण येईना. शेवटी ते चोर श्रीपांडुरंगबाबांना शरण गेले. त्यावेळी त्या महात्म्याने पुन्हा अन्न देऊन त्यांना जेवू घातले व उपदेशाने त्यांची वृत्ती सुधारून त्यांना परत पाठवून दिले. श्रीनर्मदामाता श्रीपांडुरंगमहाराजांवर प्रसन्न होती. त्यामुळे मी त्यांना शरण गेलो आणि मला सद्‌गुरू लाभ घडवून आणावा म्हणून त्यांची प्रार्थना केली. माझी ती दयनीय स्थिती पाहून ते मला असे म्हणाले की, "अरे! या भयंकर जंगलात साधू सापडणे व सद्‌गुरुलाभ घडणे कसे शक्य आहे? तू नेमावर येथे सिद्धनाथाच्या मंदिरात जाऊन जपानुष्ठान कर, म्हणजे तेथे तुला सद्‌गुरूचा शोध लागेल. श्री. पांडुरंगबाबांच्या उपदेशाप्रमाणे व आज्ञेप्रमाणे मी नेमावर येथील सिद्धेश्वराच्या मंदिरात अनुष्ठान केले. तेथे काही मंडळींकडून आपली कीर्ती माझ्या

कानावर आली. त्यावेळी मला असे वाटू लागले की, मी आपणास शरण आलो; तर आपण माझ्यावर कृपा करून कृतार्थ कराल आणि आता आपल्याला पाहिल्यावर माझी ही खात्री योग्य होती, असेच मला वाटू लागले आहे. तरी आपण माझ्यावर अनुग्रह करावा अशी माझी आपल्या चरणी प्रार्थना आहे.

आपले नाव कळल्यावर मी नेमावरला निघालो. पुढे चिखलद्याला आपली भेट होईल असे कळल्यावर मी चिखलद्याला आलो. तेथे काही दिवस मुक्काम करून राहिलो; पण तेथे मला असे कळले की, आपली गरुडेश्वरला भेट होण्याची शक्यता आहे. म्हणून मी गरुडे-श्वराला गेलो; पण तेथेही आपण नव्हता. नंतर आपला मुक्काम तिलकवाड्याला आहे असे कळले म्हणून मी तिलकवाड्याला गेलो; पण आपण त्या पूर्वीच चांदोद येथे गेला होता. पुढे आपल्या शोधार्थ मी व्यासतीर्थ, शुकदेव, अनसूयातीर्थ इत्यादि तीर्थक्षेत्रांचे दर्शन घेत घेत चांदोदला येऊन पोहोचलो. नंतर आपला मुक्काम शिनोरला श्रीमार्कंडेश्वराच्या मंदिरामध्ये आहे असे कळताच मी येथे आलो."

श्री. गांडाबुवांची ही सर्व हकीकत ऐकून श्रीस्वामीमहाराजांच्या चेहऱ्यावर एक स्मितरेषा चमकून गेली. त्या स्मित हास्यामध्ये मोठा अर्थ भरलेला होता. श्रीस्वामीमहाराजांचे आणि या वेड्याचे ऋणानुबंध फार जुने म्हणजे पूर्व जन्मीचे असावेत. या जन्मी ते अधिक दृढ व्हावयाचे होते, असेच त्या हास्यातून ध्वनित झाले असावे.

श्री. गांडाबुवांच्या घरची मंडळी त्यांच्या शोधातच होती. राज-पिपळा संस्थानचे न्यायाधीश श्री.खंडुभाई देसाई शिनोरला श्रीस्वामी महाराजांच्या प्रवचनाला येत असत. त्यांचा श्री. गांडाबुवांच्या कुटुंबियांशी उत्तम परिचय होता. श्री. गांडाबुवांना श्रीस्वामी-

महाराजांबरोबर पाहिल्यावर त्यांनी तेलंगपूरला त्यांच्या वडिलांना श्री. गांडाबुवा शिनोरला असल्याचे कळविले. त्यावेळी त्यांचा चुलत भाऊ आणि त्यांच्या बहिणीचे यजमान त्यांना शोधीत शिनोरला आले; पण त्यांनी त्यांना ओळख दाखविली नाही. तेव्हा एकान्तामध्ये त्यांनी श्रीस्वामीमहाराजांना श्री. गांडाबुवांना घरी पाठविण्याची विनंती केली. त्यावेळी त्यांना श्रीस्वामीमहाराज असे म्हणाले की, "मी कुठे धरून ठेवला आहे त्याला? चिंता करू नका. तो आपल्या आईवडिलांची सेवा करावयाला योग्य वेळी घरी येईल."

पुढे काही दिवसांनी श्री. गांडाबुवा यांना बरोबर घेऊन श्रीस्वामी महाराज निकोदा येथे गेले. तेथे त्यांनी चावडीजवळच्या शिवालयात मुक्काम केला. त्या ठिकाणी श्रीस्वामीमहाजांनी त्यांना योगाभ्यास शिकविला. त्यानंतर थोड्या दिवसांनी तेथेच श्रीशंकराच्या देवळात त्यांना राहावयास सांगून श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "तू येथे शंकरासमोर योगाभ्यास कर. श्रीशंकरपरमात्मा तुला त्याचे योग्य फळ देतील." अशा रीतीने श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना तेथेच राहावयाला सांगितले व ते पुढे निघून गेले. त्यानंतर काही दिवसांनी श्री. गांडाबुवा श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला आले असताना त्यांनी त्यांना आपल्या आईवडीलांना भेटून येण्यास सांगितले व ते त्यांना तशी आज्ञा करताना असे म्हणाले की, "आईवडील हे परमेश्वरस्वरूप व गुरुस्वरूप आहेत. त्यांच्या जिवाला यातना होतील असे वर्तन पुत्राने करू नये. तू प्रथम घरी जाऊन आपल्या आईवडिलांची क्षमा माग. सर्व वृतान्त त्यांच्या कानी घाल. आता तुझे मन संसारात रमणे शक्य नाही, अशी त्यांची खात्री पटली की, मग पुत्राचे सहस्र अपराध पोटात घालून तुझे आईवडील तुला येथे येण्यासाठी संमती देतील. पुढील चातुर्मास द्वारकेला होणार आहे. तेथे आईवडिलांची सम्मती व आज्ञा घेऊन ये." याप्रमाणे आज्ञा

झाल्यामुळे श्री. गांडाबुवा शके १८२० च्या चैत्रात तेलंगपूरला परत गेले.

श्री.गांडाबुवांना त्यांच्या आईवडिलांच्या भेटीला पाठवून देऊन श्रीस्वामीमहाराज जुनागढ संस्थानातील प्रसिद्ध श्रीदत्तक्षेत्र गिरनार पर्वतावर जावयाला निघाले. पुराणप्रसिद्ध रैवतक पर्वत म्हणजेच आजचा गिरनार पर्वत होय. या पर्वताला एकूण एकवीस शिखरे आहेत; पण त्यांपैकी फक्त पाच शिखरे यात्रास्थाने म्हणून प्रसिद्ध आहेत. पहिल्या शिखरावर श्रीमत्स्येन्द्रनाथ व श्रीगोरक्षनाथ यांच्या पादुका असून येथपर्यन्त सहा ते साडेसहा हजार पायऱ्या आहेत.नंतर थोड्या पायऱ्या खाली उतरून पुन्हा दीडहजार पायऱ्या वर चढून गेल्यावर दुसरे शिखर लागते. या शिखरावर अंबादेवीचे प्रशस्त मंदिर आहे. भारतातील बावन्न शक्तिपीठांपैकी हे एक जागृत शक्तिपीठ मानले जाते. येथून पुन्हा पाचसातशे पायऱ्या उतरून, पुढे हजार दीड हजार पायऱ्या चढून वर गेल्यावर तिसरे शिखर लागते. हे श्रीगुरुशिखर होय. ही भगवान् श्रीदत्तात्रेयांची तपोभूमी मानली जाते. येथे श्रीदत्तात्रेयांच्या पादुका आहेत. येथपर्यन्त दहा-हजार पायऱ्या होतात. चौथ्या व पाचव्या शिखरावर देवीची मंदिरे आहेत. तिसऱ्या शिखरावर जाऊन श्रीस्वामीमहाराजांनी श्रीदत्त-पादुकांना वंदन केले व तेथून श्रीसोरटी सोमनाथचे दर्शन व्हावे म्हणून माघ महिन्यात ते श्रीप्रभासक्षेत्रास जाण्यास निघाले.

**अनन्तकोटी ब्रह्माण्डनायक श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य भगवान् श्रीवासुदेवानन्दसरस्वती श्रीदत्तात्रेयस्वामीमहाराज यांचा अखंड जयजयकार असो. श्रीस्वामीमहाराजांचे परमभक्त व त्यांचे धाकटे बंधू परमपूजनीय श्रीसीतारामहाराज यांनी प्रेम, दया व करुणा यांचे सागर असलेल्या आपल्या श्रीगुरुमूर्तींचे वर्णन करून, कलियुगात श्रीस्वामीमहाराजांना उपमा देण्यास या भूतलावर**

कोणीही नसल्यामुळे ते एकमात्र अनुपमेय असे परमहंस परिव्राजकाचार्य आहेत हे सांगून, त्यांच्या यशोकीर्तीचा जो डिंडिम दशदिशात घुमवून गुणगान केले आहे, त्यात आपण सर्वजण समाविष्ट होऊन, तसेच गुणगान करून, ज्याप्रमाणे आपण आपल्या भक्तश्रेष्ठ श्रीसीतारामहाराजांना चित्तविश्रांती दिली त्याप्रमाणेच आपल्या चरणरजःकणांचे आम्ही भक्त आहोत, ही आमची दृढतम अशी भक्ति, श्रद्धा व निष्ठा जाणून घेऊन, आम्हालाही चित्तविश्रांती देऊन धन्य व कृतार्थ करा, अशी नम्रातिनम्र प्रार्थना त्यांच्या परमकोमल व परमपवित्र चरणी प्रस्तुत करू.

### पद

रम्य किती ही श्रीगुरुमूर्ति। भजका भजनीं दे जी स्फूर्ति ।। ध्रु० ।।
दुष्ट जनातें सुजन करोनी। सुमार्ग दाउनी केली कीर्ती ।। १ ।।
योगीजन हे ध्याती निशिदिनीं। रम्य मनोहर वामनमूर्ति ।। २ ।।
कलिमाजीं या नाहीं दुसरी। उपमा द्याया या भूवरती ।। ३ ।।
किति वर्णावे गुण तियेचे। सीतारामीं दे विश्रांती ।। ४ ।।



## – अध्याय आठवा –

प्रसीद मे सागस आर्तबंधो कारुण्यसिंधोऽनुपमास्त बंधो ।
बंधो मृषापि व्यथयत्ययं मां स्वप्नोपमं छिंध्यवसवंतो माम् ।।

चातुर्मास नववा–शके १८२१–इ. स. १८९९–द्वारकाः–

श्रीस्वामीमहाराज गिरनार पर्वतावरून श्रीदत्तपादुकांचे व सिद्धांचे साक्षात् दर्शन घेऊन मोठ्या समाधानाने पुढे श्रीप्रभासपट्टण क्षेत्रात श्रीसोरटी सोमनाथच्या दर्शनाला गेले. श्रीसोमनाथतीर्थ भारताच्या प्राचीन समृद्धीचे आणि वैभवाचे केन्द्रस्थान आहे. संपत्तीच्या लोभाने झालेल्या परकीय आक्रमणांचे घाव पचवीत,

आजही हे क्षेत्र आपल्या गतवैभवाची साक्ष देत ताठ मानेने उभे आहे.

श्रीसोमनाथ मंदिराचे पुजारी श्री. बाळंभट मोडे यांच्या आग्रहास्तव श्रीस्वामीमहाराज या ठिकाणी काही दिवस राहिले. हा भाग पूर्वीच्या बडोदा संस्थानात येत असे. श्रीस्वामीमहाराजांचा मुक्काम येथे असताना बडोदा संस्थानचे दिवाण काही मंडळींना घेऊन श्रीसोमनाथाच्या दर्शनाला आले होते. श्रीस्वामीमहाराजांची कीर्ती यावेळी बडोदा संस्थानासह सम्पूर्ण गुजराथमध्ये पसरत चालली होती. श्रीसोमनाथाच्या मंदिरामध्ये श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन म्हणजे मणिकांचन योग होता. दिवाणसाहेब श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला गेले. " ऐकिले होते मी तैसेची पाहिले " अशी त्यावेळी दिवाणांची अवस्था झाली. किंबहुना श्रीस्वामीमहाराजांबद्दल त्यांनी जे काही ऐकले होते, त्याहून काहीतरी अधिक त्यांच्या ठिकाणी आहे, अशी त्यांची खात्री झाली. श्रीस्वामीमहाराजांच्या व्यक्तिमत्त्वाचा प्रभावच असा होता की, त्यांच्या दृष्टिपथात जो येई तो आपलासा होऊन जाई. कठोर तपश्चर्येमुळे अग्नीतून बाहेर पडलेल्या तप्त सुवर्णाप्रमाणे व दिव्य तेजाने उजळलेल्या त्यांच्या देहावर दृष्टी पडताच कोणाचीही अशी खात्री पटत असे की, हे अमानवीय ईश्वरीरूप आहे. विरोधाची, वाईट विचारांची व कुसंस्कारांची जळमटे त्या तेजामध्ये जळून जात असत. प्रकांड विद्वत्तेने चमकणारे आणि आत्मसाक्षात्काराने तृप्त झालेले श्रीस्वामीमहाराजांचे मुखकमल पाहून कोण बरे त्यांच्यापुढे नतमस्तक होणार नाही ?

बडोदा संस्थानचा कारभार त्यावेळच्या काही संस्थानांप्रमाणे " संस्थानी कारभार " म्हणजे स्वच्छंद वर्तन करणाऱ्या लोकांचा कारभार नव्हता. मात्र बडोदा हे एक आदर्श व प्रगत विचारांचे

संस्थान असल्यामुळे संस्थानचे दिवाण वगैरे अधिकारी संस्थानच्या नोकरीमुळे व जबाबदाऱ्यांमुळे आपल्या आचारधर्मात शिथिल होते; पण श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाने व पवित्र संगतीमुळे त्यांच्यामध्ये फरक पडला व कोणत्याही परिस्थितीमध्ये आचारधर्म पाळणे, हे प्रत्येक माणसाचे कर्तव्य आहे, ही गोष्ट त्यांना चांगल्या तऱ्हेने पटली. ईश्वराचे अस्तित्व हे साधुमहात्म्यांच्या रूपाने आपणामध्ये वावरत असते याची जाणीव या अधिकाऱ्यांना झाली. श्रीस्वामीमहाराज तर श्रीदत्तप्रभूंच्या आज्ञेने सनातन धर्माचे पुनरुज्जीवन करण्यासाठीच दंड ग्रहण करून निघाले होते. कधी कधी त्यांना लोकांना उपदेश करण्याचीही गरज वाटत नसे. श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन आणि त्यांच्या आचारांचे निरीक्षण या गोष्टी वाल्याचा वाल्मीकी करावयाला पुरेशा असत.आपल्या आचारावरूनच लोकांनी शिक्षण घ्यावे व त्याप्रमाणे त्यांनी वागावे हीच त्यांची आचाराबद्दलच्या कटाक्षांची धारणा होती. त्यामुळेच अशा थोर महात्म्यांबद्दलचा आदर व्यक्त करताना श्रीसंततुकाराममहाराजांनी असे म्हटले आहे की–

**बोले तैसा चाले । त्याचीं वंदीन पाउलें ॥**
**अंगें झाडीन अंगण । त्याचें दास्यत्व करीन ॥**
**त्याचा होईन किंकर । उभा ठाकेन जोडोनि कर ॥**
**तुका म्हणे देव । त्याचें चरणीं माझा भाव ॥**

अशा रीतीने श्रीस्वामीमहाराजांचा श्रीप्रभासपट्टणात काल जात असताना एक दिवस देवांनी त्यांना अशी आज्ञा केली की, "द्विसाहस्री गुरुचरित्रावर टीका लिहावी." श्रीस्वामीमहाराजांना देवांची आज्ञा शिरसावंद्य होती; पण हे घडावे कसे ?; कारण त्यावेळी द्विसाहस्री, या पूर्वाश्रमात माणगावी ( खण्ड पहिला, पृष्ठ १७५–१७६ ) रचल्या गेलेल्या, ग्रंथाची मूळप्रत श्रीस्वामीमहा-

राजांपाशी नव्हती. असे असले; तरी भगवान् श्रीदत्तात्रेयच सर्व टीका सांगणार असल्यामुळे त्यांच्या कृपेनेच सर्व घडून येणार होते.

अशा प्रकारे दुसऱ्या दिवसापासून श्रीस्वामीमहाराजांनी देवांच्या आज्ञेप्रमाणे टीका लिहिण्यास आरंभ केला. त्यावेळी त्यांनी आपल्या दिव्यस्मृतीने द्विसाहस्रीग्रंथातील श्लोक आठवून टीका लिहावयाला सुरुवात केली. नवव्या अध्यायापर्यन्त टीका लिहून झाल्यावर त्याबद्दल एका भक्ताला लिहिलेल्या पत्रात श्रीस्वामीमहाराजांनी असे म्हटले आहे की, " तूर्त येथें विशेष पाठ देण्याचें वगैरे नसल्यामुळें रोज दोन घटका गुरुचरित्रावर टीका लिहिण्याची होत असते. स्तुति व पहिले चार अध्याय आतांच पुरे झाले. संस्कृत टीका करणेंची लहर लागली आहे. तूर्त बाराशें झाली. पुढें कशी लहर लागेल कोण जाणें ? श्रीदत्त. " वरील पत्रातील " जशी लहर लागेल त्याप्रमाणे " याचा आपण असा अर्थ घ्यावयास हवा की, श्रीदत्तात्रेयांची आज्ञा होईल त्याप्रमाणे टीका होईल.

श्रीस्वामीमहाराजांचे पूर्वाश्रमीचे भक्त व माणगावच्या श्रीदत्तमंदिराची त्यावेळी सर्व व्यवस्था पाहणारे श्री. रामभाऊ सबनीस, यांचा मुलगा श्री. गजानन, हा सबनीस कुटुंबातच दत्तक गेला होता व आता श्री. अमृतराव या नावाने ओळखला जात होता. हा द्वारकेला मामलेदार होता. या श्री. गजाननाची मुंजसुद्धा श्रीस्वामीमहाराजांच्या हस्तेच माणगावला झाली होती. श्रीस्वामीमहाराज श्रीप्रभासपट्टणला आले आहेत असे कळताच श्री. सबनीस मामलेदार महाराजांच्या भेटीला आले. परस्परांची भेट झाली व ओळखही पटली. श्री. सबनीस मामलेदारांच्या हृदयामध्ये श्रीस्वामीमहाराजांबद्दल आदर व भक्ती निर्माण झाली. त्यांच्या वृत्तीमध्ये विलक्षण फरक पडला. श्रीस्वामीमहाराजांच्या अखेरच्या दिवसात श्रीक्षेत्र गरुडेश्वरी, त्यांची सेवा करण्याचे भाग्य श्री. सबनीस मामलेदारांना लाभले होते.

श्रीप्रभासक्षेत्राहून श्रीस्वामीमहाराज सरस्वती नदीच्या काठी प्राची या क्षेत्राला गेले. याच पवित्र ठिकाणी योगयोगेश्वर भगवान् श्रीकृष्ण निजधामास गेले. येथे एका वृक्षाखाली बसलेल्या श्रीकृष्ण-प्रभूंच्या अरविंदकमलाप्रमाणे आरक्त असलेल्या अंगठ्याला हरिण-शावकाचे मुख समजून एका व्याधाने बाण मारला होता. आपला अवतार समाप्त करण्याच्या उद्देशाने हे सर्व नाट्य भगवान् श्रीकृष्णांनी घडवून आणले होते.

प्राचीहून श्रीस्वामीमहाराज पोरबंदरला येऊन पोहोचले. पोर-बंदर म्हणजे सुदामपुरी होय. आपला भक्तसखा श्री. सुदामा याच्या मूठभर पोह्यांनी संतुष्ट झालेल्या श्रीकृष्ण परमात्म्याने श्री. सुदाम-देवांना ही नगरी वसवून दिली होती. या ठिकाणी काही दिवस वास्तव्य करून नंतर येथून पुढे हिन्दूंचे सातवे मुक्तिक्षेत्र म्हणून प्रसिद्ध असलेल्या श्रीद्वारका नगरीमध्ये श्रीस्वामीमहाराजांनी प्रवेश केला. त्यावेळी ज्येष्ठ महिना होता.

या दिवसात अवर्षणामुळे येथे दुष्काळ पडला होता. येथील याद-वांची परंपरा गोपालांची असल्यामुळे त्यांना गोधन जीवनापेक्षाही अधिक प्रिय होते. असे असूनही दुष्काळामुळे हे लोक त्यावेळी चाऱ्याच्या व पाण्याच्या अभावी तडफणारी आपली गुरे चारपाच रुपायांना विकावयाला निघाले होते; परन्तु खरेदी करणारा कोणीच नव्हता. सर्वांच्याच घरी दुष्काळाची परिस्थिती होती. या दुष्काळात गुरांची उपासमार तर झालीच; पण माणसांचीही अन्नान्न दशा झाली. शेतकऱ्यांना गुरेच काय; पण बायकामुले सुद्धा सोडून जावयाची पाळी आली. श्री. गायकवाड सरकारने त्यावर्षी लोकांच्या अन्नाची तरतूद करण्यासाठी अडीच लाख रुपये दिले होते. सगळी-कडे दुष्काळ व अन्नधान्याचे दुर्भिक्ष असल्याने दूरच्या प्रांतातून येणाऱ्या धान्यावर सर्वांची नजर लागून राहिलेली असे. हा वेळ

॥ श्रीक्षेत्र गाणगापूर ॥



भगवान् श्रीमन्नृसिंहसरस्वतीस्वामीमहाराज यांच्या निर्गुण पादुका.

## ॥ श्रीक्षेत्र उज्जयिनी ॥



श्रीथोरलेस्वामीमहाराज यांचा दंडधारणविधी
जेथे झाला ते एकमुखी श्रीदत्तमंदिर.



एकमुखी श्रीदत्त मंदिरातील पूजागृह.
सर्वात पुढे डबीमध्ये श्री. राखे यांना
श्रीस्वामीमहाराजांनी दिलेल्या पादुका.

॥ श्रीक्षेत्र हरिद्वार ॥



श्रीथोरलेस्वामीमहाराज यांचा ३ रा व ६ वा असे दोन चातुर्मास श्रीक्षेत्र हरिद्वार येथें झाले.

॥ श्रीक्षेत्र डाकोर ॥



भगवान् श्रीकृष्ण डाकोरनाथजी.



भगवान् श्रीकृष्ण डाकोरनाथजींचे मंदिर.

## ॥ श्रीक्षेत्र ॐकारेश्वर ॥



बारा ज्योतिर्लिंगांपैकी एक प्रसिद्ध ज्योतिर्लिंग.



श्री ॐकारेश्वर मंदिर, श्रीनर्मदामाता, बिनतारांची पूल व परिसर.

॥ श्रीक्षेत्र नेमावर ॥



श्रीक्षेत्र नेमावर येथील श्रीनर्मदेचे नदीमध्ये असलेले नाभिस्थान.



श्रीक्षेत्र नेमावर येथील श्रीसिद्धेश्वराच्या मंदिरातील श्रीस्वामीमहाराजांचे निवासस्थान.

## ॥ श्रीक्षेत्र नेमावर ॥



श्रीसिद्धेश्वरमहादेवाचे मंदिर.



श्रीक्षेत्र नेमावर येथील श्रीविश्वनाथप्रकाशब्रह्मचारी यांच्या आश्रमातील श्रीस्वामीमहाराजांच्या पादुका.

## ॥ श्रीक्षेत्र द्वारका ॥



श्रीक्षेत्र द्वारकेचे श्रीकृष्णांचे जगत्मंदिर व श्रीगोमती नदी.



बेट द्वारका.

पावेतो श्रीस्वामीमहाराजांची कीर्ती गुजराथेत सगळीकडे पसरली होती. अशा या आपत्तीच्या वेळी श्रीस्वामीमहाराजांचे आगमन ही शुभसूचक घटना आहे असे लोकांना वाटले. ज्याप्रमाणे विभांडकपुत्र ऋष्यशृंग मुनीचे पाय रोमपादराजाच्या अवर्षणग्रस्त राज्याला लागताच तेथे पाऊस पडून दुष्काळ निवृत्ती झाली होती त्याप्रमाणे श्रीस्वामीमहाराजांच्या चरणस्पर्शाने येथील भूमी पावन होऊन निश्चित पाऊस पडेल अशी लोकांना आशा वाटली. येथे श्रीस्वामी-महाराजांनी श्रीशंकराचार्यांच्या शारदामठात मुक्काम केला. श्रीमदाद्यशंकराचार्यांनी स्थापन केलेल्या चार पीठांपैकी पश्चिमे-कडील पीठाला शारदापीठ हे नाव आहे.

श्रीस्वामीमहाराज पोरबंदरहून निघून श्रीद्वारकेस येईपर्यन्त त्यांना ३३ दिवस लागले. त्यांचा हा सर्व प्रवास गुजराथ प्रांतातूनच झाला. दक्षिणी ब्राह्मणांकडूनच भिक्षा घ्यावयाची असा त्यांचा नियम असल्यामुळे श्रीस्वामीमहाराजांना या तेहतीस दिवसात भिक्षा मिळाली नाही. त्यामुळे मार्गात गुजराथी ब्राह्मणांकडून मिळालेले खारीक व खोबरे खाऊनच त्यांना राहावे लागले. असल्या पदार्थांवर रोज कित्येक मैलांचा प्रवास करून दिवस काढावयाचे म्हणजे एक महान् दिव्यच होते. परन्तु ज्या धर्मरक्षणाच्या कार्यासाठी त्यांनी अवतार धारण केला होता, त्या उद्देशाची पूर्ती व्हावी व जो चतुर्थ संन्यासाश्रम स्वीकारून त्यांनी हे कार्य करावयाचा निश्चय केला होता, त्या आश्रमाची "सा काष्ठा सा परागतिः।" याप्रमाणे अत्यधिक परावस्था, श्रेष्ठावस्था व उच्चतमावस्था काय असते यांचा एक अपूर्व, लोकोत्तर, अलौकिक, अद्भुत व असामान्य आदर्श सर्व लोकांसमोर दीपस्तंभाप्रमाणे कायमचा उभा असावा व त्याच्या प्रकाशात हजारोहजार लोकांनी आपला संसाराचा प्रवास

मायेच्या खडकावर नाव न आपटता निर्वेधपणे करावा यासाठी त्यांनी अशा प्रकारचे भयंकर शरीरकष्ट सहन करून श्रीद्वारकेची ही यात्रा पुरी केली. आपल्या ध्येपूर्तीसाठी ज्या ज्या अवतारी व लोकोत्तर महापुरुषांनी या भूतलावर कष्ट घेतलेले दिसतात त्या त्या सर्व लोकांमध्ये श्रीस्वामीमहाराजांचे स्थान मूर्धन्य आहे, हे त्रिकालाबाधित सत्य आहे.

अशा प्रकारे या प्रवासात श्रीस्वामीमहाराजांना उपवास घडल्याने त्यांना रक्त पडून खूपच त्रास झाला. पूर्वीपासूनच असलेला त्यांचा संग्रहणीचा विकारही जास्त बळावला. त्यातच पाणी पिण्याचीही सोय राहिली नाही; कारण पाणी प्यायले की, अधिकच त्रास होत असे व तो विकार अधिकच बळावत असे. मात्र ताक घेतल्यावर हा विकार कमी होत असल्याने श्रीस्वामीमहाराज प्रवासात पाणी न पिता मिळेल तेथे ताकच घेत असत. प्रारब्ध भोगूनच संपवावयाचे, ते टाळण्यासाठी कोणताच उपाय करावयाचा नाही, ही वृत्ती श्रीस्वामीमहाराजांनी पूर्वाश्रमापासूनच धरली होती व त्यांचा तसा अपूर्व निर्धार होता. ते त्यांचे ब्रीदच होते, असे म्हटले तर त्यात यत्किंचितही अतिशयोक्ती होणार नाही. त्यामुळे प्रारब्धाचा प्रतिकार करून ते थांबविण्याचा विचार किंवा प्रयत्न श्रीस्वामी-महाराजांनी कधीही केला नाही. अशा स्थितीत तेहतीस दिवस शरीराची पर्वा न करता दृढ मनोनिग्रहाच्या बळावर त्यांनी ही श्रीद्वारकेची यात्रा पूर्ण केली होती.

श्रीद्वारकेमध्ये दक्षिणी ब्राह्मणांची घरे असल्यामुळे श्रीस्वामी-महाराजांना भिक्षेची अडचण पडली नाही; पण गावात दुष्काळ असल्यामुळे लोकांच्या घरी भिक्षेला जाताना त्यांना अत्यंत संकोच वाटत असे. श्रीद्वारकेमध्ये श्रीस्वामीमहाराजांचा चार महिने मुक्काम झाला. आपले सकाळचे आन्हिक उरकल्यावर ते तेथील लोकांना

उपनिषदाचे पाठ देत असत. संध्याकाळी पुराण होत असे. श्रीस्वामीमहाराजांची विद्वता सर्वश्रुत होती. शारदापीठ म्हणजे विद्वानांचे माहेरघर होते. येथील विद्वान् मंडळींनी श्रीस्वामीमहाराजांविषयी ऐकले होते आणि आता पाठाच्या रूपाने त्यांची विद्वत्ता प्रत्यक्ष दिसून येत होती. त्यामुळे तेथील ग्रामस्थांनी श्रीस्वामीमहाराजांना श्रीद्वारकेच्या श्रीशंकराचार्यांच्या गादीवर बसण्याचा आग्रह केला. एवढी मोठी मानाची व ऐश्वर्याची जागा आपण होऊन चालत आली असताना श्रीस्वामीमहाराजांनी ती स्वीकारली नाही. ज्यांनी स्वतःचा संसार केला नाही, ते या गादीच्या संसारात थोडेच गुंतून पडणार ? लोकांच्या आग्रहाला सीमा नव्हती. श्रीस्वामीमहाराज श्रीद्वारका सोडून गेल्यावर पुढे दोन वर्षेपर्यन्त श्रीशंकराचार्यांचे पीठ स्वीकारण्याबद्दल लोकांचा आग्रह चालूच होता; पण ते या आग्रहाला बळी पडले नाहीत. परन्तु पुढे ज्यावेळी तेथील लोकांच्या या आग्रहाची परिसीमा झाली त्यावेळी त्यांनी आता यापुढे हा आग्रह आपणास बिलकुल खपणार नाही, असे जेव्हा निक्षून सांगितले तेव्हा नाईलाजाने तेथील सर्व मंडळी गप्प बसली.

श्रीक्षेत्र प्रभासपट्टणात द्विसाहस्री या ग्रंथावर नवव्या अध्यायापर्यन्त टीका लिहून झाली होती. पुढील १० ते २३ अध्यायांवरील आणि योगरहस्य व बोधरहस्य यांवरील टीका द्वारकेत लिहून पूर्ण झाली. पंधरा वर्षांपूर्वी पूर्वाश्रमात श्रीस्वामीमहाराजांनी माणगावमध्ये "द्विसाहस्री गुरुचरित्र" हा ग्रंथ लिहिला होता. आज एवढ्या कालावधीनंतर मूळ ग्रंथ जवळ नसताना फक्त स्मरणमात्रेकरून या संस्कृत ग्रंथावरील ही टीका आपणाकडून कशी लिहून झाली, या गोष्टीचे खुद्द श्रीस्वामीमहाराजांनाच आश्चर्य वाटले. हे कर्तृत्व आपले नव्हे; याची त्यांना खात्री होती. आपल्या हातून घडलेल्या कोणत्याच गोष्टीचे कर्तृत्व त्यांनी आपणाकडे कधीच घेतले नाही.

त्यांनी लिहिलेल्या एका पत्रावरून त्यांची या ग्रंथनिर्मितीबद्दल काय भावना होती हे स्पष्ट दिसून येते. ते पत्र पुढीलप्रमाणे आहे.

"आश्विन वद्य ७, शके १८२१. द्वारका. सौराष्ट्र देश. श्रीक्षेत्र-प्रभास येथें ९ अध्यायांची टीका झाली. बाकीची आनर्त देश श्रीक्षेत्र-द्वारका येथें १४ अध्याय पूर्ण झाली. ही टीका होणे एवढा ह्या व्यक्तीचा अधिकार नाहीं. रामोहरि करणाऱ्या मुखाचें हें माहात्म्य नव्हे. तर श्रीस्वामींचा अनुग्रह व स्वहृदयस्थ स्वमहिमाख्यापक गुरुप्रसाद जाणावा. नारायण."

या श्रीद्वारकाक्षेत्रामध्ये असतानाच एका गुजराथी भक्ताच्या आग्रहावरून श्रीस्वामीमहाराजांनी द्विसाहस्री गुरुचरित्र ग्रंथावर चूर्णिका लिहून तयार केली. चूर्णिका म्हणजे द्विसाहस्री गुरुचरित्राचा संक्षेपाने संस्कृतमध्ये गद्यरूपाने केलेला सारांश होय. ही चूर्णिका अत्यंत सुबोध अशा संस्कृत भाषेत लिहिली असल्यामुळे मराठी न समजू शकणाऱ्या अन्य भाषिक लोकांना त्याचा लाभ घेता येतो व इतरांनाही सूत्ररूपाने व सारांशरूपाने चूर्णिकेच्याद्वारा श्रीमन्नृसिंह-सरस्वतीस्वामीमहाराजांचे चरित्र सतत व अखंड लक्षात ठेवणे सोपे जाते. मूळ श्रीगुरुचरित्र ग्रंथात नामधारकाने सिद्धांना अगदी सुरुवातीलाच तिसऱ्या अध्यायात असे प्रश्न विचारले आहेत की, "कवणे ठायीं तुमचा वास । नित्य तुम्हां कोठें ग्रास । होईन आतां तुझा दास । म्हणोनि चरणीं लागला ।। ३.५ ।।" त्या वेळी सिद्धांनी या प्रश्नांना अशी उत्तरे दिली की, "जें जें स्थानीं होते गुरु । तेथें असतो चमत्कारु।पुससी जरी आम्हां आहारु।गुरुस्मरण नित्य जाण ।। ३.७ ।। श्रीगुरुचरित्रमहिमान । तेंचि आम्हां अमृतपान । सदां सेवितों याचि गुणें । म्हणोनि पुस्तक दाविलें ।। ३.८ ।।" यावरून हे लक्षात येते की, श्रीपादश्रीवल्लभ श्रीमन्नृसिंहसरस्वतीस्वामीमहाराजस्वरूप श्रीदत्तात्रेयांचे नित्य व अखंड स्मरण हाच श्रीस्वामीमहाराजांनी

आपला नित्य आहार बनविला होता. त्यामुळे श्रीगुरुचरित्राचे महिमान सर्वत्र प्रसृत व्हावे व सर्वांना या चरित्ररूप अमृताचे पान घडावे म्हणून त्यांनी श्रीगुरुचरित्र हे चूर्णिकेच्या सूत्ररूपाने व इतरही अनेक प्रकारांनी वारंवार कथन केले आहे, हे स्पष्ट होते.

श्रीस्वामीमहाराजांनी आज्ञा केल्याप्रमाणे श्री. गांडाबुवा शिनोर-हून आपल्या गावी तेलंगपूर येथे आई-वडिलांची सेवा करण्यासाठी व त्यांची प्रेमाने आज्ञा घेऊन मग श्रीद्वारकेला परत येण्यासाठी गेले होते. त्याप्रमाणे त्यांनी आपल्या आईवडिलांची अनुमती घेतली व ते श्रीद्वारकेला श्रीस्वामीमहाराजांकडे परत येण्यास निघाले. त्यावेळी प्रथम ते तापी नदीवरील अश्विनीकुमार तीर्थावरून श्रीनर्मदातटाकी भडोचला आले.त्यावेळी श्रीस्वामीमहाराज द्वारकेला होते. श्री. गांड-बुवांनी श्रीस्वामीमहाराजांना पत्र पाठवून श्रीद्वारकेला येण्यासाठी अनुमती मागितली. भडोच येथे चातुर्मास करून मग आपणास श्रीद्वारकेला येऊन भेटावे असे श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना कळविले होते. त्याप्रमाणे श्री. गांडाबुवा श्रीद्वारकेला आपल्या गुरुदेवांच्या चरणापाशी येऊन उपस्थित झाले.

त्यावेळी त्यांनी श्रीस्वामीमहाराजांच्या चरणी घराकडील सर्व हकीकत निवेदन केली आणि शेवटी ते त्यांना असे म्हणाले की, "आईवडिलांनी पुढील तीन अटींवर मला इकडे येण्यास अनुज्ञा दिली आहे. त्यातील पहिली अट अशी आहे की, आईवडिलांच्या अंतकाळी मी त्यांच्याजवळ उपस्थित राहिले पाहिजे. दुसरी अट अशी घातली आहे की, आईवडिलांचे सर्व और्ध्वदेहिक कृत्य मी पार पाडले पाहिजे आणि त्यांनी तिसरी अट अशी घातली आहे की, माझ्या मुलीचे लग्न मी लावून दिले पाहिजे. या तीन गोष्टी मी निश्चित करीन असे त्यांनी माझ्याकडून वचन घेतले व मगच मला इकडे येण्यास परवानगी दिली."

श्री. गांडाबुवांनी सांगितलेली ही सर्व हकीकत ऐकून श्रीस्वामी-महाराज त्यांना असे म्हणाले की, "काही हरकत नाही. श्रद्धेप्रमाणे कार्यसिद्धी होऊन जाईल." याचा अर्थच असा आहे की, आपल्या शिष्यावर त्याच्या आईवडिलांनी टाकलेल्या जबाबदाऱ्या श्रीस्वामी-महाराज उत्तम रीतीने पार पाडून घेतील. एकदा एखाद्याचा शिष्य म्हणून स्वीकार केल्यानंतर त्याचा योगक्षेम वाहण्याची जबाबदारी गुरूचीच नाही काय? बालक मदतीसाठी मातेशिवाय दुसऱ्या कोणाकडे हात पसरणार? श्री. गांडाबुवांची योग्यता जाणल्याशिवाय श्रीस्वामीमहाराजांनी त्यांचा शिष्य म्हणून स्वीकार केला नसणार, हे जरी नितान्त खरे असले; तरी हा शिष्य आपल्या कसोटीला किती उतरतो हे पाहण्यासाठी श्रीस्वामीमहाराजांनी एकदा श्री. गांडा-बुवांची पुढीलप्रमाणे परीक्षा पाहिली.

ज्या दिवशी श्रीस्वामीमहाराज श्रीक्षेत्रद्वारका सोडून पुढील प्रवासाला जावयाला निघणार होते, त्याच्या आदल्या दिवशी शुक्रवारी श्रीस्वामीमहाराज श्री. गांडाबुवांना हाक मारून असे म्हणाले की, "प्रभासपट्टण येथे श्री. बाळंभट मोडे यांची कन्या द्वारकाबाई ही आमचे दर्शन झाले नाही म्हणून शोक करीत असून आमच्या दर्शनासाठी ती अगदी व्याकूळ झाली आहे. तू आत्ताच्या आत्ता बेट द्वारकेत जाऊन भगवान् श्रीकृष्णप्रभूंचे दर्शन घे व रविवारी बोटीने प्रभासपट्टणास जाऊन द्वारकाबाईचे समाधान करून मला राजकोटला पुन्हा परत येऊन भेट."

आपल्या श्रीसद्गुरुनाथमहाराजांनी केलेली आज्ञा शिरसावंद्य मानून श्री. गांडाबुवा प्रथम बेटद्वारकेला व तेथून श्रीप्रभासपट्टणला जावयाला निघाले. श्रीस्वामीमहाराजांच्या आज्ञेप्रमाणे ते निघालेले पाहून तेथे जमलेले लोक त्यांना असे म्हणाले की, "महाराज! आज (शुक्रवारी) आता फार रात्र झाली आहे. यावेळी रस्त्याने

जाणे फार धोक्याचे आहे आणि यांना पायी प्रवास करण्यासही बराच वेळ लागेल. तरी यांना उद्या शनिवारी तिकडे पाठविले तर बरे होईल, असे आम्हा सर्वांना वाटते."

श्रीस्वामीमहाराजांनी लोकांचे बोलणे ऐकले व श्री. गांडाबुवांकडे एक प्रेमळ कटाक्ष टाकून ते फक्त हसले. आपल्या श्रीसद्‌गुरुनाथमहाराजांच्या हसण्याचा व प्रेमळ कटाक्षाचा अभिप्राय श्री. गांडाबुवांसारख्या एकनिष्ठ व श्रद्धावान् शिष्याच्या तात्काळ ध्यानात आला. त्यांनी त्यांच्या आज्ञेप्रमाणे जावयाची तयारी केली. त्यांच्या लेखी श्रीसद्‌गुरुनाथमहाराजांची आज्ञा म्हणजे साक्षात् ईश्वराचीच आज्ञा होती व ही एक प्रकारची आपल्यावर त्यांनी केलेली महान् कृपाच आहे, असा त्यांचा दृढनिश्चय होता. श्रीगुरुकृपा पाठीशी असल्यावर संकटांची पर्वा सच्छिष्याला कशी असणार ? शुक्रवारी रात्री प्रवास करून श्री. गांडाबुवा मध्यरात्रीच्या सुमारास समुद्रकिनारी येऊन पोहोचले. तेथे बेटद्वारकेला जावयाच्या गलबताला त्या दिवशी विलंब झाल्यामुळे ते अद्याप सुटावयाचे होते; पण नावाडी श्री. गांडाबुवांना गलबतात घेईनात. त्यावेळी ते नावाडी त्यांना असे म्हणाले की, "महालकरी श्री. नारायणराव यांच्या परवानगीवाचून तुम्हाला या गलवतातून जाता येणार नाही." हे ऐकताच श्री. गांडाबुवा त्यांना असे म्हणाले की, "मला श्री. नारायणराव महालकऱ्यांच्याच घरी जावयाचे आहे." हे कळताच नावाड्यांनी श्री. गांडाबुवांना गलबतात घेतले व बेटद्वारकेला महालकऱ्यांच्या घरी रात्री दोन वाजता पोहोचविले. श्री. नारायणराव श्रीस्वामीमहाराजांची आतुरतेने वाट पाहात होते; परन्तु श्रीस्वामीमहाराजांऐवजी त्यांचे शिष्य आलेले पाहून त्यांना आनंद झाला. उर्वरित रात्र श्री. गांडाबुवांनी महालकऱ्यांच्या घरी काढली. दुसऱ्या दिवशी त्यांनी नित्यकर्मं आटोपून भगवान् श्रीकृष्णांचे दर्शन घेतले

व शनिवारी निघून लगेच रविवारी श्रीद्वारकेला परत आले. श्रीस्वामीमहाराज शनिवारीच पुढील संचारासाठी श्रीद्वारकेहून निघून गेले होते. श्री. गांडाबुवा इतक्या लवकर बेटद्वारकेहून परत आल्याचा चमत्कार पाहून श्रीस्वामीमहाराजांच्या अचिंत्य शक्तिबद्दल सर्व लोकांना फार आश्चर्य वाटले. त्यानंतर रविवारच्या दुपारच्या बोटीने श्री. गांडाबुवा श्रीप्रभासपट्टणला गेले.

श्री. बाळंभट मोडच्यांची कन्या गं. भा. द्वारकाबाई हिची श्रीस्वामीमहाराजांवर फार भक्ती होती. श्रीस्वामीमहाराज श्रीप्रभासपट्टणाहून निघून गेल्यापासून त्यांच्या दर्शनाला ती फार व्याकूळ झाली होती. तिची व्याकुळता श्रीद्वारकेला श्रीस्वामीमहाराजांना जाणवली म्हणून तर त्यांनी श्री. गांडाबुवांना तिचे समाधान करण्यास पाठविले होते. अशा प्रकारे त्यांना पाठविण्यात त्यांचा दुहेरी हेतू होता. एका बाजूने श्री. गांडाबुवांची परीक्षा होणार होती व दुसऱ्या बाजूने गं. भा. द्वारकाबाईंचे समाधान होणार होते.

श्री. गांडाबुवा श्रीप्रभासपट्टणला पोहोचल्यावर दुसऱ्या दिवशी गं. भा. द्वारकाबाईंच्या घरी जाऊन त्यांनी त्यांचे समाधान करण्याचा खूप प्रयत्न केला; पण ते त्यांचे समाधान करू शकले नाहीत. श्रीकृष्णाच्या आदेशाप्रमाणे गोपिकांचे सांत्वन करण्यासाठी गेलेल्या उद्धवाला ज्याप्रमाणे त्यांचे सांत्वन न करताच; पण त्यांच्या श्रीकृष्ण भक्तीने प्रभावित होऊन परत जावे लागले त्याप्रमाणेच श्री. गांडाबुवांना सुद्धा गं. भा. द्वारकाबाईंचे समाधान करता आले नाही. भक्तीने व्याकूळ झालेल्या गं. भा. द्वारकाबाईंना श्रीस्वामीमहाराजांचे साक्षात् दर्शन पाहिजे होते. तिच्या भक्तीने प्रसन्न झालेल्या श्रीस्वामीमहाराजांनी त्यांचे दुःख कमी न झाल्यामुळे त्यांना नंतर राजकोट येथे बोलावून घेतले व त्यांना उपदेश करून त्यांच्या मनाचे पूर्णपूणे समाधान केले. त्यानंतरच त्यांच्या मनाला खरी

शांती लाभली. गं. भा. द्वारकाबाईंची ही कथा वाचली म्हणजे आत्मीय मानलेल्या आपल्या भक्तांबद्दल श्रीस्वामीमहाराजांचा वात्सल्यभाव किती पराकोटीचा तीव्र होता हे दिसून येते. अध्यात्माच्या पथावरून चालताना साधकांनी, "जेथें जातों तेथें तूं माझा सांगाती। चालविसी हातीं धरूनियां ॥" या श्रीसंततुकाराम-महाराजांनी सांगितलेल्या न्यायाप्रमाणे चालावयास सुरुवात केली म्हणजे सद्‌गुरू त्यांच्यावर कृपेचा वर्षाव करून त्यांचा उद्धार केल्या-शिवाय राहत नाहीत; कारण गं. भा. द्वारकाबाईंसारखे भावभक्ती असणारे दीन भक्त ईश्वरस्वरूप सद्‌गुरूंना फार आवडतात. त्यामुळेच ते अशा भक्तांना ज्ञानोपदेश करून शांती प्राप्त करून देतात. या सर्वांचे साररूप वर्णन करताना श्रीसंततुकाराममहाराज एका अभंगात असे म्हणतात की –

**कृपावंत किती। दीन बहु आवडती ॥**
**यांचा भार वाहे माथां। करी योगक्षेमचिंता ॥**
**भुलों नेदी वाट। करीं धरूनि दावी नीट ॥**
**तुका म्हणे जीवें। अनुसरतां एका भावें ॥**

आपल्याला नेमून दिलेल्या कार्यात आपण यशस्वी झालो नाही, या खेदात श्री. गांडाबुवांनी प्रभासपट्टण सोडले. तेथून ते श्रीस्वामी-महाराजांच्या आज्ञेप्रमाणे प्राचीसरस्वती, गिरनार इत्यादि स्थानांना भेट देत देत राजकोट येथे श्रीस्वामीमहाराजांना येऊन भेटले.

दीनदुबळ्यांना दुःखमुक्त करून ईश्वर भजनी लावणे व जे स्वधर्मापासून ढळले होते त्यांना आपल्या धर्मामध्ये प्रस्थापित करणे हे श्रीस्वामीमहाराजांचे अवतार कार्य होते. राजकोटमध्ये त्यांचा सर्व वेळ या कार्यात जात असे. राजकोट हे त्यावेळी फार गजबजलेले शहर होते. तेथे इंग्रजी शिकलेले मोठमोठे अधिकारी तसेच भारतीय

शास्त्रांमध्ये पारंगत असे अनेक विद्वान् श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला येत असत. श्रीस्वामीमहाराजांची विद्वत्ता, त्यांचे दिव्य चारित्र्य, निरभिमान वृत्ती आणि परतत्त्वाचा स्पर्श झालेले त्यांचे व्यक्तिमत्त्व पाहून सर्वजण अत्यंत प्रभावित होऊन त्यांच्या चरणी आपोआपच नम्र होत असत. श्रीस्वामीमहाराजांच्या ठिकाणी जसा आप-पर भाव नव्हता तसा हा मोठा हा लहान हाही भाव नव्हता. ते सर्वांना सारखीच प्रेमळ वागणूक देत असत. त्यामुळे सर्वजण श्रीस्वामीमहाराजांचे अगदी दास बनत असत.

एकदा श्री. स्वामीदयानंद यांचा एक शिष्य श्रीस्वामीमहाराजांबरोबर वितंडवाद घालण्याचा प्रयत्न करू लागला. श्रीस्वामीमहाराजांची शांत वृत्ती पाहून तो अधिकच चिडला व त्यांना अद्वातद्वा बोलू लागला. त्यावेळी श्रीस्वामीमहाराज तेथे एकटेच होते. त्यांनी त्याला शान्तपणे असे सांगितले की, "तुझा आमचा काहीही संबंध नाही. तुझ्याशी वादविवाद करण्याची आमची इच्छा नाही. तू विनाकारण ही बडबड का चालविली आहेस? आम्हाला मारण्याचीच तुझी इच्छा असली; तर खुशाल मार व आपल्या मनाचे समाधान करून घे." असे म्हणून श्रीस्वामीमहाराजांनी खरोखरच आपला गाल त्याच्यापुढे केला. रागाने अंध झालेला तो माणूस मागचा पुढचा विचार न करता श्रीस्वामीमहाराजांना मारण्यासाठी पुढे सरसावला. त्यावेळी समोरील माडीवरून एक बाई हा सर्व प्रकार पाहात होती. तो मनुष्य श्रीस्वामीमहाराजांना मारणार इतक्यात ती बाई आरडाओरड करीत माडीवरून धावत खाली आली व सर्व मंडळींना तिने ही हकीकत सांगितली. त्याबरोबर लगेच सर्वमंडळी त्या ठिकाणी धावत आली; परन्तु श्री. दयानंदांचा तो शिष्य त्यापूर्वीच पळून गेला होता.

राजकोटला काहीकाळ मुक्काम केल्यानंतर श्रीस्वामीमहाराज

श्रीसरस्वती नदीच्या किनाऱ्याने प्रवास करीत वढवाण, विरमगाव-मार्गे सिद्धपूरला येऊन पोहोचले. सिद्धपूरला मातृगया असे म्हणतात. श्रीस्वामीमहाराजांनी आपली आसेतुहिमाचल यात्रा कोणत्या ना कोणत्या तरी नदीच्या किनाऱ्याने केली. सिद्धपूर येथे त्यांनी श्रीसरस्वती नदीची स्तुती करून नदीला वंदन केले व हाटकेश्वराच्या मंदिरामध्ये मुक्काम केला. यावेळी सोबत श्री. गांडाबुवा होते. श्रीस्वामीमहाराजांचा येथे तीन महिने मुक्काम झाला. दररोज प्रवचन-पुराणद्वारा त्यांनी श्रीदत्तभक्तीची लाट येथे पसरविली. श्रीदत्तजयंतीचा उत्सव येथे मोठ्या थाटाने पार पडला. पाटणा गावाहून प. प. श्री. बंबंमहादेवसरस्वतीस्वामीमहाराज या नावाचे एक संन्यासी सिद्धपूरला आले होते. त्यांच्याबरोबर आणखीही बरीच संन्यासी मंडळी सिद्धपूरला आली होती. या सर्वांबरोबर शास्त्रचर्चा चाले. प. प. श्री. बंबंसरस्वतीस्वामीमहाराजांच्या आग्रहास्तव व त्यांचा अधिकार पाहून श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना रुद्रभाष्य समजावून सांगून काही वेदान्तही समजावून सांगितला. त्यांच्या उपदेशाचा त्यावेळी अनेक विद्वानांनी लाभ उठविला.

सिद्धपूर येथे श्रीस्वामीमहाराज असताना तेथे आणखीही काही संन्यासी व ब्रह्मचारी राहात होते. त्यांपैकी एक ब्रह्मचारी कर्नाटकातील होता. तो श्रीबद्रीनारायण, श्रीकेदारनाथ, श्रीगंगोत्री, श्रीजम्नोत्री अशी उत्तराखंडाची यात्रा करून आला होता. या प्रवासात त्याला संग्रहणीचा रोग जडला होता. सिद्धपूरला आला त्यावेळी या रोगाने जर्जर होऊन तो अशक्त झाला होता. श्रीस्वामी-महाराज म्हणजे पीडितांचे मायबाप! त्यांनी ग्रामस्थांना या ब्रह्मचाऱ्याच्या खाण्यापिण्याकडे लक्ष देण्यास सांगितले. पण ग्रामस्थांनी श्रीस्वामीमहाराजांच्या सांगण्याकडे लक्ष दिले नाही व त्याला काहीसुद्धा मदत केली नाही. शेवटी श्रीस्वामीमहाराजांनी श्री.

गांडाबुवांना त्याची फक्त पंधरा दिवस व्यवस्था पाहण्यास सांगितले. आपणास फक्त पंधरा दिवसच सेवा करावयास का सांगितले यातील रहस्य श्री. गांडाबुवांना उलगडले नाही; पण त्यासंबंधी अधिक काही विचार न करता त्यांनी पंधरा दिवस त्याची उत्तम सेवा केली. त्यानंतर त्याची प्रकृती अधिकच क्षीण झाली. पंधरा दिवसांनी त्या ब्रह्मचाऱ्याचा अंतकाळ जवळ आला आहे हे जाणून श्रीस्वामीमहाराज त्याच्या जवळ जाऊन त्याला असे म्हणाले की, "तुझ्याजवळ जे गंगाजल आहे ते तू सर्व पिऊन टाक व अखंड ईश्वर नामस्मरण कर." शेवटी भगवान् श्रीदत्तात्रेयांचे "दत्त दत्त" असे नामस्मरण करीत आणि दत्तावतार श्रीस्वामीमहाराजांना आपल्या मिटत चाललेल्या डोळ्यांमध्ये साठवीत त्या ब्रह्मचाऱ्याने प्राण सोडला. श्रीस्वामीमहाराजांनी त्याला मुक्ती दिली. या सत्संगतीमुळे तो सद्‌गतीस गेला. दूरच्या प्रांतातून आलेल्या एका अतिथीची सिद्धपुरामध्ये अशी दुरवस्था झाली या गोष्टीचा श्रीस्वामीमहाराजांना खेद झाला. गृहस्थाश्रमी माणसाला अतिथी व अभ्यागताची सेवा ही परमेश्वर सेवाच आहे, हा साधा गृहस्थधर्म येथील लोक विसरले याचा श्रीस्वामीमहाराजांना विषाद वाटला. त्यांनी गावातील सर्व मंडळींना बोलावून घेतले व त्यांना गृहस्थ-धर्माची जाणीव करून देऊन झाल्या प्रकाराबद्दल सर्वांची कान-उघडणी केली. खजील झालेल्या ग्रामस्थांनी आपली चूक कबूल करून श्रीस्वामीमहाराजांची क्षमा मागितली व या पुढे यथाशक्ती अतिथी सेवा करण्याचे कबूल केले.

या गावात श्री. कृष्णंभट वैजापूरकर हे डाकोरजीचे पुजारी राहात होते. हे गृहस्थ फार प्रेमळ स्वभावाचे होते. दुर्दैवाने वाईट संगतीमुळे त्यांना गांजाचे व्यसन लागले होते. त्यांचे हे व्यसन इतके पराकोटीला गेले होते की, रात्रंदिवस ते गांजाच्या गुंगीत पडलेले

असत. गांजाच्या अधीन झालेल्या श्री. कृष्णंभटजींना त्या व्यसनातून वाचविणे अतिशय कठीण होते; पण ही कठीण गोष्ट सहज साध्य करून लोकांना सन्मार्गाला लावण्यासाठीच श्रीस्वामीमहाराजांचा संचार चालला होता. श्री. कृष्णंभटजींच्या पत्नीच्या कानी श्रीस्वामीमहाराजांची कीर्ती आली होती. ती श्रीस्वामीमहाराजांना अनन्यभावाने शरण गेली व आपल्या पतीला या व्यसनातून मुक्त करण्यासाठी काहीतरी उपासना सांगण्याबद्दल किंवा उपाय करण्या-बद्दल तिने त्यांची प्रार्थना केली. श्रीस्वामीमहाराजांना एक अनन्य भक्त निर्माण करावयाचा होता. त्यांनी श्री. कृष्णंभटजींच्या गळयात बांधण्याकरिता एक ताईत मंत्रून दिला व काही गोळ्या त्यांच्या पत्नीकडे देऊन त्यांना असे सांगितले की, "या गोळ्या आपल्या यजमानांना खावयाला द्या. मी त्या दिल्या आहेत असे त्यांना सांगा."

श्रीस्वामीमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे श्री. कृष्णंभटजींच्या पत्नीने घरी येऊन आपल्या यजमानांना सर्व हकीकत सांगून श्रीस्वामीमहाराजांच्या आज्ञेप्रमाणे सर्व केले; तर आपले कल्याण होईल अशी त्यांना अत्यंत नम्रतेने प्रार्थना केली. आपल्या पत्नीची प्रार्थना व श्रीस्वामीमहाराजांची आज्ञा श्री. कृष्णंभटजींनी मान्य केली. त्यांचे पुण्य उदयाला आले होते हेच खरे होते; कारण त्यांनी ताईत गळयात बांधून घेतला आणि गोळ्याही खाल्या. श्रीस्वामी-महाराजांनी केलेल्या उपायाने ते व्यसनमुक्त झाले व एक दिवस पत्नीबरोबर त्यांच्या दर्शनाला गेले.

श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना पाहताच "कसे काय आहे ?" असे विचारले. त्या शब्दांमध्ये जे सामर्थ्य भरले होते त्यामुळे श्री. कृष्णंभटजींच्या मनावरील अज्ञानाची पुटे विरघळून गेली व त्यांना स्वतःचीच लाज वाटली. आपला तारणकर्ता आपणासमोर आहे याची त्यांना खात्री पटली. त्या जाणिवेने त्यांच्या नेत्रांमध्ये

अश्रू उभे राहिले. पुढे होऊन त्यांनी श्रीस्वामीमहाराजांचे पाय धरले व सद्‌गदीत स्वराने ते त्यांना असे म्हणाले की, "आपल्या कृपेनेच मी व्यसनमुक्त झालो व मला लागलेली वाईट संगतही सुटली. आता आपले पाय, हेच माझा आसरा आहेत. माझ्यावर कृपा करा. मला आपल्या सेवेची संधी द्या व माझ्याकडून आपण आपली चरणसेवा करून घ्या." श्रीस्वामीमहाराजांनी अगोदरच त्यांच्यावर कृपा केली होती. त्यांच्या इच्छेप्रमाणे त्यांनी त्यांना मंत्रोपदेश देऊन कृतार्थ केले. श्री. कृष्णंभटजी श्रीस्वामीमहाराजांचे अनन्य भक्त झाले. वर्षातून एकदा तरी श्रीस्वामीमहाराज जेथे असतील तेथे जाऊन त्यांचे दर्शन घ्यावयाचे असा श्री. कृष्णंभटजींचा नियम होता. पुढे मुक्तीश्वरपूर किंवा मुक्त्याला या गावी त्यांनी श्रीस्वामीमहाराजांचे अखेरचे दर्शन घेतले.

श्रीस्वामीमहाराजांनी श्री. कृष्णंभटजी यांना जो मंत्रोपदेश केला होता त्याचे उत्तम अनुष्ठान, अभ्यास व तपश्चर्या करून ते परमार्थाचे उच्चाधिकारी झाले. शेवटच्या आजारात आपण संन्यास घ्यावा अशी त्यांना फार उत्कंठा लागली. आजारातून आपण वाचत नाही अशी खात्री पटताच त्यांनी आतुर संन्यास घेतला. त्यांचा अंतकाळ जेव्हा जवळ आला तेव्हा घरातील सर्व मंडळींना त्यांनी असे सांगितले की, "आपणास आता बरे वाटत आहे. तुम्ही सर्वजण जेवण करून या." त्यांनी असे सांगितल्यावर सर्व मंडळी जेवण्यास निघून गेली. सर्व लोक गेले असे पाहून श्री. कृष्णंभटजी हळूहळू रणछोडजीच्या मूर्तीसमोर जाऊन बसले व त्यांनी श्रीस्वामीमहाराजांचे ध्यान केले. नंतर एकदम मोठ्याने प्रणवोच्चार करीत देह ठेवला.

अशा प्रकारे देहत्याग करणे ही अत्यंत भाग्यकारक, पुण्यकारक व अलौकिक गोष्ट असल्याबद्दलचा निर्वाळा सिद्धान्तरूपाने देताना श्रीमद्‌भगवद्‌गीतेत श्रीकृष्णनाथांनी असे सांगितले आहे की—

**सर्वद्वाराणि संयम्य मनो हृदि निरुध्य च।**
**मूर्ध्न्याधायात्मनः प्राणमास्थितो योगधारणाम् ॥ ८.१२॥**
**ॐइत्येकाक्षर ब्रह्म व्याहरन् मामनुस्मरन्।**
**यः प्रयाति त्यजन्देहं स याति परमां गतिम् ॥ ८.१३॥**

याचा अर्थ असा आहे की, ज्ञानाच्या सर्व द्वारांचा संयम करून म्हणजे सर्व इंद्रियांच्या द्वारांना आवरून अर्थात् इंद्रियांना विषयापासून रोधून धरून आणि मनाचा हृदयकमलातच निरोध करून आपल्या प्राणवायूलाही सुषुम्नानाडीच्या द्वारा मस्तकात स्थापन करून योग धारणेत स्थिर झालेला जो पुरुष, तशीच धारणा धरीत असताना, ॐ अशा या एक अक्षररूप परब्रह्माच्या नावाचे उच्चारण करीत आणि त्याच्या नावाच्या अर्थस्वरूप अशा माझे चिंतन अर्थात् माझे ध्यान करीत देहाचा त्याग करून जातो, तो पुरुष परमगतीला पोहोचतो.

श्री. कृष्णंभटजींसारख्या ज्या दुराचारी पुरुषांनाही श्रीस्वामीमहाराजांसारख्या लोकोत्तर अशा दिव्य पुरुषांचा सहवास व अनुग्रह मिळतो ते अशाप्रकारे परमगतीला गेल्याशिवाय राहत नाहीत हेच खरे ! यामुळेच देवर्षी श्रीनारदांनी भक्तिसूत्रात असे म्हटले आहे की "महत्संगस्तु दुर्लभोऽगम्योऽमोघश्च ॥ ३९॥" याच्या अर्थावरून हे स्पष्ट होते की, "महापुरुषांचा अर्थात् शक्तिपातयुक्त कृपा करणाऱ्या सत्पुरुषांचा सत्संग अत्यन्त दुर्लभ म्हणजे सहजासहजी प्राप्त न होणारा, अगम्य म्हणजे सहजतेने न कळणारा अर्थात् अज्ञेय किंवा अचिंत्य आणि जर का तो पूर्वपुण्याईने किंवा प्रारब्धवशात लाभला तर अमोघ म्हणजे व्यर्थ न जाणारा अर्थात् अचूक फल किंवा सिद्धी देणारा आहे.

सिद्धपूर येथे श्रीदत्तजयंतीचा उत्सव साजरा करून श्रीस्वामीमहाराज डाकोरला जावयाला निघाले. निघण्यापूर्वी त्यांनी शिनोरला

श्री. रामचंद्रशास्त्री प्रकाशकर यांना पत्र पाठवून आपण डाकोरला जात असल्याचे कळविले होते. श्रीस्वामीमहाराजांच्या पत्रानुसार श्री. रामचंद्रशास्त्री, त्याचे बंधू श्री. बाळकृष्णशास्त्री व श्रीस्वामीमहाराजांकडे योगाचे शिक्षण घेतलेला एक गुजराथी ब्राह्मण असे तिघेजण मार्गशीर्ष वद्य द्वितीयेलाच डाकोरला येऊन पोहोचले; पण श्रीस्वामीमहाराज तेथे अद्याप आलेले नव्हते. दोनतीन दिवस श्रीस्वामीमहाराजांची वाट पाहून पंचमीस आपण परत फिरावे असे श्री. रामचंद्रशास्त्री यांनी ठरविले. पंचमीला संध्याकाळी ते परत जाण्याच्या तयारीत होते एवढ्यात श्रीस्वामीमहाराज तेथे येऊन पोहोचले व दारातूनच ते असे म्हणाले की, "ज्यांची जाण्याची तयारी झाली असेल त्यांनी भेट होताच जावे." अर्थात् त्या दिवशी कोणीही परत गेले नाही.

श्रीस्वामीमहाराजांना पाहताच सर्वांना फार आनंद झाला व सर्वांनी उठून त्यांना साष्टांग नमस्कार घातला. त्यानंतर दिवसाचे उरलेले कार्यक्रम झाले. सायंसंध्या झाल्यांवर द्वारकेला पूर्ण केलेली "द्विसाहस्री गुरुचरित्र" या ग्रंथावरील टीका आणि श्रीगुरुचरित्रावरील चूर्णिका श्रीस्वामीमहाराजांनी श्री. रामचंद्रशात्र्यांना वाचावयाला दिली व त्याच वेळी त्या ग्रंथावर त्यांनी काही काळ प्रवचन केले. नंतर तेथील तुळशी वृन्दावनाच्या ओटयावर बसून त्यांनी श्री. रामचंद्रशास्त्र्यांना ऋग्वेदाच्या संहितेतील एका वर्गाची पदे म्हणावयाला सांगितली. श्री. रामचंद्रशास्त्री यांनी श्रीस्वामीमहाराजांनी आज्ञापिल्याप्रमाणे पदे म्हणून दाखविली. त्यांची पदे म्हणून झाल्यावर श्रीस्वामीमहाराजांनी स्वतः त्यांना जटा, घन, पंचसंधि, माला, रथक्रम, दंडक्रम वगैरे विकृती म्हणून दाखविल्या. श्री. रामचंद्रशास्त्र्यांना या गोष्टीचा मोठा अचंबा वाटला. जवळ एकही ग्रंथ नसताना संहितेसह सर्व विषय श्रीस्वामीमहाराजांच्या

जिव्हाग्री असत, ही गोष्ट श्री. रामचंद्रशास्त्र्यांनी अनेकदा अनुभवली होती. श्रीस्वामीमहाराजांनी हे सर्व अध्ययन केव्हा व कुठे केले असेल असा प्रश्न त्यांच्या समोर उभा राहिला. श्री. रामचंद्रशास्त्र्यांच्या मनातील हे विचार श्रीस्वामीमहाराजांनी जाणले. या विषयाची अधिक चर्चा होऊ नये; पण श्री. रामचंद्रशास्त्र्यांच्या मनातील शंका निघून जावी या उद्देशाने श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "हे सर्व समजून घेऊन तुला काय करावयाचे आहे? कळावयाचे होते ते कळले ना?" श्री. रामचंद्रशास्त्र्यांवर श्रीस्वामीमहाराजांचे प्रेम होते. श्री. शास्त्रीबुवा सुद्धा गुरूला शोभतील असेच शिष्य होते. श्रीस्वामीमहाराजांच्या वरील बोलण्यावरून काय समजावयाचे ते श्री. रामचंद्रशास्त्री समजून चुकले. ज्यांची मेधानाडी जागृत झाली आहे अशांच्या जिव्हाग्री सर्व ज्ञान वसत असते, या गोष्टीची सत्यता श्री. रामचंद्रशास्त्री श्रीस्वामीमहाराजांच्या ठिकाणी पाहात होते. वास्तविक श्रीस्वामीमहाराज श्रीदत्तावतार होते. भगवान् श्रीदत्तात्रेयांनीच अनेक भक्तांजवळ या गोष्टीची कबुली दिली होती; पण श्रीस्वामीमहाराजांच्या निकटवर्ती शिष्यांना ही गोष्ट अजून पटली नव्हती. परमेश्वराच्या मायेच्या आवरणामुळेच ही मंडळी अद्याप श्रीस्वामीमहाराजांना ओळखू शकली नव्हती. श्री. रामचंद्रशास्त्रीसुद्धा याला अपवाद नव्हते. त्यामुळे श्रीस्वामीमहाराज एक मेधावी सद्गुरू आहेत या पलीकडे त्यांची दृष्टी पोहोचू शकली नाही.

डाकोर येथे आल्यावर दुसऱ्या दिवशी पहाटे प्रार्तविधी झाल्यावर श्रीस्वामीमहाराज श्री. रामचंद्रशास्त्र्यांना बरोबर घेऊन गोमती नदीवर गेले. डाकोर हे गुजराथचे पंढरपूर असून श्रीडाकोरनाथाच्या चरणकमलाजवळूनच गोमती ही नदी वाहते. त्यावेळी नदीला फारसे पाणी नव्हते; पण श्रीस्वामीमहाराज नेहमी नदीमध्येच स्नान करीत

असल्याने, होते तेवढ्या पाण्यातच त्यांनी स्नान केले व ते परत येण्यास निघाले. वाटेत श्रीडाकोरनाथजींचे मंदिर लागले. त्यावेळी श्री. रामचंद्रशास्त्र्यांनी त्यांना असे विचारले की, " डाकोरनाथजींचे दर्शन घ्यावयला जावयाचे आहे ना ? " हा प्रश्न ऐकताच श्रीस्वामी-महाराज त्यांना असे म्हणाले की, " आपणाला डाकोरनाथजींच्या दर्शनाला जावयाचे नाही; कारण काल सायंकाळी येथे आल्यावर ज्यावेळी वाटेत डाकोरनाथजींचे मंदिर लागले त्यावेळी " आपण डाकोरनाथजींचे दर्शन करून यावे " असे बरोबर असलेल्या एका भजनीबाईने सुचविल्यावरून आपण डोकोरनाथजींच्या मंदिरात गेलो होतो; परन्तु त्यावेळी देवळाचा दरवाजा एकाएकी बंद झाला. त्यामुळे डाकोरनाथजींचे दर्शन झाले नाही. डाकोरनाथजींना आपणास दर्शन द्यावयाची इच्छा नाही असे पाहून आपण त्यावेळी मंदिरातून परत आलो. त्यामुळे आता आपणाला पुन्हा डाकोर-नाथजींच्या दर्शनाला जावयाचे नाही. "

श्रीस्वामीमहाराजांची कीर्ती आता गुजराथ देशात सगळीकडे पसरली होती. प्रत्येक गावातील लोक त्यांच्या आगमनाची अत्यंत आतुरतेने वाट पाहत असत. श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन व्हावे, त्यांच्या मुखातून चार उपदेशाच्या गोष्टी ऐकावयाला मिळाव्यात व आपल्या प्रापंचिक आणि पारमार्थिक अडचणी श्रीस्वामी-महाराजांच्या कानावर घालाव्यात असे सर्वांना वाटत असे. त्यामुळे श्रीस्वामीमहाराजांचे डाकोरला आगमन झाल्याचे कळताच तेथील लोकांना फार आनंद झाला. षष्ठीच्या दिवशी श्रीस्वामीमहाराजांचे आन्हिक उरकल्यावर त्यांना भेटावयाला येणाऱ्या लोकांची रीघ लागली. तिसऱ्या प्रहरापर्यन्त श्रीस्वामीमहाराज लोकांशी बोलत होते व त्यांचे दुःख निवारण करण्यासाठी उपाय सांगत होते. दर्शनाला येणाऱ्यांची संख्या कमी न होता उत्तरोत्तर वाढतच होती. सायंकाळी

पाच वाजण्याच्या सुमारास श्रीस्वामीमहाराज दंडकमंडलू घेऊन व "श्रीगुरुदेवदत्त" म्हणून अकस्मात् उभे राहिले व जावयास निघाले. श्रीस्वामीमहाराज अकस्मात् जावयाला निघाले हे पाहून लोकांच्या आश्चर्याला पारावार राहिला नाही. सर्वांना असे वाटले होते की, श्रीस्वामीमहाराजांच्या दिव्य संगतीचा लाभ या गावाला कमीतकमी तीनचार दिवस तरी लाभेल. लोकांनी श्रीस्वामीमहाराजांना आणखी काही दिवस डाकोरला राहण्याची विनंती केली; पण श्रीस्वामी-महाराज एकदा उठले ते पुढील मुक्कामाला जाण्यासाठीच निघाले. त्यामुळे "आता जाऊ या" असे म्हणून श्रीस्वामीमहाराज जावयाला निघाले. त्यावेळी श्री. रामचंद्रशास्त्रीही त्यांच्याबरोबर होते. त्यांनी श्रीस्वामीमहाराजांना आपल्याबरोबर शिनोरला चलण्याचा आग्रह धरला. त्यावेळी श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "एकदा शिनोरला येणे झाले आहे. आता पुन्हा तिकडे येण्याचे काय प्रयोजन आहे?"

श्रीस्वामीमहाराजांचे हे उत्तर ऐकताच श्री. रामचंद्रशास्त्री त्यांना असे म्हणाले की, "तर मग आपण जाल तेथे मीही आपणाबरोबर पायी येतो. आपल्या संगतीचा लोभ सुटत नाही." या बालसदृश हट्टाने श्रीस्वामीमहाराजांचा निर्धार विरघळला. त्यांनी शिनोरला येण्याचे कबूल केले. त्यावेळी श्री. रामचंद्रशास्त्र्यांना "तू गाडीने जा" असे सांगून ते शिनोरच्या दिशेने पुढे चालू लागले. आपला एक हट्ट पुरा झाला, आता दुसराही होईल, या वेडया आशेने श्री. रामचंद्र-शास्त्र्यांनी श्रीस्वामीमहाराजांबरोबर चालत जाण्याची इच्छा व्यक्त केली व ते श्रीस्वामीमहाराजांच्या मागून चालू लागले. मग मात्र श्रीस्वामीमहाराजांनी उग्र अवतार धारण केला व "तू आता मागे फिरतोस की नाही?" असे त्यांना रागाने विचारताच श्री. रामचंद्र-शास्त्री निरुपायाने मागे फिरले व त्याच रात्री गाडीने बडोद्याला

जाऊन मार्गशीर्ष वद्य अष्टमीला संध्याकाळी शिनोरला पोहोचले.

श्री. रामचंद्रशास्त्री शिनोरला परत आल्यावर तेथील परिचित मंडळी त्यांना असे म्हणाली की, "तुम्ही डाकोरला दर्शनाला गेलात आणि ते तर षष्ठीच्याच दिवशी संध्याकाळी येथे आले. आम्हाला वाटले तुम्हीसुद्धा श्रीस्वामीमहाराजांबरोबर असणार." हे ऐकताच श्री. रामचंद्रशास्त्र्यांना फार आश्चर्य वाटले. त्यांचा लोकांच्या सांगण्यावर विश्वासच बसेना. श्री. रामचंद्रशास्त्री घाईघाईने घरी गेले व स्नानसंध्या आटोपून श्री. मार्कंडेयाच्या मंदिरात श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी गेले. त्यावेळी श्री. रामचंद्रशास्त्र्यांच्या मनात असे विचार येत होते की– "षष्ठीला सायंकाळी पाच वाजता आपल्याबरोबर निघालेले श्रीस्वामीमहाराज अवघ्या दीडतासात शिनोरला कसे येऊन पोहोचले? आज अष्टमी म्हणजे आपल्या पूर्वी दोन दिवस अगोदर श्रीस्वामीमहाराज येथे येऊन पोहोचले की काय? आपण कोठेही न थांबता गाडीने प्रवास केला आणि श्रीस्वामीमहाराज पायीच चालत होते. हे कसे शक्य आहे?" या विचारातच श्री. रामचंद्रशास्त्री श्रीमार्कंडेश्वराच्या मंदिरात जाऊन पोहोचले. आत श्रीस्वामीमहाराज आपले नित्य कर्म करीत बसले होते. श्री. रामचंद्रशास्त्र्यांची चाहूल लागताच त्यांनी मान वर करून पाहिले व ते हसले. श्रीस्वामीमहाराज अवघ्या दीड तासात डाकोरहून शिनोरला येऊन पोहोचले, ही अद्‌भुत वार्ता हा हा म्हणता सर्वांच्या कानावर गेली व श्रीस्वामीमहाराजांच्या अचिंत्य सामर्थ्याबद्दल लोकांची पूर्ण खात्री पटली.

यावेळी श्रीस्वामीमहाराजांचा शिनोरला तीन महिने मुक्काम झाला. शिनोरच्या लोकांची पूर्वीपासूनच त्यांच्यावर अपार श्रद्धा व भक्ती होती. वरील प्रसंगाने ती द्विगुणित झाली, दर्शनार्थींची गर्दी दिवसेंदिवस वाढतच होती. यावेळी श्री. रामचंद्रशास्त्र्यांचा

श्रीस्वामीमहाराजांपाशी वराच अभ्यास झाला. एक दिवस श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "आत्तापर्यन्त झालेला अभ्यास नीट टिकवशील तर त्याचा तुला पुष्कळ उपयोग होईल." श्रीस्वामीमहाराजांचे हे शब्द ऐकल्यावर श्री. रामचंद्रशास्त्र्यांच्या मनात पाल चुकचुकली. "श्रीस्वामीमहाराज एवढ्यातच शिनोर सोडण्याच्या विचारात तर नाहीत ना ? " या विचाराने त्यांच्या डोळ्यात अश्रू उभे राहिले. श्रीस्वामीमहाराजांचा हा वियोग किती दिवसांचा होईल कोण जाणे ? त्यांचा आवाज जड झाला. त्यावेळी श्री. रामचंद्रशास्त्री श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाले की, "महाराज ! येथून मुक्काम लवकर हलविण्याचा तर आपला विचार नाही ना ? आपल्यापासून मी दूर राहू शकणार नाही. मलाही आपल्याबरोबर घेऊन चला."

श्री. रामचंद्रशास्त्र्यांनी अशी विनंती करताच ते त्यांना असे म्हणाले की, "चिंता करू नकोस. पुन्हा भेट होईल व त्यावेळी तू माझ्याजवळ शेवटपर्यन्त राहशील."

पुढे श्रीस्वामीमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे श्री. रामचंद्र-शास्त्र्यांची व त्यांची भेट श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे अखेरच्या वेळी झाली. त्यावेळी श्री. रामचंद्रशास्त्री हे स्वामीमहाराजांच्या समाधि-काळापर्यन्त त्यांच्याजवळ राहिले व शिनोरला श्रीस्वामीमहाराज त्यांना जे म्हणाले होते त्या वाक्यातील गूढार्थ त्यावेळी त्यांच्या लक्षात आला.

शिनोरच्या या मुक्कामात पूर्वजन्मीच्या एका योगभ्रष्ट माणसाला श्रीस्वामीमहाराजांनी आत्मज्ञान देऊन मुक्तीच्या मार्गाला लावले. या माणसाचे नाव जगला असे होते. तो काळ्या वर्णाचा व कृश शरीराचा असून कोळी जातीतील होता. स्वभावतःच तो मोठा विरक्त होता. त्याच्या घरातील लोकांनी त्याचे लग्न ठरविताच तो

घरातून पळाला व शिनोरला येऊन राहिला. त्याचे वागणे एखाद्या वेड्यासारखे होते. जडभरताप्रमाणे त्याचे देहाकडे लक्षही नसावयाचे. भूक, तहान इत्यादींवर त्याने कधीच मात केली होती. त्याचप्रमाणे थंडी, ऊन, पाऊस, वारा इत्यादि सर्व गोष्टी तो उघड्या अंगाने सहन करीत असे. अशा अवस्थेत तो दोन वर्षे शिनोरला राहिला होता. तेथे तो आपल्या उद्धारकर्त्याची वाट पाहत होता.

एके दिवशी श्रीस्वामीमहाराज घाटावरून स्नान करून परत येत होते. त्यावेळी जगलाने पुढे येऊन हात पसरून त्यांना वाटेतच अडविले व हेच आपले उद्धारकर्ते आहेत हे जाणून तो त्यांच्या वाटेत अत्यंत शान्तपणे व काही एक न बोलता कृपेची वाट पाहात उभा राहिला. हे पाहताच श्रीस्वामीमहाराजांनी त्याच्याकडे दृष्टि-क्षेप टाकला व त्या विदेही पुरुषास ओळखून ते त्याला असे म्हणाले की, "तू येथे राहतोस काय? रात्री मार्कंडेयाच्या मंदिरात ये." त्याच्या उद्धाराची वेळ अगदी जवळ आली होती. श्रीस्वामीमहा-राजांचा मार्ग त्याने अडविल्याबरोबर सोबतचे लोक स्तंभित झाले होते; कारण शिनोरमधील सर्व माणसे त्याला ओळखत असून त्यांच्या दृष्टीने हा माणूस वेडा होता.

श्रीस्वामीमहाराजांनी जगलाला असे सांगताच तो "होय" म्हणून हात जोडून बाजूला झाला. हे सर्व पाहून लोकांना आश्चर्य वाटले व त्यांच्या मनात असे विचार आले की, "हा जगला श्रीस्वामीमहाराजांचा पूर्व परिचित आहे की काय? पण असे होणे कसे शक्य आहे?" एक तर हा जातीचा कोळी होता. श्रीस्वामीमहाराज कधी त्याच्या गावी गेल्याचे ऐकिवात नव्हते. श्रीस्वामीमहाराजांच्या पूर्वीच्या येथील मुक्कामात हा येथे आल्याचे कोणी पाहिले नव्हते; पण श्रीस्वामीमहाराजांनी मात्र या सांप्रतच्या काळातील जडभरताला ओळखले होते.

त्या दिवशी संध्याकाळी श्रीस्वामीमहाराजांनी सर्वांना असे सांगितले की, "आजपासून मार्कंडेयाच्या मंदिरात गीता सांगावयाची आहे." श्रीस्वामीमहाराज श्रीमद्‌भगवद्‌गीता सांगणार हे ऐकून रात्री सर्व मंडळी मंदिरात जमा झाली. जगलाही अगदी वेळेवर येऊन श्रीस्वामीमहाराजांची आपल्यावर दृष्टी पडेल अशा रीतीने एका बाजूला बसला. त्या रात्री श्रीस्वामीमहाराजांनी गीतेचा पहिला अध्याय सांगितला. जगला श्रीस्वामीमहाराजांच्या तोंडचा शब्दन् शब्द जिवाचे कान करून ऐकत होता. दुसऱ्या रात्री गीतेचा दुसरा अध्याय झाला. याही वेळी जगला आपली आदल्या रात्रीची जागा धरून बसला होता. लोक अधून मधून त्याच्याकडे कुतूहलाने पाहत असत. तो जातीचा कोळी व अशिक्षित असल्यामुळे त्याला हा गीतार्थ काय कळणार अशी शंका प्रत्येकाच्या मनात होती. जगला मात्र श्रीस्वामीमहाराजांच्या मुखातून बाहेर पडणारा प्रत्येक शब्द लक्ष देऊन ऐकत होता. अशा रीतीने सतरा रात्री श्रीस्वामीमहाराजांनी गीतेचे सतरा अध्याय सांगितले. सतरावा अध्याय सांगून झाल्यावर जगला उठला व श्रीस्वामीमहाराजांना साष्टांग नमस्कार घालून तो त्यांना असे म्हणाला की, "यापुढे मला काहीसुद्धा ऐकावयाचे नाही. तेव्हा आपण आता इकडे येणार नाही," असे म्हणून जगला निघून गेला. अठरावा अध्याय ऐकावयाला तो आला नाही. त्याला पाहिजे होते ते आत्मज्ञान सतरा दिवसात त्याला मिळाले होते. त्याचे जीवितकार्य संपले होते. आता या नश्वर देहात व जगात कशाला राहावयाचे? पुढे एक दोन महिन्यातच त्याने देह ठेवला.

त्या वर्षी शिनोरला दुष्काळ पडला आणि कॉलऱ्याचीसुद्धा साथ पसरली. पुष्कळ माणसे या रोगाला बळी पडत होती. श्रीस्वामीमहाराजांबरोबर श्री. गांडाबुवासुद्धा होते. त्यांच्याबरोबर येणाऱ्या

पुष्कळ श्रद्धावान् मंडळींना औषध देऊन श्रीस्वामीमहाराजांनी बरे केले. जंगलातून लाकडे आणून त्याचा व्यापार करणारी कबाडी म्हणून एक जमात येथे आहे. या कबाडी लोकांपैकी कबाडीदादा म्हणून प्रसिद्ध असणाऱ्या एका गृहस्थाचा विनायक नावाचा मुलगा शाळेत शिकत होता. दुर्दैवाने विनायक परीक्षेत नापास झाला. त्यामुळे विनायकला फार वाईट वाटले. आपण नापास झाल्यामुळे आपल्याला नोकरी लागणार नाही, याचा त्याला खेद झाला. श्रीस्वामीमहाराज लोकांचे दुःख हरण करतात असे त्याने ऐकले होते. श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला जाऊन त्याने आपली कहाणी त्यांच्या कानावर घातली. त्यावेळी तो त्यांना असे म्हणाला की, " वडील वृद्ध झाल्यामुळे कुटुंबाच्या पोषणाची जबाबदारी माझ्यावर आहे. मी परीक्षेत नापास झालो. त्यामुळे मला चांगली नोकरी मिळणार नाही. आता घरचा चरितार्थ चालविणे कठिण जाणार आहे. आपण माझ्यावर कृपा करावी. यातून मार्ग काढण्यासाठी काहीतरी उपाय सांगावा. "

दुःखाने गांजलेल्या लोकांची कहाणी ऐकून श्रीस्वामीमहाराजांचे हृदय विरघळत असे. त्यांनी विनायकला एक मंत्र व त्याचा विधी लिहून दिला व त्याचे निष्ठेने अनुष्ठान करण्यास सांगितले. विनायकानेही श्रीस्वामीमहाराजांनी दिलेला मंत्रजप अत्यंत श्रद्धेने केला. त्याचे फळही त्याला लवकरच मिळाले. कबाडीदादांच्या कंपनीतील वरिष्ठांनी विनायकला बोलवून त्याची त्याच्या वडिलांच्या जागेवर नेमणूक केली.

मंत्रशक्तीचा प्रभाव फार मोठा आहे. त्यामुळे अचिंत्य, अतर्क्य व अशक्य गोष्टी याही काळात घडून येऊ शकतात. मात्र मंत्र देणाऱ्याची अलौकिक सामर्थ्यशक्ती व तो करणाऱ्याची दृढतम श्रद्धा यांचा त्यासाठी संगम होणे नितान्त आवश्यक आहे. यातील

एकही उणे पडले; तरी नियमाला बाध येण्याची शक्यता असते.

अनन्तकोटी ब्रह्माण्डनायक श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य भगवान् श्रीवासुदेवानन्दसरस्वती श्रीदत्तात्रेयस्वामीमहाराज यांचा अखंड जयजयकार असो. श्रीस्वामीमहाराजांचे परमभक्त व त्यांचे धा.कट बंधू परमपूजनीय श्रीसीताराममहाराज यांनी, ज्याप्रमाणे श्रीमत गुरुचरित्रग्रंथात "जयजयाजी गुरुमूर्ती । तूंचि साधन परमार्थी । मातें निरोपिलें प्रीती । तत्त्वबोध कृपेनें ।। १६.१४१ ।।" व "दैवें उणा असेल नरू । तेणें भजावा श्रीगुरू । तोचि पावेल पैलपारू । पूज्य होय सकळ लोकां ।। १८.७१ ।।" असे म्हणून श्रीसरस्वती गंगाधरांनी श्रीगुरू म्हणजेच परमार्थप्राप्तीचे साधन होय असा जो महासिद्धान्त प्रस्थापित केला आहे, त्याप्रमाणेच श्रीगुरुवासुदेवचरणांना "आतां हृदय हें आपुलें । चौफाळूनियां भलें । वरी बैसऊं पाउलें । श्रीगुरूंचीं ।। १५.१ ।। " या श्रीज्ञानेश्वर-महाराजांनी ज्ञानेश्वरीत सांगितलेल्या न्यायाने आज्ञाचक्ररूप हृदयात अखड धारण करण्याचे जे अपूर्व, अलौकिक, लोकोत्तर व एकमेवाद्वितीय असे साधन, स्वरचित एका अभंगात शब्दबद्ध करून प्रस्तुत केले आहे, ते अखंड स्मरणात ठेवून, आपण सर्वजण हे साधन करून, "दास सीताराम हा मुक्त होई ।। " या न्यायाने-मुक्त होण्यासाठी श्रीस्वामीमहाराजांच्या परमपवित्र व परमकोमल, चरणी अत्यंत लीन होऊन प्रार्थना करू.

## पद

मना ध्याय गुरुवासुदेवास चित्तीं । याहुनि अन्य तुज किमपि नाहीं ।ध्रु.।
गर्व हा सोडुनि, शरण जा गुरुपदीं । नित्य हें तपचि तूं आचरावें ।।
वासुदेवामुखें मार्ग हा पाहुनी । सतत नाम स्मरत डुलत राही ।। १ ।।

कामक्रोधादि षड्वैरी तुज गांजिती । म्हणुनि तूं गुरुचरणीं लीन होई ।।
श्रवण मननादि हें कर्म तूं करुनिया । दुःखरूपी भवापार होई ।।२।।
साधुसंगति धरूनि इंद्रियें वळवुनी । स्वात्मरूपामृता पिवुनि राहीं।।
हेंचि साधन तुला मुक्तिचें सांगुनी ।दास सीताराम हा मुक्त होई ।।२।।



## – अध्याय नववा –

श्रीपाद श्रीवल्लभ त्वं सदैव । श्रीदत्तास्मान्पाहि देवाधिदेव ।।
भावग्राह्य क्लेशहारिन्सुकीर्ते । घोरात्कष्टादुद्धरास्मान्नमस्ते ।।

**चातुर्मास दहावा–शके १८२२– इ. स. १९००–चिखलदा :–**

श्रीस्वामीमहाराज वैशाख वद्य अमावस्या शके १८२२ म्हणजेच इ. स. १९०० रोजी शिनोरहून निघून चिखलद्यास आले. यावेळी श्रीस्वामीमहाराजांचे वय ४५।४६ वर्षांचे असेल. या वयात एक अवतारी पुरुष म्हणून श्रीस्वामीमहाराजांच्या कीर्तीचा सौरभ संपूर्ण गुजराथमध्ये पसरला होता. महाराष्ट्राच्या या सुपुत्राने गुर्जर प्रांतीयांची मने जिंकून घेतली होती. श्रीस्वामीमहाराजांच्या उपदेशाने त्यांच्या हृदयात श्रीदत्तभक्तीचा मळा फुलला होता. श्रीदत्त-भक्तीची मुहूर्तमेढ श्रीस्वामीमहाराजांनीच या प्रांतामध्ये रोवली. त्या लोकांमध्ये भक्ती नव्हती असे नाही; पण त्यांच्या भक्तीला श्रीस्वामीमहाराजांनी डोळसपणा व दिशा दाखवून दिली. अन्यथा एवढे लोक श्रीस्वामीमहाराजांच्या भजनी लागलेच नसते.तसे पाहता श्रीस्वामीमहाराजांना गुजराथ काय, महाराष्ट्र काय आणि मध्य-प्रदेश काय ? सर्व एकच भूमी. "हे विश्वचि माझे घर" अशी त्यांची वृत्ती झाली होती. त्यांनी आपले पाय पडतील त्या भूमीमधील लोकांना श्रद्धायुक्त अशी डोळस भक्ती दिली, श्रीदत्तभक्तीची ध्वजा फडकाविली व वेदान्ताचा प्रचार केला.

श्रीस्वामीमहाराज आता दुसऱ्या वेळी चिखलद्यास आले होते. ते प्रथम इ. स. १८९७ मध्ये येथे आले होते. त्यावेळी पेटलादचा चातुर्मास संपवून ते चिखलद्यास आले आणि त्यांचा तेथे आठ नऊ महिने मुक्काम झाला होता. त्यामुळे चिखलद्यामध्ये त्यांची परिचित मंडळी पुष्कळ होती. यावेळी श्रीस्वामीमहाराजांचा मुक्काम श्रीराममंदिरात झाला. श्रीनर्मदेच्या दक्षिण किनाऱ्यावर बडवाणी संस्थान होते. येथील राजे श्री. गणपतीसिंह ठाकोरसाहेब श्रीस्वामी-महाराजांचे भक्त होते. इ. स. १८८७ मधील श्रीस्वामीमहाराजांच्या पहिल्या भेटीच्या वेळी या श्री. ठाकोरसाहेबांनी श्रीस्वामीमहा-राजांना भेटावयाला येणाऱ्या मंडळींची सोय व्हावी म्हणून बरीच मदत केली होती. श्री. ठाकोरसाहेबांचा असा आग्रह होता की, श्रीस्वामीमहाराजांनी एक तरी चातुर्मास चिखलद्यास करावा. त्यांच्या व इतर भक्तांच्या आग्रहासाठी श्रीस्वामीमहाराजांनी आपला हा दहावा चातुर्मास चिखलद्यास करण्याचे ठरविले. श्रीस्वामीमहाराज प्रथम श्रीगोपाळकृष्णाच्या मंदिरात उतरले होते; पण जसजशी दर्शनार्थींची गर्दी वाढत गेली तसतशी श्रीगोपाळकृष्ण मंदिरातील जागा अपुरी पडू लागली. ती जागा थोडी गैरसोयीची-सुद्धा होती. त्यामुळे श्रीस्वामीमहाराजांनी मंदिराच्या पाठीमागील बाजूस असलेल्या खोलीमध्ये आपला मुक्काम हलविला. पुढे चिखलदा सोडीपर्यन्त ते याच खोलीत राहत होते.

येथे आल्या दिवसापासून श्रीस्वामीमहाराजांचे कार्यक्रम पहिल्या खेपेला होते तसेच सुरू झाले. सकाळी जिज्ञासूंना ब्रह्मकर्म, शास्त्रा-भ्यास व योग सांगणे, संध्याकाळी पुराण सांगणे व इतर वेळी संकट-ग्रस्त लोकांना संकट निवारणार्थ उपाय सांगणे, या कार्यक्रमामध्ये त्यांचा दिवस केव्हा उजाडावयाचा आणि केव्हा मावळावयाचा हे सुद्धा कळत नसे. त्यांच्या दर्शनाला येणाऱ्या भक्तमंडळींची गर्दी

दिवसेंदिवस वाढतच होती. यावेळी सावंतवाडीहून बरीच मंडळी श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला आली होती. त्यांमध्ये श्री. विश्वनाथराव चिटणीस होते. ते आपल्या बंधूंना बरोबर घेऊन आले होते. श्री. विश्वनाथराव यांना पिशाच्चबाधा झाली होती. त्यामुळे खाल्लेले अन्न ताबडतोब उलटून पडत असे. त्यावेळी पुन्हा त्यांच्या पोटात भुकेने डोंब उठत असे; पण भूक शमविण्यासाठी पोटात अन्नच राहात नसे. दिवसेंदिवस त्यांची प्रकृती ढासळून ते अशक्त झाले होते. श्रीस्वामीमहाराजांनी पूर्वाश्रमात माणगाव येथे जे लोकोत्तर कार्य केले होते ते तेथील लोक अजून विसरले नव्हते. त्यामुळे या असाध्य व्याधीतून आपली मुक्तता फक्त श्रीस्वामी-महाराजच करतील या विश्वासानेच श्री. विश्वनाथराव चिटणीस श्रीस्वामीमहाराजांपाशी आले होते.

श्रीस्वामीमहाराजांना साष्टांग नमस्कार करून आपली सर्व हकीकत त्यांच्या चरणी निवेदन करताना श्री. विश्वनाथराव त्यांना असे म्हणाले की, "महाराज ! या पोटाच्या व्याधीने मला अगदी हैराण केले आहे. गेले कित्येक दिवस पोटात अन्नच टिकत नाही. बेसुमार भूक लागते; पण अन्नाला स्पर्श करावयाला भीती वाटते. पोटात अन्न गेले की, लगेच ते उलटून पडते. या भुकेपायी मी अगदी व्याकुळ झालो आहे. लोक म्हणतात, ही पिशाच्चबाधा आहे. माण-गावी पुष्कळ उपाय करून पाहिले; पण आराम काही वाटत नाही. आता आपल्या पायापाशी धाव घेतली आहे. आपण काहीतरी उपाय सांगून मला या व्याधीतून मोकळे करा."

श्री. विश्वनाथराव चिटणीसांनी केलेली ही प्रार्थना ऐकताच श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना एकदा आपादमस्तक न्याहाळून पाहिले व ते त्यांना असे म्हणाले की, "ही पिशाच्चबाधा नव्हे; हा कुलस्वामिनीचा कोप आहे. तुमच्या कुलस्वामिनीची आराधना

तुमच्या कुळातील माणसांकडून योग्य प्रकारे होत नाही. त्यांचा हा परिणाम आहे. तुमच्या कुळातील माणसे आता इतस्ततः गेली असल्यामुळे तुम्हाला आपल्या पुरताच विचार करणे भाग आहे. ” त्यानन्तर श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना श्रीदत्तमंत्र दिला व कुलस्वामिनीची आराधना करण्यासाठी देवीमंत्रही दिला. शिवाय गोरख चिंचेचे एक औषधही त्यांना दिले. अशा प्रकारे मंत्र व औषध मिळाल्यावर श्रीस्वामीमहाराजांच्या कृपेने आपण रोगमुक्त होणार अशी श्री. चिटणीसांची खात्री पटली.

ही खात्री पटताच ते स्वामीमहाराजांना असे म्हणाले की, “ महाराज ! या व्याधीच्या निमित्ताने आपल्या पुर्नदर्शनाचा लाभ घडला. आम्ही संसारी माणसे असल्यामुळे रोजच्या व्यवहारातून डोके वर काढावयाला सवड सापडत नाही. नाक दावल्यावर तोंड उघडते या न्यायाने या रोगाच्या निमित्ताने आपल्या श्रीचरणांचे पुन्हा दर्शन घडले. ” हे ऐकताच श्रीस्वामीमहाराजांनी त्याच्याकडे पाहून स्मित केले. त्यानंतर श्री. चिटणीस अधून मधून श्रीस्वामी-महाराजांच्या दर्शनाला ते जेथं असत तेथे जात असत.

श्री. नारोपंत उकिडवे हे श्रीस्वामीमहाराजांचे पूर्वाश्रमातील निकटवर्ती स्नेही व भक्त होते. श्रीस्वामीमहाराजांच्या परवानगीने त्यांनी लिहिलेले, “ द्विसाहस्रीगुरुचरित्र ” ते छापीत होते. त्याच वेळी दुसरेही एक गृहस्थ श्रीस्वामीमहाराजांच्या अनुज्ञेशिवाय हाच ग्रंथ छापीत होते. त्यांनी तशी जाहिरातही केली होती. श्री. नारो-पंतांनी जेव्हा ही जाहिरात पाहिली त्यावेळी त्यांनी ती जाहिरात श्रीस्वामीमहाराजांकडे पाठवून पत्रातून त्यांना असे विचारले की, “ या अपरिचित मनुष्याने आपली परवानगी न घेता द्विसाहस्री-गुरुचरित्र हा ग्रंथ छापणे सुरू केले आहे. तरी यांचेवर खटला का करू नये ? ” ते पत्र त्यावेळी तेथे उपस्थित असलेल्या सर्व लोकांनी

पाहिले. त्यावेळी त्यांच्यापैकी एक सद्‌गृहस्थ आपण होऊनच असे बोलून गेले की, "महाराजांच्या वृत्तीत लोकैषणा व वित्तैषणा यांचा काहीच संबंध नसल्यामुळे कोणीही त्यांच्या ग्रंथांना नावे ठेवली काय अथवा ते शिरी धरले काय, त्याचा विषाद वा हर्ष महाराजांना काहीच नाही. लोकांच्या उपयोगासाठी कोणी हा ग्रंथ छापत असल्यास चांगलेच आहे." श्री. नारोपंतांना त्या गृहस्थावर खटला भरण्याचा सल्ला श्रीस्वामीमहाराजांनी दिला नाही. आपले ग्रंथ छापण्यावद्दल खास अशी परवानगी श्रीस्वामीमहाराजांनी कोणालाच दिली नव्हती.

चिखलद्याच्या या चातुर्मासामध्ये श्रीस्वामीमहाराजांनी "माघ माहात्म्य" हा प्राकृत ओवीवद्ध ग्रंथ लिहिला. याची ओवी संख्या ३४३ असून प्रत्येक ओवीचे प्रथमाक्षर "श्रीदत्त" असे आहे. हा ग्रंथ हस्तलिखित स्वरुपात असून त्याची पहिली हस्तलिखित प्रत "प्रसाद" म्हणून श्रीस्वामीमहाराजांनी श्री. गंगाधरपंत वैद्य यांना दिली होती. ही प्रत श्री. गंगाधरपंतांच्या संग्रही होती असा उल्लेख त्यांनी आपल्या स्मरणवहीमध्ये केला आहे.

श्रीस्वामीमहाराज चिखलद्यास येण्याच्या पूर्वी ब्रह्मावर्त येथून आलेले एक वृद्ध स्वामी तेथे येऊन राहिले होते. पूर्वी श्रीस्वामी-महाराज ब्रह्मावर्तास असताना त्यांनी त्यांच्याजवळ राहून योगाभ्यास केला होता. पुढे या वृद्धस्वामींनी श्री. बाळाभाऊ वैद्य यांना धौती क्रिया शिकविली होती; पण इतर क्रिया व पुढचा अभ्यास शिकण्याचे राहून गेले होते. श्रीस्वामीमहाराज चिखलद्यास आल्यावर आपला अपूर्ण अभ्यास पूर्ण करण्याकरिता ते त्यांच्याकडे गेले. श्री. बाळाभाऊ वैद्य त्यांच्याकडे गेल्यावर त्यांनी त्यांना नमस्कार केला व तेथे लोकांची गर्दी असल्यामुळे काही सामान्य प्रश्न विचारून वेळ काढला. त्यानन्तर जेव्हा सर्व लोक निघून गेले तेव्हा एकान्त

पाहून त्यांनी आपली योगाभ्यास शिकण्याची इच्छा त्यांच्याजवळ प्रदर्शित केली. श्री. बाळाभाऊंनी ही इच्छा प्रकट करताच श्रीस्वामी-महाराजांनी त्यांना योग म्हणजे काय ? हे समजावून सांगितले व ते स्वस्थ राहिले.

आपणास योगाभ्यास शिकविण्यासंबंधी श्रीस्वामीमहाराज काहीच बोलत नाहीत असे पाहून श्री. बाळाभाऊ त्यांना असे म्हणाले की, "मागे येथे एक वृद्धस्वामी आले होते. ते आपल्याकडून धौती, बस्ती, नेती इत्यादि सर्व क्रिया शिकले होते. त्यांनी मला धौतीची क्रिया शिकविली होती; परन्तु माझा पुढील अभ्यास अपूर्णच राहिला. त्यानन्तर मागे मी इंदूरला अभ्यासासाठी असताना एका महात्म्यांच्या दर्शनाला जात असे. या महात्म्यांचे नाम श्री. गोंदवलेकरमहाराज होते. मला योगाभ्यास शिकविण्याची ज्यावेळी त्यांना मी विनंती केली त्यावेळी त्यांनी मला सांगितले होते की, "काही दिवसांनी तुला एका अलौलिक, अद्वितीय व लोकोत्तर अशा संन्याशांचे दर्शन होऊन त्यांचा दिव्य सहवास तुला घडेल आणि त्यांच्या कृपेनेच तुला योगाभ्यास मिळेल." इतके सांगितल्यावर त्यांनी मला पुढे असेही सांगितले की, "ज्याला ज्याच्याकडून अलभ्य असा दुर्मिळ लाभ मिळावयाचा असेल तो त्याच्याकडूनच मिळत असतो. दुसऱ्या कोणाकडूनही अशा प्रकारच्या लाभाची प्राप्ती होत नाही. या सर्व गोष्टी पूर्वऋणानुबंधाच्या आहेत. हा सार्वत्रिक व त्रिकालाबाधित सिद्धान्त आहे." श्री. गोंदवलेकरमहाराज यांच्या सांगण्याप्रमाणे आपणच ते संन्यासी आहात याबद्दल माझी खात्री झाली आहे. तरी आपण मला योगातील पुढील सर्व क्रिया शिकवून माझा अपूर्ण राहिलेला योगाभ्यास पूर्ण करून घ्यावा व मला कृतार्थ करावे. याशिवाय माझ्यामागे कुटुंबाचे कोणतेच पाश आता राहिलेले नाहीत."

श्री. बाळाभाऊ वैद्यांचे हे सर्व निवेदन ऐकताच श्रीस्वामीमहाराजांनी त्यांची योग्यता पाहून श्री. स्वात्मारामयोगींद्र विरचित "हठयोगप्रदीपिका" हे पुस्तक मागवून घेतले व हा ग्रंथ त्यांना समजावून देऊन स्वत:समोर नित्य त्रिकाळी योगाभ्यास शिकविण्याचे व त्याचा अभ्यास करवून घेण्याचे काम सुरू केले. अशा रीतीने श्रीस्वामीमहाराजांच्या मार्गदर्शनाखाली त्यांचा सर्व योगाभ्यास पुर्ण झाला.

एकदा योगाभ्यासाचा विषय चालला असताना कोणीतरी श्री. लोकमान्य टिळक, नाटककार श्री. किर्लोस्कर, श्रीरामदासस्वामी व श्रीतुकाराममहाराज यांच्याविषयी श्रीस्वामीमहाराजांना विचारले. त्यावेळी श्रीस्वामीमहाराज असे म्हणाले की, "लोकमान्य पूर्वजन्मी योगी होते म्हणूनच त्याच्या ठिकाणी लोकोत्तर बुद्धिसामर्थ्य आहे. तीच गोष्ट नाटककार किर्लोस्करांची. तेही पूर्वजन्मी योगीच होते. श्रीरामदासस्वामीमहाराज व श्रीतुकाराममहाराज हेही पूर्वजन्मी योगीच होते. ज्या ज्या ठिकाणी लोकोत्तर कार्य दिसून येते त्या त्या ठिकाणी तो या जन्मी किंवा पूर्वजन्मी केलेल्या योगाभ्यासाच्या सामर्थ्याचा परिणाम आहे असे समजावे. श्रीरामदासस्वामीमहाराज व श्रीतुकाराममहाराज हे जसे योगी होते तसे ते थोर भक्तही होते." असे सांगून श्रीस्वामीमहाराजांनी वरील दोघाही संतांच्या अभंगातील योगविषयक भाग दाखवून दिला.

या चातुर्मासातच सागरचे श्री. भैय्याशास्त्री चिखलद्यास येऊन राहिले होते. ते श्रीस्वामीमहाराजांकडे "वेदान्तकेसरी" हा ग्रंथ समजावून घेण्यासाठी येत असत. एक दिवस बोलण्याच्या ओघात त्यांनी श्रीस्वामीमहाराजांना असे विचारले की, "आपण एवढे संस्कृत ग्रंथ लिहिले आहेत; तर आपली संस्कृत श्लोक रचण्याची गती तरी काय आहे ?" हे ऐकताच श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना

असे उत्तर दिले की, " माझ्या उजवीकडे व डावीकडे एकेक असे दोन लिहिणारे बसले व त्यांना आलटून पालटून नवीन श्लोक रचून सांगावयाला लागलो; तरीसुद्धा रचित असलेले श्लोक ते दोघेही लिहून घेऊ शकणार नाहीत. " हे उत्तर ऐकताच श्री. भैय्याशास्त्री श्रीस्वामीमहाराजांची नवीन संस्कृत श्लोक रचण्याची तीव्र गती व अचिंत्य असे बुद्धिसामर्थ्याचे वैभव पाहून थक्क झाले.

श्रीस्वामीमहाराजांचा चिखलद्यास चातुर्मास चालू होता. त्या वर्षीच या प्रांतात दुष्काळ पडला आणि त्यातच महामारीचाही उपद्रव सुरू होऊन पुष्कळ माणसे मृत्युमुखी पडली. त्यामुळे चातुर्मास संपताच श्रीस्वामीमहाराजांनी चिखलदा सोडावयाचे ठरविले. श्रीस्वामीमहाराज चिखलद्याहून जाणार असे कळताच कोकणातील श्री. राजाभाऊशास्त्री यांनी त्यांच्यापुढे एक पंचांग ठेवून वाटेत एकादशी वगैरे आल्यास पाहण्यासाठी उपयोगी पडेल म्हणून ते बरोबर घेण्याची विनंती केली. त्यांची ही विनंती ऐकताच श्रीस्वामी-महाराज त्यांना असे म्हणाले की, " प्रवासात ओझे नको. काडी घेऊन जमिनीवर हिशोब केला की, एकादशी कळून येते. "

श्रीस्वामीमहाराजांचा चिखलद्याचा दहावा चातुर्मास संपताच ते चिखलदा सोडून श्रीनर्मदातटाकी मंडलेश्वर या गावी आले. श्रीस्वामीमहाराजांचा सर्व प्रवास नदी किनाऱ्यावरूनच होत असे. त्यावेळी मार्गात जवळपास जी तीर्थक्षेत्रे येत असत त्यांचे दर्शन घेऊन ते पुढे जात असत. मंडलेश्वर हे गाव त्या वेळच्या इंदूर संस्थानातील जिल्ह्याचे ठिकाण होते. येथे श्रीस्वामीमहाराजांकडे लोकांचे फारसे येणेजाणे होत नव्हते. या ठिकाणी श्रीस्वामीमहाराज विश्वेश्वर मंदिरासमोरील एका धर्मशाळेतील मोठ्या पडवीत राहत असत व रात्री झोपण्यासाठी दुसऱ्या एका बंदिस्त धर्मशाळेत जात

असत. रात्री त्याच धर्मशाळेत ते श्रीगणेशपुराण सांगत व पुराण आटोपल्यावर तेथेच धर्मशाळेत एका पाटावर एक छाटी अंथरून व एक छाटी पांघरण्यास घेऊन झोपत असत.

श्रीस्वामीमहाराजांबरोबर यावेळी श्री. गांडाबुवाही होते. त्याप्रमाणेच येथे श्री.आप्पा निगडीकर हे कर्नाटकातील एक सरकारी नोकरही त्यांच्यावर काही आरोप आल्यामुळे फरारी होऊन वेषांतर करून श्रीस्वामीमहाराजांजवळ राहत होते. श्री. आप्पा निगडीकर श्रीस्वामीमहाराजांजवळ योगाभ्यास शिकत असत. त्यांच्या बरोबरच इंदूर जिल्ह्याचे एक ब्राह्मण अधिकारी श्रीस्वामीमहाराजांकडे येऊन श्रीमद्भागवतातील वेदस्तुती समजावून घेत असत. मंडलेश्वर येथील श्री. इनामदारांची श्रीस्वामीमहाराजांवर फार श्रद्धा होती. हे श्री. इनामदारांचे घराणे ऐतिहासिक असून त्यांना पेशव्यांकडून इनाम मिळाले होते. श्री. इनामदारांच्या घरून दररोज श्रीस्वामीमहाराजांसाठी ताक येत असे. कोणत्या ना कोणत्या तरी रूपाने श्रीस्वामीमहाराजांची सेवा करून धन्य व्हावे असे सर्वांना वाटत असे.

येथील तुरुंगाधिकारी श्री. वामनराव हेही देशस्थ ब्राह्मण होते. त्यांचीही श्रीस्वामीमहाराजांवर फार श्रद्धा होती. ते वारंवार दर्शनाला येत असत. एका रात्री श्री. वामनरावांच्या गायीला कसला तरी आजार झाला. श्री. वामनरावांना हे माहीत होते की, श्रीस्वामीमहाराजांजवळ सर्व प्रकारच्या व्याधींवर हमखास औषध मिळते. एके दिवशी श्री. वामनराव गायीला घेऊन रात्रीच्या वेळी हळूहळू श्रीस्वामीमहाराज झोपले होते त्या धर्मशाळेजवळ आले. त्यांची चाहूल लागताच श्रीस्वामीमहाराज उठून बाहेर आले व अंधारातूनच कोठून तरी एक औषध आणून त्या गायीला दिले. औषधाने ती गाय उत्तम बरी होऊन तात्काळ घरी गेली.

श्रीस्वामीमहाराजांच्या अंतःकरणात प्राणिमात्राबद्दल किती

अपार दया होती व करुणेचा सागर कसा ओतप्रोत भरलेला होता हे या कथेवरून दिसून येते. रात्री—अपरात्री श्री. वामनराव गायीला घेऊन आले म्हणून त्यांना एक चकार शब्दही न बोलता व आपली झोप मोडली म्हणून कसलीही तक्रार न करता ते तात्काळ उठले व अंधारात जाऊन औषध आणून त्यांनी ते त्या गायीला दिले. त्यामुळे एक मुका जीव व्याधिमुक्त झाला. हे सर्व पाहिले म्हणजे जे प्राणिमात्राच्या सुखाने सुख पावतात व जे परिसाप्रमाणे स्वतःचा थोरपणा विसरून दुसऱ्याच्या कल्याणासाठी देह झिजवितात तेच खरे संत होत, असे सिद्धान्तरूपाने सांगताना श्रीसंततुकाराममहाराजांनी आपल्या अभंगात जे कथन केले आहे त्याचे स्मरण होते. ते म्हणतात—

**काय वानूं आतां न पुरे हे वाणी । मस्तक चरणीं ठेवीतसें ।।**
**थोरीव सांडिली आपुली परिसें । नेणे सिवों कैसें लोखंडासी ।।**
**जगाच्या कल्याणा संतांच्या विभूति । देह कष्टविती उपकारें ।।**
**भूतांची दया हे भांडवल संता । आपुली ममता नाहीं देहीं ।।**
**तुका म्हणे सुख पराविया सुखें । अमृत हें मुखें स्रवतसे ।।**

श्रीस्वामीमहाराजांच्या या अपार दयेचा व विशाल करुणेचा प्रत्यय पुढे जेव्हा मंडलेश्वरी तापाची साथ सुरू झाली तेव्हा सर्व लोकांना मोठ्या तीव्रतेने आला; कारण तापावर उपयोगी पडणाऱ्या औषधांच्या गोळ्या स्वतः करून ते त्या आजारी लोकांना देत असत. यावरून असे लक्षात येते की, महापुरुषही जगातील व्यवहार हा सामान्य व्यवहाराप्रमाणेच करीत असतात. आपल्या अंगच्या सामर्थ्याचा ते वारंवार वापर करताना दिसत नाहीत. मात्र त्यांनी आपले सामर्थ्य हरघडी दाखवावे अशी सामान्य माणसांची अपेक्षा असल्याने त्यांची फसगत होते. ईश्वराने आखून दिलेल्या चक्रनेमिक्रमात सहसा कधीच बदल करावयाचा नाही, अशी त्यांची दृढ धारणा असल्यामुळे, ते असामान्य महापुरुषाला, साधूला, महात्म्याला

किंवा संताला ओळखू शकत नाहीत; कारण असे महात्मे आपल्या सामर्थ्याचा फारच क्वचित् व तोही आपल्या भक्तांसाठी वापर करीत असतात, असे दिसून येते.

इंदूरचे प्रसिद्ध नैय्यायिक श्री. सखारामशास्त्री टिल्लू हे वारंवार श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला मंडलेश्वर येथे येत असत. श्रीस्वामीमहाराजांचे शास्त्रविषयक प्रगाढ ज्ञान पाहून श्री. सखारामशास्त्री प्रभावित झाले होते आणि आपणही श्रीस्वामीमहाराजांकडून काहीतरी लाभ करून घ्यावा म्हणून त्यांनी आपणास वेदान्त सांगण्याची प्रार्थना केली. ती प्रार्थना मान्य करून श्रीस्वामीमहाराज त्यांना वेदस्तुती, ब्रह्मस्तुती व उपनिषद्भाष्य समजावून देत असत. अशा रीतीने श्री. सखारामशास्त्रींना वेदान्त सांगण्याचे कार्य चालू असताना प्रसंगाने ते कधी कधी त्यांना असे म्हणत असत की, " मला न्यायशास्त्राचा गंधही नाही. आपणासारख्या विद्वान् नैय्यायिकाला मी काय शिकविणार ? " श्रीस्वामीमहाराजांची वृत्ती ही याप्रमाणे पूर्णपणे निरभिमानी होती. आपल्या अंगच्या प्रगाढ विद्वत्तेचा त्यांना कधीसुद्धा अहंकार झाला नाही. संन्यास दीक्षेच्या वेळीही अग्नीमध्ये आहुती देण्यापुरताही अहंकार त्यांच्याकडे राहिला नव्हता; मग यासंबंधी पुढील काळाचा विचारच करण्याचे कारण नव्हते. श्रीस्वामीमहाराज आपणास न्यायशास्त्र येत नाही असे जरी म्हणाले, तरी श्री. सखारामशास्त्री त्यांना असे म्हणत असत की, " महाराज! आपण वेदान्त ज्याप्रकारे समजावून सांगत आहात तसा तो इतर कोणालाही समजावून सांगता येईल असे मला वाटत नाही. आपल्याकडून इतक्या प्रगाढ अनुभूतीने भरलेले वेदान्ताचे सांगोपांग विवरण मला ऐकावयास मिळते हे मी माझे भाग्य समजतो. हे विवेचन ऐकून मी कृतार्थ व तृप्त होत आहे. आणि महाराज ! खरे सांगावयाचे म्हणजे न्यायादि सर्व शास्त्रात माझ्या सारखा कोणीही पारंगत

झाला; तरीही त्याला हा विषय स्वप्रज्ञेने व स्वप्रयत्नाने समजणे शक्य नाही, अशी आता माझी पक्की खात्री झाली आहे." श्री. सखारामशास्त्रींनी असे दरवेळी काहीतरी म्हटले की, श्रीस्वामीमहाराज एकदा मंदस्मित करीत व पुन्हा विषय पुढे सांगण्यास सुरुवात करीत.

श्रीस्वामीमहाराजांची ही वृत्ती पाहिली की, श्रीमद्भगवद्गीतेत पूर्ण ज्ञानाचे जे पहिलेच चिन्ह "अमानित्व" म्हणजे मी मोठा, मी विद्वान् इत्यादि म्हणजे आत्मश्लाघा किंवा अहंकार नसणे असे आहे, म्हणून सांगितले आहे, त्याची प्रचीती येथे आपल्याला तंतोतंत येते. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी याचा जो भावार्थ श्रीज्ञानेश्वरीमध्ये प्रकट केला आहे तो पाहिला म्हणजे हा अमूर्त गुण जणू काही श्रीस्वामीमहाराजांसारख्या लोकोत्तर महापुरुषाच्या आश्रयाने समूर्त झाला असेच म्हणावे लागते. सकलसंतशिरोमणी श्रीज्ञानेश्वरमहाराज ज्ञानेश्वरीत असे म्हणतात की–

> **वाचस्पतिचेनि पाडें। सर्वज्ञता तरी जोडे।**
> **परि वेडिवेमाजीं दडें। महिमेभेणें ॥ १३.१९१ ॥**
> **चातुर्य लपवी। महत्त्व हारवी।**
> **पिसेपण मिरवी। आवडोनि ॥ १९२ ॥**
> **लौकिकाचा उद्वेगु। शास्त्रांवरी उबगु।**
> **उगेपणी चांगु। आथी भरु ॥ १९३ ॥**

मंडलेश्वर येथे मुक्काम असतानाच श्रीक्षेत्र नरसोबावाडीहून श्री. गुंडभट खोंवारे हे तेथे आले होते. वाडीसंबंधी वर्णन असलेले एक स्तोत्र वाडीतीलच एका ब्राह्मणास लिहून हवे आहे, अशी त्यांनी श्रीस्वामीमहाराजांना विनंती केली. त्यांच्या इच्छेप्रमाणे "कृष्णावेणीपंचगंगायुतिस्थं" हे स्तोत्र श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना लिहून दिले.

याच वेळी सावंतवाडीहूनसुद्धा चार ब्राह्मणमंडळी श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला आली होती. त्यांमध्ये श्री. शंकरभटजी सप्रे हेही होते. ते श्रीस्वामीमहाराजांचे पूर्वाश्रमापासूनच मोठे भक्त व सदाचारसंपन्न गृहस्थ होते. त्यांच्या घरी पूर्वीपासूनच स्मार्ताग्नी होता. ते भिक्षावृत्तीवर अग्निसेवा करीत असत. पुढे त्यांना श्रौताग्नी ठेवण्याची इच्छा झाली व त्याप्रमाणे त्यांनी श्रीस्वामीमहाराजांकडे आपली इच्छा व्यक्त केली. त्यावेळी श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "शारीरिक व आर्थिक दृष्टीने श्रौताग्नी ठेवणे व त्याची सेवा करणे कठिण जाईल. सध्या स्मार्ताग्नी आहे तेवढीच अग्निसेवा पुरे." असे श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना सांगितले; पण श्री. सप्रे यांची श्रौताग्नी ठेवण्याची इच्छा दांडगी होती. त्यामुळे अखेर श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना श्रौताग्नी ठेवावयाला संमती दिली. पुढे श्री. सप्रे यांनी भिक्षावृत्तीवर अखेरपर्यंन्त अग्निसेवा केली. श्रीस्वामीमहाराजांनी लिहिलेले बरेचसे ग्रंथ त्यांनी छापून काढून श्रीस्वामीमहाराजांच्या ग्रंथाच्या प्रसाराचे वाङ्मयीन कार्य करून ती सेवा त्यांच्या चरणी रुजू केली.

त्यावेळी तेथे आलेले दुसरे गृहस्थ हे श्री. सखारामपंत निगुडकर असून ते भडगांव येथे वकिली करीत असत. त्यांची श्रीस्वामीमहाराजांवर खूप श्रद्धाभक्ती होती.

सावंतवाडीहून मंडलेश्वरी श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनार्थ आलेले तिसरे गृहस्थ श्री. सीतारामपंत निगुडकर हे असून ते तेथेच सबजज्ज होते. एक उत्तम व निःपक्षपाती न्यायाधीश म्हणून त्यांची कीर्ती होती. श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना श्रीदत्तमंत्राचा उपदेश देऊन कृतार्थ केले होते. त्यांची श्रीस्वामीमहाराजांवर नितान्त श्रद्धा व अपार भक्ती होती. पुढे ते आपल्या गावी परत आल्यावर कालौघात त्यांना श्रीस्वामीमहाराजांचा असा दृष्टान्त झाला की,

"काम, क्रोध व लोभ हे त्रिविध नरकद्वार सोडावे." हा दृष्टान्त झाल्याबरोबर दुसऱ्या दिवशी आपल्या नोकरीचा राजीनामा देऊन श्री. सीतारामपंत मोकळे झाले व त्यांनी आपले उर्वरित आयुष्य सदाचरणात व ईश्वर भक्तीत घालविले. "अनायासेन मरणम्" एवढीच ते ईश्वरापाशी प्रार्थना करीत. पुढे त्यांच्या इच्छेप्रमाणे त्यांना बोलता बोलता सहज मृत्यू आला.

सावंतवाडीहून आलेले चौथे ब्राह्मण गृहस्थ श्री. गणेशपंत सातवळेकर हे असून ते कोलगावचे राहणारे होते. त्यांची हकीगत मोठी विलक्षण आहे. श्रीस्वामीमहाराज माणगाव सोडून निघून गेल्यावर त्यांचे बंधू श्री. सीतारामपंत यांना त्यांच्या भेटीसाठी जशी अत्यंत आतुरता निर्माण झाली; तशीच श्री. गणेशपंत सातवळेकर यांनासुद्धा श्रीस्वामीमहाराजांच्या भेटीची विलक्षण आतुरता निर्माण झाली होती. त्यांना ध्यानी, मनी व स्वप्नी सदासर्वदा श्रीस्वामीमहाराजच दिसत असत. श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला ते एवढे व्याकुळ झाले होते व त्यांना भेटीची एवढी तळमळ लागली होती की, एक दिवस कोणासही न कळवता ते त्यांच्या भेटीसाठी घरातील कोणासही न सांगता निघून गेले; परन्तु त्यांची व श्रीस्वामीमहाराजांची भेट झाली नाही. मध्येच त्यांच्या वडिलांनी त्यांचा शोध करून त्यांना परत घरी आणले; पण घरी त्यांचे चित्त रमेना. ते सदा उदास असत. श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाचा त्यांना सारखा ध्यासच लागलेला होता. त्यांची ती अवस्था पाहून त्यांच्या वडिलांना फार वाईट वाटले. अखेर त्यांनी योग्य सोबत पाहून श्री. गणेशपंतांना श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला जाण्याची परवानगी दिली; पण जाण्यापूर्वी त्यांनी मुलाला श्रीगुरुचरित्राच्या पोथीवर हात ठेवून "मी महाराजांचे दर्शन घेऊन परत येईन." अशी शपथ घ्यावयाला लावली आणि मगच त्यांना जाऊ दिले.

श्री. गणेशपंत सातवळेकर अशा तळमळीने मंडलेश्वरला श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी आले होते. श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन होताच त्यांचे अष्टसात्त्विक भाव जागृत झाले. श्रीस्वामी-महाराजांना साष्टांग नमस्कार घालून व हात जोडून ते त्यांच्या समोर उभे राहिले. भक्ताच्या मनीचे भाव श्रीस्वामीमहाराजांनी ओळखले व त्यांना स्वतःपाशी ठेवून घेतले. त्यावेळी त्यांनी श्रीस्वामीमहाराजांजवळ वेदस्तुती, ब्रह्मस्तुती व मनन यांचा अभ्यास केला. पुढे उत्तरायण लागल्यावर काही उपनिषदे सांगून श्रीस्वामी-महाराजांनी त्यांना अनुग्रह दिला. अनुग्रहरूप महाप्रसाद मिळाल्या-वर पुढे काही दिवसांनी एकदा दुपारच्या वेळी श्रीविश्वेश्वराच्या मंदिरात ते भाष्य चिंतनिका करीत बसले असताना श्री. गणेश-पंतांना श्रीदत्तमहाराजांनी संन्यासीरूपाने साक्षात् दर्शन दिले. दैदिप्यमान कांतीने उजळून निघालेले ते श्रीदत्तात्रेयांचे संन्यासीरूप पाहताच त्यांचे हृदय आनंदाने उचंबळून आले. त्यांचे शरीर जड व अचल झाले. त्या संन्याशाच्या शरीरावरील तेज जरी प्रखर होते; तरी ते श्री. गणेशपंतांच्या नेत्रांना सुखावह वाटले. त्या तेजाने त्यांचे नेत्र दिपून जाण्यापूर्वीच सुहास्य मुद्रेने श्रीदत्तमहाराज अंत-र्धान पावले. आपणास भगवान् श्रीदत्तात्रेयांचे संन्यासी वेषात साक्षात् दर्शन झाले याची जाणीव होताच श्री. सातवळेकरांना जणूकाही समाधी दशाच प्राप्त झाली. त्या स्थितीमध्ये ते किती-तरी वेळ मंदिरात बसून होते. आपणाला झालेले दर्शन त्यांनी आपल्या श्रीगुरुदेवांना सांगितले. श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना शुभाशीर्वाद देऊन " तुमचे काम झाले आहे. " असे सांगितले. श्री. गणेशपंत सातवळेकरांचे चित्त या दर्शनामुळे शांत झाले व इच्छा नसतानाही वडिलांना दिलेल्या वचनाप्रमाणे ते कोलगावला परतले.

त्यानंतर कालौघात श्री. गणेशपंत सातवळेकरांना श्रीक्षेत्र नर-

सोवावाडीस दोन वेळा व श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथे एक वेळा असे तीन वेळा श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन झाले. या प्रत्येकवेळी त्यांना श्रीस्वामीमहाराजांचा निकटचा सहवास मिळाला. श्री. गणेशपंतांवर श्रीस्वामीमहाराजांचे एवढे प्रेम होते की, त्यांनी त्यांना योगाची माहिती तर सांगितलीच; पण आपले स्वतःचे आयुर्वेदातील अनुभव स्वहस्ताने लिहून देऊन ते बाड श्री. गणेशपंताना दिले व यापुढे हाच व्यवसाय चालू ठेवावा अशी त्यांना आज्ञा केली. श्री. सातवळेकरांच्या घरात प्रसादरूपाने आलेला हा औषधांचा व्यवसाय पुढे चांगलाच चालला व अद्याप चालतो आहे. श्री. गणेशपंतांचे सुविद्य चिरंजीवही हा औषधाचा व्यवसाय चालवीत होते.

इ. स. १९१३ पासून श्री. सातवळेकरांच्या घरी दर गुरुवारी श्रीस्वामीमहाराजांच्या नावाने अखंड भजनाचा कार्यक्रम आजतागायत चालू आहे. आज श्रीस्वामीमहाराजांचे जे चरित्र लोकांसमोर आले आहे त्याचे सर्व श्रेय श्री. गणेशपंत सातवळेकर यांनाच आहे. श्रीस्वामीमहाराजांच्या जीवनातील प्रसंग, आठवणी, त्यांच्या कृपेने पावन झालेल्या लोकांचे अनुभव वगैरे सामग्री परिश्रमपूर्वक जमवून त्यांनी श्रीस्वामीमहाराजांचे चरित्र लिहून ठेवले होते त्यांनी लिहिलेल्या या माहितीच्या आधारानेच श्रीस्वामीमहाराजांचे ज्ञात चरित्र आज आपणापुढे येऊ शकले. श्रीस्वामीमहाराजांनी निरनिराळ्या ठिकाणी केलेल्या लीला अगणित आहेत; पण त्यांची कोणी नीट संगतवार जुळवणी केली नाही. ज्या महाभागांच्या आयुष्यात श्रीस्वामीमहाराजांच्या कृपेने परिवर्तने घडली, जे त्यांच्या कृपाप्रसादाने सन्मार्गाला लागले आणि ज्यांच्या आयुष्याचे श्रीस्वामीमहाराजांच्या अपार कृपेने सोने झाले, त्या महाभागांचे अनुभव त्यांच्याबरोबरच काळाच्या उदरात नष्ट झाले. त्यामुळ

अशा फारच थोड्या गोष्टी आपल्याला ज्ञात झाल्या आहेत. श्रीस्वामीमहाराज स्वतः अशा गोष्टींचा कोणाकडे कधीच उल्लेख करीत नसत. त्यामुळे त्यांच्या चरित्रातील एक मोठा भाग आज अज्ञात आहे. तो जर प्रकाशात आला असता; तर श्रीस्वामीमहाराजांच्या रूपाने प्रत्यक्ष भगवान् श्रीदत्तात्रेयांनी ज्या अपूर्व,अलौकिक व लोकोत्तर लीला या भूतलावर करून कर्म, भक्ती व ज्ञान यांच्या हृद्य दर्शनाचा जो अपूर्व सोहळा उपस्थित केला असेल, त्या सर्वांचे अवगाहन करण्याचा आनंद उपभोगून पवित्र, धन्य व कृतार्थ होता आले असते; पण त्या लीलांचे शब्दरूप दर्शन घेण्याचे आपल्या भाग्यात नाही. जे काही अनुभव आज आम्हाला कोठे कोठे ऐकावयाला मिळतात त्यांची संगतवार जुळवणी करणे हे फार कठिण काम आहे. श्री. गंगाधरपंत वैद्य यांनी श्रीस्वामीमहाराजांसंबंधी आठवणी लिहून ठेवल्या आहेत. तसेच यवतमाळचे श्री. सरमोकादम यांनी आपल्या कुटुंबियांना आलेल्या अनुभवांची नोंद करून ठेवली आहे. श्रीमती दत्तीबाई नागेशकर या गोमंतकातील बाईंचे अनुभव आम्ही प्रत्यक्ष त्यांच्याच तोंडून ऐकले आहेत. वयोमानामुळे या अनुभवांचा कालक्रम त्यांना नीट सांगता आला नाही; पण त्यांच्या आठवणी अतिशय हृद्य आहेत. अशा अनेकजणांजवळील आठवणी आम्ही या चरित्रात दिल्या आहेत.

मंडलेश्वरातील मुक्कामी श्रीस्वामीमहाराजांना थंडी वाजून ताप येऊ लागला. हा त्रास काही दिवस सतत चालू होता; पण त्यांच्या नेहमीच्या स्नानादिक विधीत व इतर कोणत्याही कार्यक्रमात तापामुळे कधीही खंड पडला नाही. सकाळी मंडळी पाठ ऐकण्याकरिता येऊन बसली की, श्रीस्वामीमहाराजांना थंडी वाजण्यास सुरुवात व्हावयाची. त्यावेळी ते जमलेल्या मंडळींना असे सांगत असत की, " थोडे बसा. हे हींव घालवून येतो, " असे म्हणून

ते निजण्याच्या खोलीत जात व प्राणायामादिकांनी ती घालवून लवकरच परत येऊन पाठ सुरू करीत. परन्तु यौगिक क्रियांनी थंडी गेली; तरी त्यांच्या अंगात ताप असे. त्यामुळे लोक त्यांना असे म्हणत असत की, " आपणास थंडी वाजून ताप आला आहे; तरी आज पाठ राहू दे. पाठ बंद ठेवून आपण विश्रांती घ्यावी. " परन्तु श्रीस्वामीमहाराजांनी लोकांचा आग्रह कधीही मानला नाही. लोकांनी आग्रह केला की, ते त्यांना असे म्हणत असत की, " ताप काय रोजचाच आहे. तो राहीना का ! तो आपले काम करील, आपण आपले काम करू. भोग संपला की, तो आपोआप आपण-हूनच निघून जाईल. त्याची चिंता करण्याचे कारण नाही. " इतके सांगून श्रीस्वामीमहाराज पुन्हा पाठाला सुरुवात करीत असत.

श्रीस्वामीमहाराजांची हिवतापाची ही व्याधी बरेच दिवस चालू राहिल्याचे पाहून पाठाला येणारे एक गृहस्थ त्यांना असे म्हणाले की, " माझ्याकडे औषधाची एक मात्रा आहे, ती आपण घ्यावी, अशी आपणाला माझी प्रार्थना आहे. " परन्तु श्रीस्वामीमहाराज कधी-सुद्धा औषध घेत नसत. त्यामुळे ते त्या गृहस्थांना असे म्हणाले की, "आपणाजवळ त्रिमात्रांचा संग्रह आहे. आता फक्त अर्धमात्रेचाच प्रश्न आहे. उपदेशानंतर त्रिमात्रांप्रमाणे तिचाही संग्रह होईल. आता फक्त अर्धमात्रेची जरूरी असल्यामुळे तुमच्याकडील सगळ्या मात्रेचा काही उपयोग नाही." या वाक्यातील गूढार्थ सर्वच लोकांच्या ध्यानात आला नाही आणि तो सर्वांना समजणे शक्यही नव्हते. शिवाय त्यांच्या भाषणाचा खुलासा विचारण्याचे कोणाला धैर्यही झाले नाही.

अंगात ताप असला ; तरी श्रीस्वामीमहाराज भिक्षा करीत असत. त्यावेळी त्यांच्या जवळ पाठ घेत असलेल्या श्री. गणेशपंत सातवळे-करांना या गोष्टीचे नवल वाटले. त्यामुळे श्री. गणेशपंत श्रीस्वामी-महाराजांना असे म्हणाले कीं, " महाराज ! ताप अंगात असताना

आपणास अन्न जाते तरी कसे ? " त्यावर श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "अहो ! आपण अन्न खाल्ले पाहिजे. तापाचा व अन्नाचा संबंधच काय ? " हे उत्तर ऐकताच श्री. गणेशपंत स्तब्ध झाले. पुढे काही दिवसांनी श्री. गणेशपंतांना स्वतःला ताप येऊ लागला. ताप आला की, त्यांना खाण्याची वासना न होता अन्नद्वेष निर्माण होत असे.त्याप्रमाणे त्यांना याही वेळी अन्नद्वेष निर्माण झाला. श्रीस्वामीमहाराजांनी मंत्रोपचाराने ताप बांधून घालवून टाकला; पण त्यांचा अन्नद्वेष गेला नाही. यावेळी " रोग आपले काम करील, आपण आपले काम करावे. " इत्यादि उपदेशाचा त्यांना उपयोग झाला. पुढील आयुष्यात प्रसंगाने श्री. गणेशपंतांना ताप आला; तरी श्रीस्वामीमहाराजांचे वाक्य लक्षात असल्यामुळे ते तापातही जेवत असत.

एकदा एका गृहस्थाने श्रीस्वामीमहाराजांना असे विचारले की " संन्याशाने एकदा तरी आपल्या आईची भेट घ्यावी आणि जन्मभूमीचे दर्शन घ्यावे असे लोक म्हणतात, याबद्दल आपला काय अभिप्राय आहे ? " हा प्रश्न ऐकताच श्रीस्वामीमहाराजांनी असा खुलासा केला की, " संन्यासी माणसाने इतर कोणालाही वंदन करू नये; पण माता दिसल्यावर तिला मात्र वंदन केलेच पाहिजे. मात्र त्यासाठी मुद्दाम मातुश्रींची भेट घ्यावयाला गेले पाहिजे असे नाही, तसेच संन्यास घेतल्यावर जन्मभूमीचे दर्शन घेणे म्हणजे मूळ प्रपंचाधिष्ठान पाहणे व त्यातच लीन होणे असा आहे. खरे तर परार्थच मुख्य आहे.

श्रीस्वामीमहाराजांचे गुरुस्वामी श्रीनारायणानंदसरस्वतीस्वामीमहाराज काही दिवस मंडलेश्वरला येऊन राहिले होते. श्रीगुरुस्वामींच्याबरोबर त्यांचे एक तरुण संन्यासी शिष्यही होते. या तरुण शिष्याच्या अंगी खरी संन्यासीवृत्ती बाणली नव्हती. तो घरातून

भांडून निघाला होता. एकदा तो भिक्षेला गेला असताना या तरुण संन्याशाने एका गृहस्थाच्या घरची माळ चोरून आणली. ही गोष्ट श्रीस्वामीमहाराजांच्या निदर्शनाला आल्यावरोबर त्यांनी श्रीगुरुस्वामींना स्पष्ट शब्दात असे सांगितले की, "अनधिकारी माणसाला संन्यासदीक्षा दिली की अशी स्थिती होते. अशा तऱ्हेने चोरी करणाऱ्या माणसाला तुरुंगात घालावे." श्रीस्वामीमहाराजांच्या या कडक भाषणामुळे श्रीगुरुस्वामींनी त्या शिष्याला दुसऱ्या गावी पाठवून दिले.

याच सुमारास सामाजिक सुधारणेचे वारे वाहू लागले होते. पुष्कळ सुधारक पुनर्विवाहाचा पुरस्कार करीत असल्यामुळे त्याबद्दल सर्वत्र वादविवाद चालू होता. अशा वेळी काही मंडळींनी श्रीस्वामीमहाराजांकडे आग्रह धरला की, पुनर्विवाहाच्या खंडनपर त्यांनी एक लेख लिहून द्यावा. त्या लेखाच्या प्रसिद्धीने सुधारणावाद्यांना चांगलेच प्रत्युत्तर मिळेल." लोकांनी फारच आग्रह धरला म्हणून श्रीस्वामीमहाराज लेख लिहावयाला बसले. हातात लेखणी धरताच "लेखणी खाली ठेव," अशी त्यांना श्रीदेवांची आज्ञा झाली. त्यांनी ताबडतोब लेखणी खाली ठेवली. श्रीदेवांच्या या आज्ञेमुळे तो लेख लिहून तर झाला नाहीच; पण इतर लिखाणही बंद झाले. पुढे एक वर्षानंतर एकदा एके ठिकाणी शाईची एक दौत व शेजारी एक काडी पडलेली श्रीस्वामीमहाराजांना दिसली. अनवधानाने श्रीस्वामीमहाराजांनी काडी शाईत बुडविली व एका कागदावर "श्रीदत्त" वगैरे काही अक्षरे लिहिली; पण लगेच त्यांना श्रीदेवांच्या आज्ञेची आठवण होऊन त्यांनी काडी खाली ठेवली व लिखाण बंद केले. त्यावेळी श्रीदेवांची अशी वाणी ऐकू आली की, "आपण काही इतर लिखाणास बंदी केली नव्हती. फक्त तो लेख लिहिण्यास बंदी केली होती." श्रीदेवांचा हा अभिप्राय समजल्यावर श्रीस्वामीमहाराजांनी

लिखाण करण्यास पुन्हा सुरुवात केली.

मंडलेश्वरला श्री. अजमत अली खान नावाचे सुभेदार होते. ते हिन्दू धर्माचे द्वेष्टे नव्हते. ते ब्राह्मणांचा आदर करीत असत. श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन घ्यावयाची त्यांना फार इच्छा झाली. श्रीस्वामीमहाराजांच्या परवानगीने त्यांना त्यांचे दर्शन मिळाले. यावेळी श्री. रावसाहेब गोळे तेथे जज्ज होते. त्यांनी श्रीस्वामी-महाराजांकडून भागवतातील काही भाग समजावून घेतला.

अशा रीतीने मंडलेश्वर येथील दिवस चालले असता एके दिवशी देवांनी श्रीस्वामीमहाराजांना असे सांगितले की, " गुरुस्वामी-श्रीनारायणानंदसरस्वतीस्वामीमहाराज हे आजारी आहेत; तरी त्यांची सेवा करण्यास जावे. " देवांनी असे सांगताच श्रीस्वामी-महाराज मंडलेश्वराहून निघाले. त्यावेळी त्यांच्या सोबत श्री. आप्पा निगडीकर व श्री. गांडाबुवा हे होते.

श्री. स्वामीमहाराज फाल्गुन महिन्याच्या अखेरीस इंदूरला येऊन पोहोचले. ते गावाबाहेर आले आहेत असे कळताच गावातील प्रमुख ब्राह्मण मंडळी त्यांच्या स्वागतासाठी आली. सर्वांनी त्यांना सामोरे जाऊन साष्टांग नमस्कार केला व त्यांनी गावात यावे म्हणून त्यांना आग्रहाची विनंती केली. ही विनंती ऐकताच " आपण शहरात राहत नाही. तेथे फार अडचणी असतात, " असे श्रीस्वामीमहाराजांनी सांगितले. त्यावेळी तेथे आलेल्या सर्व लोकांनी त्यांना अशी विनंती केली की, " आपल्या अडचणी आम्ही दूर करू. आपण कसेही करून गावात मुक्काम करावा. " सर्व मंडळींचा तो प्रेमाचा आग्रह पाहून लोकांचे मन मोडणे श्रीस्वामीमहाराजांच्या जीवावर आले. त्यांनी गावामध्ये मुक्काम करण्याचे ठरविले व जमलेल्या सर्व लोकांना असे सांगितले की, " आपल्या सर्वांच्या प्रेमाच्या आग्रहास्तव आपण गावात येऊ. मात्र चार दिवसच आपला मुक्काम तेथे राहील;

कारण श्रीगुरुस्वामी आजारी असल्यामुळे चार दिवसांपेक्षा अधिक राहण्यास आपणास सवड नाही." श्रीस्वामीमहाराजांनी येण्याचे मान्य केले हे पाहून सर्वांना परमानंद झाला. त्यावेळी श्री. आप्पा निगडीकर यांना श्रीगुरुस्वामींच्या शुश्रूषेकरिता श्रीस्वामीमहाराजांनी पुढे पाठवून दिले.

श्रीस्वामीमहाराजांची इंदुरात उतरण्याची सोय सरकारी बागेजवळ सुबरायाच्या वाड्यात करण्यात आल्यावर ते तेथे येऊन उतरले. या वाड्यातच तेथील वेदशास्त्रपाठशाळा होती. चार दिवसांच्या मुक्कामानंतर श्रीस्वामीमहाराजांनी पुढील प्रवासाला जावयाची तयारी केली व आपण निघणार असे त्यांनी सर्वांना सांगितले. त्यांच्या दिव्य संगतीचा काळ एवढ्या लवकर संपेल असे लोकांना वाटले नव्हते. श्रीस्वामीमहाराजांचा निर्णय ऐकून सर्वांना फार वाईट वाटले. त्यांनी श्रीस्वामीमहाराजांना अशी विनंती केली की, "महाराज! आपल्या मुखातून काहीतरी उपदेश एकण्याची आम्हा सर्वांची इच्छा आहे; तरी कृपाकरून काही दिवस तेथे राहून लोकांना शास्त्रोपदेश करावा व उपदेशामृताचा लाभ करून द्यावा." लोकांच्या आग्रहास्तव श्रीस्वामीमहाराज पुढे १८ दिवस तेथे राहिले. त्यावेळी त्यांनी तेथील मंडळींच्या इच्छेप्रमाणे सर्वानुक्रम व गायत्रीभाष्य सांगितले. तेथे रोज पुष्कळ मोठमोठी विद्वान् मंडळी दर्शनाला व भाष्य ऐकावयाला येत असत. श्रीस्वामीमहाराजांचे विषयावरील प्रभुत्व व अगाध ज्ञान पाहून सर्व विद्वान् मंडळी चकित झाली. भिक्षेची वेळ सोडून बाकीचा सर्व वेळ सांगण्याचे काम अठरा दिवस चालू होते; तरी भाष्य सांगून पूर्ण झाले नाही. संपूर्ण भाष्य श्रीस्वामीमहाराजांच्या मुखातून ऐकण्याची लोकांची इच्छा होती; पण उज्जयिनीहून श्री. आप्पा निगडीकरांचे असे पत्र आले की, "श्रीगुरुस्वामी फार

आजारी आहेत. "वासुदेवानंद आल्यावाचून आपणास बरे वाटणार नाही," असे श्रीगुरुस्वामी म्हणतात. तरी लवकर येण्याचे करावे." या पत्रामुळे गायत्री भाष्य अर्धवट सोडून अठरा दिवसांनंतर श्रीस्वामीमहाराजांनी इंदूर सोडले.

इंदूरमध्ये ज्याप्रमाणे विद्वान् व मुमुक्षू मंडळी श्रीस्वामी-महाराजांच्या मुखातून शास्त्रचर्चा ऐकावयाला येत असत तसेच संसारातील दुःखांनी कष्टी झालेली माणसे सुद्धा आपली दुःखे घेऊन त्यांच्याकडे येत असत. श्रीस्वामीमहाराज दोन्ही प्रकारच्या लोकांचे समाधान करीत असत. एकदा एका गृहस्थांनी येऊन श्रीस्वामीमहाराजांना असे विचारले की, "माझी गाय चुकली आहे. ती केव्हा व कोठे सापडेल?" हा प्रश्न ऐकताच श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "मीं काही ज्योतिषी नाही. तुमची गाय कोठे गेली आहे ते मी कसे सांगू?" श्रीस्वामीमहाराजांच्या या उत्तराने त्या गृहास्थांचे समाधान झाले नाही. त्यांना ठाऊक होते की, श्रीस्वामीमहाराज सर्व प्रश्नांची उत्तरे देतात. ते तेथेच बसून राहिले. त्यांचा विशेष आग्रह पाहून श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "गाय गोठ्यात येऊन उभी राहिली आहे. घरी जाऊन पाहा." हे ऐकताच त्या गृहस्थांनी घरी येऊन पाहिले; तर खरोखरच गाय गोठ्यात उभी होती. हे पाहून त्यांना फार आश्चर्य वाटले.

एकदा श्रीस्वामीमहाराज आपणाजवळच्या श्रीदत्तमूर्तीची पूजा करीत असताना तेथे असलेल्या एका विद्वान् माणसाने त्यांना असे विचारले की, "आपण आता देवस्वरूप झाला आहात. आता या मूर्तिपूजेची आपणास काय आवश्यकता आहे?" त्यांचे हे म्हणणे ऐकताच श्रीस्वामीमहाराजांनी असे उत्तर दिले की, "ज्या मूर्तीच्या पूजेने ही परमावस्था प्राप्त झाली त्या मूर्तीला विसरणे आता योग्य

होईल का ? तथापि तसाच श्रद्धावान् कोणी पूजा करणारा भेटला तर त्याला ही मूर्ती देता येईल."

श्रीस्वामीमहाराज उज्जयिनीस पोहोचल्यावर त्यांनी आपले गुरुस्वामी श्रीनारायणानंदसरस्वतीस्वामीमहाराज यांची उत्तम प्रकारे सेवा केली. त्यांना औषधोपचार करून व्याधिमुक्त केले. येथें सुद्धा श्रीस्वामीमहाराजांभोवती पूर्वीप्रमाणे उपदेशामृत ऐकण्यासाठी लोक जमा झाले होते. श्रीस्वामीमहाराज संध्याकाळी श्रीमद्भागवत पुराण सांगत असत. पुष्कळ लोक जमत. सर्वंच लोकांची श्रीस्वामीमहाराजांभोवती गर्दी होऊ लागली. श्रीनारायणानंदसरस्वतीस्वामीमहाराजांना पूर्ण आराम मिळू लागला; पण त्यांच्या मनात माणसाचा अनादी काळापासूनचा शत्रू जो मत्सर तो जागृत झाला. श्रीगुरुस्वामींना आपल्या शिष्याचा उत्कर्ष सहन होईना. शिष्याच्या लोकप्रियतेचा त्यांना हेवा वाटू लागला. श्रीस्वामीमहाराजांच्या लक्षात ही गोष्ट येताच आपल्यामुळे श्रीगुरुस्वामींना त्रास होऊ नये व आता त्यांची प्रकृतीही बरी झाली आहे असे पाहून त्यांच्या आज्ञेने श्रीस्वामीमहाराजांनी उज्जयिनी सोडले. अशा प्रकारे श्रीस्वामीमहाराज श्रीगुरुस्वामींची आज्ञा घेऊन उज्जयिनीहून निघाले.

**अनन्तकोटी ब्रह्माण्डनायक श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य भगवान् श्रीवासुदेवानंदसरस्वती श्रीदत्तात्रेयस्वामीमहाराज यांचा अखंड जयजयकार असो. श्रीस्वामीमहाराजांचे परमभक्त व त्यांचे धाकटे बंधू परमपूजनीय श्रीसीतारामहाराज यांनी ज्याप्रमाणे श्रीमत् गुरुचरित्रग्रंथात श्रीपादश्रीवल्लभ यांनी, त्यांच्या आईने त्यांना लग्न करण्यासंबंधी आग्रह केला तेव्हा त्यांनी "कराल विवाह माझा तुम्हीं। सांगों ऐका विचार आम्हीं। वैराग्य स्त्रीसंगें असेन मी। काम्य आमुचें तियेजवळीं ॥ ५.५३ ॥ त्या स्त्रियेवांचून**

आणीक नारी। समस्त जाण मातेसरी। जरी आणाल ते सुंदरी। वरीन म्हणे तयेवेळीं ॥ ५४ ॥ आपण तापसी ब्रह्मचारी। योगस्त्रिवांचोनी नारी। बोल धरा निर्धारीं। श्रीवल्लभ नाम माझें ॥५५॥" असे उत्तर देऊन आपण वैराग्यरूप योगस्त्रियेचा अंगीकार केल्याचे जसे स्पष्ट केले आहे. त्याप्रमाणेंच आपल्याला श्रीगुरुचरणांच्या कृपेनेच निवृत्तिरूप स्त्रीरत्न प्राप्त झाल्यामुळेच आपला भवभ्रम जाऊन ज्ञानदीप हृदयात प्रकटून,आपणास दत्तारामची प्राप्ती झाली आहे, असे एका अभंगात शब्दबद्ध करून जसे श्रीगुरुचरणी प्रस्तुत केले आहे, तसे ते आपण सर्वजण त्यांच्याच शब्दात प्रस्तुत करून, आम्हासही वैराग्यप्राप्तीचा आशीर्वाद देऊन, आमच्याही हृदयात ज्ञानदीप प्रज्ज्वलित करून व आम्हालाही श्रीदत्तारामाची प्राप्ती करून देऊन, आपल्या शिष्यत्रयांप्रमाणे व आमचा भवभ्रम दूर करून धन्य व कृतार्थ करा, अशी श्रीस्वामीमहाराजांच्या परमपवित्र व परमकोमलचरणी अत्यंत शरणागतिपूर्वक प्रार्थना करू.

## - अभंग -

रामा आली आतां निवृत्ती मजला। हर्ष बहू झाला मनीं माझ्या ॥ १ ॥
ऐसें हें स्त्रीरत्न गुरुराये दिल्हें। मोक्षपद आलें माझ्या हातां ॥ २ ॥
आतां कैंचे जन्म गेला भवभ्रम। मनीं दत्ताराम प्रगटला ॥ ३ ॥
प्रगटला ज्ञानदीप हा हृदयीं। अज्ञानासी घाई झाली बहू ॥ ४ ॥
माझा सर्व भ्रम वासुदेवें नेला। स्वरूपीं लीन केला सीतारामा ॥ ५ ॥

# – अध्याय दहावा –

त्वं नो माता त्वं पिताऽऽप्तोऽधिपस्त्वम् ।
त्राता योगक्षेमकृत्सद्गुरुस्त्वम् ।
त्वं सर्वस्वं नोऽप्रभो विश्वमूर्ते ।
घोरात्कष्टादुद्धारास्मान्नमस्ते ।।

**चातुर्मास अकरावा – शके १८२३ – इ. स. १९०१ – महत्पूर :-**

श्रीस्वामीमहाराज उज्जयिनीहून निघाल्यावर महत्पूरला येऊन पोहोचले. त्यावेळी वैशाख महिना होता. चातुर्मास जवळ येत होता. त्यामुळे तेथील लोकांनी श्रीस्वामीमहाराजांना चातुर्मास महत्पूरला करण्याचा आग्रह केला. श्रीस्वामीमहाराजांनीही लोकांच्या आग्रहास्तव आपला अकरावा चातुर्मास महत्पूरला करण्याचे ठरविले. या गावाजवळून क्षिप्रा नदी वाहते. त्यामुळे चातुर्मासासाठी हे ठिकाण योग्य होते. श्रीस्वामीमहाराज येथे सहा महिने राहिले. येथे लोकोद्धाराचे कार्य नेहमीप्रमाणे चालू होते.

या मुक्कामात महत्पूरच्या लोकांनी श्रीस्वामीमहाराजांना असा आग्रह केला की, "श्रीदत्तपुराण हा संस्कृत ग्रंथ असल्यामुळे तो आमच्यासारख्या प्राकृत जनांच्या आटोक्यात येत नाही व समजतही नाही. तरी आपण त्या ग्रंथातील कथांचा संग्रह करून तो ग्रंथरूपाने आम्हा सर्वांना दिल्यास सर्व लोकांवर उपकार होतील." लोकांची ही विनंती ऐकताच श्रीस्वामीमहाराजांनी "श्रीदत्तमाहात्म्य" या नावाचा एक प्राकृत, ओवीबद्ध व रसाळ असा ग्रंथ केला. श्रीदत्तपुराणातील सर्व कथा या ग्रंथात संग्रहीत केल्या असून या ग्रंथात कित्येक ओव्या मंत्ररूप आहेत. हा ग्रंथ साधकांना फार उपयुक्त व फलदायी ठरला आहे. श्रीस्वामीमहाराजांनी लिहिलेल्या एका पत्रात या ग्रंथाबद्दल पुढील उल्लेख सापडतो.

"श्रावण शु. ११–कांहीं लोकांचा येथें असा आग्रह होता कीं, सविस्तर दत्तमाहात्म्य असावें. त्यावरून ओवीबद्ध तृतीयाष्टकापासून सहाव्या अध्यायापर्यन्त आजपर्यंन्त ओव्या लिहिल्या. प्रायः प्रत्यहीं १०८ होत गेल्यामुळें तेवढाच अध्याय ठेवला. उद्या ५० वा अध्याय पुरा होईल. सुमारें साडेपाच हजार ग्रंथ झाला. आतां पुढें लिहिण्याची इच्छा होत नाहीं. नारायण."

महत्पूर येथील मुक्कामात श्रीस्वामीमहाराजांनी आणखी एका ग्रंथाची रचना केली. या ग्रंथाचे नाव "त्रिशती गुरुचरित्र" असे असून हे तीनशे संस्कृत श्लोकांचे रसाळ काव्य आहे.

या सुमारासच सावंतवाडीला श्री. शंकरभटजी सप्रे हे श्रीस्वामीमहाराजांनी लिहिलेले सटीक द्विसाहस्त्री गुरुचरित्र छापीत होते. ते छापून झाल्यावर त्यांनी त्या ग्रंथाची एक छापील प्रत श्रीस्वामीमहाराजांकडे पाठवून दिली व पत्र लिहून असे विचारले की, "या ग्रंथात छापताना बऱ्याच चुका राहून गेल्या आहेत; तरी या अशुद्धाबद्दल काय करावे ते कळविण्याची कृपा करावी." हे पत्र मिळताच श्रीस्वामीमहाराजांनी श्री. सप्रे यांना उत्तर म्हणून पाठविलेल्या पत्रात असे लिहिले आहे की, "श्रावण व. ११–महत्पूर. छापलेल्या पुस्तकांत अशुद्धें राहिली तरी राहोत. "गच्छतः स्खलनं क्वापि" हा न्याय सर्वत्र आहेच. शुद्धिपत्र मात्र द्यावें म्हणजे झालें. नारायण"

ग्वाल्हेर संस्थानात गुणाछावणी म्हणून एक लष्करी ठिकाण आहे. तेथे श्री. विश्वनाथराव ताटके म्हणून एक उत्तम सर्जन डॉक्टर राहत होते. ते प्रथम अगदी नास्तिक होते. नूतन संस्कारामुळे ते ब्राह्मण असूनही संध्यादि नित्यकर्म करीत नसत.

एकदा या डॉक्टरांच्या एका पायाला हाडव्याव्रण झाला. ते स्वतः डॉक्टर असल्यामुळे त्यांनी निरनिराळ्या डॉक्टरांचे व वैद्यांचे पुष्कळ इलाज केले; पण गुण येईना. त्यांचा पाय आतून सडू लागला.

शेवटी सर्व तज्ज्ञ डॉक्टरांनी त्यांना असा निर्णय दिला की, पाय कापून टाकल्याशिवाय उपाय नाही. सर्व डॉक्टरांनी दिलेला हा निर्णय ऐकताच त्यांना फार वाईट वाटले. ते अगदी हताश व उदास झाले. अशा स्थितीत त्यांना त्यांच्या एका मित्राने श्रीस्वामीमहाराजांचे नांव सांगून त्यांच्याकडून दैवी उपाय करून घेण्यास सांगितले. इतर सर्व उपाय करून थकल्यामुळे डॉक्टर ताटके यांनी नास्तिकपणाचा खोटा आग्रह दूर ठेवला व ते श्रीस्वामीमहाराजांना शरण गेले. त्यावेळी ते त्यांना असे म्हणाले की, "महाराज! माझ्या पायाला हाडव्याव्रण झाला असून तो आता औषधाने कधीही बरा होणार नसल्यामुळे पाय कापून काढणे आवश्यक आहे, असा सर्व डॉक्टरांनी निर्णय दिला आहे. परन्तु आपणाला मी शरण आलो आहे. आपणच आता मला काहीतरी औषध देऊन बरे करावे, अशी माझी आपल्या चरणी विनंती आहे." डॉक्टर ताटके यांनी असे सांगताच श्रीस्वामी-महाराज त्यांना असे म्हणाले की, "तुम्ही सर्वांना औषध देणारे. तुम्हाला औषध कोणी द्यावे?" श्रीस्वामीमहाराजांच्या या उद्गारांनी डॉक्टर ताटके स्तब्ध झाले. ते त्यांना काहीच न बोलता मौन धरून राहिले; कारण त्यांना मनातून असे वाटत होते की, श्रीस्वामी-महाराजांची आपल्यावर दृष्टी पडताच आपला असाध्य रोगही बरा होईल. श्रीस्वामीमहाराज धन्वन्तरींचेही धन्वंतरी आहेत.

थोड्याच वेळात श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना एक मंत्र लिहून दिला व त्या मंत्राचा दररोज श्रद्धेने जप करावयाला सांगितले. तसेच व्रणावर पोटीस बांधावयास सांगून शिवाय काही औषधही दिले. डॉक्टर ताटके यांनी काही दिवस श्रद्धेने जप व औषधोपचार केल्यावर त्यांचा हाडव्याव्रण पूर्णपणे बरा होऊन पायही अगदी पहिल्याप्रमाणे चांगला झाला. डॉक्टर ताटके यांचा पाय न कापता तो श्रीस्वामीमहाराजांच्या कृपेने पूर्ववत् उत्तम बरा झाला हे पाहून

सर्व डॉक्टर मंडळींना कमालीचे आश्चर्य वाटले. स्वत: डॉक्टर ताटके यांना तर आपला पाय बरा झाला हा एक अभूतपूर्व चमत्कारच आहे असे वाटले व त्यांचा नास्तिकपणा पूर्णपणे गेला. श्रीस्वामी-महाराजांकडून त्यांनी सर्व ब्रह्मकर्म शिकून घेतले व पुढे ते आचार-धर्माने वागू लागले. या सर्व प्रकारामुळे ते श्रीस्वामीमहाराजांचे एकनिष्ठ सेवक बनले. श्रीस्वामीमहाराजांनी लिहिलेला श्रीदत्त-माहात्म्य हा ग्रंथ डॉक्टर ताटके यांनीच स्वत:च्या खर्चाने छापून प्रथम प्रसिद्ध केला.

श्रीस्वामीमहाराज महत्पुरात असताना कार्तिक पौर्णिमेस चंद्रग्रहण आले. तेव्हा ग्रहणाच्या दिवशी क्षिप्रेत स्नान करून मग महत्पूर सोडावे असा श्रीस्वामीमहाराजांनी विचार केला; पण श्रीदत्तप्रभूंचा विचार वेगळाच होता. त्यामुळे देवांनी त्यांना अशी आज्ञा केली की, "ग्रहणापूर्वीच महात्पूर सोडून गंगेकाठी ब्रह्मावर्ताला जावे." परन्तु देवांनी अशी आज्ञा केली; तरी आपण ग्रहणातील पर्वकालाचे स्नान येथेच क्षिप्रा नदीत करून पुढे जावे असा विचार करून आपला उद्देश पूर्ण करण्याकरिता श्रीस्वामीमहाराज देवांच्या आज्ञेकडे दुर्लक्ष करून तेथेच राहिले. वास्तविकपणे देवांची आज्ञा मोडल्यामुळे यापूर्वी अनेक वेळा श्रीस्वामीमहाराजांना कठोर देहदंड भोगावे लागले होते. त्यामुळे यावेळी देवांची आज्ञा न पाळता, स्नान करून मगच पुढे जाण्याचा विचार त्यांनी का केला ते आपल्यासारख्या सामान्य-जनांच्या बुद्धीला आकलन होणार नाही. देव आणि भक्त यांमध्ये घडलेली ही एक अतर्क्य लीला होती!

श्रीस्वामीमहाराजांची इच्छा व देवांची सिद्ध आज्ञा यांमध्ये प्रारब्ध उभे राहिले व देवांची आज्ञा प्रबल ठरली. त्यामुळे त्यांना ग्रहणाचे स्नान झालेच नाही. त्याच दिवशी रात्री श्रीस्वामीमहा-राजांना एका भयंकर विषारी नागाने दंश केला, अंगात विष

भिनल्यामुळे त्यांना प्राणांतिक वेदना होऊ लागल्या. आता याचा पुढे श्रीस्वामीमहाराजांवर काय परिणाम होतो याची काहीच कल्पना करता न आल्यामुळे सर्व मंडळी अत्यंत दुःखद मनस्थितीत होती. अशा परिस्थितीत काय करावे ते कोणालाच काही समजेना. श्रीस्वामीमहाराज तर विषावर औषध घेणे शक्य नव्हते; कारण कोणत्याही रोगावर केव्हाही औषध घेण्याची त्यांची पद्धतच नव्हती व "औषधं जान्हवी तोयं वैद्यो नारायणो हरिः।" अशी त्यांची याबावत दृढधारणा होती. त्यामुळे श्रीस्वामीमहाराज समाधी लावून बसले. समाधी अवस्थेत तीनचार तास गेले व वेदना जाणवल्या नाहीत; पण समाधीतून उत्थान झाल्यावर विषाचे वेग पुन्हा जाणवू लागले. त्याचा जोर कमी झाला नव्हता. विष काही उतरेना. औषधोपचाराशिवाय विष उतरणार कसे ? विषाचे वेग सारखे येत राहिल्यामुळे श्रीस्वामीमहाराज पुन्हा समाधी लावून बसले. अशा तऱ्हेने दोन दिवस गेले. त्यानंतर विषाची बाधा थोडीथोडी कमी होऊ लागली; पण ती पूर्णपणे गेली नाही. विषबाधेमुळे श्रीस्वामी-महाराजांचे मस्तक सुन्न आणि जड झाले होते. प्रथम त्याचे कारण काही लक्षात येईना; पण नागाने दंश केलेली जागा पाहताच तेथे त्याचा दात मोडून पायात रुतून बसलेला आढळला. तो काढून टाकताच मस्तक हलके झाले; पण महत्पूर सोडीपर्यंन्त विष पूर्णपणे उतरले नाही. अशा तऱ्हेने दहा दिवस महात्पुरातच गेले. दहाव्या दिवशी श्रीस्वामीमहाराजांनी महत्पूर सोडल्याबरोबर विष उतरून त्यांचा पाय बरा झाला. म्हणजे सर्पाचे विष महत्पूर गावाच्या सीमे-पर्यन्तच मर्यादित होते! पुढे आश्विनात सूर्यग्रहण येत होते, म्हणून श्रीस्वामीमहाराज महत्पुराहून आलोट या गावी आले. या ठिकाणी श्रीस्वामीमहाराजांनी अनादिकल्पेश्वराच्या स्तुतीपर एक स्तोत्र रचून, त्या दैवताला वंदन केले. तेथे श्रीस्वामीमहाराजांचा काही

दिवस मुक्काम झाला.

या सर्व कथेचा विचार म्हणजे हे लक्षात येते की, श्रीस्वामीमहाराजांसारख्या लोकोत्तर व अलौकिक अशा महापुरुषांनाही देवांची आज्ञा दुर्लंघ्य होती. देव आपल्या भक्ताचे जसे कोडकौतुक करतो तसे तो आपली आज्ञा पाळली नाही म्हणजे शिक्षाही करतो. अशा स्थितीत श्रीस्वामीमहाराजांनी देवांची आज्ञा पाळली नाही याचे एकच कारण असे दिसते की, देवांची आज्ञा मोडली की, अशी शिक्षा होते हेही त्यांना यावरून सर्व साधकभक्तांना दाखवून द्यावयाचे होते. यापेक्षाही या कथेचे काही अलौकिक रहस्य असेल; तर ते एक त्यांना व देवांनाच ठाऊक असले पाहिजे किंवा जो कोणी साधकभक्त श्रीस्वामीमहाराजांच्या कृपेने अप्राकृत भक्तीच्या प्रांतात प्रवेश करू शकेल तेव्हाच त्याला या लीलेचे रहस्य अंतरंग होईल.

आलोट गावी श्री. कानडकर म्हणून एक दांपत्य राहत होते. त्यांना दोन मुलगे व एक मुलगी होती. त्यांच्या घरची स्थिती अगदी मध्यम दर्जाची होती. मुलांचे जमेल तेवढे शिक्षण वडिलांनी करून घेतले होते. त्यांचा मोठा मुलगा सखाराम हुशार होता. त्याला कथा कीर्तनाची आवड होती. गावात कोठेही कथा, कीर्तन किंवा भजन असल्यास वेळ सापडेल तेव्हा तेथे जाऊन तो श्रवणाचा आनंद लुटीत असे. सखारामला गाण्याचेही थोडे अंग होते. त्याचा गळा गोड होता. प्रसंगी हरदासाबरोबर सूर धरण्याचेही भाग्य त्याला लाभत असे. पोटाचा उद्योग म्हणून कीर्तनाची कास धरावी लागेल असे त्याला वाटले नव्हते; पण विधिलिखित मात्र तसेच होते. त्याचे वडील अल्पशा आजाराने अकस्मात् मरण पावले आणि कुटुंबाच्या पालनपोषणाची जबाबदारी सखारामवर येऊन पडली. त्यावेळी त्याचे वय आठदहा वर्षांचे होते. उद्योगाचे काहीच साधन नाही व अंगी काही कलाही नाही, अशा स्थितीत कुटुंबाचे पोट कसे

भरावयाचे हा प्रश्न त्याच्यासमोर उभा राहिला. गावात येणाऱ्या कीर्तनकारांबरोबर सूर धरून त्या पोटी मिळणाऱ्या बिदागीवर तो कुटुंबाचे पालनपोषण करू लागला. ती बिदागी ती कितीशी असणार? पुष्कळदा सर्वांवर अर्धपोटी राहावयाची पाळी येत असे. शेवटी स्वतःच कीर्तन करावयाचा निर्णय सखारामने घेतला. आत्ता-पर्यंत त्याने जी कीर्तने ऐकली होती त्यांमधील कीर्तनकारांच्या लकबी व कथाप्रसंग हाताळण्याची पद्धत या गोष्टींचे सखारामने निरीक्षण केले होते. त्याचा त्याला यावेळी उपयोग झाला. मुळात त्याचा गळा गोड होता, त्याला संगीताची जाण होती आणि या व्यवसायात आपण यशस्वी व्हावे अशी त्याची आत्यंतिक इच्छा होती; कारण यात अपयश आले तर उपासमार होईल याची त्याला खात्री होती. त्यामुळे कालौघात त्याने केलेली कीर्तने लोकांना आवडू लागली व कीर्तनकार म्हणून तो लोकांच्या पसंतीला उतरला. त्याचे उत्पन्न वाढले आणि कुटुंबाला दोन वेळा पोटभर अन्न मिळू लागले.

असूया सर्वच क्षेत्रात आहे. येथेही ती होतीच. सखाराम कानड-कराच्या कीर्तनातील यश त्याच्या शत्रूंना सहन झाले नाही. त्यांनी त्याला एकदा प्रसंग पाहून पाण्यातून शेंदूर पाजला. त्यामुळे त्याचा गळा गेला व आवाज बसला. त्यामुळे कुटुंबपोषणाचे एकमेव साधन बंद पडले आणि दारिद्र्यामुळे पुन्हा प्रपंचाची फारच ओढाताण होऊ लागली. या परिस्थितीत काय करावे ते सखारामला सुचेना. आत्महत्येचे विचार त्याच्या मनात येऊ लागले. यावेळी श्रीस्वामी-महाराजांचा मुक्काम महत्पूरला होता. श्रीस्वामीमहाराज धन्वंतरी आहेत, ते ईश्वराचे अवतार आहेत व त्यांच्या कृपेने सर्व प्रकारच्या आधिव्याधी नष्ट होतात, अशी त्यांची कीर्ती सगळीकडे पसरली होती. सखारामच्याही कानी ही कीर्ती आली व त्याने महत्पूरला

जावयाचे ठरविले. महत्पूरला आल्यावर श्रीस्वामीमहाराजांना साष्टांग नमस्कार घालून त्याने अत्यंत दीनपणे आपली दुरवस्था त्यांना निवेदन करून एकंदर सर्व कहाणी सांगितली आणि यावर काहीतरी उपाय सांगून यातून आपली सुटका करावी व जीवन मार्गी लावावे म्हणून प्रार्थना केली. त्याची सर्व हकीकत ऐकल्यावर श्रीस्वामीमहाराज त्याला असे म्हणाले की, "तुझा गळा पूर्ण बरा व्हावयाला चार महिने लागतील. जर तू येथे चार महिने आपणाजवळ राहिलास तर तुझी इच्छा पूर्ण होईल." श्रीस्वामीमहाराजांनी त्याला असे सांगताच तो त्यांना असे म्हणाला की, "चार महिने येथे राहून आईच्या व भावंडांच्या पोटाचा प्रश्न कसा सोडवू? त्यांच्या जवळ असल्यास काबाडकष्ट करून प्रपंचाची काहीतरी अडचण दूर करता येईल. मला आपल्याजवळ इतक्या दिवस राहता येईल असे वाटत नाही."

त्याची ती आर्तता आणि दयनीय अवस्था पाहून दीनांचे कैवारी श्रीस्वामीमहाराज कळवळले व ते त्याला असे म्हणाले की, "काही हरकत नाही. तू आलोटला परत जा. आमचे तिकडे येणे होणार आहेच. त्यावेळी तुझ्या गळ्यावर इलाज करू. येत्या आश्विन वद्य अमावास्येला सूर्यग्रहण येते. त्यापूर्वी तेथे येऊन भेट म्हणजे तुझे कार्य होईल."

महत्पुराहून आलोटला आल्यावर श्रीस्वामीमहाराजांचा मुक्काम क्षिप्रा चर्मण्वती संगमाजवळ होता. सखाराम त्यांची वाट पाहताच होता. ते आल्याचे कळताच तो त्यांच्या दर्शनाला गेला. श्रीस्वामीमहाराजांनी एका वनस्पतीचा रस त्याला पिण्यास दिला व त्याच रसाने एक मंत्र त्याच्या जिभेवर लिहून ग्रहणकाळी क्षिप्रा चर्मण्वती संगमात पाण्यात उभे राहून त्या मंत्राचा जप त्याला करण्यास सांगितले. श्रीस्वामीमहाराजांच्या आज्ञेप्रमाणे सखारामने ग्रहण

लागल्यापासून ते सुटेपर्यंन्त पाण्यात उभे राहून एकनिष्ठेने जप केला. आश्चर्याची गोष्ट अशी आहे की, जसेजसे सूर्याला लागलेले ग्रहण सुटू लागले तसेतसे सखारामच्या गळयाला लागलेले ग्रहणही सुटू लागले. मंत्रजप करता करता त्याचा आवाज सुटू लागला. ग्रहण संपले आणि त्याचा आवाज पूर्ववत् झाला. ओलेत्यानेच धावत जाऊन त्याने श्रीस्वामीमहाराजांपुढे लोटांगण घातले. त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांनी त्याच्याकडे अत्यंत प्रेमार्द्र दृष्टीने पाहून त्याला आशीर्वाद दिला व ते त्याला असे म्हणाले की, " तुझे काम झाले आहे. आता तू जा." श्रीस्वामीमहाराजांनी असे सांगताच तो त्यांना वंदन करून आपल्या घरी निघून गेला.

सखाराम आता पूर्वीप्रमाणे कीर्तन करू लागला. एवढया लवकर त्याचा गळा बरा झाला यावर लोकांचा विश्वास बसेना. त्याचा आवाज पूर्ववत् उत्तम झाला. एवढेच नव्हे; तर पूर्वीपेक्षा अधिक सुरेल झाला व त्याची बुद्धी अधिक तीव्र झाली. श्रीस्वामीमहाराजांनी आपल्या पवित्र हातांनी त्याच्या जिभेवर मंत्र लिहिला होता व औषध दिले होते. त्याचाच हा अपूर्व परिणाम होता. त्याने आपले पहिले कीर्तन श्रीस्वामीमहाराजांवरच केले. डोळयात आसवे आणून त्याने श्रीस्वामीमहाराजांचा महिमा श्रोत्यांसमोर गायिला. पुढे त्याचा कीर्तनव्यवसाय उत्तमप्रकारे चालला व त्यास पुष्कळ पैसा मिळाला. कालौघात सखाराम कानडकर कीर्तनाचार्य श्री. सखारामपंत कानडकर म्हणून प्रसिद्धीस आले.

आलोटहून श्रीस्वामीमहाराज सारंगपूरला जावयाला निघाले. आलोटच्या लोकांनी साश्रूनयनांनी त्यांना निरोप दिला. मार्गशीर्ष महिन्यात ते सारंगपूरला येऊन पोहोचले. सारंगपूरचा श्रीस्वामीमहाराजांचा हा दुसरा मुक्काम होता. पहिल्या वेळी त्यांनी श्री. केशवराव भट यांचा उद्धार केला होता. सारंगपूरचे लोक श्रीस्वामी-

महाराजांना विसरणे शक्य नव्हते. त्यांच्या आगमनाने तेथील लोकांना फार आनंद झाला.

श्रीस्वामीमहाराजांजवळ जे लोक योगाभ्यास शिकण्यासाठी येऊन राहिले होते त्यांमध्ये श्री. गांडाबुवा, श्री. आप्पा निगडीकर, श्री. व्यंकटराव स्टेशनमास्तर इत्यादि मंडळी होती. श्री. व्यंकटराव स्टेशनमास्तर हे कोटेश्वराहून चिखलद्यास येऊन राहिले होते. येथेच त्यांची व श्रीस्वामीमहाराजांची प्रथम भेट झाली होती. श्री. व्यंकटराव यांनी श्री. कृष्णाबुवा तोडीवाले यांच्याकडून श्रीरामदासी मंत्राचा उपदेश घेतला होता. योगाभ्यासामुळे श्रीरामाचे ध्यान करणे अधिक चांगले जमेल असा विचार करून त्यांनी श्रीस्वामीमहाराजांकडे योग शिकण्याची इच्छा व्यक्त केली; पण ते योगाभ्यास शिकावयाला अनधिकारी असल्यामुळे श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना योग शिकण्यास संमती दिली नाही. शेवटी श्रीस्वामीमहाराजांकडून योगाभ्यास शिकण्याची संमती मिळेपर्यन्त अन्नग्रहण करणार नाही असा श्री. व्यंकटरावांनी निश्चय केला. त्यांची निष्ठा पाहून श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना योग शिकविला. श्री. व्यंकटराव जेवणात मीठ खात नसत.

वर उल्लेख केलेल्या तिघांनाही खेचरी मुद्रेचा अभ्यास सांगावयाचा होता. श्रीस्वामीमहाराजांच्या लेखी या मुद्रेचे माहात्म्य अपार असल्यामुळे त्यांनी अनेकांना ही मुद्रा शिकविल्याचे दिसून येते. या दृष्टीने श्रीस्वात्माराम योगींद्र यांनी लिहिलेल्या "हठयोगप्रदीपिका" या ग्रंथातील खेचरी मुद्रेची माहिती पाहिली; तर ती यत्किंचितही अनाठायी ठरणार नाही. ही माहिती सांगताना ते असे म्हणतात की—

"जीभ उलटी करून जेव्हा ती कपाळाच्या मध्य छिद्रामध्ये प्रविष्ट केली जाते आणि भ्रूमध्यांतर्गत भ्रूमध्यात जेव्हा दृष्टीचा

प्रवेश होतो तेव्हा खेचरीमुद्रा होते. छेदन, चालन व दोहन या तीन क्रियांच्या द्वारा जिभेच्या खालील असलेल्या पडद्यासारख्या नाडीचे छेदन करावे लागते. जीभ ज्या ठिकाणी खालच्या बाजूला जवड्याला जोडलेली असते त्या ठिकाणच्या नाडीचा शस्त्राने छेद घेणे याला छेदन म्हणतात. अंगठा व तर्जनी या बोटांमध्ये जीभ धरून ती दातावर घासत डाव्या-उजव्या बाजूस हलवून त्या शिरेचा छेद करणे याला चालन म्हणतात व वरील प्रमाणेच बोटांमध्ये जीभ धरून गाईची धार काढल्याप्रमाणे जीभ हलवून लांब करणे याला दोहन म्हणतात. अशा प्रकारे जोपर्यन्त जीभ भ्रुकुटीच्या मध्यभागी स्पर्श करीत नाही तोपर्यन्त ती लांब केली पाहिजे. ज्यावेळी जीभ भृकुटीमध्याला स्पर्श करील त्यावेळी खेचरीमुद्रा सिद्ध होते. या खेचरीमुद्रेमुळे योगीसाधकाला धातूंची विषमतारूप व्याधी, वृद्धावस्था, सर्प-विंचू यांचे विष, रोग, मरण, अंतःकरणाचो तमोगुणरूपी तंद्रा, निद्रा, क्षुधा, तृषा, चित्ताची तमोगुण अवस्थारूप मूर्च्छा, कर्मलिप्तता इत्यादि कोणत्याही गोष्टींची बाधा होत नाही व त्याच्या देशकालवस्तुपरिच्छेदाचा बाध होतो."

खेचरी मुद्रेकरता जिव्हाशिरच्छेदन शस्त्राने करणे हा अत्यंत कौशल्याचा व काळजीपूर्वक करण्याचा प्रयोग आहे. जरा कोठे चूक होऊन भलत्याच एखाद्या मोठ्या शिरेला धक्का लागून ती शीर कापली जाऊन रक्तस्राव होऊ लागला; तर प्राणावर प्रसंग तरी यावयाचा नाही तर वाचा तरी जावयाची. श्री. गांडाबुवांना श्रीस्वामीमहाराजांनी महत्पुराहूनच डॉ. ताटके यांच्याकडे गुणाछावणीला शस्त्राने जिव्हाशिरच्छेदन करण्यासाठी पाठविले होते. श्री.गांडाबुवांचे जिव्हाशिरच्छेदन उत्तम रीतीने पार पडले होते.ते महत्पूरला परत आल्यावर श्रीस्वामीमहाराजांनी श्री. आप्पा निगडीकर आणि श्री. व्यंकटराव स्टेशनमास्तर या दोघांना सारंगपूरहून डॉ.ताटके यांच्याकडे पाठविले

या दोघांच्याही जिभेच्या खालील आवश्यक ती शीर कापण्याचे काम चालू असताना दुसरीच मोठी शीर तुटली. त्यामुळे भयंकर रक्तस्राव होऊ लागला. डॉ. ताटके यांनी त्यांचा रक्तस्राव थांबविण्यासाठी कसून प्रयत्न केला; पण काही केल्या तो थांबेना. दोघांचीही शुद्ध हरपू लागली. पुढील गंभीर परिणामांची कल्पना असल्यामुळे डॉ. ताटके यांना अतिशय भीती वाटली व त्यांनी घडलेली सर्व हकीकत श्रीस्वामीमहाराजांना सारंगपूरला तारेने कळविली. सारंगपूर ते गुणाछावणी हे अंतर चाळीस कोसांचे आहे. श्रीस्वामीमहाराज ताबडतोब सारंगपूरहून निघाले व दुसऱ्या दिवशी गुणाछावणीला येऊन पोहोचले. त्यांनी स्वत: एकदा दोघांच्याही जिभेची स्थिती कशी काय आहे ते पाहिले व त्यावर गंगावती नावाची एक वनस्पती वाटून लावली. त्याबरोबर थोड्याच वेळात रक्तस्राव थांबून दोघेही सावध झाले. यामुळे श्रीस्वामीमहाराजांचे औषधीज्ञान व अद्‌भुत सामर्थ्य पाहून डॉ. ताटके यांना कमालीचे आश्चर्य वाटले व त्यांची श्रीस्वामीमहाराजांवरील श्रद्धा अधिकच बळकट झाली.

अशा प्रकारे श्री. व्यंकटराव व श्री. निगडीकर यांच्या जिभेच्या खालील शिरेचा छेद करण्याचे काम पार बिघडून गेले. एका अर्थाने या दोघांचा खेचरीचा योग नव्हता असेच म्हणावे लागेल. श्री. व्यंकट-रावांच्या जिभेखाली मासाचा गोळा वाढला व श्री. निगडीकरांची शीर बरोबर तुटली नव्हती. त्यामुळे खेचरीमुद्रा सिद्ध करावयाला दोघेही अपात्र ठरले होते. पुढे या दोघांनी जरी खेचरीमुद्रेचा अभ्यास केला; तरी त्याचा त्यांना काहीही उपयोग झाला नाही. त्यानंतर ‘तुम्ही दोघांनीही यापुढे खेचरीमुद्रेचा अभ्यास करू नये. तुम्हाला अशक्तपणा आलेला आहे. तेव्हा हवा मानवेल अशा ठिकाणी तुम्ही जाऊन राहा. यापुढे आपणाबरोबर येण्याचे आता कारण नाही.” असे श्रीस्वामीमहाराजांनी त्या दोघांना सांगितले; पण त्या दोघांनाही

श्रीस्वामीमहाराजांच्या संगतीचा मोह टाळता येईना. श्रीस्वामी-महाराजांची आज्ञा मोडून ते त्यांच्या बरोबर ब्रह्मावर्ताला जावयाला निघाले. श्री. गांडाबुवा मात्र श्रीस्वामीमहाराजांच्या आज्ञेप्रमाणे योगाभ्यास करण्यासाठी भडोचला निघून गेले.

या मुक्कामात सावंतवाडीहून श्रीस्वामीमहाराजांच्या पूर्वाश्रमा-तील साधकाचे पत्र आले होते. त्यामध्ये त्यांनी श्रीस्वामीमहाराजांना "इकडील भागात आपले येणे कधी होईल" अशी पृच्छा केली होती. त्यांच्या पत्राला श्रीस्वामीमहाराजांनी जे उत्तर पाठविले आहे, ते अत्यंत नमुनेदार असून मननीय असे आहे. त्या पत्रात त्यांनी असे लिहिले आहे की, "पौष वद्य ३०—नारायण. हा देह तिकडे येण्याची इत्यादि इच्छा करणेची गरज नाहीं. क्षणभंगुर, नश्वर देहापेक्षां यशःकाय कायम राहणार नाहीं काय ? (जयति ते सुकृतिनो रस-सिद्धाः कवीश्वराः। नास्ति येषां यशःकाये जरामरणजं भयम्) जरी यशःकायानें शंकासमाधान भाषणादिक कसें घडेल ? म्हणणें, तर प्राकृत लोकांकरितां भक्तिज्ञान रसभरित दत्तमाहात्म्य प्रसिद्ध झालें आहे. शिवाय संस्कृत प्राकृत अनेक ग्रंथांची प्रसिद्धी झाली. तेणें शंका-समाधान होईल. नारायण."

श्रीस्वामीमहाराजांनी अशा प्रकारचे पत्र लिहून आपण आत्म-स्वरूपाने सर्वत्र समव्याप्त असून देहाच्या इकडे तिकडे येण्या-जाण्याला काहीही महत्व नाही हे दाखवून दिले असून "मरावे परी कीर्तिरूपे उरावे ॥" हा श्रीसमर्थरामदासस्वामींचाच अमर सिद्धान्त पटवून दिला आहे.

सारंगपूराहून श्रीस्वामीमहाराज क्षेत्रावतीच्या तीरावर भेलसा या ठिकाणी येऊन काही दिवस राहिले. या गावी श्री. गोविंदराव पंडित यांना श्रीस्वामीमहाराजांनी योगाभ्यासाचे शिक्षण दिले श्रीस्वामीमहाराजांच्या संन्यास परंपरेचा वारसा प. प. श्रीनृसिंह

सरस्वतीदीक्षितस्वामीमहाराज यांच्याकडे गेला तसा योगाभ्यासातील त्यांचा वारसा गुरुभक्त श्री. गोविंदराव पंडित यांच्याकडे गेला असे मानले जाते.

श्रीस्वामीमहाराजांचा पुढील मुक्काम जालवण या गावी झाला. श्रीस्वामीमहाराजांचा जालवणचा हा दुसरा मुक्काम होता. यावेळी श्रीस्वामीमहाराज सरकारी देवळात उतरले होते. त्यांच्या सोबत श्री आप्पा निगडीकर व श्री. व्यंकटराव स्टेशन मास्तर होते. या ठिकाणी पेशव्यांचे अधिकारी गोविंदपंत बुंदेले (खेर) हे राहत असत या ठिकाणी श्रीस्वामीमहाराजांचा चार महिने मुक्काम झाला. जालवण येथे गावातील लोकांमध्ये वैमनस्य येऊन दोन तट तडले होते. श्रीस्वामीमहाराजांना ही गोष्ट आवडली नाही; कारण अशा तऱ्हेच्या दुफळीने व्यक्तीची व समाजाची प्रगती खुंटते. लोकांतील ग्रामण्य नष्ट करून त्यांची पूर्ववत् एकी करण्याचे श्रीस्वामीमहाराजांनी ठरविले. तशी संधी त्यांना लवकरच प्राप्त झाली.

येथील काही वयोवृद्ध विद्वान् मंडळींना अरणे व उपनिषदे म्हणावयाची होती; पण आजपर्यन्त योग्य अधिकारी व्यक्ती न मिळाल्यामुळे त्यांची ही इच्छा अपुरीच राहिली होती. श्रीस्वामीमहाराजांसारखी अधिकारी व्यक्ती जालवणाला आल्यामुळे सर्व मंडळींना फार आनंद झाला. एवढ्या दिवसांची आपली इच्छा पूर्ण होण्याचा योग आला असे सर्वांना वाटले. त्यामुळे सर्वांनी श्रीस्वामीमहाराजांना अशी विनंती केली की, काही दिवस जालवणला राहून त्यांनी लोकांना अरणे व उपनिषदे सांगावी.

लोकांनी हे सांगताच त्यांच्यातील भांडणे मिटविण्यास ही संधी उत्तम आहे असे पाहून श्रीस्वामीमहाराजांनी स्पष्ट शब्दात त्या सर्वांना असे सांगितले की, "तुम्ही दोन्ही पक्षांच्या मंडळींनी मनातील वैरभाव टाकून जर एकी केली तरच आम्ही येथे राहू.

आधी आपापसातील तंटे मिटवा; मगच अरणे शिकण्याची गोष्ट करा. तुमचे सर्वांचे एकमत होत असेल आणि ग्रामण्य मोडत असेल तरच राहणे व शिकविणे होईल."

श्रीस्वामीमहाराजांचे हे स्पष्ट मत पाहून शेवटी गावातील सर्व मंडळींनी एकत्र जमून गावातील वाद कायमचा मिटविण्याचे ठरविले. जर आपल्या गावातील हा तंटा मिटला नाही तर आपण श्रीगुरुमहाराजांच्या सहवासाला मुकणार आणि उपनिषदे व अरणे ही शिकावयास मिळणार नाहीत, असा विचार करून श्रीस्वामी-महाराजांचे शिष्य श्री. बाळासाहेब जोशी यांनी या बाबतीमध्ये पुढाकार घ्यावयाचे ठरविले. श्रीदत्तजयंतीच्या दुसऱ्या दिवशी श्री. बाळासाहेब जोशी यांनी स्वखर्चाने आपल्या घरी पारणे करावयाचे ठरविले व गावातील सर्व लोकांना भोजनाचे आमंत्रण दिले. या प्रसंगी सर्वांची एकवाक्यता होऊन बरेच दिवसांची गावातील दुफळी मोडली व लोकांना श्रीस्वामीमहाराजांच्या मुखातून अरणे व उप-निषदे ऐकण्याचे भाग्य लाभले. श्रीस्वामीमहाराजांच्या रूपाने प्रत्यक्ष भगवान् श्रीदत्तमहाराजच बोलत आहेत असे लोकांना वाटले. येथे श्रीस्वामीमहाराजांची बरीच भक्त मंडळी होती. यावेळी सर्वांनी श्रीस्वामीमहाराजांकडून अनुग्रह व श्रीदत्तोपासना घेतली. हल्ली येथील मंडळी दरवर्षी श्रीगुरुद्वादशीला व श्रीदत्तजयंतीला पादुकांचे पूजन करून चांगला उत्सव करतात. जालवणहून श्रीस्वामीमहाराज चैत्र महिन्यामध्ये ब्रह्मावर्ताला जाण्यासाठी निघाले. यावेळी श्री. आप्पा निगडीकर व श्री. व्यकंटराव यांना श्रीस्वामीमहाराजांची आज्ञा नसतानाही ते त्यांच्याबरोबर प्रवासास जाण्यास निघाले होते.

**अनन्तकोटी ब्रह्माण्डनायक श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य भगवान् श्रीवासुदेवानन्दसरस्वती श्रीदत्तात्रेयस्वामीमहाराज यांचा**

अखण्ड जयजयकार असो. ज्याप्रमाणे श्रीमत् गुरुचरित्र ग्रंथात श्रीमन्नृसिंहसरस्वतीस्वामीमहाराज यांची सायंदेवाच्या मुखातून स्तुती करताना श्रीसरस्वती गंगाधर यांनी "तूं त्रैमूर्तींचा अवतार। अज्ञानदृष्टी दिससी नर। वर्णावया न दिसे पार। तुझी महिमा स्वामिया ॥ ४२.१६१ ॥ तुझी महिमा वर्णावयासी। शक्ति कैंची आम्हांसी। आदिपुरुष भेटलासी। कृपानिधि स्वामिया ॥ ६२ ॥ जैसा चंद्र चकोरासी। उदय होतां संतोष त्यासी। तैसा आनंद आम्हांसी। तुझे चरण लक्षितां ॥ ६३ ॥ पूर्वजन्मीं पापराशी। केल्या होत्या बहुवशी। श्रीगुरूचें दर्शनासी। पुनित झालों म्हणतसे ॥ ६४ ॥ जैसा चिंतामणिस्पर्शी। हेमत्व होय लोहासी। मृत्तिका पडता जंबूनदीसी। उत्तम सुवर्ण होतसे ॥ ६५ ॥ जातां मानस-सरोवरासी। हंसत्व येई वायसासी। तैसे तुझें दर्शनेसी। पुनित झालों स्वामियां ॥ ६६ ॥" असे म्हणून आपल्या श्रीसद्गुरूंचा जो अपरंपार महिमा गाईला आहे, त्याप्रमाणेच श्रीस्वामीमहाराजांचे परमभक्त व त्यांचे धाकटे बंधू परमपूजनीय श्रीसीतारामहाराज यांनी आपल्या श्रीसद्गुरुनाथांचा जो अलौकिक, अद्वितीय व अपरंपार महिमा गाईला आहे, तो त्यांच्या शब्दात तसाच श्रीस्वामीमहाराजांच्या चरणी प्रस्तुत करून आपण सर्वजण त्यांच्या परमपवित्र व परमकोमलचरणी कृपाशीर्वादासाठी अत्यंत शरणागतिपूर्वक प्रार्थना करू.

## — अभंग —

तुझा वास जेथें असे निरंतर। यमही किंकर होई त्याचा ॥ १ ॥
अष्टसिद्धि दासी होऊनि राहाती। योगियांचीं गती नाहीं जेथें ॥२॥
कामादि षड्वैरी पळोनियां जाती। आशा तृष्णा मरती भिवोनियां ॥
ऐसा महिमा सद्गुरुकृपेचा। अनुभव त्याचा सीतारामा ॥ ४ ॥

# – अध्याय अकरावा –

पापं तापं व्याधिमाधिं च दैन्यं।
भीतिं क्लेशं त्वं हराऽशुत्वदन्यम्।
त्रातारं नो वीक्ष ईशास्तजूर्ते।
घोरात्कष्टादुद्धरास्मान्नमस्ते ॥

**चातुर्मास बारावा– शके १८२४–इ. स. १९०२–ब्रह्मावर्त:–**

श्रीस्वामीमहाराज जालवणहून निघाल्यावर चैत्र शुद्ध १३ ला दुपारच्या वेळी श्रीक्षेत्र ब्रह्मावर्त येथे येऊन पोहोचले. श्री. आप्पा निगडकर व श्री. व्यंकटराव हे दोघे, येताना प्रवासात बरोबर होतेच. यावेळी गावातील पूर्वीचीच परिचित मंडळी, तसेच सर्वश्री फाटक, रिसबूड, पटवर्धन व खाडिलकर वगैरे शिष्यमंडळी श्रीस्वामी-महाराजांच्या स्वागतासाठी घाटावर जमली होती. श्रीस्वामी-महाराजांची ब्रह्मावर्ताला येण्याची ही तिसरी खेप होती. यावेळी त्यांचा या ठिकाणी अडीच वर्षे मुक्काम झाला. त्यामुळे येथे लागोपाठ बारावा, तेरावा व चौदावा असे तीन चातुर्मास झाले. याही वेळी श्रीस्वामीमहाराज श्री. अंताजीपंतांच्या घाटावरील श्रीराम-मंदिरातच राहिले होते. गावात दुसरेही एक श्रीराममंदिर असून ते ब्रह्मावर्ताचे इनामदार श्री. सुभेदार या कण्वशाखीय ब्राह्मण गृहस्थांच्या मालकीचे होते. श्री. अंताजीपंतांच्या श्रीराममंदिराची रचना घरासारखी होती. त्यांत दोन खोल्या व मध्ये सोपा होता. सध्या हे श्रीराममंदिर जीर्ण झाले आहे.

ब्रह्मावर्त या पुराणप्रसिद्ध क्षेत्राबद्दल व पापक्षालिनी श्रीगंगे-बद्दल देवांना एवढी आवड होती की, त्यांनी स्वामीमहाराजांना पुन्हा तेथे जाण्याची आज्ञा केली आणि अडीच वर्षे या पावन ठिकाणी राहून लोकोद्धाराचे कार्य करावयाला लावले. श्रीस्वामीमहाराजांना

ब्रह्मावर्त काय किंवा कोणत्याही नदीवरील इतर कोणतेही गाव काय सर्व सारखेच होते. त्यांनी कदाचित् भिक्षेची सोय आहे किंवा नाही एवढेच पाहिले असते. त्यांचा सर्व संचार देवांच्या आज्ञेने झाला. एखाद्या ठिकाणी मुक्काम करणे किंवा ते ठिकाण सोडणे हे सुद्धा देवांच्याच आज्ञेने होत असे. त्यामुळे हा तिसऱ्या वेळचा ब्रह्मावर्तामधील अडीच वर्षांचा मुक्काम ही देवांचीच आवड असावी. श्रीस्वामीमहाराजांच्या कीर्तीची दुंदुभी काशीक्षेत्रापर्यन्त पसरली होती. तेथील विद्वान् मंडळी श्रीस्वामीमहाराजांना काशीला येण्यासाठी आग्रहाने आमंत्रणे देत असतानाही श्रीस्वामीमहाराजांनी ती नाकारली; कारण ब्रह्मावर्त सोडण्यास देवांची आज्ञा झाली नव्हती.

श्रीस्वामीमहाराज आले असे समजल्याबरोबर ब्रह्मावर्तातील पूर्वीची सर्व मंडळी त्यांच्या दर्शनासाठी धावून आली. कुशल प्रश्न वगैरे झाल्यावर त्यांनी सर्वांना असे सांगितले की, "आजपासून अध्ययन सुरू होईल. तरी दुपारपासून सर्वांनी यावे." आपल्या इच्छित कार्याच्या सिद्धीसाठी "विरंग जाऊ नेदी क्षण" या श्रीसमर्थरामदासस्वामीमहाराजांनी सांगितलेल्या न्यायानेच त्यांनी हे सर्वांना सांगितले, यात शंकाच नाही. ते विश्रांती आदि कोणत्याच कामासाठी एक क्षणभरही थांबण्यास तयार नव्हते. त्यामुळे नेहमीप्रमाणे ब्रह्मावर्त येथील अडीच वर्षांच्या मुक्कामातही श्रीस्वामीमहाराजांनी आपल्या देहाची यत्किंचितही पर्वा केली नाही. खरे पाहता उभ्या आयुष्यात त्यांनी आपल्या देहाची आसक्ती बाळगली नाही आणि त्याची कधी पर्वाच केली नाही; कारण लोकांना सदाचार, भक्ती, आचारनिष्ठा, निष्काम कर्मयोग इत्यादि सर्वांची शिकवण देऊन व सर्व भारतवर्षात पायी हिंडून, वर्णाश्रमधर्माची अर्थात् सनातन वैदिक धर्माची पुन्हा नीट घडी बसविण्यासाठीच श्रीदत्तप्रभूंनी त्यांच्या रूपाने अवतार धारण केला होता.

वरीलप्रमाणे लोकांना अध्ययनासाठी येण्यास सांगून श्रीस्वामी-महाराज श्रीगंगेवरून स्नान करून परत आले. नंतर आपले नित्यकर्मं आटोपून ते भिक्षेला गेले. त्यांनी तीन घरची भिक्षा आणून ती सेवन केली. इतके होईतोपर्यंन्त अध्ययनाकरिता मंडळी उपस्थित झाली. याप्रमाणे रोजचा कार्यंक्रम सुरू झाला.

श्रीस्वामीमहाराज दररोज ज्याच्या त्याच्या आवडीप्रमाणे व योग्यतेप्रमाणे उपनिषदे, गीताभाष्य, पंचदशी, जीवन्मुक्तिविवेक, मनुस्मृती, याज्ञवल्क्यस्मृती इत्यादि विविध ग्रंथांचे अध्यापन करीत असत. वैदिक मंडळींना ते पदे, सर्वानुक्रम वगैरे शिकवीत असत. मुलांना संध्यादि ब्रह्मकर्मं व काही काव्य असे ते शिकवीत असत.

बाह्यात्कारी वरील सर्व व्यवहार करीत असताना श्रीस्वामी-महाराजांची अंतर्वृत्ती सदासर्वदा परमेश्वरस्वरूपी लीन झालेली असे. ते एकदा मुलांना समासचक्र सांगत होते. " कृष्णश्वासौ सर्पश्च कृष्ण सर्पः " हा विग्रह मुलांना सांगत असताना ते एकदम समाधी अवस्थेमध्ये गेले. परमेश्वराचे ध्यान त्यांच्या वृत्तीत एवढे भिनले होते की, नुसत्या " कृष्ण " या शब्दोच्चाराबरोबर त्यांच्या अंतः-चक्षूंसमोर भगवान् श्रीकृष्णाची मूर्ती उभी राहिली आणि त्या मूर्तीच्या दर्शनसुखात ते समाधिलीन झाले.

या मुक्कामात श्रीस्वामीमहाराजांना भेटावयाला श्री. गणेशपंत सातवळेकर ब्रह्मावर्ताला गेले होते. त्यावेळी त्यांना असे दिसून आले की, श्रीराममंदिरांत एका धातूच्या पेटीवर देवाच्या मूर्ती ठेवल्या असून श्रीस्वामीमहाराजांजवळील श्रीदत्तमूर्तीसुद्धा तेथेंच ठेवलेली होती. मूर्तीची पूजा, अर्चा वगैरे झालेली होती; पण तिकडील पद्धतीप्रमाणे मूर्तीवर फुले वगैरे वाहिलेली नव्हती.

श्रीस्वामीमहाराजांना विश्रांती ठाऊक नव्हती. रात्री थोडा वेळ तें निद्रा घेत. एवढीच त्यांची विश्रांती होती. ती सुद्धा तीन ते चार

तासाहून अधिक नसे. बाकी सर्व वेळ नित्यकर्म व अध्यापन यातच जात असे. या अध्यापनाच्या वेळी श्रीस्वामीमहाराज जे विषय हाताळीत ते पाहता त्यांच्या ज्ञानाची आणि धारणाशक्तीची सामान्य माणसाला साधारण कल्पना करता येईल असे वाटते. वर उल्लेख केलेल्या विषयांशिवाय योग, ज्योतिष, वैद्यक, वनस्पती, विज्ञान वगैरे विषयही ते सांगत असत. शिवाय रोगी मंडळींना औषध देणे व पिशाच्च बाधा, रोगपीडा वगैरेंच्या निवारण्यासाठी यंत्र, तंत्र, मंत्र वगैरे उपचार करणे हे नित्याचेच होते. औषध देण्यासाठी जो खर्च येत असे तो श्री. व्यंकटराव व इतर मंडळी करीत असत. लोकांना त्यांच्या कार्यसिद्धीसाठी मंत्र, तंत्र इत्यादि सांगून त्यांच्याकडून त्यांचे ते अनुष्ठानही करवून घेत. शकुन, प्रश्न-पत्रिका इत्यादि गोष्टी पाहण्याचे कामसुद्धा अधूनमधून चालत असे. शिवाय तिसरे प्रहरी श्रीमद्भागवताच्या एकादश स्कंधावर पुराण होत असे. यावेळी आपणास विषयाचे आकलन नीट व्हावे, म्हणून पुराण श्रवणास येणाऱ्या मंडळींपैकी पाच सहाजण पोथ्या घेऊन येत असत. भक्तांकडून आलेल्या पत्रांना श्रीस्वामीमहाराज संध्या-काळी स्वतः उत्तरे लिहीत असत. अशा तऱ्हेने श्रीस्वामीमहाराजांचे लोकोद्धाराचे कार्य चालले होते. कोणत्याही कामाचा त्यांनी कधीही कंटाळा केला नाही. लोकांमध्ये भक्ती, ज्ञान आणि वैराग्य या गुणांची वाढ व्हावी व जनसामान्य परमार्थाकडे वळून समाजात सत्त्ववृद्धी व्हावी या हेतूनेच श्रीस्वामीमहाराज हे कार्य अव्याहत करीत होते.

हे सर्व करीत असताना एकीकडे ते आपला देहभोगही भोगीत होते. उत्तरेकडून द्वारकेकडे जाताना, गुजराथ प्रांतामध्ये भिक्षा न मिळाल्यामुळे महिन्याहून अधिक काळ त्यांना जवळजवळ उपासच करावा लागला होता. मात्र या काळात काही गुजराथी ब्राह्मण

मंडळींनी दिलेला खजूर, खारिक व सुके खोबरे खाऊन त्यांना देहधारणा करावी लागली. वरील आहारावर पाणी प्याल्यामुळे पूर्वाश्रमापासून असलेला त्यांचा संग्रहणीचा विकार बळावला. यासंबंधी श्रीस्वामीमहाराजांनी स्वतःच एका पत्रात खालील उल्लेख केला आहे. ते पत्र असे आहे.

"ब्रह्मावर्त, पौष शु।। २, शके १८२४. नारायण. द्वारकेस जाते वेळीं रस्त्यांत ३३ दिवस भिक्षा न झाली व कोठें कोठें कोणी खजूर खोबरें दिलें. त्या सेवनानें कांहीं दिवस रक्त पडून संग्रहणीवर आज तीन वर्षें पल्ला पोचला व पाणी प्याल्यावर जास्त उपद्रव. हें जाणून ताकावर तीन वर्षें घालविलीं. गेल्या ज्येष्ठ शु. द्वादशीस पाणी पिण्यांत आल्यानें जास्तीच उपद्रव जाहला व त्याचा प्रतिकार करण्याची मुळीच इच्छा नाहीं. कारण (भोगादेव क्षयः कार्योनान्य-थारब्ध कर्मणः) मग उगीच तन्निमित्तक विचार कशास करावा ? देहबुद्धीनेंही कदाचित् पाहिलें तरी ही 'क्षुधव्याधिश्वचिकित्स्यतां प्रतिदिनं भिक्षौषधं भुज्यताम्' या परता दुसरा विचार करावयास नकोच. कदाचित् कोणी म्हणेल कीं शरीर कष्टानें ईश्वराचें भजन तरी कसें घडेल ? तर स्वल्पोपद्रवानें भजनाला आज अडथळा येईल तर अंतीं 'शतवृश्चिक दष्टस्य या पीडा सानुभूयते' अशा कष्टांत तरी 'अंतकालेचमामेव' इत्यादि कसें घडावें ? तर हा दृढ होण्याचा कित्ताच गिरवला जातो. कळावें. नारायण."

माणसाच्या जीवनातील एका महत्त्वाच्या समस्येला श्रीस्वामी-महाराजांनी येथे सहजपणे अगदी समर्पक उत्तर दिले आहे. मरण समयी परमेश्वराचे चिंतन केल्यास माणसाला सद्गती लाभते असे शास्त्रांतरी वर्णन केले आहे. शरीराला क्षुल्लक ज्वर झाला; तरी माणूस सर्व काही विसरून त्या ज्वरालाच कवटाळून कण्हत बसतो. आपली नित्यकर्मे पार पाडणे सुद्धा त्याला जमत नाही. एवढे आम्ही

देहबुद्धीच्या अधीन आहोत. जन्मभराच्या या सवयीमुळे अंतकाळी देहाला ज्या अनंत यातना होतात, त्यांमध्ये मन गुंतून राहिल्यामुळे परमेश्वराकडे ते कसे लावता येईल ? श्रीस्वामीमहाराज जन्मभर शारीरिक यातना भोगीत होते; पण त्या यातनांकडे त्यांनी नेहमीच दुर्लक्ष केले. त्यांनी आपल्या दैनंदिन आचाराच्या व ईश्वर चिंतनाच्या आड या यातनांना कधीच येऊ दिले नाही. अंतकाळी होणाऱ्या मृत्युवेदनेमुळे आपले मन परमेश्वरापासून विचलित होऊ नये यासाठी प्रत्येकाने आयुष्यभर हा असा सराव केला पाहिजे असेच त्यांना सुचवावयाचे होते.

चैत्रवैशाखात ब्रह्मावर्ताला कडक उन्हाळा असतो. श्रीगंगेच्या काठावर वाळू तापलेली असते. या हवामानामध्ये पाणी प्यायल्यामुळे श्रीस्वामीमहाराजांना मागे श्रीद्वारकेकडे जाताना जो संग्रहणीचा विकार जडला होता तो अधिकच बळावल्यामुळे त्या विकाराने त्यांना फारच त्रास दिला. या किंवा कोणत्याच विकारावर औषध घ्यावयाचे नाही हा त्यांचा पक्का निश्चय व नियम होता. त्यामुळे वारंवार शौचाला जावे लागत असे. त्यानन्तर स्नान अपरिहार्य असल्यामुळे व श्रीगंगानदीचे पात्र लांब गेल्यामुळे फर्लांग दोन फर्लांग तापलेली वाळू तुडवीत श्रीगंगेवर ते जात असत व स्नान करून तेवढीच वाळू तुडवीत मंदिरात परत येत असत.

आषाढ पौर्णिमेस गुरुपूजन करून श्रीस्वामीमहाराजांनी आपल्या बाराव्या चातुर्मासाला शके १८२४ मध्ये ब्रह्मावर्त येथे सुरुवात केली. यावेळी शिरोळचे श्री. शंकरराव कुलकर्णी श्रीस्वामीमहाराजांच्या सान्निध्यात राहण्यासाठी मुद्दाम ब्रह्मावर्ताला आले होते. श्रीस्वामीमहाराजांच्या कृपेने पुढे हे संकेश्वर करवीर पीठाचे श्रीशंकराचार्य झाले. यांची हकीकत पुढे आली आहे. श्री. शंकरराव कुलकर्णी हे आपण त्यावेळी समक्ष पाहिलेली स्थिती सांगत असत.

श्रीस्वामीमहाराज ज्या शारीरिक यातना भोगीत असत व त्या यातना भोगीत असतानाही त्यांनी आपल्या आचारात किंवा दैनंदिन व्यवहारात कधीच कशी त्रुटी पडू दिली नाही, याचे हृदय हेलावून टाकणारे वर्णन ते करीत असत. ते असे सांगत असत की, "ब्रह्मावर्तास उन्हाळ्यात गंगानदीचा प्रवाह घाटापासून बराच दूर गेलेला असतो. श्रीस्वामीमहाराज शौचास जात आणि भर दुपारी दोन प्रहरी ती तापलेली वाळू तुडवीत प्रवाहापर्यंन्त जाऊन स्नान करून परत येत असत. पुन्हा शौचास गेले की, याच पद्धतीने ते जाऊन येत. ज्या तापलेल्या वाळूकडे दुपारी नुसते पाहणेसुद्धा असह्य होते अशी वाळू दोनतीन फर्लांग तुडवीत शान्तपणे जावयाचे व परत तसेच शान्तपणे यावयाचे हे मोठे दुष्कर कर्म होते. हे दृश्य पाहिले म्हणजे श्रीस्वामीमहाराजांची "दुःखेष्वनुद्विग्नमनः सुखेषु विगतस्पृहः ।" याप्रमाणे असलेली जीवन्मुक्त स्थिती ही सहज सर्वांच्या लक्षात येत होती. ज्यांची देहावर बिलकूल आसक्ती नाही अशा ब्रह्मनिष्ठ महात्म्याच्या दर्शनाने, भाषणाने व सान्निध्य इत्यादिकांचा लाभ ईशकृपेने झाल्याने आम्ही धन्य झालो हेच खरे." हे श्रीशंकराचार्यांचे उद्गार जाहेत. श्रीस्वामीमहाराजांना एक दिवस शौचाचा फारच त्रास झाला. रक्त पडले. त्यावेळी ते असे म्हणाले की, "आज देह फार हलका झाला. पंधरा खेपा झाल्या." केवढी ही देहाबद्दल अनासक्ती ! आणि आपणास ते भोगावे लागते म्हणून त्याबद्दल खिन्नताही नाही. जे आपल्या वाट्याला आले ते भोगून संपवावयाचे हाच त्यांचा नियम व निश्चय होता. या दृष्टीने वर उल्लेखिलेली श्रीशंकराचार्यांनी स्वतः सांगितलेली हकीकत व श्रीस्वामीमहाराजांनी स्वतः लिहिलेले पत्र पाहिले म्हणजे श्रीगुरुचरित्रातील दुसऱ्या अध्यायातील श्रीवेदधर्मामुनींनी आपला शिष्य श्री. संदीपक याला

प्रारब्धनिष्कृतीचा जो अमर सिद्धान्त सांगितला आहे. त्याचेच पालन जणूकाही श्रीस्वामीमहाराज स्वत: करून त्याचा आदर्श समाजाला घालून देत होते, असेच सिद्धान्तरूपाने म्हणावे लागते. याबाबतीत श्रीसरस्वतीगंगाधर यांनी श्रीगुरुचरित्रात असे लिहिले आहे की–

ऐका शिष्य सकळिक । आमचें पूर्वार्जित असें एक ।
जन्मांतरीं सहस्राधिक । केलीं होतीं महापातकें ॥ २.१६० ॥
आमुचें अनुष्ठान करितां । बहुत गेले प्रक्षाळितां ।
कांहीं शेष असे आतां । भोगलियावांचूनि न सुटे जाणा ॥ १६१ ॥
तपःसामर्थ्यें उपेक्षा करतों । पाप मोक्षा आड रिघतों ।
याचि कारणें निष्कृति करितों । तया पाप घोरासी ॥ १६२ ॥
न भोगितां आपुल्या देहीं । आपुले पापा निष्कृति नाहीं ।
हा निश्चय जाणोनि पाहीं । भोगावें आम्हीं परियेसा ॥ १६३ ॥
दीपक म्हणे गुरूसी । पाप करितां देह नाशी ।
न करावां संग्रहो दुःखासी । शीघ्र करा प्रतिकारू ॥ १६८ ॥
वेदधर्म म्हणे तयासी । दृढ देह असतां मनुष्यासी ।
क्षालन करावें पापासी । पुढती वाढे विषापरी ॥ १६९ ॥
अथवा तीर्थें प्रायश्चित्तें । आपुले देहीं भोगोनि त्वरितें ।
पापा वेगळें न होतां निरुतें । मुक्ति नव्हे आपणासी ॥ १७० ॥
देव अथवा ऋषेश्वरांसी । मनुष्यादि ज्ञानवंतांसी ।
क्षालन न होय पापासी । आपुलें आपण न भोगितां ॥ १७१ ॥

येथे अध्यापनाचे कार्य दररोज चालले होते. त्यामध्ये कधीही खंड पडला नाही. त्याचबरोबर श्रीस्वामीमहाराज लोकांना कीर्तन करावयाला व पुराण सांगावयाला शिकवीत असत. कीर्तन करणारी मंडळी तयार झाली म्हणजे त्यांपैकी एखाद्याकडून ते कीर्तन करून घेत असत. कीर्तनाचा पूर्वरंग व आख्यानाची पदे ते स्वत: तयार करून देत असत. शिकाऊ कीर्तनकाराचे कीर्तन ऐकण्यास श्रीस्वामी-

महाराज स्वतः वसत असत. तीच गोष्ट पुराण शिकणाऱ्यांची असे. त्यांचीही तयारी झाली म्हणजे श्रीस्वामीमहाराज त्यांना पुराण सांगावयाला लावीत व आपण श्रोत्यांमध्ये ऐकावयाला बसत. या सर्व गोष्टी लोकांना शिकवून त्यांचे कौतुक करावयाला श्रीस्वामीमहाराज तयार असत. आपल्या शिष्यांनी लोकांकडून शाबासकी मिळविली म्हणजे त्यांना आनंद होत असे व कधीही असूया वाटत नसे. त्यावेळी सातआठ लोक कीर्तन करण्यात व पुराण सांगण्यात तयार झाले होते. त्यामध्ये श्री. रामचंद्रराव खरे, श्री. शंकरशास्त्री कुलकर्णी ( शिरोळकर ), श्री. गोपाळराव राजाध्यक्ष इत्यादि मंडळी होती. त्याचप्रमाणे वालावली येथील पूर्वाश्रमातील श्री. जयरामशास्त्री उपाध्ये हे श्रीप्रज्ञानानंदसरस्वती नावाचे संन्यासी श्रीस्वामीमहाराजांच्या सहवासाचा लाभ व्हावा म्हणून ब्रह्मावर्त येथे त्यांच्याजवळ येऊन राहिले होते. यावेळी कीर्तनाच्या निमित्ताने श्रीस्वामीमहाराजांनी पुष्कळ स्फुट कविता, स्तोत्रे, पदे वगैरेंची रचना केली.

माणगाव सोडल्यापासून श्रीस्वामीमहाराजांची व त्यांच्या नातेवाईकांपैकी कोणाचीही आजपर्यन्त भेट झाली नव्हती. श्रीस्वामीमहाराजांचे कनिष्ठ बंधू श्री. सीतारामपंत यांच्यावर श्रीस्वामीमहाराजांचे पूर्वाश्रमात फार प्रेम होते. श्रीस्वामीमहाराज प्रेमाने त्यांना भलोबा अशी हाक मारीत असत. श्री. सीतारामपंतांचे आपल्या वडील बंधूवर प्रेम तर होतेच शिवाय त्यांची त्यांच्यावर फार श्रद्धाही होती. श्रीस्वामीमहाराज माणगाव सोडून गेल्यावर भलोबांना फार वाईट वाटले होते. त्यांचे मन माणगावमध्ये रमेना. तरीही पाच वर्षे माणगावमध्ये राहून त्यांनी आपल्या आईची सेवा केली. त्यांनी मनाने आपल्या अग्रजाला गुरू मानले होते. अखेर श्रीगुरुदेवांच्या शोधार्थ माणगाव सोडून ते निघाले. भटकत भटकत शके १८२४ च्या वैशाखात ते ब्रह्मावर्ताला येऊन पोहोचले. आपले गुरू व ज्येष्ठ बंधू

येथे आहेत असे त्यांना कळले होते. ज्या दिवशी या बंधुद्वयांची ब्रह्मावर्त येथे भेट झाली तो मोठा अपूर्व योग होता.

ते वैशाख महिन्याचे अखेरचे दिवस होते. श्रीगंगातीरावरील श्रीराम मंदिराचा सभामंडप नेहमीप्रमाणे सायंकाळच्यावेळी श्रोतृ-वर्गाने भरून गेला होता. त्यामध्ये वयोवृद्ध व विद्वान् मंडळींचाच जास्त भरणा होता. व्यासपीठावर श्रीरामचंद्राकडे मुख करून श्रीस्वामीमहाराज बसले होते. त्यांच्या अंगावर भगवी छाटी व मुखावर आयुष्यभर कठोर तपश्चर्या व साधना केल्याचे फळ दिव्य तेजाच्या रूपाने झळकत होते.

त्यावेळी श्रीस्वामीमहाराज जीवनमुक्तिविवेक या संस्कृत ग्रंथावर प्रवचन करीत होते. प्रवचन अस्खलित संस्कृतमध्ये चालले होते. प्रतिपाद्य विषयावर पूर्ण प्रभुत्व असल्यामुळे श्रोत्यांची मने त्यांनी आपल्याकडे खेचून घेतली होती. त्यांचे संस्कृत भाषेवरील प्रभुत्व पाहून विद्वान्‌ही चकित झाले होते. जीवनमुक्तिविवेकसारखा अद्वैत वेदान्ताचे प्रतिपादन करणारा कठिण ग्रंथ, प्रतिपाद्य विषयाचे श्रीस्वामीमहाराजांचे सखोल ज्ञान आणि संस्कृत भाषेवरील त्यांचे प्रभुत्व या त्रिवेणी संगमात श्रोतृवर्ग न्हाऊन निघत होता. श्रीस्वामी-महाराजांच्या अमोघ वक्तृत्वाने आणि त्यांच्या मुखमंडलावरील तेजाने लोक खिळून राहिले होते. प्रवचन सांगत असताना श्रीस्वामी-महाराज अधूनमधून आपली नजर श्रोत्यांमधून चौफेर फिरवीत होते. आपल्या व्याख्यानाचा श्रोत्यांच्या मनावर काय परिणाम होत आहे याचाच जणू ते अंदाज घेत असावेत.

अशाच एका दृष्टिक्षेपामध्ये सभामंडपाच्या अंतिम टोकाला बसलेला एक ओळखीचा चेहरा त्यांना दिसला. सभामंडपाच्या खांबाला टेकून साधुवृत्तीची एक व्यक्ती श्रीस्वामीमहाराजांच्या चेहऱ्याकडे एकटक पाहत प्रवचन ऐकत होती. श्रीस्वामीमहाराज

आपल्या विषयाशी एवढे एकरूप झाले होते की, त्यांच्या नजरेसमोर ओळखीचा चेहरा येऊन गेला; पण त्याचा त्यांच्या मनावर काहीही परिणाम झाला नाही. त्या व्यक्तीची ओळख त्यांना पटली की नाही, हे सांगणे कठिण होते; कारण त्यांचा चेहरा निर्विकार दिसत होता.

संधिकाळ संपला. प्रवचनही संपले. लोक श्रीस्वामीमहाराजांच्या व्युत्पन्न आणि प्रगल्भ बुद्धीची प्रशंसा करीत आपापल्या घरी गेले. श्रोते निघून गेले आणि त्यांच्याबरोबर ते ओळखीचे गृहस्थही गर्दीमध्ये मिसळून निघून गेले. ते श्रीस्वामीमहाराजांचे पूर्वाश्रमातील धाकटे बंधू श्री. सीतारामपंत होते. त्या दिवशी ते इतरांबरोबर निघून गेले व दुसऱ्या दिवशी प्रवचन सुरू होण्यापूर्वीच श्रीराममंदिरामध्ये आले व इतरांप्रमाणे पुढे होऊन श्रीस्वामीमहाराजांना साष्टांग नमस्कार करून आपल्या जागेवर जाऊन बसले. श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना आधल्या दिवशीच ओळखले होते. त्या दिवशी सुद्धा तासभराने प्रवचन संपल्यावर इतर श्रोत्यांप्रमाणे भलोबा श्रीस्वामीमहाराजांना नमस्कार करून ते जेथे उतरले होते त्या श्रीमारुतीमंदिराकडे निघून गेले. श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाने त्यांचा तळमळणारा जीव शान्त झाला होता.

तिसऱ्या दिवशी मात्र श्रीस्वामीमहाराजांनी आपल्या बंधूंची दखल घेतली. त्यांना तसे करणे भाग पडले; कारण आधल्या रात्री भगवान् श्रीदत्तात्रेयांनी भलोबांची चौकशी करण्याचा आदेश त्यांना दिला होता. प्रवचन सुरू होण्यापूर्वी भलोबांनी श्रीस्वामीमहाराजांना नमस्कार केला आणि ते आपल्या नेहमीच्या जागेवर जाऊन बसले. नमस्कार केल्यावर "नारायण" असा श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना आशीर्वाद दिला; पण ते आणखी काही बोलले नाहीत. प्रवचन संपल्यावर त्यांनी जवळच्या एका माणसाला श्री. सीतारामपंतांकडे बोट दाखवून "त्यांना बोलावले आहे असे सांगा"

असे सांगतले. एवढ्यामध्ये बहुतेक सर्व श्रोते निघून गेले होते. अगदी निकटची मंडळी तेवढी अवतीभोवती होती. श्रीस्वामीमहाराजांनी या नवीन साधूला का बोलावले आहे याचे त्यांना कुतूहल वाटले.

ते जवळ आल्यावर श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, " माणगाव सोडून किती दिवस झाले ? येथे कधी आलास ? मातुश्रींचे क्षेम आहे ना ?"

श्रीस्वामीमहाराजांनी अशा प्रकारे आपली चौकशी केली हे पाहून भलोवांना मनोमन आनंद झाला व ते त्यांना असे म्हणाले की, " मी माणगाव सोडल्याला चारपाच वर्षे होतील. येथे येऊन आठदहा दिवस झाले. मी मारुतीच्या देवळात उतरलो आहे. मातुश्री वैकुंठवासी झाल्याची खबर हरिद्वारला मिळाली होती. त्याला आता दोन महिने होतील. "

हे ऐकताच श्रीस्वामीमहाराजांच्या चेहऱ्यावर यत्किंचितही चलविचल झालेली दिसली नाही; पण मनात थोडीतरी खळबळ माजली असेलच. जन्मदात्या आईच्या मृत्यूची खबर कोणालाही अस्वस्थ केल्याशिवाय राहणार नाही. " माता वंद्या यतेरपि " हे नितान्त सिद्धच आहे. " पितृमातृक्षयंश्रुत्वास्नानाच्छुद्ध्यतिसाम्बरम् " म्हणजे मातापितरांचे मरण श्रवण केले असता सचैल स्नान केल्याने यती शुद्ध होतो, या न्यायाने मातेच्या मृत्यूची वार्ता ऐकून श्रीस्वामीमहाराज दंड घेऊन उठले व श्रीगंगेवर स्नान करून शुद्ध झाले.

श्री. सीतारामपंतांनी श्रीस्वामीमहाराजांकडून अनुग्रह घेण्याची इच्छा प्रदर्शित केली. त्यावेळी " इच्छा असेल तर सहवासामध्ये राहा. " एवढेच श्रीस्वामीमहाराज म्हणाले. श्री. सीतारामपंतांनी आपले ग्रंथ वगैरे सामान श्रीमारुतीमंदिरातून आणून ते आता श्रीराममंदिरामध्ये श्रीस्वामीमहाराजांबरोबर राहू लागले. त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांनी श्री. सीतारामपंतांकडून एक गायत्रीपुरश्चरण

करवून घेतले व त्यांना हठयोगची साधना दिली. नंतर एक कृच्छ्र-चांद्रायणव्रत करण्याची श्री. सीतारामपंतांची इच्छा होती; पण हे व्रत करण्याची आवश्यकता नसल्याचे श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना सांगितले. योगाचे शिक्षण श्री सीतारामपंतांनी हरिद्वार येथे श्री. जालवणकर योग्यांकडून घेतले होते.

यासंबंधी पाठविलेल्या एका पत्रात श्रीस्वामीमहाराज असे म्हणतात की, "येथें भला येऊन पाच महिने राहिला आहे. पूर्वीचा दैवयोग काय होता तो असो. पण तूर्त येथें वेदान्ताचे पाठ चालतात. त्यावरोबर श्रवणाचा व पठणाचा उद्योग बराच चालविला आहे. त्याला जा अथवा राहा असें कांहींच सांगितलें नाहीं. चार पढतात त्यांत कां पढेना ? सन्मार्ग आहे व गंगास्नान होत आहे. नारायण."

श्री. रामचंद्रपंत खरे हे ब्रह्मावर्तामध्ये स्नानसंध्या करून माधुकरी मागून राहत असत. श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना कीर्तन करावयाला शिकविले होते. त्यांच्या मनात श्रीस्वामीमहाराजांबद्दल अतिशय पूज्य बुद्धी होती. श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना बरीच आख्याने व पूर्वरंग रचून दिले होते. ते पाठ करून ते कीर्तन करीत असत.

श्रीस्वामीमहाराजांकडे कीर्तन करावयाला शिकलेल्या मंडळींपैकी श्री. गोपाळराव राजाध्यक्ष हे रत्नागिरी जवळील सोलगावचे गौड सारस्वत ब्राह्मण होते. पूर्ववयात घरून निघाल्यावर त्यांनी श्री. बद्री-नाथाची व श्री. गंगोत्रीची यात्रा केली होती. या यात्रेहून परतल्यावर ते ब्रह्मावर्त येथे माधुकरी मागून श्रीदत्तभजन करण्यात काळ घालवीत असत. श्रीस्वामीमहाराजांची सर्वत्र पसरलेली कीर्ती ऐकून आपल्याला त्यांचे दर्शन केव्हा घडेल अशी त्यांना सारखी तळमळ लागली होती. त्यांच्या पूर्व पुण्याईनें त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन घेण्याचा सुयोग त्यांना आला. श्रीस्वामीमहाराजांचा बारावा चातुर्मास येथे होत होता. श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन झाल्यामुळे

त्यांना अत्यंत आनंद झाला होता व ते त्यांच्या सान्निध्यात जास्तीत जास्त वेळ घालवू लागल्यामुळे त्यांच्या संगतीत त्यांचा काळ फार आनंदात जाऊ लागला. त्यांची श्रीस्वामीमहाराजांवर फार निष्ठा होती. एकदा त्यांनी श्रीस्वामीमहाराजांना एकान्तात अशी प्रार्थना केली की, " मला कीर्तन करण्याची फार हौस आहे; परन्तु माझी तितकी तयारी नाही. असे असले तरी माझी ही इच्छा आपण पूर्ण करावी. " वास्तविकपणे कीर्तनाच्या दृष्टीने विचार केला; तर त्यांच्या सर्व बाजू कच्च्या व लंगडया होत्या. अशा रीतीने सर्व दृष्टीने ते अनधिकारी असले; तरी श्रीस्वामीमहाराजांच्या कृपेने त्यांची इच्छा पूर्ण झाली. कोणाचाही भाव नष्ट करावयाचा नाही ही श्रीस्वामीमहाराजांची वृत्ती होती. त्यामुळे श्रीस्वामीमहाराजांनी एक कीर्तन त्यांच्याकडून पूर्व व उत्तररंगासह बसवून घेतले व एकादशीच्या दिवशी ते त्यांच्याकडून करवूनही घेतले.

एकादशीच्या दिवशी जेव्हा श्री. गोपाळराव राजाध्यक्ष कीर्तन करण्यास उभे राहिले तेव्हा " येथे माधुकरी मागून जगणारा माणूस, हा काय कीर्तन करणार ? याची बुद्धिमत्ता ती काय ? " असे उपहासाचे उद्‌गार जो तो काढू लागला. श्रीस्वामीमहाराजांच्या कृपारूपी दिव्यत्वाचा ज्याला स्पर्श झाला त्याला अशक्य असे काहीच नाही. एकादशीच्या दिवशी कीर्तनकाराच्या वेषात श्री. गोपाळराव कीर्तनाच्या जागेवर उभे राहिले. प्रभू श्रीरामचंद्राला त्यांनी नमस्कार केला. श्रोतृवर्गात बसलेल्या आपल्या गुरूंना, श्रीस्वामीमहाराजांना, त्यांनी नमस्कार केला आणि हाती टाळ घेऊन त्यांनी ठेका धरला. कीर्तनाच्या पूर्वरंगाला सुरुवात झाली. निरूपणासाठी जो अभंग त्यांनी घेतला होता त्याच्या पहिल्याच ललकारीने त्यांनी श्रोत्यांची मने काबीज करून घेतली. समोर श्रीस्वामीमहाराजांकडे पाहून ते बोलत होते. श्रीस्वामीमहाराज ऐकत होते. कीर्तनाला

उत्तरोत्तर असा रंग चढत चालला की, सर्व श्रोते मंत्रमुग्ध होऊन गेले. त्या दिवशी एका माधुकऱ्याने केलेले अश्रुतपूर्व असे कीर्तन ब्रह्मावर्ताच्या लोकांनी ऐकले. त्यानंतर श्री. गोपाळराव राजाध्यक्ष स्वत:च श्रीगुरुचरित्रातील कथानकांवर आख्याने रचून ती श्रीस्वामी-महाराजांना वाचून दाखवीत असत व त्यांनी संमती दर्शविल्यावर त्यांवर ते कीर्तने करीत असत.

शके १८२६ च्या आपल्या १४ व्या चातुर्मासात श्रीस्वामी-महाराजांनी ब्रह्मावर्त येथे मौन स्वीकारले होते. त्यावेळी श्रीगुरु-चरित्रावर स्वत: रचलेले एक आख्यान घेऊन श्रीस्वामीमहाराजांना दाखविण्यासाठी श्री. गोपाळराव राजाध्यक्ष त्यांच्याकडे गेले होते. आख्यान ऐकल्यावर "नारायण" असे पसंतीदर्शक उद्‌गार श्रीस्वामी-महाराजांनी काढले. ज्यावेळी चातुर्मास संपला त्यावेळी श्रीगंगेचा प्रवाहही पलीकडे गेला होता. श्रीस्वामीमहाराज ब्रह्मावर्ताहून जाण्याची चिन्हे दिसू लागली. ते पाहून श्री. गोपाळराव राजाध्यक्षांनी श्रीस्वामीमहाराजांकडे दुसरीकडे जाऊन राहण्यासाठी परवानगी मागितली. श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना पाटीवर असे लिहून दाखविले की, "नेमावर येथे श्रीनागेश्वराच्या मंदिरात राहून गायत्री पुरश्चरण करावे. खर्चास काही पाहिजे का ? कोणाकडून देवविता येईल ! " श्रीस्वामीमहाराजांनी लिहिलेला हा मजकूर पाहताच ते त्यांना असे म्हणाले की, " महाराज ! आपली आज्ञा मला शिरसा-वंद्य आहे. त्याप्रमाणे मी आजच गायत्रीपुरश्चरण करण्यासाठी नेमावरला जाण्यास निघत आहे. मला खर्चासाठी काहीही नको; फक्त आपले पुन्हा दर्शन व्हावे अशी मात्र माझी तीव्र इच्छा आहे. " श्री. गोपाळराव राजाध्यक्षांनी अशी विनंती केल्यावर श्रीस्वामी-महाराजांनी बरे आहे असे म्हणून होकारार्थी मान हलविली. ते

पाहताच श्री. गोपाळरावांना फार आनंद झाला व ते श्रीस्वामी-महाराजांना साष्टांग नमस्कार घालून निर्दिष्ट स्थानी निघून गेले.

ब्रह्मावर्त येथे श्रीगंगेचे वाळवंट मैलभर रुंदीचे आहे. उन्हाळ्यात मध्यान्हकाळी सूर्यप्रकाशाने ते तापले म्हणजे त्यातून चालण्याची कोणाची ताकद होत नाही. सूर्याचे ऊन अंगावर सहन करवेल; पण त्याच सूर्य किरणांनी तापलेली वाळू सहन करविणार नाही. तापलेल्या वाळूचे कण पाय पोळून काढतात. सायंकाळी सहा वाजेपर्यंन्त त्या तापलेल्या वाळवंटामध्ये कोणी जात नाही; पण अशा या अग्नीप्रमाणे तापलेल्या वाळवंटातून भर उन्हात अनवाणी चालत जाऊन संपूर्ण उन्हाळाभर श्रीस्वामीमहाराज दररोज दुपारी तीन वाजण्याच्या किंचित् पूर्वी श्रीगंगेचे स्नान करून येत असत.

श्रीगंगेवरचे हे विशाल वाळवंट सूर्य किरणांनी तापले असता जोरदार वारा सुटला म्हणजे भयंकर वावटळ सुरू होऊन वाळवंटा-तील वाळू आकाशात उडून दशदिशा व्यापून टाकते व वारा जिकडे नेईल तिकडे वाळूचा हा स्तंभ आकाशातून प्रवाहाप्रमाणे भराभर वाहू लागतो. आकाशात वाळू उडून प्रकाश लोपतो व अंधार पडतो. अशा वाळूच्या वादळाला इकडे " आँधी " म्हणतात. अशा आँधी-मध्ये सापडलेला माणूस कधीकधी नाकातोंडात व कानाडोळ्यात वाळू शिरून गुदमरून जातो. क्वचित्प्रसंगी तो आंधळा होतो किंवा वाऱ्याबरोबर उडून श्रीगंगाप्रवाहात किंवा दुसरीकडे कोठेतरी जाऊन पडतो. प्रसंगी तो प्राणालाही मुकतो. येथील रहिवासी आँधी येण्याची चिन्हे दिसू लागताच पळत सुटतात व त्वरेने आपल्या घरी किंवा सुरक्षित ठिकाणी जाऊन बसतात. ही आँधी किती वेळ टिकेल याचा नेम नसतो. तास दोन तासही हे वादळ टिकते. तेवढा वेळ कोणीही माणूस आपल्या निवाऱ्याच्या जागेतून बाहेर पडत नाही. अशी आँधी वर्षातून बरेच वेळा येते. एतद्देशीय लोकांना या

आँधीची माहिती असते; पण परदेशी नवखा माणूस या आँधीत सापडला तर तो प्राणास मुकतो.

असाच एक जिवावरचा प्रसंग श्री. सीतारामपंत टेंबे व शिरोळचे श्री. शंकरराव कुलकर्णी यांच्यावर आला होता; पण श्रीस्वामीमहाराजांच्या कृपेने ते त्यातून वाचले. त्यावेळी श्री. शंकरराव वेदान्ताचे अध्ययन करण्यासाठी ब्रह्मावर्ताला श्रीस्वामीमहाराजांजवळ येऊन राहिले होते.श्रीस्वामीमहाराज, श्री. सीतारामपंत व श्री. शंकरराव यांना, रोज श्रीमद् आद्य शंकराचार्यांच्या भाष्यावरून वेदान्ताचे पाठ देत असत.

एके दिवशी संध्याकाळी श्री. सीतारामपंत व श्री. शंकरराव कुलकर्णी नेहमीप्रमाणे श्रीगंगेवर सायंसंध्या करावयाला निघाले होते. त्यावेळीही सूर्य तळपतच होता, असे म्हटले तर वावगे होणार नाही. खाली वाळू तापलेली होती. या अशा उन्हात हे दोघे सुहृद आपले आराध्य दैवत श्रीस्वामीमहाराज यांच्याविषयी बोलत चालले होते. बोलण्यात ते एवढे रंगले होते की, आजूबाजूच्या परिस्थितीची त्यांना जाणीवही नव्हती. कथागोष्टीत ते दंग नसते; तरीसुद्धा येणाऱ्या संकटाची त्यांना कल्पना आली नसती. दोघेही तेथे नवीनच होते. यावेळी हवेमध्ये एक चमत्कारिक वास सुटला होता. तो एवढा सूक्ष्म होता की, स्थानिक माणसाशिवाय दुसऱ्या कोणाच्याही तो लक्षात आला नसता. दुरून एक लहानसा ढग त्यांच्या रोखाने सरकत येत होता. तोही प्रथम त्यांच्या ध्यानात आला नाही. तो ढग जसाजसा जवळ येऊ लागला तसतसा तो सर्वव्यापी होऊ लागला आणि त्याचबरोबर वेगाने वाहणाऱ्या वाऱ्याचा भेसूर आवाज ऐकू येऊ लागला. वावटळ प्रचंड वेगाने त्यांच्या रोखाने येत होती. त्यावेळी दोघेही वाळवंटाच्या मध्यावर येऊन पोहोचले होते. कोठेही नजर टाकली तरी सर्वत्र विस्तीर्ण वाळवंट व पुढे नदीचे पात्र दिसत होते. निवाऱ्याची जागा कोठेही दिसत नव्हती. अशा

वेळी काय करावे व कोठें पळत जावे हे त्यांना सुचेना. पळणार तरी कोठे ? वाळू हळूहळू वाऱ्याच्या जोराने आकाशात उडू लागली आणि प्रचंड वेगाने येणाऱ्या त्या मेघात मिसळून गेली. सगळीकडे काळोख पसरला. डोळे उघडे ठेवता येईनात. तोंडही उघडता येईना. नाकात व कानात वाळू जाऊ लागली. अंगावरचे उत्तरीय दोघांनी नाकातोंडावरून गुंडाळून घेतले. या आंधळ्या कोशिं-बिरीच्या धडपडीमध्ये दोघेही एकमेकांपासून अलग झाले. कोण कोठे गेला हेच कळेना. हाक मारावी तर तोंड उघडता येईना. मृत्यू स्पष्ट दिसू लागला. आता श्रीस्वामीमहाराजांचा धावा करणे हाच एकमात्र उपाय त्यांच्यापुढे होता; कारण त्यांच्याशिवाय या संकटातून सोडविणारे दुसरे कोणी नव्हते. त्यामुळे दोघांनीही बसल्याजागी श्रीस्वामीमहाराजांचा धावा सुरू केला.

इकडे श्रीराममंदिरामध्ये श्रीस्वामीमहाराज बसले होते. सभोवती बरीच मंडळी होती. प्रश्नोत्तरे चालली होती. मधून मधून कोणाला आजारावर औषध दे, कोणाला पिशाच्च बाधेवर मंत्र, यंत्र दे; तर कोणाला प्रापंचिक अडचणींवर काही दैवी इलाज सांग, असे त्यांचे जनकार्य चालले होते. मध्येच श्रीस्वामीमहाराजांना आपला जीव कासावीस झाल्यासारखे वाटले. श्वास कोंडला जाऊ लागला. श्रीगंगेच्या वाळवंटावर आँधी थैमान घालीत होती. त्यामुळे "आपल्यापैकी कोणी गंगेवर गेले आहेत का ?" अशी त्यांनी पृच्छा केली. त्यावेळी श्री. ब्रह्मचारीबुवा आणि श्री. शंकरराव शिरोळकर संध्या करण्यासाठी श्रीगंगेवर गेल्याचे कळले. श्री. ब्रह्मचारीबुवा म्हणजे श्री. सीतारामपंत टेंबे होत. श्रीस्वामीमहाराजांनी हे जाणले की, ते दोघे संकटात सापडले असून आपला धावा करीत आहेत. त्यांक्षणी श्रीस्वामीमहाराज तेथून उठले आणि साधनेच्या खोलीत जाऊन समाधी लावून बसले.

तिकडे श्रीगंगेच्या वाळवंटातील आँधीचा जोर अकस्मात् कमी झाला. डोळे मिटून श्रीस्वामीमहाराजांचा धावा करणाऱ्या श्री. सीतारामपंतांना मोकळे मोकळे वाटले. वारा थांबला होता. आँधी दूर निघून गेली होती. श्री. सीतारामपंतांनी तोंडाभोवती गुंडाळलेले उत्तरीय हळूच बाजूला केले व डोळे किलकिले करून समोर पाहिले. सर्व काही शान्त होते. अंगावरची वाळू झाडून त्यांनी श्री. शंकररावांना हाक मारली. श्री. शंकरराव जवळच डोके खाली करून मान दोन्ही गुडघ्यात दाबून धरून बसले होते. हाक ऐकून त्यांनी ओ दिली व हाकेच्या अनुरोधाने पाहिले. समोर श्री. ब्रह्मचारीबुवा उभे होते. दोघेही संध्यावंदन करून श्रीस्वामीमहाराजांचे गुणगान करीत श्रीराममंदिरात परत आले.

श्री. सीतारामपंतांचे गायत्री पुरश्चरण संपेपर्यन्त आपण ब्रह्मावर्त सोडून कोठे जाणार नाही असे श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना कबूल केले होते. श्रीराममंदिरामध्ये ज्या खोलीत श्रीस्वामीमहाराज साधना वगैरे करीत असत त्या खोलीत दुसऱ्या कोणीही कधी जाऊ नये आणि कोणी त्या खोलीत गेल्यास आपण तावडतोब ब्रह्मावर्त सोडून निघून जाऊ अशी श्रीस्वामीमहाराजांनी सर्वांना सक्त ताकीद दिली होती. खोलीची झाडलोट ते स्वतःच करीत असत. श्रीस्वामीमहाराजांची खोली साफसूफ करून काहीतरी सेवा करावी असे प्रत्येकाला वाटत असे; पण श्रीस्वामीमहाराज कोणाकडूनही सेवा करून घेत नसत. त्यांच्या शब्दाविरुद्ध जाण्याची कोणाची छाती नव्हती. अशा परिस्थितीमध्ये एक दिवस सकाळचे आन्हिक उरकून श्रीस्वामीमहाराज परत आल्यावर आपल्या खोलीची कोणीतरी झाडलोट केल्याचे त्यांना दिसून आले. आजूबाजूला लोक भयभीत मुद्रेने उभे होते. त्यांना अशी खात्री वाटत होती की, श्रीस्वामीमहाराज आता ब्रह्मावर्त सोडून निघून जाणार. त्यावेळी " खोलीत कोणी प्रवेश केला ?"

असे विचारून परशुमुद्रा बांधण्यासाठी श्रीस्वामीमहाराजांनी दंडाला हात घातला. श्रीस्वामीमहाराजांनी रागाने विचारलेला हा प्रश्न ऐकताच त्यावेळी तेथे उपस्थित असलेल्या लोकांनी श्रीस्वामी-महाजांना असे सांगितले की, "ब्रह्मचारीबुवांना नको, नको म्हणून सांगितले असतानाही त्यांनी आपली खोली झाडून ठेविली आहे."

श्रीस्वामीमहाराजांनी हे ऐकताच दंडाला घातलेला हात मागे घेतला. त्यांच्या चेहऱ्यावर कोमल भाव उमटले. त्यांनी आपल्या पुढील आन्हिकाला सुरुवात केली. असे त्यांचे श्री. भलोवांवर प्रेम होते आणि श्री. भलोबासुद्धा असा आपला प्रेमाचा हक्क मधूनमधून गाजवीत असत. श्रीस्वामीमहाराजांचे ब्रह्मावर्त सोडून जाण्याचे रद्द झाल्याचे पाहून लोकांनाही फार समाधान वाटले.

ही गोष्ट श्रीक्षेत्र नरसोबाच्या वाडी जवळील शिरोळ गावच्या श्री. शंकरराव कुलकर्णी यांची आहे. त्यांचा चित्रकलेचा अभ्यास पूर्ण झाला होता. त्यांच्या घरची परिस्थितीही उत्तम होती. ते चित्रकला शिक्षक होते; पण नोकरीमध्ये त्यांचे मन रमेना व जीवनात गोडीही वाटेना. त्यांना तीव्र विरक्ती उत्पन्न झाल्यामुळे एक दिवस त्यांनी आपला व्यवसाय व शिरोळ गाव सोडले आणि ते औंध येथे जाऊन एकान्तामध्ये राहू लागले. पुढे त्यांना दासबोध, ज्ञानेश्वरी हे ग्रंथ वाचण्याचा छंद लागला. अशा स्थितीत ते काशीला गेले असता ज्ञानेश्वरीतील योगनिरूपण वाचून त्यांना योगाभ्यास करण्याची इच्छा झाली. परमार्थ साधन हेच आपल्या जीविताचे उद्दिष्ट आहे असे त्यांना वाटू लागले; पण योग्य गुरूशिवाय योगाभ्यास सुरू कसा होणार? आपणास योग कोण शिकविणार? असे प्रश्न त्यांच्या मनात येऊ लागले. माणसाच्या मनामध्ये एखाद्या गोष्टीबद्दल तीव्र इच्छा निर्माण झाली की, इच्छापूर्तीचा मार्गही त्याला सापडतो. श्रीक्षेत्र काशी हे सर्व विद्यांचे माहेरघर आहे. योगशास्त्रातील समर्थ

मार्गदर्शक आपणास काशीला सापडेल या विचाराने त्यांनी काशीच्या निरनिराळ्या मठात चौकशी केली. ज्यावेळी तारकमठातील श्रीप्रज्ञानानंदसरस्वतीस्वामीमहाराज यांची गाठ पडली त्यावेळी त्यांनी "प. प. श्रीसुदेवानंदसरस्वतीस्वामीमहाराज हे योगात निष्णात असून सध्या ते ब्रह्मावर्त येथे वास्तव्य करून आहेत; तरी तेथे तुम्ही अवश्य जाऊन त्यांचे दर्शन घ्या"—असे सांगितले. हृदयात उत्पन्न झालेल्या तीव्र वैराग्याच्या अग्नीने श्री. शंकररावांच्या वासना जळून चालल्या होत्या. सत्पुरुषाच्या दर्शनाची वेळ जवळ येत होती. क्षणाचाही विलंब न लावता ते ब्रह्मावर्ताला निघून गेले. श्री. अंताजीपंतांच्या श्रीराममंदिरात एका लोकोत्तर पुरुषाची पुढे होऊ घातलेल्या दुसऱ्या एका लोकोत्तर पुरुषाशी गाठ पडली. श्रीस्वामीमहाराजांनी श्री. शंकरराव कुलकर्ण्यांचा अधिकार ओळखला. नुसता अधिकारच ओळखला असे नाही; तर भविष्य-काळात त्यांना एक जबाबदारीचे पद भूषवावयाचे आहे, हेही त्यांनी ओळखले. पूर्वतयारी करून घेण्यासाठीच देवांनी त्यांना श्रीस्वामी-महाराजांकडे पाठविले असावे. श्रीस्वामीमहाराजांना साष्टांग नमस्कार घालून श्री. शंकरराव त्यांना असे म्हणाले की, "काशीच्या प्रज्ञानानंदस्वामींनी मला आपणाकडे पाठविले आहे. माझी योग शिकण्याची इच्छा आहे. आपण योगज्ञ आहात. आपण माझी इच्छा पुरी करावी अशी माझी आपणास नम्र प्रार्थना आहे."

त्यांची ही इच्छा ऐकताच श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "ठीक आहे. येथे राहून योगाभ्यास करा."

त्यानंतर श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना योगातील षट्क्रिया, प्राणायाम वगैरे सर्व क्रिया शिकविल्या. श्री. शंकरराव कुलकर्णी यांना भविष्य काळात करावे लागणारे महान् कार्य लक्षात घेऊन त्यांच्या पुढील शिक्षणाचा पाया घालण्यासाठी श्रीस्वामीमहाराज एक दिवस

त्यांना असे म्हणाले की, "खरा आनंद वेदान्ताच्या अभ्यासावाचून मिळणे शक्य नाही; पण वेदान्त ग्रंथ संस्कृतमध्ये आहेत."

श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना असे सांगताच ते त्यांना असे म्हणाले की, "मला वेदान्त शिकावयाचा आहे. आपल्या पायाशी बसून मी वेदान्ताचे धडे घेईन. आपण मला सर्व शिकवावे."

श्री. शंकररावांचे शिक्षण सांप्रदायिक क्रमानेच होणे आवश्यक होते. त्यामुळे श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "तुम्हाला ज्या प्रकारच्या अध्ययनाची आवश्यकता आहे त्या प्रकारचे अध्ययन श्री. नारायणशास्त्री एकसंबेकर यांच्याकडे होईल. तुम्ही एकसंब्याला त्यांच्याकडे जा. मी पाठविले आहे म्हणून सांगा. त्यांच्याकडे तुमचे पायाशुद्ध शिक्षण होईल."

श्रीस्वामीमहाराजांची आज्ञा घेऊन श्री. शंकरराव एकसंब्याला वे. शा. सं. श्री. नारायणशास्त्र्यांकडे गेले. श्रीस्वामीमहाराजांनी आपल्याकडे अध्ययनासाठी माणूस पाठविला आहे याचा काय अर्थ होतो, ते श्री. नारायणशास्त्री समजले. त्यांनी श्री. शंकररावांना संस्कृत शिकवून प्रथम वेदाध्ययन सांगितले आणि नंतर त्यांच्याकडून शास्त्राभ्यास करून घेतला. श्री. शंकररावांचे आता श्री. शंकरशास्त्री झाले. श्री. शंकरशास्त्री कुलकर्णी शिरोळकर यांना ब्रह्मावर्त येथे असताना श्रीस्वामीमहाजांनी कीर्तन करावयाला शिकविले होते. श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना वेदान्तनिरूपणरूप आख्याने स्वतः तयार करून दिली होती. श्री. शंकरराव त्यांच्या आधारे ब्रह्मावर्त येथे दर एकादशीला कीर्तन करीत असत. श्रीस्वामीमहाराजांची त्यांच्यावर फार मर्जी होती; कारण भविष्यात श्री. शंकरशास्त्री शंकराचार्यांच्या गादीवर येणार हे श्रीस्वामीमहाराजांनी जाणले होते. मध्यंतरीच्या काळात श्रीस्वामीमहाराजांनी स्वहस्ते लिहिलेली ब्रह्मसूत्र भाष्याची पोथी श्री. शंकरशास्त्र्यांना देण्यासाठी म्हणून

श्री. केशवशास्त्री जोशी यांच्याकडे दिली होती. श्री. शंकरशास्त्री व श्री. केशवशास्त्री यांची भेट न झाल्याकारणाने श्री. केशवशास्त्र्यांनी प्रसादाची ती पोथी श्रीक्षेत्र नरसोबाच्या वाडीला श्रीदीक्षितस्वामी-महाराजांकडे ठेवली. पुढे दीडवर्षं ती पोथी श्रीदीक्षितस्वामी-महाराजांकडेच होती. त्यानन्तर शके १८२६ मध्ये श्रीस्वामी-महाराज श्रीक्षेत्र नरसोबाच्या वाडीला गेले असताना श्री. शंकर-शास्त्री त्यांच्या दर्शनाला गेले. त्यावेळी "आपण पाठविलेली ब्रह्म-सूत्राची पोथी मिळाली की नाही?" म्हणून श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना विचारले. ती पोथी श्री. शंकरशास्त्र्यांकडे न जाता अद्यापि श्रीदीक्षितस्वामीमहाराजांकडे असल्याचे कळल्यावर श्रीस्वामी-महाराजांनी ती श्रीदीक्षितस्वामीमहाराजांकडून घेऊन श्री. शंकर-शास्त्र्यांना दिली.

पुढे श्री. मार्कंडेय ब्रह्मचारी यांच्याकडून श्रृंगेरीची हकीकत कळल्यावर श्री. शंकरशास्त्री श्रृंगेरीला न्याय, वेदान्तादि शास्त्रांचा अभ्यास करण्यासाठी गेले. तेथून अभ्यास पूर्ण करून परतल्यावर त्यांना श्री. शंकराचार्यांच्या करवीर येथील संकेश्वर पीठावर पीठा-धिपती म्हणून नेमण्यात आले. जगद्गुरू म्हणून त्यांची निवड व्हावी यासाठी श्रीस्वामीमहाराजांचे त्यांना आशीर्वाद होते. शके १८३५ मध्ये श्रीस्वामीमहाराज श्रीक्षेत्र गरुडेश्वरी असताना या नेमणुकी-बद्दल श्री. शंकरशास्त्र्यांनी त्यांना पत्राने विचारले होते व श्रीस्वामी-महाराजांनी त्यांना होकारात्मक उत्तर पाठविले होते. श्रीस्वामी-महाराजांनी त्यांना पूर्वी ब्रह्मसूत्रभाष्याची पोथी प्रसाद म्हणून दिली होती, त्या मागचा हेतू आता श्री. शंकरशास्त्र्यांच्या ध्यानात आला. ती पोथी म्हणजे श्री. शंकरशास्त्र्यांची जगद्गुरुपदावर नेमणूक व्हावी म्हणून श्रीस्वामीमहाराजांनी दिलेला आशीर्वादच होता.

दिवाळीचा सण ब्रह्मावर्तामध्ये फार थाटाने साजरा झाला. यावेळी देवांना भक्ताकडे हट्ट धरावयाचे प्रयोजन पडले नाही. चिखलद्यात पाच वर्षांपूर्वी दिवाळीच्या दिवशी जे नाटय घडले, ते आपले आणि भक्ताचे नाते सर्वजणांना समजावे म्हणून देवांनी घडवून आणले होते. या दिवाळीला भक्त-भाविकांच्या हृदयामध्ये देवांनी अशी प्रेरणा निर्माण केली की, दिवाळीच्या दिवशी देवांना अभ्यंग स्नान घालून षोडशोपचारे पूजा करावी. दिवाळीच्या दिवशी श्रीदत्तमूर्तीच्या पूजेकरिता पंचामृतादि पूजासाहित्याने भरलेली पाचपन्नास ताटे मंडळींनी आणली होती. त्या सर्व भक्तांनी बरोबर आणलेल्या पूजाद्रव्याने श्रीस्वामीमहाराजांनी श्रीदत्तमूर्तीची प्रेमाने व भक्तीनें अभ्यंगस्नान घालून षोडशोपचारे पूजा केली. सुगंधी फुलांची एवढी रास पडू लागली की, देवांना वाहिलेल्या फुलांमध्ये मूर्तीच लपून जाऊ लागली. प्रत्येक वेळी फुलांच्या राशीतून मूर्ती वर काढून ठेवावी व नंतर दुसऱ्या भक्ताने पूजा करावी असा प्रकार चालला होता. श्रीस्वामीमहाराज हा सोहळा कौतुकाने पाहत होते. त्यांनी आपल्या निष्काम भक्तीने देवांना आपलेसे केले होते. त्या दिवाळीच्या उत्सवात दररोज भजन कीर्तन, पुराण इत्यादि कितीतरी कार्यक्रम नित्य चालू होते. दरवर्षी गावामध्ये प्रत्येक देवळात कोणता ना कोणता तरी उत्सव होतच असे; पण यावर्षीच्या दिवाळीमध्ये श्रीस्वामीमहाराजांच्या श्रीदत्तमूर्तीच्या उत्सवासारखा उत्सव इतर कोणत्याही देवळात एवढ्या मोठ्या प्रमाणावर कधीही झाला नव्हता. लोकांचा उत्साहसुद्धा दांडगा होता. या उत्सवामुळे श्रीदत्तप्रभूंची श्रीस्वामीमहाराजांवर केवढी कृपा आहे, हे सर्वांना दिसून आले. श्रीस्वामीमहाराजांची आपल्या उपास्य देवतेवर केवढी भक्ती होती व त्यांच्या अंतःकरणात देवाविषयी किती उत्कट प्रेम होते, हे सर्वांना माहीतच होते. त्यामुळे प्रभूंनी भक्तवात्सल्य प्रकट

करण्याकरिताच आपला उत्सव थाटाने करून घेतला.

पुढे दीड महिन्याने श्रीदत्तजयंती आली. श्रीदत्तजयंतीचा उत्सव-सुद्धा येथेच झाला. हा उत्सव दिवाळीच्या उत्सवापेक्षा कितीतरी पटीने मोठ्या प्रमाणावर साजरा झाला. रोज दोन दोन, तीन तीन भजने व कीर्तने होत. भजन व कीर्तनाबरोबर श्रीक्षेत्र नरसोबाच्या वाडीप्रमाणे श्रीगुरुचरित्राचे दहावीस पाठसुद्धा होत. श्रीस्वामी-महाराजांकडून आख्यान तयार करून घेऊन अगदी आठ वर्षांच्या मुलांनीसुद्धा कीर्तने केली. का नाही करणार ? "मूकं करोति वाचालम्" अशी ज्यांची शक्ती होती, त्या श्रीस्वामीमहाराजांच्या आशीर्वादाने बोबड्या बालकांनी सभेपुढे कीर्तन केले तर नवल नाही. या उत्सवात कार्यक्रमाची एवढी धामधूम झाली की, श्रोत्यांना मंदिर सोडून स्वयंपाक, जेवण, झोप यासाठीसुद्धा घरी जाता येईना. काही श्रोते तर उत्सव संपेपर्यन्त मंदिरातच वास्तव्य करून होते. शेवटच्या दिवशी समाराधना होऊन चारपाचशे माणसांना पक्वान्नांचे आकंठ भोजन देण्यात आले. त्या रात्री ललीतही झाले.

ब्रह्मावर्तांचे इनामदार श्री. सुभेदार यांचेही गावात एक श्रीराम-मंदिर होते. श्री. सुभेदार यांचे घराणे कण्वशाखीय असून ते खूप श्रीमंत होते. यांच्या वाड्यातच बैराग्यांना सदावर्त चाले. हे सदावर्त परोपकाराच्या बुद्धीतून चालले होते.

एकदा चारपाच बैरागी इनामदारांच्या वाड्यात आले आणि जेवून परत जातेवेळी तेथे पडलेली काही जळाऊ लाकडे त्यांनी सर्पणासाठी म्हणून नेली. चोरी करण्याच्या उद्देशाने त्यांनी ती लाकडे नेली नव्हती. बाजूला पडलेली दिसली व आपणास वापरता येतील म्हणून त्यांनी ती नेली. कदाचित् सदावर्ताचाच तो भाग असेल, असेही त्यांना वाटले असावे; पण ही गोष्ट श्री. सुभेदारांना कळताच त्यांनी त्या बैराग्यांना पकडून तुरुंगात घातले. पुढे दोन चार

दिवसांनी त्यांनी त्यांना सोडून दिले. तेथून निघून जाण्यापूर्वी ते बैरागी श्री. सुभेदारांकडे आले व संतापाने त्यांना असे म्हणाले की, "तू आम्हाला त्रास दिल्याबद्दल ईश्वर तुझे हालहाल करील." एवढे बोलून ते साधू निघून गेले. श्री. सुभेदारांनीही या शापाकडे दुर्लक्ष केले; कारण कावळ्याच्या शापाने गाय कधीच मरत नाही, असे त्यांना वाटल्यामुळे त्या बैराग्यांच्या बोलण्यात त्यांना काहीच तथ्य वाटले नाही.

परन्तु साधुलोकांचा कोप बाधल्याशिवाय थोडाच राहणार? श्री. सुभेदारांवर अनेक संकटे येऊ लागली. थोड्याच दिवसात त्यांचा वडील भाऊ मरण पावला. एके दिवशी मध्यरात्रीच्या सुमारास एक स्त्री श्री. सुभेदारांच्या घरातून रडत रडत श्रीगंगेच्या किनाऱ्याकडे जाताना दिसली. श्रीस्वामीमहाराजांनी तिच्या रडण्याचा सूर ऐकला व तिला अशी जाताना पाहून त्यांना नवल वाटले. ती कोण आहे हे त्यांनी लगेच ओळखले. श्री. सुभेदारांच्या घरची लक्ष्मी त्यांचा त्याग करून निघून चालली होती. श्री. सुभेदारांचा पुतण्या श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला येत असे. दुसऱ्या दिवशी तो जेव्हा दर्शनाला आला तेव्हा श्रीस्वामीमहाराज त्याला असे म्हणाले की, "माधवराव! काल रात्री तुमच्या वाड्यातून लक्ष्मी बाहेर पडून रडत रडत निघून गेली. तरी यापुढे सावधगिरीने वागावे." श्रीस्वामीमहाराजांचे हे शब्द ऐकून श्री. माधवराव फार खिन्न झाले. काही दिवसांनी गावात प्लेगची साथ सुरू झाली. लोक भराभर गाव सोडून निघून जाऊ लागले. श्री. इनामदार मंडळी आपल्या वाड्यातच होती. या प्लेगने श्री. माधवरावांचा बळी घेतला. त्यांच्या बायकोने इस्टेटीचा आपला वाटा मिळावा म्हणून श्री. इनामदारांवर दावा केला. या दाव्यात श्री. इनामदारांना पुष्कळ खर्च आल्यामुळे त्यांना दैन्यावस्था व विपत्ती प्राप्त झाली. अशा तऱ्हेने

त्या बैराग्यांचा कोप श्री. इनामदारांना बाधला व त्यांचे अगदी हालहाल झाले. साधूंचा शाप या युगातही नाशक होतो हेच या कथेवरून दिसून येते.

एकदा ग्वाल्हेरच्या श्री. गोपालाचार्यांचे एक शिष्य श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला आले. हे स्वतःला मोठे शास्त्री व पंडित समजत असत. ते विद्वान् होते; पण अहंकाराने त्यांच्या विद्वत्तेवर पाणी पडत होते. ते श्रीस्वामीमहाराजांकडे त्यांच्या दर्शनासाठी येत असत असे म्हणण्यापेक्षा, संधी मिळाल्यास श्रीस्वामीमहाराजांची काही तरी चूक दाखवून लोकांपुढे आपली विद्वत्ता प्रदर्शित करण्यासाठीच येत असत, असे म्हणणे योग्य होईल. एक दिवस श्रीस्वामीमहाराज नित्याप्रमाणे पुराण सांगत असताना मध्येच या श्री. शास्त्रीबुवांनी श्रीस्वामीमहाराजांचे सांगणे हे व्याकरणशास्त्राच्या विरुद्ध आहे असे दाखविण्याचा प्रयत्न केला. श्रीस्वामीमहाराजांनी अत्यंत शान्तपणे व सौम्य भाषेत आपण केलेले समास व अर्थ बरोबर आहेत व तसे ते मानण्यास हरकत नाही, हे अनेक ग्रंथांचे आधार घेऊन श्री. शास्त्रीबुवांच्या नजरेला आणले. त्यामुळे श्री. शास्त्रीबुवांचे समाधान झाले आणि श्रीस्वामीमहाराजांच्या असामान्य विद्वत्तेबद्दल त्यांची खात्री पटली; पण त्यांचा अहंकार दुखावला गेला होता. श्रीस्वामीमहाराजांचे काहीतरी वैगुण्य दाखवून त्यांना निरुत्तर करण्याची श्री. शास्त्रीबुवा संधी पाहात होते.

श्री. शास्त्रीबुवा वेदान्ती असले; तरी ते कोरडे वेदान्ती होते. निर्गुण निराकार परमात्म्याची उपासना करणाऱ्या साधकाला सगुणाची कास धरूनच पुढे जावे लागते, पराभक्ती ही शुद्धज्ञानापोटीच निर्माण होते व शुद्ध ज्ञान आणि शुद्ध भक्ती एकच आहेत, या गोष्टी त्यांना अद्याप पटलेल्या नव्हत्या. एके दिवशी रात्री श्री. स्वामीमहाराज एकटेच आहेत असे पाहून ते त्यांना असे म्हणाले की,

" महाराज ! आपण संन्यासाश्रम घेतला आहे; मग आपण मूर्ति-पूजा का करता ? संन्याशाने मूर्तिपूजा करावी याबद्दल शास्त्राधार कोठे आहे ? मी गायत्री जप करतो; पण मूर्तिपूजेवर माझा बिलकूल विश्वास नाही. "

श्री. शास्त्रीबुवांचे हे म्हणणे श्रीस्वामीमहाराजांनी अगदी शान्तपणे ऐकून घेतले व ते त्यांना असे म्हणाले की, " तुमचे ठीक आहे शास्त्रीबुवा ! तुम्ही अधिकारी आहात. तुम्ही निर्गुणाची उपासना केली तरी चालेल. निर्गुण उपासनेचा अधिकार ज्याने मिळविला आहे त्याने सगुण उपासना केलीच पाहिजे असे नाही. आमची परिस्थिती थोडी वेगळी आहे. ही मूर्ती आम्हाला सोडून जात नाही. मग आम्ही पूजा करावी की करू नये ते तुम्हीच सांगा. "

श्रीस्वामीमहाराजांनी असे म्हणताच. श्री. शास्त्रीबुवांना अधिकच जोर चढला. ते त्यांना असे म्हणाले की, " मूर्ती सोडून जात नाही म्हणजे काय ? मूर्ती का कधी कोणाला धरून ठेवते ? आपण ह्या मूर्तीला सोडून द्या म्हणजे झाले ! "

श्री. शास्त्रीबुवांचे हे म्हणणे शांतपणे ऐकून श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, " बरे आहे. आपण म्हणता तसे करू. "

पुढे एके दिवशी श्रीस्वामीमहाराज श्री. शास्त्रीबुवांना असे म्हणाले की, " आपण मागे म्हणाल्याप्रमाणे आज आपण दोघे गंगेवर जाऊ व गंगाप्रवाहात ही मूर्ती सोडून देऊ. " श्री. शास्त्री-बुवांना श्रीस्वामीमहाराजांचे म्हणणे एकदम पटले व आपल्या म्हणण्याप्रमाणे ते मूर्तीचा त्याग करावयास तयार झाले आहेत हे पाहून त्यांना मनोमन खूप आनंदही झाला.

एवढे बोलणे झाल्यावर श्रीस्वामीमहाराज श्री. शास्त्रीबुवांना घेऊन श्रीगंगेवर गेले. त्यांनी श्रीगंगेवर जाताना बरोबर श्रीदत्त-मूर्ती घेतलीच होती. श्रीगंगेवर आल्यावर श्रीस्वामीमहाराजांनी

स्नान केले आणि ते श्री. शास्त्रीबुवांना असे म्हणाले की, "शास्त्रीबुवा ! हे पाहा ! आपल्या म्हणण्याप्रमाणे ही मूर्ती गंगाप्रवाहात सोडून देतो." असे म्हणून त्यांनी ती श्रीदत्तमूर्ती श्रीगंगाप्रवाहात सोडून दिली व ते तीरावर आले.

श्रीशास्त्रीबुवांना असे वाटले की, ती श्रीदत्तमूर्ती श्रीगंगेत बुडून प्रवाहाबरोबर वाहत जाऊन नाहीशी होईल; पण ती श्रीदत्तमूर्ती श्रीगंगेत बुडलीही नाही आणि ती प्रवाहाबरोबर वाहतही गेली नाही. हे पाहताच श्री. शास्त्रीबुवांना आश्चर्याचा पहिला धक्का बसला. धातूची एक जड मूर्ती पाण्यात न बुडता तरंगते हे पाहूनच त्यांच्या मूर्तिपूजेबद्दल असलेल्या अविश्वासाला धक्का बसला व ते डळमळीतही झाले. इतक्यात आणखी एक चमत्कार घडला. श्रीगंगाप्रवाहत समर्पण केलेली ती अंगुष्ठप्रमाण श्रीदत्तमूर्ती जणूकाही स्वतःहून पाण्यावरून चालत चालत तीरावर आली व ती श्रीस्वामीमहाराजांसमोर येऊन बसली. श्री. शास्त्रीबुवांनी हा चमत्कार आपल्या डोळ्यांनी पाहिला आणि त्यांची मती अगदी गुंग होऊन गेली. ते पार स्तिमित झाले. त्यांनी वाळूतच श्रीस्वामीमहाराजांना एक साष्टांग नमस्कार घातला व आपली सगुणोपासनेबद्दलची मते चुकीची होती, हे अगदी प्रांजळपणे कबूल केले. पुढे त्यांचा निर्गुणोपासनेबद्दलचा अहंकार पूर्णपणे लयाला जाऊन ते सगुणोपासनाही करू लागले.

ज्या सुखां नाहीं मिती। योग्या ठावी न जी स्थिती।
प्रेमळ भक्ताची स्थिती। ती गती अनिर्वाच्य॥
कोटी जन्मांचें सुकृत। जेव्हा मूर्तिमंत।
दैवें उदया येत। तेव्हां भक्त होईल॥
भक्तीचे प्रकार। जगीं असती चार।
त्यात ज्ञानोत्तर। भक्ती थोर जाणावी।

**जो हा ज्ञानी भक्त। भगवंतीं नित्यमुक्त।**
**तोची परम मुक्त। प्रेमरसासक्त सर्वथा ।।**

एक अलौकिक चमत्कार करून प्रत्यक्ष कृतीने सुगुणोपासनेची जी सत्यता श्रीस्वामीमहाराजांनी श्री. शास्त्रीबुवांना पटवून दिली, त्यामुळे त्यांच्या मनावरचे मायेचे पडदे बाजूला झाले. आपल्या भोवतालचे विश्व चैतन्यमय असल्याचा त्यांना साक्षात्कार झाला. पंढरीचा विठोबा श्री. नामदेवांशी बोलत असे व जनाबाईंबरोबर जाते ओढीत असे आणि मीरेचा गिरिधर तिच्या बरोबर प्रेमालाप करीत असे इत्यादि सर्व गोष्टी ज्याप्रमाणे सत्य आहेत त्याप्रमाणेच श्रीस्वामीमहाराजांबरोबर देव खरोखरच बोलतात अशी त्यांची खात्री झाली. त्याचप्रमाणे जितकी निर्गुणोपासना सत्य आहे तितकीच सगुणोपासनाही सत्य आहे, ही श्री. शास्त्रीबुवांची पक्की खात्री झाली व त्याचबरोबर त्यांच्या मनात श्रीस्वामीमहाराजांबद्दल आदर आणि श्रद्धा निर्माण झाली.

ब्रह्मावर्ताच्या या मुक्कामात पुढे ज्येष्ठ महिन्यात दशहरा आला. ज्येष्ठ शुद्ध प्रतिपदा ते ज्येष्ठ शुद्ध दशमीपर्यन्त हा उत्सव होत असून या दिवसात श्रीगंगेची पूजा करून उत्सव केला जातो. त्यावेळी पुराण सांगावे अशी श्री. शास्त्रीबुवांना इच्छा झाली. त्यामुळे त्यांच्या मनात असा विचार आला की, "श्रीस्वामीमहाराजांचे येथे श्रीराममंदिरात पुराण चालू आहे, अशा वेळी आपण दुसऱ्या कोणत्यातरी मंदिरात पुराण सांगावे हेच बरे." श्री. शास्त्रीबुवांनी आपला हा विचार श्रीस्वामीमहाराजांना सांगितला. तो ऐकताच श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "दुसऱ्या मंदिरात कशाला पुराण सांगता? येथे या मंदिरातच तुमचे दशहारातील पुराण होऊ द्या. आपणही ते ऐकू." असे सांगून श्रीस्वामीमहाराजांनी आपले नित्याचे श्रीराममंदिरातील पुराण

बंद करून तेथेच श्री. शास्त्रीबुवांना पुराण सांगण्यास सांगितले व आपण स्वतः दहा दिवस पुराण श्रवणास बसले. जर आपण आपले येथले पुराण चालू ठेवून श्री. शास्त्रीबुवांना अन्यत्र पुराण सांगण्यास सांगितले असते; तर श्रोतृवर्ग तिकडे निश्चित गेला नसता, याची श्रीस्वामीमहाराजांना खात्री होती. त्यामुळे त्यांनी श्री. शास्त्रीबुवांचे येथेच पुराण करविले. "समः सर्वोपकारकः।" या न्यायाने साधूंची दृष्टी सर्वत्र सम व त्यांची वृत्ती सर्वांवर उपकार करणारी अशीच असते. श्रीस्वामीमहाराज हे असे थोर साधू होते. त्याचप्रमाणे "अमानी मानदो" याप्रमाणे साधू हा स्वतः मान न घेणारा; पण दुसऱ्याला मान देणारा असतो. या एका कथेवरून श्रीस्वामीमहाराजांचे हे दिव्य गुण दिसून येतात. ज्यावेळी उपरोक्त सर्व अमूर्त गुण श्रीस्वामीमहाराजांच्या आश्रयाला येऊन समूर्त झाल्याने त्यांचे दर्शन आपणास घडले हे श्री. शास्त्रीबुवांना जाणवले त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांसारख्या लोकोत्तर अशा दिव्य पुरुषाचे अलौकिक चरित्र पाहून त्यांना स्वतःलाच धन्यता वाटली व आपण कृतकृत्य झालो हा विचार त्यांच्या मनात दृढ होऊन ते श्रीस्वामीमहाराजांचे निस्सीम भक्त झाले.

ब्रह्मावर्त येथे एक उत्तरदेशी ब्राह्मण श्रीस्वामीमहाराजांजवळ श्रीतुलसीरामायण वाचावयाची परवानगी मागू लागला. संगीत भजन करून तो श्रीतुलसीरामायण सांगणार होता. श्रीस्वामीमहाराजांना भजन अतिशय आवडत असे आणि संगीत भजनामध्ये तर ते तल्लीन होऊन जात असत. या ब्राह्मणाला त्यांनी श्रीतुलसीरामायणावर भजन करण्यास आनंदाने अनुमती दिली. सर्वांच्या मते हा कार्यक्रम रात्री व्हावा असे ठरले. त्यासाठी तबला व पेटीची सोय होईल असे त्याला कळविण्यात आले. ठरल्यावेळी सायंकालीन नित्य-

नेम आटोपल्यावर श्रीस्वामीमहाराज सर्व मंडळींबरोबर श्रीराम-मंदिरात येऊन उपस्थित झाले. तबला पेटीची सोय मंडळींनी केलीच होती. श्रीस्वामीमहाराजांना समोर बसलेले पाहून त्या ब्राह्मणाला फार आनंद झाला. त्याने श्रीतुलसीरामायण वाचण्यास आरंभ केला. प्रथम तो एक चौपायी मोठ्याने वाचीत असे व नंतर तीच चौपायी निरनिराळ्या रागात गाऊन दाखवीत असे. पेटी तबल्याची साथ उत्तम होती. गाताना तो स्वतः रंगून जात होता आणि श्रोतेसुद्धा तल्लीन होत होते. एकच चौपायी विविध रागात म्हणावयाला राग-दारीचे ज्ञानसुद्धा चांगलेच असावे लागते. चौपायी गाऊन झाल्यावर त्या चौपायीचा कथानकाला धरून त्याने अर्थ सांगितला व नंतर त्याच चौपायीचे वेगवेगळे पाच सहा अर्थ सांगितले. अशा तऱ्हेने बारा वाजेपर्यन्त त्याने सर्वांना मंत्रमुग्ध करून ठेवले. एकच चौपायी वेगवेगळ्या रागात म्हणणारा दुसरा गायक आपण पाहिला नाही असे सर्वजण म्हणू लागले. श्रीस्वामीमहाराजांनाही फार आनंद झाला. शेवटी त्या ब्राह्मणाची योग्य संभावना करून श्रीस्वामी-महाराजांनी त्याला परत पाठविले.

या वर्षीचा श्रीदत्तजयंतीचा उत्सव पार पडल्या नंतरची ही गोष्ट आहे. एकदा श्रीस्वामीमहाराज ध्यानस्थ बसले असताना त्या गावात प्लेग सुरू होणार याबद्दल त्यांना एक चमत्कारिक दृश्य दिसले. प्रथम काही पिशाच्चे दिसली. त्या पिशाच्चांनी नंतर यवनरूप धारण केले व ते आपल्या पदरातील काही पदार्थ सर्व गावभर फेकण्याचे काम करीत आहेत असे दृश्य त्यांना दिसले. त्यांपैकी एक जण श्रीस्वामीमहाराजांपुढे आला व तो त्यांना असे म्हणाला की, " उद्या-पासून या गावावर आमचा हल्ला होणार आहे. आपण हे गाव सोडून दुसरीकडे निघून जावे. " हे ऐकताच श्रीस्वामीमहाराजांनी त्याला असे उत्तर दिले की, " ज्यांच्या आज्ञेने आपण येथे आलो त्यांची

आज्ञा झाल्याशिवाय आपणास येथून हालता येत नाही." इतके बोलून श्रीस्वामीमहाराज स्तब्ध झाले.

याप्रमाणे श्रीस्वामीमहाराजांचे व त्या पिशाच्चाचे बोलणे चालले असता तेथे एक ग्रामस्थ बाई उभी होती. तिने ते सर्व बोलणे ऐकले. त्यानंतर श्रीस्वामीमहाराज पुन्हा ध्यानस्थ बसल्यावर ती बाई गावात परत आली व तिने सर्व ग्रामस्थ मंडळींना देवळात घडलेला सर्व प्रकार सांगून शेवटी ती सर्वांना असे म्हणाली की, "ईश्वराच्या अवकृपेमुळे या गावात लवकरच प्लेग सुरू होणार आहे; तरी सर्वांनी गावाबाहेर राहण्यास जावे." ही बातमी वाऱ्यासारखी गावात पसरली. सगळी-कडे घबराटीचे वातावरण निर्माण झाले. जो तो गाव सोडून पळून जाऊ लागला. काही लोकांनी मात्र घरादाराच्या व पैशाच्या लोभाने गावातच राहावयाचे ठरविले. त्यानंतर लवकरच गावात साथ सुरू झाली. पटापट उंदीर मरून पडू लागले. गावात राहिलेल्यांपैकी कोण माणूस मृत्यूचे भक्ष होणार ते श्रीस्वामीमहाराज अगोदरच सांगत असत; पण श्रीस्वामीमहाराजांचे न ऐकता जे लोक लोभाने घर न सोडता गावातच राहत ते अखेर प्लेगला बळी पडत असत. अशा तऱ्हेने दहावीस माणसे मेली. पुढची पाळी श्री. आप्पा निगडी-कर यांची आहे असे श्रीस्वामीमहाराजांनी जाणले; पण श्री. आप्पांना याची स्पष्ट जाणीव करून दिल्यास ते घाबरून जातील म्हणून श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना मृत्यूची लक्षणे तेवढी सांगून ठेवली. हीच लक्षणे श्रीस्वामीमहाराजांनी "श्रीदत्तमाहात्म्य" या ग्रंथात पुढीलप्रमाणे लिहून ठेवली आहेत. त्यात ते असे म्हणतात की—

"तेलानें माखून। स्वप्नीं नर येऊन। जया देई दर्शन। तया मरण जवळी॥३६.३९॥ स्वप्नीं कराल विकट। पुरुष दिसे निकट। दांत खाई कटकट। मारी उद्भट होऊनी॥४३॥ हातीं शस्त्र घेऊनी। अथवा मारी पाषाणांनीं। तयाचे संनिधानीं। मृत्यू येऊनी

राहिला ॥ ४४ ॥ दुसऱ्याचिया नेत्रीं। पाहतां न दिसे जरी। आपुली बाहुली तरी। मृत्यू दूरी नाहींच ॥ ४८ ॥ इंद्रधनू रात्रीस। दिवा देखे भगणास। मृत्यू सत्वर तयास। गांठी खास जाणावें ॥४९॥

पुढे श्री. आप्पा निगडीकरांना प्लेगची गाठ आली आणि ताप येऊ लागला. दिवसाढवळ्या गंधर्व नगरे दिसू लागली. रात्रीच्या वेळी आकाशात इंद्रधनुष्य दिसू लागले. तापामध्ये चमत्कारिक स्वप्ने पडू लागली. स्वप्नामध्ये एक भयानक चिडलेला सर्प फुत्कारत आपल्या अंगावर धावून येत आहे व आपल्याला दंश करीत आहे असे त्यांना दिसले व ते भीतीने किंचाळत जागे झाले. त्यांच्या अंगात ताप असल्यामुळे या विचित्र स्वप्नांचा व देखाव्यांचा त्यांना प्रथम अर्थ कळेना; परन्तु ज्वर थोडा उतरल्यावर त्यांच्या असे लक्षात आले की, श्रीस्वामीमहाराजांनी सांगितलेली ही सर्व मृत्यूची लक्षणे आहेत. आपला अंतकाळ समीप आला आहे हे ओळखून त्यांनी श्रीस्वामीमहाराजांना जवळ बोलाविले व आपणास संन्यास घ्यावयाची इच्छा आहे असे त्यांनी त्यांना सांगितले. श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना ताबडतोब आतुर संन्यास दिला व पद्मासन घालून बसविले. नंतर तीन वेळा त्यांच्याकडून प्रणवोच्चार करवून घेतला. शेवटी दीर्घ प्रणवोच्चार करीत असतानाच श्री. आप्पा निगडीकरांचे प्राणोत्क्रमण झाले. योग्यांनासुद्धा दुर्मिळ असे मरण त्यांना लाभले.

डॉ. ताटके यांनी ज्यांचे जिव्हाबंधछेदन शस्त्रक्रियेने केले होते त्यांपैकी श्री. आप्पा निगडीकर व श्री. व्यंकटराव स्टेशनमास्तर यांचे जिव्हाबंधछेदन असफल झाले होते. श्रीस्वामीमहाराजांनी या दोघांनाही आपल्या बरोबर न येता हवा मानवेल अशा ठिकाणी जाऊन राहण्याची आज्ञा केली होती. आज्ञाभंग करून दोघांनीही श्रीस्वामीमहाराजांबरोबर राहण्याचा अट्टाहास धरला. काही जणांचे असे म्हणणे आहे की, श्रीस्वामीमहाराजांची आज्ञा न पाळल्यामुळे

श्री. आप्पा निगडीकर यांना प्लेगाने मृत्यू आला. ते काहीही असले; तरी या संबंधात श्रीस्वामीमहाराजांनी एका भक्ताला लिहिलेले खालील पत्र उद्‌बोधक असून त्यात श्री. आप्पा निगडीकर यांच्या मृत्यूबद्दल त्यांनी प्रशंसोद्‌गार काढले आहेत. ते पत्र असे आहे.

"पौष व. ७ शके १८२४. चार वर्षें बरोबर आप्पा या नावाचे कर्नाटक ब्राह्मण होते. त्यांनीं साबेसुबेपणीं संन्यास घेऊन तात्काळ तीन वेळ प्रणव म्हणून देहोत्सर्ग केला. हें मरण योग्यांनासुद्धा दुर्मीळ. कळावें. नारायण."

त्यानंतर संन्यासधर्माला अनुसरून श्री. आप्पा निगडीकरांच्या देहाचे विसर्जन श्रीगंगेत करण्यात आले. श्री. आप्पा निगडीकरांच्या देहाचे विसर्जन करून श्रीस्वामीमहाराज मंदिरात आल्यावर त्यांनाही प्लेगने गाठले. परन्तु हा रोग घेऊन येणाऱ्या पिशाच्चांना त्यांनी अगोदरच असे सांगितले होते की, "आपण उपास्य देवतेच्या आज्ञेशिवाय हे गाव सोडून जाणार नाही." त्यामुळे जरी त्यांना प्लेगने गाठले; तरी त्या रोगाचे येथे काही चालले नाही हे निराळे. येथे आपली काही डाळ शिजत नाही असे जेव्हा प्लेगच्या देवतेला कळून चुकले तेव्हा शेवटी तो रोग श्रीस्वामीमहाराजांच्या मुखावाटे निघून गेला व त्यांची प्रकृती पूर्ववत् सुधारली.

प्लेगच्या साथीत बरेच लोक गाव सोडून दूर राहावयास गेले होते. त्यामुळे श्रीस्वामीमहाराजांभोवतालची वर्दळ कमी झाली होती. त्यावेळी देवांची अशी आज्ञा झाली की, "संस्कृतमध्ये समश्लोकी गुरुचरित्र करावे." ही आज्ञा झाली तेव्हा श्रीस्वामीमहाराजांच्या अंगात प्लेगचा ताप होता. एवढा मोठा ग्रंथ आपणाकडून कसा पुरा होईल अशी शंका त्यांच्या मनात उत्पन्न झाली. तेव्हा देवांची पुन्हा अशी आज्ञा झाली की, "सध्या रोगामुळे

गावातील मंडळी बाहेर आहेत व पाठ वगैरे बंद आहेत. तरी दररोज दोनशे ते अडीचशे ओव्या सहज होतील. महिना सव्वा महिन्यामध्ये सहा हजार सातशेपन्नास ग्रंथसंख्या पूर्ण होईल." याप्रमाणे रचना कशी असावी वगैरे सर्व सांगून ग्रंथ कसा पूर्ण करावयाचा ते देवांनी सांगितले. मूळ ग्रंथाच्या ओव्या ७३०० इतक्या आहेत. असे असताना हा ग्रंथ समश्लोकी कसा होईल वगैरे शंका श्रीस्वामीमहाराजांच्या मनात आल्यावर कोणकोणत्या अध्यायातील ओव्या अर्थानुसंधानास अडचण न येता कमी करता येतील, तेही देवांनी सांगितले व ग्रंथाची सुमारे ६७५० इतकी श्लोकसंख्या दाखविली. गावातूनच एक हस्तलिखित श्रीगुरुचरित्राची एकवन्न अध्यायी पोथी मिळवून श्रीस्वामीमहाराजांनी समश्लोकी गुरुचरित्र हा ग्रंथ पंचेचाळीस दिवसात पूर्ण केला. या ग्रंथाची भाषा सोपी व रसाळ आहे. त्यामुळे ग्रंथ उत्कृष्ट झाला आहे. या ग्रंथासंबंधी श्रीस्वामीमहाराजांनी लिहिलेले एक पत्र उपलब्ध झाले आहे. ते पुढीलप्रमाणे आहे.

"ब्रह्मावर्त, चैत्र वद्य १३–१८२५. ब्रह्मावर्तास असतांना गांवांत प्लेग असल्यामुळें सर्व लोक गांवाबाहेर गेले. कांहीं वृद्ध मात्र गांवांत राहिले होते. त्यावेळीं तेथें समश्लोकी करण्याचें सांगणें झालें व तेथें एक लेखी जुनें पुस्तक ५१ अध्यायांचें होतें. त्यावरून संस्कृत करण्याचें सांगणें झालें. हें मोठें काम कधीं व कसें संपावें असें त्यावेळीं मनांत येतांच पुनः सांगणें झालें कीं, तूर्त पाठ वगैरे देण्याचें नसल्यामुळें २०० ते २५० श्लोक होऊन महिना सव्वा महिन्यांत ग्रंथ पुरा होईल. असें म्हणून सुमारें ६७५० श्लोक संख्या दाखविली. नंतर या गुरुचरित्राची जास्त संख्या पाहून ६ । २६ । ३६ । ३७ । ४१ । ४२ या अध्यायांतील ओव्या अर्थानुसंधानास अडचण न येणाऱ्या कमी करून समश्लोकी केल्यावर संख्या भरते. तरी तसें करावें काय अशी प्रार्थना केल्यावर तसें करण्याची आज्ञा झाली. त्याप्रमाणें ग्रंथ

झाला. आतां कमी जास्त करतां येत नाहीं. नारायण."

या ग्रंथाच्या शेवटी दोन श्लोकात ग्रंथाची रचना कशी झाली ते लिहिले आहे. त्यात श्रीस्वामीमहाराजांनी असे म्हटले आहे की, "प्रत्येक दिवशीं शंभरपेक्षांही जास्त श्लोक झाले. त्यांतच पांच दिवस तर दोनशेंपेक्षाही अधिक श्लोक तयार झाले आहेत." वास्तविकपणे एका दिवसात नुसते दोनशे श्लोक लिहून काढणेसुद्धा एखाद्याला अशक्य आहे; मग नवीन श्लोक तयार करून लिहिणे ही मानवी शक्तीच्या पलीकडची गोष्ट आहे; परन्तु रोजचे व प्रासंगिक कार्यक्रम, आजारीपण अशी एकंदर स्थिती असताना इतकी श्लोकरचना रोज होत असे. हे पाहिले म्हणजे अशा तऱ्हेच्या असाध्य गोष्टी श्रीस्वामीमहाराजांना सहज सुसाध्य होत; कारण जी शक्ती त्यांच्याकडून हे कार्य करून घेत होती ती शक्ती भगवान् श्रीदत्तात्रेयांची होती, याची खात्री पटते. याच दिवसांमध्ये श्रीस्वामीमहाराजांनी "लघुमननसार" या नावाचा वेदान्तपर ग्रंथही लिहिला.

श्री. आप्पा खाडिलकर हे दक्षिणी ब्राह्मण ब्रह्मावर्त येथे राहत असत. एकदा त्यांना रक्ताची हगवण सुरू होऊन ते फार आजारी पडले. त्यांना औषधाचाही उपयोग होईना. दिवसेंदिवस ते अशक्त होत चालले. कोणीतरी श्री. खाडिलकरांच्या आईला असे सांगितले की, "तुम्ही पंचपक्वान्नांचे जेवण करून ते मुलावरून ओवाळून कोणाला तरी खावयाला घाला, म्हणजे तुमचा मुलगा बरा होईल.' श्री. खाडिलकर मंडळी वारंवार श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला जात असत. त्यामुळे त्यांचा श्री. व्यंकटराव स्टेशनमास्तर वगैरे श्रीस्वामीमहाराजांच्या सर्व भक्तांशी चांगला परिचय झाला होता. के दिवशी श्री. खाडिलकरांच्या आईने पंचपक्वान्नांचे जेवण तयार करून ते मुलावरून उतरून श्री. व्यंकटरावांना भिक्षेला बोलावून त्यांना खावयाला दिले. खरोखरच त्या दिवसापासून श्री. आप्पा

खाडिलकरांना आराम वाटू लागला; पण श्री. व्यंकटरावांना मात्र तो आप्पांचा रोग जडला आणि ते दिवसेंदिवस अशक्त होत चालले. श्रीस्वामीमहाराजांच्या कानावर जेव्हा ही गोष्ट गेली तेव्हा त्यांनी श्री. व्यंकटराव यांना असे सांगितले की, "तू कोणाकडचा तरी उतारा खाल्ल्यामुळे तुझी अशी अवस्था होऊन तुला ही व्यथा जडली आहे. यातून तू बरा होशील असे वाटत नाही." श्रीस्वामीमहाराजांच्यां तोंडचे हे शब्द म्हणजे ब्रह्मवाक्यच असल्यामुळे ते कधीच खोटे ठरणार नाही याची श्री. व्यंकटरावांना खात्री होती; पण जिवाची अशा कोणाला सुटली आहे का? श्रीस्वामीमहाराजांच्या नकळत त्यांनी पुष्कळ इलाज केले; पण त्यांचा काही उपयोग झाला नाही. पुढे श्री. व्यंकटरावांची रक्ताची हगवण बंद झाली; पण त्यांना दमा सुरू झाला आणि या दम्यामध्येच त्यांचा अंत झाला. अशा रीतीने कित्येक वर्षे श्रीस्वामीमहाराजांच्या निकट सहवासात असलेल्या या दोन भक्तांनी श्रीस्वामीमहाराजांच्या सान्निध्यात देह ठेवले. त्या दोघांच्या जीविताचे सोने झाले.

शके १८२४ च्या वैशाख महिन्याच्या अखेरीस श्री. सीतारामपंत श्रीस्वामीमहाराजांना भेटावयाला ब्रह्मावर्त येथे आले. त्यावेळी त्यांच्याकडून श्रीस्वामीमहाराजांना ती. मातुश्रींचे देहावसान झाल्याचे कळले होते. ती. मातुश्रींच्यामागे श्रीस्वामीमहाराजांचे पूर्वाश्रमातील दुसरे बंधू श्री. हरिभट ऊर्फ श्री. दत्तोबा हे माणगावच्या श्रीदत्तमंदिराची व घरची सर्व व्यवस्था पाहत असत. श्रीस्वामीमहाराजांनीं माणगाव सोडल्यावर तेथील वैभव नष्ट झाले होते. मंदिरातील नेहमीचे कार्यक्रम कसेबसे उरकता उरकता श्री. हरिभटांना कष्ट पडत असत. अशा परिस्थितीमध्ये श्री. हरिभट श्रीस्वामीमहाराजांना भेटण्यासाठी ब्रह्मावर्ताला आले होते. या भेटीमध्ये श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना असे सांगितले की, "तुमच्याकडे

आलेल्या कोनकरांच्या मिळकतीस शाप असल्यामुळे त्या मिळकतीची अभिलाषा न धरता ती तुम्ही सोडून द्या. मातुश्री निवर्तल्यामुळे तेथील पुण्याईसुद्धा संपलेली आहे. म्हणून माणगावला आता काही राहणार नाही." या संदर्भात मागील एका प्रसंगाची आठवण येते. श्रीस्वामीमहाराजांचे वडिलार्जित घर मोडकळीस आल्यावर त्याच ठिकाणी त्यांनी नवीन घर बांधले. घराच्या वास्तुशांतीच्या वेळी मुहूर्त टळेपर्यन्त श्रीस्वामीमहाराजांच्या सौभाग्यवती वास्तुशांतीच्या विधीसाठी आल्या नाहीत. त्यामुळे वास्तुशांती श्री. हरिभटांकडून करवून घेऊन श्रीस्वामीमहाराज असे म्हणाले होते की, "या घरात कोणी नांदणार नाही, येथे धर्मशाळा होईल." ही मिळकत शापित होती, म्हणून तर नसेल ना श्रीस्वामीमहाराजांनी त्यावेळी अशी वाणी उच्चारली होती ? काही असो; पण श्रीस्वामीमहाराजांच्या उपदेशाप्रमाणे श्री. हरिभट वागले नाहीत आणि शेवटी त्याचा व्हावयाचा तोच परिणाम झाला. माणगावमध्ये श्री. टेंब्यांचा वंश राहिला नाही. श्री. हरिभटांच्या मागे त्यांचे जामात श्री. घुपकर ही व्यवस्था पाहत होते.

प्लेगच्या साथीमुळे तीन महिने लोक गावाबाहेरच होते. पुढे प्लेग ओसरू लागल्यावर शके १८२५ च्या चैत्र महिन्यापासून लोक पुन्हा गावात येऊ लागले. लोक जमल्यावर मंदिरातील श्रीस्वामीमहाराजांचे इतर सर्व कार्यक्रम पूर्वीप्रमाणेच सुरू झाले. पुन्हा अध्यापन, रोग निवारण, ज्योतिष सांगणे, कीर्तन व पुराण यांमध्ये श्रीस्वामीमहाराजांचा सर्व वेळ जाऊ लागला. आता तर दर्शनाला येणाऱ्यांची संख्या अधिकच वाढली होती; कारण श्रीस्वामीमहाराजांनी प्लेगच्या साथीचे भाकित अगोदरच केले होते व श्रीस्वामीमहाराज गावात राहत असतानाही प्लेग त्यांचे काहीसुद्धा करू शकला नाही,

या सर्व गोष्टी आता सर्वतोमुखी झाल्या होत्या. प्लेगसारखे अरिष्ट निवारण करण्यासाठी हरिभजन हाच एक उपाय आहे,असे श्रीस्वामी-महाराज सांगत. श्रीस्वामीमहाराजांच्या दिव्य सामर्थ्याचा प्रभाव पाहून सर्व लोकांचा त्यांच्या सांगण्यावर विश्वास बसला आणि लोकांनी भजनाचे सप्ताह सुरू केले. सर्वजण निष्ठेने अहोरात्र भजन करीत असत. सुभेदार वगैरे श्रीमंत मंडळीही भजनाला येऊ लागली व उत्सवासाठी द्रव्य साहाय्य करू लागली. श्रीस्वामीमहाराजांच्या उपदेशाप्रमाणे तेथे लागोपाठ सात भजन सप्ताह झाले. प्रत्येक सप्ताहासाठी श्रीस्वामीमहाराजांनी स्वतः पुढीलप्रमाणे नाममंत्र लिहून दिले होते.

पहिल्या सप्ताहासाठी – " शिवहर शंकर । गौरी शंकर ।। "
दुसऱ्या सप्ताहासाठी – " हरे राम हरे राम राम राम हरे हरे ।।
हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे ।। "
तिसऱ्या सप्ताहासाठी – " श्रीपादश्रीनृसिंहस्वामी ।
श्रीमद्दत्तात्रेयमौनी ।। "
चौथ्या सप्ताहासाठी – " गणेश गौरीहर नंदन ।
विघ्न विनाशक गजानन ।। "
पाचव्या सप्ताहासाठी– " हरिहर गणपति भास्करशक्ति ।
स्वरूप ईशो वरदो जयति ।। "
सहाव्या सप्ताहासाठी– " जय पुरुषोत्तम । शरणद सत्तम ।। "
सातव्या सप्ताहासाठी– " शिवहरशंकर । गौरीशंकर ।। "

वरीलप्रमाणे सात सप्ताह पूर्ण झाल्यावर " दिगंबरा दिगंबरा श्रीपादवल्लभ दिगंबरा " या नाममहामंत्राचा एक सप्ताह झाला. नंतर दशाहारामध्ये श्रीभागीरथीच्यासाठी " भागीरथी जय पावन गंगे। जान्हवी तारय पातकभंगे।। " या मंत्राचा नववा सप्ताह झाला. प्रत्येक सप्ताह झाल्यावर सप्ताहाच्या सांगतेसाठी शेकडो

रुपये खर्च करून ब्राह्मणादि सर्व लोकांना मुक्तद्वार भोजन झाले.

अनन्तकोटी ब्रह्माण्डनायक श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य भगवान् श्रीवासुदेवानन्दसरस्वती श्रीदत्तात्रेयस्वामीमहाराज यांचा अखण्ड जयजयकार असो. ज्याप्रमाणे "श्रीगुरुः परमकारणभूता शक्तिः।" म्हणजे श्रीगुरू ही परमकारणभूत, सर्वकारणभूत व सर्वप्रधान अशी शक्ती आहे, असे म्हणून श्रीगुरूंचा भावनोपनिषदात गौरव केला आहे, "श्रीगुरुनाथस्य सर्वकारणकारणम्।" म्हणजे श्रीगुरू हे सर्व कारणांचे व त्यांच्या परिणामांचे कारण आहेत, असे म्हणून काश्यपसूत्रात त्यांची महती वर्णन केली आहे, "अस्मिन्मार्गे सर्वश्रेयोमूलभूतो गुरुरेव।" म्हणजे योगमार्गामध्ये सर्व प्रकारे कल्याण करणारे मूळ गुरूच आहेत असे म्हणून गोरक्षसिद्धान्तसंग्रहात त्यांचे अपरंपार श्रेष्ठत्व कथन केले आहे व "गुरुरुपायः।" म्हणजे गुरू हेच श्रेष्ठ उपाय अर्थात् साधन होत असे म्हणून शिवसूत्रात त्यांचा अलौकिक महिमा गाईला आहे, त्याप्रमाणेच श्रीस्वामीमहाराजांचे एकान्तिक परमभक्त, श्रेष्ठ शिष्य व त्यांचे पूर्वाश्रमातील धाकटे बधू परमपूजनीय श्रीसीतारामहाराज यांनी आपले सद्गुरू श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानन्दसरस्वतीस्वामीमहाराज हे मोक्षदाते, कल्पतरू व भवाब्धीला पार करणारे उतारू असून असे अघटित कृत्य त्यांच्याशिवाय कोणीही करण्यास समर्थ नाही, हे सांगून "मुख्य वासुदेव गुरु" असा महासिद्धान्त प्रस्थापित करताना जी स्तुती केली आहे, ती त्यांच्याच शब्दात प्रस्तुत करून, आपल्या भक्तश्रेष्ठावर जशी आपण कृपा केली तशी आमच्यावरही करून, आमच्याही हृदयात आपण सर्व गुरूंचे मुख्य गुरू आहात अशी दिव्य धारणा उपस्थित करून, आम्हाला धन्य व कृतार्थ करा, अशी अत्यंत शरणागतीपूर्वक त्यांच्या परमकोमल व परमपवित्र चरणी प्रार्थना करू.

## अभंग

गुरु माझा मोक्षदाता। श्रुती गर्जती सर्वथा ॥ १ ॥
गुरु माझा कल्पतरू। भवाब्धीला हा उतारू ॥ २ ॥
गुरु एक माता पिता। दुःख शोक भयहर्ता ॥ ३ ॥
गुरुला जे शरण जाती। ऋद्धिसिद्धि दासी होती ॥ ४ ॥
गुरु देवाचाही देव। भक्तांलागी त्याचा ठाव ॥ ५ ॥
मुख्य वासुदेव गुरु। सीतारामा हा निर्धारु ॥ ६ ॥

## – अध्याय बारावा –

नान्यस्त्राता नापि दाता न भर्ता। त्वत्तो देव त्वं शरण्योऽकहर्ता।
कुर्वात्रेयानुग्रहं पूर्णराते। घोरात्कष्टादुद्धरास्मान्नमस्ते ॥

चातुर्मास तेरावा – शके १८२५ – इ. स. १९०३ – ब्रह्मावर्तः–

श्रीस्वामीमहाराजांना श्रीक्षेत्र ब्रह्मावर्तामध्ये येऊन आता एक वर्ष होऊन गेले होते. "नित्यश्रीर्नित्य मंगलम्" या न्यायाने सर्व मंडळींचा काळ मोठ्या आनंदात जात होता. अशातच आषाढ मास उजाडला. त्यामुळे शके १८२५ च्या आषाढ पौर्णिमेस व्यासपूजन करून श्रीस्वामीमहाराजांनी तेरावा चातुर्माससुद्धा ब्रह्मावर्त येथेच केला. या वर्षीही नेहमीचे कार्यक्रम चालू होतेच. श्रीस्वामीमहाराजांकडे संसारातील त्रितापाने पोळलेले लोक वारंवार येत असत. श्रीस्वामी-महाराज सर्वांना उपाय सांगत व पुष्कळ प्रसंगी ते स्वतःच उपाय करीत असत. एकदा गावात एक बाई प्रसूतीच्या वेळी अडली. सुईणीने आपल्या बुद्धीप्रमाणे करावयाचे ते सर्व प्रयत्न केले. काही तात्कालिक औषधेही दिली; पण मूल आडवे झाले होते. शेवटी परि-स्थती निकराला आली. मूल आणि बाळंतीण ही दोघेही जावयाची

भीती निर्माण झाली. शेवटी बाईची वडीलधारी माणसे श्रीराम-मंदिरामध्ये श्रीस्वामीमहाराजांकडे धावली. त्यांनी सर्व हकीकत त्यांच्या कानावर घातली व ते सर्वजण रडू लागले. श्रीस्वामी-महाराजांनी सर्वांना आश्वासन देऊन काही मंत्रप्रयोग केला व त्या बाईंची तात्काळ सुटका केली. बाई व मुलगा सुखरूप आहेत असे पाहून त्या घरातील सर्वांना आनंद झाला.

वरील प्रकारच्या कितीतरी गोष्टी नित्य घडत असल्यामुळे श्रीस्वामीमहाराजांच्या कीर्तीचा सौरभ, काशी, प्रयाग या क्षेत्रां-पर्यन्त कधीच जाऊन पोहोचला होता. काशी हे विद्वानांचे माहेर-घर आहे. येथे विद्वत्ता चिरंतन वास करते. त्यावेळी येथे कितीतरी विद्वान् व उच्च दर्जाची साधक मंडळीही होती. श्रीस्वामीमहा-राजांच्या संगतीचा लाभ मिळावा अशी येथील विद्वान् मंडळींची इच्छा होती. त्यांनी श्रीस्वामीमहाराजांना काशीला येण्यासाठी आग्रहाची पत्रे पाठविली; पण "उपास्य देवतेच्या आज्ञेवाचून आपणास कोठेच जातां येत नसल्याने येता येत नाहीं." एवढेच श्रीस्वामीमहाराजांनी सर्वांना उत्तर पाठविले. त्यावेळी काशीचे एक अधिकारी संन्यासी प. प. श्रीशांताश्रमस्वामीमहाराज यांना श्रीस्वामीमहाराजांच्या भेटीची एवढी तळमळ लागली होती की, ते स्वतःच काशीहून ब्रह्मावर्ताला आले.

श्रीशांताश्रमस्वामीमहाराज यांना त्यांच्या श्रीसद्गुरुनाथ-महाराजांनी वयाच्या १५ व्या वर्षी संन्यासदीक्षा दिली होती व त्यांना श्रीमद्भागवताची पोथी देऊन त्याचे अखंड सप्ताह करण्यास सांगितले होते. याशिवाय रोज श्रीमद्भगवद्गीतेचा एक अध्याय आणि श्रीविष्णुसहस्रनामाचा एक पाठ करण्यास सांगितले होते. पुढे श्रीशांताश्रमस्वामीमहाराजांनी आपल्या श्रीसद्गुरुनाथमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे श्रीमद्भागवताचे ४० वर्षे अखंड सप्ताह केले.

त्यांनी केलेल्या या बलवत्तर उपासनेमुळे भगवान् श्रीगोपालकृष्ण-नाथमहाराज त्यांच्यावर अत्यंत प्रसन्न झाले होते. त्यामुळे त्यांनी केलेला श्रीमद्‌भागवताचा अर्थ ऐकण्यासाठी काशीतील षट्‌शास्त्री पंडित त्यांच्या चरणांपाशी येऊन बसत असत. त्या सर्व पंडितांची अशी खात्री झाली होती की, श्रीशांताश्रमस्वामीमहाराजांच्या मुखातून स्वत: भगवान् श्रीगोपालकृष्णनाथमहाराजच अर्थ सांगत असतात. सर्व पंडितांची ही धारणा अगदी यथार्थ होती; कारण त्यांनी सांगितलेला श्रीमद्‌भागवताचा अर्थ इतका अपूर्व असे की, तो ऐकताच त्यांना जो आनंद होत असे तो अलौकिक व अवर्णनीय असा असे व त्यामुळे त्यांची जणू काही समाधीच लागत असे. शिवाय श्रीशांताश्रमस्वामीमहाराजांना स्वत: भगवान् श्रीकृष्णनाथमहाराज रोज पहाटे हाक मारून उठविण्यापासून झोपेपर्यंन्तची सर्व देखभाल करतात हे सर्वविश्रुत होते.

अशारीतीने मोठे उपासक, ज्ञानी व ज्यांनी भागवताचे अखंड सप्ताहरूपी तप केले आहे असे अधिकारी पुरुष श्रीशांताश्रमस्वामी-महाराज ज्यावेळी ब्रह्मावर्ताला श्रीराममंदिरात येऊन पोहोचले त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांचे अध्यापन चालू होते. विद्यार्थ्यांमध्ये काशी, नाशिक वगैरे दूरदूरच्या ठिकाणचे विद्यार्थी होते. श्रीस्वामी-महाराजांची अध्यापन करण्याची पद्धत पाहून श्रीशांताश्रमस्वामी-महाराजांना फार आनंद झाला. पाठ चालू होता. श्रीस्वामीमहा-राजांनी श्रीशांताश्रमस्वामीमहाराजांना पाहिले. दोघांच्याही नजरा एकमेकांना मिळाल्या. दोघाच्याही नेत्रांतून अश्रुधारा वाहू लागल्या. दोघेही एकमेकांकडे पाहत होते आणि दृष्टीनेच एकमेकांशी बोलत होते. शब्दांनी व्यक्त होईल असे ते बोलणे नव्हते. त्यांचे बोलणे शब्दापलीकडचे होते. त्या दोघांचा असा मूक संवाद काही वेळ झाला. मग श्रीस्वामीमहाराजांनी उठून त्यांचे यथोचित स्वागत

केले. तेथील वातावरणात आणि श्रीस्वामीमहाराजांच्या संगतीमध्ये श्रीशांताश्रमस्वामीमहाराज एवढे रमले की, ब्रह्मावर्त सोडून पुन्हा काशीला परत जावे असे त्यांना वाटेना. त्यामुळे ते चार महिने श्रीस्वामीमहाराजांच्या संगतीमध्ये राहिले.

कार्तिक महिन्यात श्रीस्वामीमहाराजांनी श्रीसप्तशतीगुरुचरित्रसार या सातशे श्लोकी प्राकृत ग्रंथाची रचना केली. या ग्रंथात श्रीगुरु-चरित्रातील कथा साररूपाने दिल्या असून त्यातील प्रत्येक ओवीचे तिसरे अक्षर वाचल्यावर श्रीमद्‌भगद्‌गीतेतील पंधरावा अध्याय तयार होतो. श्रीगुरुचरित्राप्रमाणे हा ग्रंथ सुद्धा प्रासादिक आहे.

श्रीस्वामीमहाराजांकडे अध्ययनासाठी आलेल्या मंडळींमध्ये पालघरचे श्री. विष्णुपंत पटवर्धन नावाचे एक ब्राह्मण गृहस्थ होते. त्यांचे इंग्रजी शिक्षणही झाले होते. ऐन तारुण्यात त्यांची पत्नी निव-र्तल्यामुळे त्यांना संसाराबद्दल विरक्ती निर्माण झाली होती. त्यावेळी त्यांचे वय तिशीच्या जवळपास होते. वैराग्याच्या झटक्यामध्ये त्यांनी गृहत्याग केला व तीर्थाटण करीत ते काशीला येऊन पोहोचले. काशीमध्ये त्यांच्या कानावर श्रीस्वामीमहाराजांची कीर्ती आली. त्यामुळे त्याच्या दर्शनासाठी ते ब्रह्मावर्ताला आले. त्यांना मुळातच चांगले कीर्तन करता येत होते. श्रीस्वामीमहाराजांकडे ते आणखीन कीर्तन शिकले व स्वतंत्रपणे कीर्तन करू लागले. ते भजनही उत्तम म्हणत असत. श्री. विष्णुपंतांचा स्वभाव प्रेमळ आणि मनमिळाऊ असल्यामुळे श्री. सीतारामपंत वगैरे मंडळींमध्ये त्यांचे उठणे बसणे होत असे. खरे वैराग्य प्राप्त झाल्याशिवाय व जगातील यच्चयावत् गोष्टींबद्दलचा मोह नष्ट झाल्याशिवाय माणसाला षड्रिपूंवर विजय मिळविणे अशक्य आहे, हे नितान्त सत्य आहे. षड्रिपूंच्या दमना-साठी शरीराला कितीतही कष्ट दिले; तरी जोपर्यंन्त माणसाचे मन त्याच्या स्वाधीन होत नाही तोपर्यंन्त षड्रिपू किंवा अष्टपाश त्याला

सोडीत नाहीत. पत्नीविरहाच्या शोकाने श्री. विष्णुपंतांनी घर सोडले, तीर्थयात्रा केल्या; पण कामक्रोधादि षड्रिपूंना ते सोडू शकले नाहीत.

श्री. विष्णुपंत पटवर्धन एका रात्री कीर्तन करण्यास उभे राहिले. समोर श्रीस्वामीमहाराज, श्री. सीतारामपंत वगैरे मंडळी बसली होती. कीर्तन ऐन रंगात आले असताना कीर्तनाला आलेल्या एका सुंदर स्त्रीला पाहून त्यांच्या मनात दुष्ट वासना उत्पन्न झाली. त्यामुळे आपण ज्या व्यासपीठावर आहोत त्या व्यासपीठाचा आपल्या हातून अपमान झाला व आपण या व्यासपीठावर उभे राहण्यास नालायक ठरलो आहोत असे वाटून श्री. विष्णुपंतांना जबरदस्त धक्का बसला. त्यांनी कीर्तनाचा पुढील भाग पुरा केला; पण एका स्त्रीमुळे उपस्थित झालेल्या वासनेचा श्री. विष्णुपंतांच्या मनावर एवढा परिणाम झा ला की, श्री. सीतारामपंतांच्या नावाने एक चिठ्ठी लिहून ठेवून ज्या डोळ्यांमुळे आपल्याकडून पाप घडले व वाईट वासना मनात उत्पन्न झाली, त्या डोळ्यांना शिक्षा करण्यासाठी ते रानात निघून गेले. रानात गेल्यावर तेथे शेराचा व रुईचा चीक एकत्र करून त्यांनी तो आपल्या दोन्ही डोळ्यात घातला. चीक डोळ्यात घालताना त्यांच्या मनात असे विचार येत होते की, "याच डोळ्यांनी काल माझा विश्वासघात केला. त्यांच्यामुळेच माझ्या मनात वाईट वासना उत्पन्न झाली. याच डोळ्यांनी मला मोहात पाडून फसविण्याचा घाट घातला होता. आता हे डोळेच नष्ट केल्यावर पुन्हा असा प्रसंग येणार नाही." श्री. विष्णुपंतांसारख्या सूज्ञ माणसाला एवढेही समजले नाही की, दोष त्यांच्या डोळ्यांचा नसून ज्या मनामुळे वासना उत्पन्न झाली, त्या मनाचा तो दोष होता. ते मन जिंकल्याशिवाय डोळ्यांना शिक्षा करून काय फायदा ?

श्री. विष्णुपंत स्वभावाने पूर्वीपासूनच आतताई व हट्टी होते. पूर्वी

पंढरपुरामध्ये एका माणसाबरोबर भांडण झाल्यामुळे त्यांनी स्वत:ला शिक्षा व्हावी म्हणून आपली जीभ कापून घेतली होती व नाशिक-लाही भजनावरून काही भांडणतंटा निर्माण झाला, त्यावेळी सुद्धा आत्मशिक्षा म्हणून त्यांनी पुन्हा एकदा आपली जीभ कापून घेतली होती. परन्तु या उपायांनी त्यांच्या मनातला क्रोध गेला नव्हता व त्यांच्या मनाला शांतीही अशी कधी लाभली नव्हती. आता डोळे फोडून घेऊन त्यांचा काम तरी कसा शांत होणार? जोपर्यन्त मन ताब्यात नाही तोपर्यन्त इंद्रियांना शिक्षा करून काय फायदा? दुसऱ्या दिवशी सकाळी संध्येला जाताना श्री. विष्णुपंत कोठे दिसेनात. ते पुढे संध्येला गेले असतील असे समजून श्री. सीतारामपंत वगैरे मंडळी घाटावर गेली; पण श्री. विष्णुपंत तेथेही नव्हते. मुक्कामावरून परत आल्यावर सर्वांना श्री. सीतारामपंतांच्या नावाने लिहिलेली चिठ्ठी मिळाली; पण शोधावयाचे तरी कोठे?

श्री. विष्णुपंतांनी डोळ्यात विषारी चीक घातल्यामुळे त्यांच्या डोळ्यास इजा होऊन डोळ्यांची आग होत होती; त्यांचे डोळे उघडले जाईनात. त्यामुळे त्यांना काही दिसेना. आपण कोठे आहोत तेही त्यांना कळेना. अन्न नाही, पाणी नाही अशा अवस्थेत ठिकठिकाणी ठेचा लागून ते पडले. मरण आल्यास बरे; पण हे नको असे त्यांना वाटू लागले. दुपार टळून गेल्यावर ते भुकेने अगदी व्याकूळ झाले. त्यांची ही मरणोन्मुख अवस्था रानातील वाटेने जाणाऱ्या एका शिपायाच्या नजरेला आली. त्याने श्री. विष्णुपंतांना बटाटे उकडून खाऊ घातले व मग हाताला धरून गावात आणून सोडले. गावातील लोकांनी श्री. विष्णुपंतांना ओळखले व श्रीराममंदिरात श्रीस्वामी-महाराजांकडे आणून सोडले. त्यांची ती दीनवाणी अवस्था पाहून सर्वांना फार वाईट वाटले. श्रीस्वामीमहाराजांना जेव्हा एकंदर सर्व

हकीकत समजली तेव्हा त्यांनी त्यांची अत्यंत कडक शब्दात कान-उघाडणी केली. त्यावेळी श्रीस्वामीमहाराज श्री. विष्णुपंतांना असे म्हणाले की, "जरी अकस्मात् मनात वासना किंवा विकार उत्पन्न झाले; तरी विवेकाने व विचारानेच हळूहळू मन स्वाधीन करून घेतले पाहिजे. अशा प्रकारच्या साहसाने स्वत:ला शिक्षा करून घेऊन इंद्रियांचे दमन होणे शक्य नाही व ते योग्यही नाही. अशा घोर कृतीचा काहीही उपयोग होत नाही, हे लक्षात ठेवावे. शरीराला शिक्षा करण्यापेक्षा मन वळविणे हे महत्त्वाचे आहे. ते वळले म्हणजेच त्याचा अध्यात्माच्या प्रगतीला उपयोग होतो."

इतका उपदेश केल्यानंतर पुढे श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना पूर्णपणे अंधाऱ्या खोलीत ठेवून त्यांच्या डोळ्यांवर उपचार केले. या उपचाराने त्यांचे डोळे बरेच सुधारले. त्यानंतर एक दिवस ते बाहेर बसले असताना श्रीगंगा किनाऱ्यावर सोसाटयाचा वारा सुटला. या वादळाने धुळीचे कण श्री. विष्णुपंतांच्या डोळ्यात गेले व त्यांचे डोळे पुन्हा बिघडले. त्यांच्या डोळ्यांबद्दल पुन्हा सर्वांना काळजी उत्पन्न झाली. श्री. सुभेदार वगैरे मंडळींनी त्यांना कानपूरला सिव्हिल सर्जनकडे पाठविले. त्यावेळी त्यांची शुश्रूषा करण्यासाठी श्री. सीतारामपंत टेंबे त्यांच्याबरोबर गेले होते.

यावेळी श्री. व्यंकटय्या नावाचा एक ब्राह्मणाचा मुलगा श्रीस्वामी-महाराजांची सेवा करण्यास मिळावी म्हणून बेळगावहून ब्रह्मावर्ताला आला होता. त्याने आपली इच्छा श्रीस्वामीमहाराजांच्या कानी घातली. ज्याप्रमाणे श्रीगुरुचरित्राच्या तेराव्या अध्यायात श्रीमन्नृसिंह-सरस्वतीस्वामीमहाराजांनी आपल्याकडे आलेल्या कांचीवासी श्री. सायंदेवास शूलपीडित ब्राह्मणाची सेवा करावयाला सांगितले होते त्याप्रमाणेच आपली सेवा करावयाला आलेल्या श्री. व्यंकटय्याला श्रीस्वामीमहाराज असे म्हणाले की, "तूं श्री. विष्णुपंतांना सेवेची

अत्यंत गरज आहे; तरी कानपूरला जाऊन तू त्यांची सेवा कर. त्या अनाथ ब्राह्मणाची केलेली सेवा आपणास पोहोचेल." श्रीस्वामी-महाराजांच्या इच्छेप्रमाणे श्री. व्यंकटय्या कानपूरला जाऊन श्री. विष्णुपंतांची सेवा करू लागला. डॉक्टरी उपायांनी श्री. विष्णुपंतांचे डोळे बरे झाले; पण डोळ्यात थोडी कसर राहिलीच. पुढे त्यांना घेऊन श्री. व्यंकटय्या ब्रह्मावर्ताला श्रीस्वामीमहाराजांपाशी परत आला. श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन घेतल्यावर ते श्री. विष्णुपंतांना असे म्हणाले की, " आता तुमचे जरुरीपुरते काम झाले आहे. यापुढे नर्मदातीरावर ईश्वरभजन करून राहावे." श्रीस्वामीमहाराजांची आज्ञा शिरसावंद्य मान्य करून पुढे श्री. विष्णुपंत नर्मदातीरी मंडलेश्वरला जाऊन राहिले.

भजनाच्या सप्ताहाचे ब्रह्मावर्ताच्या लोकांना आता जणूकाही वेडच लागले होते, यापूर्वी नऊ सप्ताह झालेच होते. पुन्हा आणखी दोन सप्ताह झाले. दोन्ही सप्ताहासाठी श्रीस्वामीमहाराजांनीच नाममंत्र लिहून दिले होते. पाहिल्या भजनासाठी "नृसिंहमूर्ते। जय हतभीते।।" हा मंत्र व दुसऱ्यासाठी "अंजनिसुता रुद्रावतारा। जय रामदूता भवभयवारा।।" असे मंत्र लिहून दिले होते.

या भजन सप्ताहाच्या निमित्ताने गावात नेहमी उत्सव होऊ लागले. सप्ताह समाप्तीला ब्राह्मण भोजन व अन्नसंतर्पण होत असे. गावात आनंदी आनंद होऊ लागला; पण या उत्सवांमुळे व लोकांच्या वाढत्या गर्दीमुळे श्रीस्वामीमहाराजांना फारच उपद्रव होऊ लागला. या वाढत्या व्यापावर मौन धारण करणे हाच एक उत्तम उपाय आहे असा विचार करून ब्रह्मावर्त येथील तिसऱ्या चातुर्मापासून श्रीस्वामीमहाराजांनी मौन धरण्याचे ठरविले.

मौनापूर्वी आपल्याजवळच्या श्रीदत्तमूर्तीची काहीतरी व्यवस्था करावी असे श्रीस्वामीमहाराजांना वाटू लागले. भक्ताच्या मनातील

विचार देवाला कळणार नाहीत; तर कोणाला कळणार? आपल्या भक्ताला आपला उपद्रव होऊ लागला आहे या जाणिवेने देवांना फार वाईट वाटले. त्यामुळे एके दिवशी देव रुसून श्रीगंगेत जाऊन बसले. जेव्हा सकाळी पूजेच्या वेळी श्रीस्वामीमहाराजांना देवांची मूर्ती दिसली नाही तेव्हा त्यांना अत्यंत बरे वाटले. आपल्या मागची एक उपाधी कमी झाली हे पाहून त्यांना अत्यंत समाधान वाटले; कारण असली उपाधी टाकीन म्हणून ती टाकताही येत नाही. श्रीदत्त-मूर्ती दिसली नाही; पण त्याच वेळी श्रीगंगेच्या बाजूने रडण्याचा आवाज ऐकू आला. श्रीदत्तमूर्तीचा तो चिरपरिचित आवाज होता. श्रीस्वामीमहाराज आवाजाच्या रोखाने श्रीगंगातीरावर गेले. आवाज श्रीगंगेतून येत होता. श्रीस्वामीमहाराजांनी जेव्हा पुढे जाऊन शोध करून पाहिले तेव्हा त्यांना ती मूर्ती श्रीगंगेमध्ये सापडली. हा सर्व प्रकार पाहून श्रीदत्तमूर्तीचा त्याग करण्याचा किंवा इतर काही व्यवस्था करण्याचा विचार त्यांनी सोडून दिला.

देव निघून गेल्यावर "बरे झाले, एक उपाधी कमी झाली," हे श्रीस्वामीमहाराजांच्या मनातील विचार वाचल्यावर आपल्या मनात गैरसमज निर्माण होण्याची शक्यता आहे. त्यांच्या मनातील या विचारांमुळे श्रीस्वामीमहाराजांच्या मनातील देवांवरील भक्ती कमी झाली असे वाटेल; पण वस्तुस्थिती तशी नव्हती. श्रीस्वामी-महाराज आता अशा अवस्थेला येऊन पोहोचले होते की; काही एक कर्तव्य म्हणून त्यांच्यासाठी शिल्लक राहिलेच नव्हते. पूजा, जपजाप्य या सर्वांच्या पलीकडे ते गेले होते. त्यांना आता गलित-कर्म अवस्था प्राप्त झाली होती. जळीस्थळी, काष्ठीपाषाणी भरलेला देव त्यांच्या दृष्टीने आता एका मूर्तीमध्ये थोडाच मावणार होता? स्वतःच ब्रह्मरूप झाल्यावर कोणी कोणाची पूजा करावयाची? पूज्य, पूजक आणि पूजा ही त्रिपुटी त्यांच्या लेखी एक झाली होती.

"मुळी स्वरूपची एक। तेथे कैंचा सेव्य सेवक ॥" ही अवस्था सामान्यांच्या आकलनापलीकडची आहे. अनधिकारी लोकांच्या दृष्टीने ही पाखंडी अवस्था ठरेल; पण श्रीस्वामीमहाराजांना पाखंडी म्हणण्याचे धैर्य कोणालाच झाले नसते.

श्रीस्वामीमहाराजांच्या या लोकोत्तर दिव्य अवस्थेमुळे मूर्तीची पूजा ही त्यांना उपाधी वाटत होती. मूर्तीची काहीतरी व्यवस्था करता आली तर बरे होईल असे विचार त्यांच्या मनात वारंवार येऊ लागले. देवांनाही भक्ताची जास्त परीक्षा पाहावयाची नव्हती. ज्या भक्ताने देवांना मायेने हृदयाशी कवटाळले होते तोच भक्त आता देवांना दूर सारावयाला तयार झाला होता. भक्ताची ही अपूर्व अशी उच्चावस्था देवांनीच नाही का निर्माण केली होती? श्रीस्वामीमहाराजांचे सर्व जीवनच देवांच्या इच्छेप्रमाणे चालले होते. सांप्रतचे विचारही देवांच्या कृपेचेच फळ होते. आता मूर्ति-पूजेच्या व्यापातून श्रीस्वामीमहाराजांची सुटका करण्याचे देवांच्याच मनात आले.

एक दिवस पूजा करताना श्रीस्वामीमहाराज कसे कोण जाणे; पण एकदम मोठ्याने असे म्हणाले की, "ही मूर्ती कोणी चोरून का नेत नाही?" आणि दुसऱ्याच दिवशी त्या मूर्तीची चोरी झाली. मूर्ती जाग्यावर नव्हती. रडण्याचा आवाजही ऐकू येत नव्हता. श्रीस्वामीमहाराजांच्या इच्छेप्रमाणे मूर्तीची चोरी झाली होती. श्रीस्वामीमहाराजांचे आदल्या दिवशीचे उद्गार जवळच बसलेल्या श्री. व्यंकटय्याने ऐकले होते. त्यानेच ती मूर्ती चोरली होती. कर्नाटकातून आलेल्या या ब्राह्मण मुलाने श्रीस्वामीमहाराजांच्या आज्ञेने कानपूरच्या सिव्हिल हॉस्पिटलमध्ये श्री. विष्णुपंतांची सेवा करून श्रीस्वामीमहाराजांची मर्जी संपादन केली होती. कानपूरहून परतल्यावर श्रीस्वामीमहाराजांनी त्याला काही शिक्षणही दिले होते. तो शिकत होता आणि श्रीस्वामीमहाराजांची मर्जी संपादन

करीत होता. श्रीदत्तमूर्ती श्री. व्यंकटय्याने चोरल्याचे श्रीस्वामी-महाराजांना समजले. त्याच्यावर काही अरिष्ट येऊ नये व त्याचे भले व्हावे ही त्यांची इच्छा होती. श्रीस्वामीमहाराजांना हे माहीत होते की, आपण त्या मूर्तीची जेवढी पाळणूक केली तशी पाळणूक दुसऱ्या कोणाकडूनही होणार नाही आणि ही मूर्ती ज्याच्याकडे जाईल त्याचा सर्वनाश करील. त्यामुळे त्यांनी श्री. व्यंकटय्याला बोलावून घेतले आणि त्याला असे सांगितले की, "नुसती मूर्ती मिळाली म्हणजे काम झाले असे समजू नकोस. ती नीट जपली पाहिजे. फुकटचा हत्ती मिळाला तरी तो पोसावयाची शक्ती नसेल तर काय उपयोग?" नंतर त्यांनी त्या मूर्तीची कशी सेवा करावयाची ते श्री. व्यंकटय्याला समजावून सांगितले. तरी सुद्धा जी मूर्ती श्रीस्वामीमहाराजांशी बोलत होती, त्यांच्यावर रागावत होती, रुसत होती व प्रसंगी रडतही होती, त्या मूर्तीची यथायोग्य सेवा त्यांच्याशिवाय दुसरे कोण करू शकणार? पुढे श्री. व्यंकटय्याने मंडलेश्वरी वास्तव्य केले व तेथे या मूर्तीची श्रीस्वामीमहाराजांच्या उपदेशाप्रमाणे तो नित्य पूजाअर्चा करीत असे. मात्र श्री. व्यंकटय्या तिरोधान पावल्यावर त्या मूर्तीचे काय झाले हे कळले नाही. मूर्ती नेली त्यावेळीच श्रीस्वामीमहाराज असे म्हणाले होते की, "ही मूर्ती जेथे जाईल त्याच्या सर्वस्वाचा नाश होईल; कारण आपणाइतकी पाळणूक कोणाकडूनही होणार नाही."

श्रीस्वामीमहाराजांचे चिखलद्याचे भक्त श्री. गंगाधरपंत वैद्य यांच्या स्मरणवहीमध्ये श्री. व्यंकटय्याबद्दल बरीच माहिती मिळते. तसेच श्रीस्वामीमहाराजांच्या चरित्राचे मूळ लेखक श्री. गणेशपंत सातवळेकर यांनी "शके १८२४ मध्ये ब्रह्मावर्त येथे राहाणारे श्री. व्यंकटय्या नावाचे एक गृहस्थ श्रीस्वामीमहाराजांबरोबर एके दिवशी फार कडाक्याने भांडले" असा उल्लेख केला आहे. हा प्रसंग श्री.

सीतारामपंत टेंबे असताना घडला. म्हणजे वैशाख महिन्यानंतर केव्हातरी हे श्री. व्यंकटय्या श्रीस्वामीमहाराजांपाशी होते. श्री. व्यंकटय्या हे नाव दक्षिणेकडील आहे. दक्षिणेकडील दोन व्यंकप्पा ( किंवा श्री. व्यंकटप्पा व श्री. व्यंकटराव ) श्रीस्वामीमहाराजांबरोबर होते. या दोहोंपैकी कोटेश्वरचे श्री. व्यंकटराव स्टेशनमास्तर श्रीस्वामीमहाराजांबरोबर भांडण करणे शक्य नाही; कारण त्यांचा या चरित्रात जो उल्लेख येऊन गेला आहे, त्यावरून हे ध्यानात येईल. शिवाय वैशाख किंवा जेष्ठ महिन्यात त्यांचे निधन झाले. तेव्हा वर म्हटल्याप्रमाणे श्रीस्वामीमहाराजांशी भांडण करणारे श्री. व्यंकप्पा म्हणजेच कर्नाटकातील ब्राह्मण मुलगा श्री. व्यंकटय्या की काय, या गोष्टीचा खुलासा मिळाला असता तर बरे झाले असते. असो. श्री. गंगाधरपंत वैद्यांनी असे लिहून ठेवले आहे की—"कोटेश्वरी राहणारे श्री. व्यंकटबुवा वयाने मोठे होते. दुसरे श्री.व्यंकटबुवा ब्रह्मचारी यांना लहान व्यंकटबुवा असे म्हणत असत. (हेच कर्नाटकी ब्राह्मणपुत्र व्यंकटय्या असावेत. ) या लहान श्री. व्यंकटबुवा ब्रह्मचाऱ्यांना श्रीस्वामीमहाराजांनी आपणाकडील श्रीदत्तमूर्ती दिली होती. संवत् १९६७ चे वर्ष म्हणजे इ. स. १९११ मध्ये लहान श्री. व्यंकटबुवा श्रीनर्मदा प्रदक्षिणेस निघून श्रीकोटेश्वराचे दक्षिण किनाऱ्यावर या श्रीदत्तमूर्तीसह गेले होते. श्री. व्यंकटबुवांचे हे अखेरचे दर्शन आपणास झाले. पुढे ते गुजराथेत गेल्यावर श्रीनर्मदा प्रदक्षिणा सोडून अबूच्या पर्वताकडे निघून गेले. त्यानन्तर त्यांचा काही शोध लागला नाही. तसेच या श्रीदत्तमूर्तीची पुढे काय अवस्था झाली ते समजण्याचे साधन नाहीसे झाले."

"हे लहान श्री. व्यंकटबुवा अत्यंत वैराग्यशील, स्वधर्माने वागणारे व श्रीस्वामीमहाराजांच्या भक्तांपैकी अद्वितीय भक्त होते. कित्येक विचारवान् पुरुषांची अशी कल्पना आहे की, श्रीस्वामीमहाराजांच्या

कुटुंबाचा म्हणजे सौ. अन्नपूर्णामातेचा लहान श्री. व्यंकटबुवा हा पुरुषावतार झालेला आहे. शास्त्रात "पुनर्जन्म लभते माता पत्नीच प्रेशमात्रतः।" हे वचन सापडते. श्रीस्वामीमहाराजांच्या कुटुंबास गंगाखेड येथे शके १८१३ म्हणजे इ. स. १८९१ साली देवाज्ञा झाली. त्या वर्षाच्या मानाने लहान श्री. व्यंकटबुवांच्या वयाचे मान (शके १८२५ मध्ये म्हणजे इ. स. १९०३ मध्ये त्यांना मूर्ती मिळाली त्यावेळी त्यांचे वय १२–१३ वर्षांचे असावे) तंतोतंत मिळत होते. काय असेल ते परमेश्वर जाणे! आम्हा मनुष्याकडून अशा गोष्टींचा खुलासा होणे अशक्य आहे." असो. अशा तऱ्हेने श्रीस्वामीमहाजां-जवळची दुसरीही श्रीदत्तमूर्ती गेली आणि श्रीस्वामीमहाराज खऱ्या अर्थाने निःसंग झाले.

अनन्तकोटी ब्रह्माण्डनायक श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य भगवान् श्रीवासुदेवानन्दसरस्वती श्रीदत्तात्रेयस्वामीमहाराज यांचा अखण्ड जयजयकार असो. ज्याप्रमाणे "दीर्घेण कालेन अनुष्ठातॄणां कामोद्भवात् हीयमानविवेकविज्ञानहेतुकेन अधर्मेण अभिभूयमाने धर्मे, प्रवर्धमाने च अधर्मे, जगतः स्थितिं परिपिपालयिषुः सः आदिकर्ता नारायणाख्यः विष्णुः भौमस्य ब्रह्मणः ब्राह्मणत्वस्य रक्षणार्थं देवक्यां वसुदेवात् अंशेन किल संबभूव। ब्राह्मणत्वस्य हि रक्षणेन रक्षितः स्यात् वैदिको धर्मः तदधीनत्वात् वर्णाश्रमभेदानाम्।" म्हणजे कृत, त्रेता ही युगे संपूर्ण होऊन जवळ जवळ द्वापरयुगाच्या समाप्तीपर्यंन्त, एवढा दीर्घ व मोठा काल मध्ये निघून गेल्यावर (प्रवृत्ती व निवृत्तिरूप द्विविध वेदोक्त) धर्माचे अनुष्ठान करणाऱ्या ब्राह्मणादिकांमध्ये कामाचा अर्थात् विषयतृष्णेचा उद्भव झाल्यामुळे कमीकमी होत जाणारा विवेक व विज्ञान यांना कारण होणाऱ्या अधर्माकडून धर्माचा पराभव होऊ लागला असता अर्थात् क्षय केला जाऊ लागला असता आणि अधर्माची अतिशय वृद्धी होऊ लागली

असता ( ईश्वराने घालून दिलेली मर्यादा कोलमडू लागली म्हणून) जगाच्या स्थितीचे परिपालन किंवा रक्षण करण्याची इच्छा करणारा तो आदिकर्ता, पहिला स्रष्टा, नारायण नावाचा विष्णू अर्थात् व्यापक परमात्मा भूलोकाच्या ब्रह्माचे म्हणजे ब्राह्मणत्वाचे अर्थात् ब्राह्मणाच्या ठिकाणी असणाऱ्या धर्माचे रक्षण करण्यासाठी देवकीच्या उदरी वसुदेवापासून अंशाने उत्पन्न झाला. हे पुराणातून प्रसिद्ध असून, ब्राह्मण्याच्याच रक्षणाचे कारण असे की, ब्राह्मणत्वाचे रक्षण केल्याने वैदिकधर्म सुरक्षित राहील; कारण वर्णभेद व आश्रमभेद ब्राह्मणाच्या अधीन आहेत, असे श्रीमद् आद्य शंकराचार्यांनी श्रीमद् भगवद्गीतेच्या भाष्यात म्हटले आहे त्याचप्रमाणे श्रीस्वामीमहाराजांचे अलौकिक परमभक्त, श्रेष्ठतम शिष्य व त्यांचे पूर्वाश्रमातील धाकटे बन्धू श्रीसीतारामहाराज यांनी आपले सद्गुरू श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानन्दसरस्वतीस्वामीमहाराज यांनी उपरोक्त श्रीमद् आद्य शंकराचार्यांनी कथन केल्याप्रमाणेच जगदुद्धारास्तव मानवरूप घेऊन स्वाश्रमोचितकर्म करणाऱ्या सज्जनांचे रक्षण व धर्मपालनास्तव वासुदेव या नावाने अवतार धारण केला आहे हे सांगून " सीताराम तव गुण गाउनि दृढ मिठी दे चरणांसी ॥ " ही भक्तीची परिसीमा जशी प्रकट केली आहे, ती त्यांच्याच शब्दात प्रस्तुत करून, आपल्या भक्तश्रेष्ठावर आपण जशी कृपा केली तशी ती आमच्यावरही करून, आमच्याही हृदयात पराभक्तीचे सर्व स्रोत उपस्थित करून, आम्हालाही आपल्या चरणाला मिठी घालण्याची बुद्धी देऊन व आपल्या चरणापाशी जागा देऊन, धन्य व कृतार्थ करा, अशी अत्यंत शरणागतीपूर्वक त्यांच्या परमकोमल व परमपवित्र चरणी प्रार्थना करू.

## पद

दीन दयाघन पतीतपावन सद्‌गुरु तूं देवा ।।
अनन्यभावें निशिदिनिं आम्ही करूं तुझी सेवा ।। धृ. ।।
तेजोमय हें स्वयंप्रकाशक निर्मल तव स्वरुप ।
जगदुद्धारास्तव तूं घेसी हें मानवरूप ।।
अंतरिं दृष्टी करुनि पाहतां निर्गुण हें अरुप ।
जडेंद्रियासी प्रकाश देसी जैसा जगिं दीप ।। १ ।।
वसति दीव्यत इति व्युत्पत्त्या अन्वर्थक नांव ।
सर्व भूवरी प्रसिद्ध जाहलें स्वामि वासुदेव ।।
बहुजन त्वद्दर्शनासि येती मागति पदिं ठाव ।
त्यांची इच्छा पुरवुनि भजनीं देसी सद्‌भाव ।। २ ।।
स्वाश्रमोचितकर्मं करुनी जे द्विज जगिं असती ।
सात्विक बुद्धी पाहूनि त्यांवरि तुमची बहु प्रीती ।।
इच्छा त्यांची पुरवुनि देसी संतति संपत्ती ।
दुराचारें वर्तति जे जन जाती अधोगती ।। ३ ।।
सज्जनरक्षण धर्मपालनास्तव तूं अवतरसी ।।
कलिमाजीं या सर्व देवता गुप्त होति ऐसी ।।
श्रुतिस्मृतीचीं वाक्यें स्मरुनी जागृत तूं होसी ।
सीताराम तव गुण गाउनि दृढ मिठी दे चरणांसी ।। ४ ।।



## – अध्याय तेरावा –

धर्मे प्रीतिं सन्मतिं देवभक्तिम् । सत्संगाप्तिं देहि भुक्तिं च मुक्तिम् ।
भावासक्तिं चाखिलानन्दमूर्ते । घोरात्कष्टादुद्धरास्मान्नमस्ते ।।

चातुर्मास चौदावा–शके १८२६–इ. स. १९०४–ब्रह्मावर्त :–

श्रीस्वामीमहाराजांचा चौदावा चातुर्मासही ब्रह्मावर्त येथेच झाला. वाढत्या लोकप्रियतेमुळे श्रीस्वामीमहाराजांना ब्रह्मावर्तामध्ये दोन वर्षे अतिशय दगदग झाली. अत्यधिक श्रमामुळे विश्रांती अशी मिळालीच नाही. त्या दोन वर्षांच्या काळात ते रात्री दोन–तीन तासच विश्रांती घेत असत. यावेळी त्यांना विश्रांतीची आवश्यकता होती. त्यामुळे चातुर्मास सुरू होण्यापूर्वीच त्यांनी चातुर्मासात मौन पाळण्याचे ठरविले होते.

ज्यावेळी चातुर्मास सुरू झाला त्यावेळी पूर्वी ठरल्याप्रमाणे आषाढ पौर्णिमेपासून श्रीस्वामीमहाराजांनी मौन धारण केले. श्रीदत्तमूर्ती तर श्री. व्यंकटय्या घेऊन गेला होता. पुराणसुद्धा बंद होते. आता नित्यकर्म आणि भिक्षा या दोनच गोष्टी ते करीत असत. याशिवाय अन्य दुसरा कोणताही कार्यक्रम नव्हता. श्रीस्वामीमहाराज बहुतेक सर्व काळ समाधीमध्ये लीन असल्यामुळे भिक्षासुद्धा दोन–तीन दिवसांनंतर केव्हातरी होत असे. विशेष काही सांगावयाचे असल्यास ते पाटीवर लिहून दाखवीत असत. या चातुर्मासामध्ये श्रीस्वामी-महाराज श्रीराममंदिरासमोर श्रीगंगाकिनारी झोपडी बांधून राहत होते. ही झोपडी कालांतराने श्रीगंगेमध्ये वाहून गेल्यावर श्री. सुभे-दारांनी श्रीस्वामीमहाराजांचे स्मारक म्हणून एक कायम स्वरूपाची कुटी तेथे बांधली. आता त्या ठिकाणी श्रीस्वामीमहाराजांच्या स्मरणार्थ एक श्रीदत्तमंदिर बांधले आहे. त्या मंदिराला राणी इंदिराबाई होळकर यांच्याकडून मासिक वेतन मिळते.

एक दिवस समाधी अवस्थेमध्ये असताना श्रीस्वामीमहाराजांना श्रीक्षेत्र नरसोबाच्यावाडीला जाण्याची आज्ञा झाली. त्यावेळी देवांनी त्यांना असे सांगितले की, " नरसोबाच्यावाडीला सध्या अनाचार चालू आहे. तेथील व्यवस्था फार बिघडली आहे. तरी तेथे जाऊन व्यवस्था करावी व आपली छाटी (देवांच्या अंगावरील भगवे वस्त्र)

मिळेपर्यन्त तेथेच राहावे." ही आज्ञा ऐकताच श्रीस्वामीमहाराज स्तब्ध झाले; कारण त्यांच्या मनात ब्रह्मावर्ताहून काशीला जावयाचे होते; पण आता वाडीला जाणे भाग होते. अडीच वर्षे ब्रह्मावर्ताच्या भाग्यवान् लोकांना श्रीस्वामीमहाराजांच्या दिव्य संगतीचा लाभ झाला होता. या लोकांमध्ये श्रीस्वामीमहाराजांनी श्रीदत्तभक्तीचे बीज रोवले व सदाचार आणि स्वधर्मनिष्ठा यांची वाढ केली. त्रितापाने पोळलेल्या लोकांचे कष्ट नाहीसे करण्यासाठी श्रीस्वामी-महाराजांनी त्यांना सर्व प्रकारे साहाय्य केले. अडीच वर्षांच्या सहवासात लोकांनी श्रीस्वामीमहाराजांवर फार प्रेम केले. त्यांची त्यांच्यावर भक्ती तर होतीच; पण त्याहीपेक्षा त्यांचे श्रीस्वामी-महाराजांवर फार प्रेम होते. श्रीस्वामीमहाराज त्यांचे माता, पिता, बंधू, गुरू इत्यादि सर्व काही होते.

चातुर्मास संपताच श्रीस्वामीमहाराजांनी दंडाला परशुमुद्रा बांधली व ते पुढील मुक्कामाला निघाले. त्यांनी श्री. सीताराम-पंतांना पुढे जाण्याची आज्ञा केली व मागाहून ते स्वतः निघाले. त्यावेळी हजारोंचा समुदाय श्रीस्वामीमहाराजांच्या कुटीसमोर जमा झाला होता. "दत्तभजन करीत राहा" असा श्रीस्वामीमहाराजांनी लोकांना उपदेश केला. श्रीस्वामीमहाराजांची व आपली आता ताटा-तूट होणार; कारण हे त्यांचे ब्रह्मावर्तामधील अखेरचेच दर्शन आहे या विचाराने लोकांना फार दुःख झाले. कानपूरहून बरीच मंडळी दर्शनासाठी आली होती. श्रीस्वामीमहाराजांनी ब्रह्मावर्त सोडून जाऊ नये म्हणून शिवदत्त नावाचा एक भक्त तर त्यांच्या कुटी-समोर आडवा पडून राहिला; पण श्रीस्वामीमहाराज केव्हा व कसे निघून गेले हे त्याला कळलेसुद्धा नाही.

तेथून निघाल्यावर ब्रह्मावर्तापासून जवळच असलेल्या व ब्रह्म-देवाने यज्ञसमयी सिद्धेश्वर या नावाने लिंग स्थापन केलेल्या शिव-

मंदिरामध्ये श्रीस्वामीमहाराज आले व तेथून यमुनातीराने प्रवास करीत करीत ते काल्पी या गावी आले.

काल्पी गावाहून श्रीस्वामीमहाराज जालवणला आले. जालवणला त्यांची ही दुसरी भेट होती. श्रीस्वामीमहाराज आले असे कळताच परिचित मंडळी दर्शनासाठी जमा झाली. नेहमीचे कार्यक्रम सुरू झाले. श्रीस्वामीमहाराजांची विद्वत्ता केवढी मोठी आहे आणि सर्वज्ञता हे त्यांच्या विद्वत्तेचे दुसरे अंग कसे आहे, याची यावेळी लोकांना प्रचीती आली. येथे एक मुसलमान गृहस्थ आपणावर अनुग्रह करावा म्हणून श्रीस्वामीमहाराजांची विनवणी करू लागला. त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांनी त्याची आर्तता पाहून त्याला कुराणातील एक मंत्र सांगून त्याचा जप करावयाला सांगितले. जालवणहून श्रीस्वामीमहाराज पिछोऱ्याला आले व तेथे त्यांनी चार दिवस मुक्काम केला.

ब्रह्मावर्ताच्या लोकांनी आपणावर केवढे प्रेम केले हे श्रीस्वामीमहाराजांनी अनुभवले होते. आपण तेथून निघताना लोकांना किती दुःख झाले होते ते त्यांनी पाहिले होते. लोकांच्या प्रेमाखातर वस्तुरूपाने आपली तेथे काहीतरी आठवण ठेवावी अशी श्रीस्वामीमहाराजांची इच्छा होती; पण तेथील लोक त्यांना सोडीनात म्हणून श्रीस्वामीमहाराज ब्रह्मावर्ताहून घाईघाईने निघून आले होते. आता पिछोरा येथून त्यांनी आपली धाबळी, कंथा, भोपळ्याचा लहान कमंडलू या वस्तू एका ब्राह्मणामार्फत ब्रह्मावर्ताच्या मंडळींसाठी आठवण म्हणून पाठवून दिल्या. ब्रह्मावर्त येथे श्रीस्वामीमहाराज ज्या ठिकाणी राहत असत तेथे या वस्तू ठेवून तेथील मंडळी मोठ्या आदराने त्या वस्तूंची नित्य पूजा, उत्सव वगैरे करू लागले.

पिछोऱ्याहून श्रीस्वामीमहाराज रावेरला आले. या गावी त्यांचा काही दिवस मुक्काम झाला. येथे ज्या लोकांच्या घरी श्रीस्वामी-

महाराज भिक्षेला जात असत त्यांमध्ये श्री. चिटणीस म्हणून एक गृहस्थ होते. एक दिवस श्रीस्वामीमहाराज भिक्षेला येत आहेत असे पाहून श्री. चिटणीसांची मेहुणी अस्पर्श असल्यामुळे घराबाहेर गेली व जवळच एक पडीक मशीद होती त्या ठिकाणी जाऊन उभी राहिली. तेथे ती उभी असतानाच अकस्मात् तिचे शरीर थंडगार पडले व ती आजारी पडली. क्षणापूर्वी धडधाकट असलेली बाई अकस्मात् अशी आजारी का पडली हे कोणालाच कळेना. तिच्या आजाराची हकीकत श्रीस्वामीमहाराजांच्या कानी जाताच त्यांनी बाईला पाचव्या दिवशी आपणासमोर घेऊन या असे श्री. चिटणीसांना सांगितले. पाचव्या दिवशी श्रीस्वामीमहाराजांसमोर त्या बाईस आणताच ती मोठमोठ्याने ओरडू लागली व हातवारे करू लागली. तिच्या अंगामध्ये पिशाच्चाने संचार केला होता. श्रीस्वामीमहाराजांनी त्या पिशाच्चाला दरडावून असे विचारले की, "तू कोण आहेस आणि या बाईला का धरले आहेस ?"

हा प्रश्न ऐकताच ते पिशाच्च श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाले की, "मी या मशिदीचा मालक जिंद आहे. हे माझ्या मशिदीजवळ राहतात; पण पडलेल्या मशिदीची दुरुस्ती हे लोक कधीच करत नाहीत. त्यामुळे या बाईला मी धरले आहे."

हे ऐकताच श्रीस्वामीमहाराज त्या पिशाच्चाला असे म्हणाले की, "या बाईचा काहीसुद्धा अपराध नसताना, केवळ ही तुझ्या मशिदीजवळ उभी होती इतक्या क्षुल्लक कारणास्तव तू हिला त्रास देत आहेस. तेव्हा तुला शिक्षा जरूर केली पाहिजे. आपण काही यांना मशीद दुरुस्त करण्यास सांगणार नाही."

श्रीस्वामीमहाराजांची ही दरडावण्याची भाषा ऐकून तो जिंद घाबरला व काकुळतीला येऊन मशीद दुरुस्त करून देण्याबद्दल श्रीस्वामीमहाराजांची प्रार्थना करू लागला. श्रीस्वामीमहाराजांनी

विचार केला की, " मशीद पडत चालली आहे व चिटणीस मशिदीची दुरुस्ती करावयाला समर्थ आहेत. तेव्हा या लोकांना जिंदापासून पुढे काही उपद्रव होऊ नये " म्हणून त्यांनी श्री. चिटणीसांना ती मशीद दुरुस्त करावयाला सांगितले. श्रीस्वामीमहाराजांच्या आज्ञे-प्रमाणे त्या मशिदीची श्री. चिटणीसांनी दुरुस्ती करून दिल्यावर त्या बाईचा त्रास दूर झाला व ती पूर्ववत् उत्तम झाली.

रावेरहून श्रीस्वामीमहाराज माळव्यातील भेलसा या गावी आले. हे गाव वेत्रवती नदीच्या काठी आहे. या ठिकाणी श्रीस्वामी-महाराजांची श्रीक्षेत्र नरसोबावाडीतील त्यांचे प्रिय व पट्टशिष्य, श्रीदीक्षितस्वामीमहाराज यांची भेट झाली. श्रीक्षेत्र नरसोबावाडीत प्लेगची साथ आली त्यावेळी श्रीदीक्षितस्वामीमहाराजांची पत्नी त्या साथीमध्ये बळी पडली. पुढे ते स्वतःही प्लेगने आजारी पडल्यामुळे त्यांनी आतुर संन्यास घेतला. आपणाला श्रीस्वामीमहाराजांकडून दंड मिळावा अशी त्यांची इच्छा होती. त्याप्रमाणे त्यांनी श्रीस्वामीमहाराज ब्रह्मावर्त येथे असताना त्यांना पत्राने असे कळविले होते की, " प्लेगच्या आजारीपणात पत्नी निवर्तली. मलाही पुढे प्लेगने गाठल्यामुळे आतुरसंन्यास घेतला आहे. तरी दंड धारणविधी आपल्या हस्ते व्हावा अशी इच्छा आहे." त्या पत्राला उत्तर देताना श्रीस्वामीमहाराजांनी उलट टपाली असे कळविले होते की, " देवांची इच्छा असेल तसे घडेल. वाडीसच राहावे, नारायण. " शिवाय तसा तोंडी निरोपही त्यांनी श्रीदीक्षितस्वामीमहाराजांना पाठविला होता. पण श्रीदीक्षित-स्वामीमहाराज श्रीस्वामीमहाराजांना भेटवयाला फार अधीर झाले होते. श्रीस्वामीमहाराज ब्रह्मावर्ताला आहेत असे श्री. सीताराम-बुवांनी त्यांना तारेने कळविले होते. तार मिळताच श्रीगुरुदर्शना-साठी उतावीळ झालेले श्रीदीक्षितस्वामीमहाराज जरी नुकतेच आजारातून उठले होते व " वाडीसच राहावे " असे श्रीस्वामी-

महाराजांचे त्यांना पत्र आले होते; तरी गुर्वाज्ञेचे उल्लंघन करून श्री. गणू बोडस यांना बरोबर घेऊन ते रेल्वेने ब्रह्मावर्ताला आले; परंतु त्या अगोदरच श्रीस्वामीमहाराजांनी ब्रह्मावर्त सोडले होते. श्रीस्वामीमहाराज अमुक ठिकाणी आहेत असे कळल्यावर श्रीदीक्षितस्वामीमहाराज त्या ठिकाणी जातात तोपर्यन्त श्रीस्वामीमहाराज तेथे नसून पुढील मुक्कामी गेल्याचे कळत असे. गुरुशिष्यांचा असा पाठशिवणीचा खेळ चालला होता. अखेर श्रीस्वामीमहाराज भेलसा येथे आहेत असे श्रीदीक्षितस्वामीमहाराजांना कळले व तेथे गुरुशिष्यांची भेट झाली. बराच प्रवास केल्यानंतर श्रीगुरुचरणांचे दर्शन झाल्यामुळे श्रीदीक्षितस्वामीमहाराजांचे चित्त शांत झाले.

श्रीस्वामीमहाराजांचे श्रीदीक्षितस्वामीमहाराजांवर फार प्रेम होते. त्यामुळे आपल्या आज्ञेचा भंग करून जरी ते श्रीक्षेत्र नरसोबावाडी सोडून आले; तरी त्याबद्दल ते त्यांना काही म्हणाले नाहीत. दुसऱ्या दिवशी उभयता गुरुशिष्य वेत्रवती नदीवर स्नानास गेले तेव्हा "कलौवेत्रवती गंगा" असे शास्त्रवचन श्रीदीक्षितस्वामीमहाराजांना सांगून त्या नदीचा महिमाही त्यांनी कथन केला.

त्यानंतर स्नानाहून परत आल्यावर श्रीस्वामीमहाराजांनी श्रीदीक्षितस्वामीमहाराजांना असे सांगितले की, "नरसोबावाडीस जाण्याबद्दल श्रीदत्तमहाराजांची आपणास आज्ञा आली आहे. त्याप्रमाणे लवकरच येणे घडेल. तरी तुम्ही रेल्वेतून पुढे जावे." श्रीस्वामीमहाराजांच्या आज्ञेप्रमाणे श्रीदीक्षितस्वामीमहाराज रेल्वेने श्रीक्षेत्र नरसोबावाडी येथे आले व त्यांनी श्रीस्वामीमहाराज लवकरच येथे येणार असल्याची वार्ता सर्व लोकांना सांगितली. ही वार्ता ऐकताच सर्व वाडीकर मंडळींना अत्यंत आनंद झाला व ते श्रीस्वामीमहाराजांची वाट पाहू लागले.

भेलशाहून निघून श्रीस्वामीमहाराज हुशंगबाद येथे आले. हे स्थान

श्रीनर्मदेच्या किनाऱ्यावर आहे. येथे श्रीस्वामीमहाराजांचा काही दिवस मुक्काम झाला. श्रीस्वामीमहाराज ज्या ठिकाणी जात तेथे त्यांची कीर्ती अगोदरच गेलेली असे. येथेही असेच झाले. एक दिवस चार विद्यार्थी श्रीस्वामीमहाराजांजवळ आले व त्यांनी त्यांना अशी प्रार्थना केली की, "आम्ही या वर्षी परीक्षेस बसणार आहोत. तरी परीक्षेत उत्तीर्ण होण्यासाठी काहीतरी उपाय सांगावा." हे ऐकताच श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "आपण काही ज्योतिषी नाही. या बाबतीमध्ये आपणास काही कळत नाही व माहितीही नाही. तरी दुसऱ्या कोणाला तरी हा प्रश्न विचारा." श्रीस्वामीमहाराजांच्या या उत्तराने त्या विद्यार्थ्यांचे समाधान झाले नाही. त्यांनी श्री. जयराम मुजुमदार या गृहस्थांना पुढे करून श्रीस्वामीमहाराजांना पुन्हा कळकळीची विनंती केली. श्रीस्वामी-महाराजांनी त्या विद्यार्थ्यांसाठी एक मंत्र लिहून दिला व परीक्षा होईपर्यन्त दररोज १०८ वेळा त्याचा श्रद्धेने जप करण्यास सांगितले. त्याप्रमाणे त्या विद्यार्थ्यांनी अत्यंत श्रद्धेने जप केला. त्यामुळे ते सर्वजण परीक्षेत उत्तमरीतीने उत्तीर्ण झाले.

हुशंगाबादहून प्रवास करीत करीत श्रीस्वामीमहाराज एक दिवस अकस्मात् श्रीक्षेत्र नरसोबावाडीला येऊन पोहोचले. श्रीस्वामी-महाराज वाडीला येणार ही गोड बातमी अगोदरच पुढे आलेल्या श्री. सीतारामबुवांनी व श्रीदीक्षितस्वामीमहाराजांनी वाडीकरांना सांगितली होती. त्यामुळे तेथील लोक श्रीस्वामीमहाराजांच्या वाटे-कडे चातकाप्रमाणे दृष्टी लावून बसले होते. श्रीस्वामीमहाराज एकटेच पायी प्रवास करीत असल्याने त्यांच्या आगमनाचा निश्चित दिवस कोणालाही माहीत नव्हता. तरीसुद्धा श्रीस्वामीमहाराज येतील तेव्हा त्यांचे भव्य स्वागत करावयाचे असे वाडीकर मंडळींनी

ठरविले होते; पण श्रीस्वामीमहाराज कधी आले ते कोणाला कळलेसुद्धा नाही.

फाल्गुन शुद्ध द्वादशी, शनिवार, शके १८२६ इ. स. १९०४ रोजी सकाळी दहा वाजण्याच्या सुमारास दोन छाटचा, दण्ड, भोपळचाचा एक कमंडलू व उपनिषदांची एक लहान पोथी एवढ्या ऐश्वर्यासह श्रीस्वामीमहाराज श्रीदत्तपादुकांसमोर दत्त म्हणून उभे राहिले. "नमो ब्रह्मदेवा"– हे पद म्हणून त्यांनी देवांची प्रार्थना केली व श्रीपादुकांना वंदन करून ते श्रीनारायणस्वामींच्या समाधीचे दर्शन घेण्यासाठी वर गेले. श्रीस्वामीमहाराजांचे भव्य स्वागत करण्याचे वाडीकरांचे स्वप्न हे स्वप्नच राहिले. श्रीनारायणस्वामींच्या समाधीचे दर्शन घेऊन श्रीस्वामीमहाराज ब्रह्मानंदांच्या माडीवर जाऊन बसले. त्यानन्तर श्रीस्वामीमहाराज वाडीला आल्याचे सर्व लोकांना कळले. श्रीस्वामीमहाराजांच्या आगमनाची वातमी हा हा म्हणता सगळीकडे पसरली. "साधुसंत येती घरा तोची दिवाळी दसरा"– अशी वाडीकरांची स्थिती झाली. सर्व पुजारी मंडळी दर्शनाला आली. सर्वांचे नमस्कार झाले. वाडीकरांना श्रीस्वामीमहाराज हे फक्त संन्याशी नव्हते; तर ते भगवान् श्रीदत्तात्रेयांचे अवतार होते आणि श्रीस्वामीमहाराजांना वाडीचे पुजारी ही देवांची लेकरे होती. उभयपक्षी असे दिव्य संबंध निर्माण झाले होते. श्रीस्वामीमहाराजांनी सर्वांचे क्षेमकुशल विचारले. श्रीस्वामीमहाराज आणि पुजारी यांच्यातील सुखसंवाद दीड तास चालला होता.

त्या दिवशी श्रीस्वामीमहाराजांचे प्रातःस्नान मिरजेच्या घाटावर झाले होते. दुपारी वाडीला पुन्हा स्नान करून त्यांनी आपले नित्यकर्म आटोपले व थोडे वेदपठण करून ते ध्यानस्थ बसताच त्यांना क्षणार्धात समाधी लागली. श्रीस्वामीमहाराजांना केव्हाही सहज समाधी लागत असे. या स्थितीत तासभर गेला, त्यावेळी दर्शनाला

आलेली मंडळी उभी होती. तासभरानंतर त्यांचे समाधीतून उत्थान झाले. यावेळी अठ्ठेचाळीस दिवसांच्या वाडीच्या मुक्कामात श्रीस्वामीमहाराजांना अनेकदा समाधी लागली होती.

समाधी उतरल्यावर श्रीस्वामीमहाराज भिक्षेला गेले. प्रत्यही फक्त तीनच घरची भिक्षा घ्यावयाची हा श्रीस्वामीमहाराजांचा नियम येथे लोकांच्या प्रेमापुढे चालू शकला नाही. त्यामुळे जास्तीत जास्त घरातून भिक्षा घेऊन श्रीस्वामीमहाराजांनी जणू वाडीकरांना आपल्या प्रेमाची पावतीच दिली होती.

भिक्षा झाल्यावर गावातील मंडळी येऊन बसू लागली. संध्याकाळपर्यन्त मंडळी दर्शनाला येतच होती आणि कुशल प्रश्न चालले होते. या प्रथम दिवशीच एका आर्तभक्ताला दर्शन देऊन श्रीस्वामीमहाराजांनी धन्य केले. वाडीचे पोस्टमास्तर श्री. नारायणराव नांदगावकर हे स्वामीमहाराजांची कीर्ती ऐकून त्यांच्या चरणी मनोमन लीन झाले होते. श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाची त्यांना तळमळ लागली होती. अखेर त्यांची आतुरता एवढ्या शिगेला पोहोचली की, श्रीस्वामीमहाराज ब्रह्मावर्ताला आहेत असे कळल्यावर ते ब्रह्मावर्ताला जावयाची तयारी करू लागले; पण श्रीस्वामीमहाराज वाडीला येणार आहेत असे कळल्यावर ते त्यांच्या आगमनाची उत्कंठेने वाट पाहू लागले.

श्री. नारायणराव नांदगावकरांच्या आयुष्यात फाल्गुनातील तो शनिवारचा दिवस मोठा भाग्याचा होता. सकाळी श्रीकृष्णामाईमध्ये स्नान करून श्री. नारायणराव श्रीपादुकांचे दर्शन घेऊन वर श्रीनारायणस्वामींच्या समाधीचे दर्शन घेत असतानाच, "श्रीस्वामीमहाराज येथे आले आहेत. श्रींचे दर्शन करून वर येत आहेत," असे शब्द त्यांच्या कानी आले.लगेच श्री.नारायणराव पायऱ्यांजवळ आले. तेजस्वी चेहऱ्याचे व कृश शरीराचे एक तेजस्वी संन्यासी पायऱ्या

चढून वर येत होते. त्यांच्या मागून बऱ्याच लोकांचा घोळका येत होता. हीच आपली श्रीगुरुमूर्ती आहे हे ओळखून श्री. नारायणरावांनी "श्रीगुरुदेवदत्त" म्हणत रस्त्यातच त्यांना दंडवत प्रणाम केला व ते हात जोडून उभे राहिले. त्यांच्या डोळ्यांतून सारखा अश्रुपात होत होता. "नारायण" म्हणून श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना आशीर्वाद दिला. एवढ्या दिवसांची आपली तळमळ शान्त झाली व आपण कृतकृत्य झालो असे श्री. नारायणरावांना वाटले. संध्याकाळी श्रीस्वामीमहाराज श्रीकृष्णापंचगंगेच्या घाटावर सायंसंध्येसाठी गेले व तेथून सुमारे आठ वाजता श्रीपादुकांचे दर्शन करून ब्रह्मानंदांच्या मठात गेले. तेथेच त्यांचा मुक्काम होता. दुसऱ्या दिवसापासूनच योग, उपनिषदे, ज्योतिष वगैरे शिकण्यासाठी लोक ब्रह्मानंदांच्या मठात येऊ लागले.

श्रीक्षेत्र नरसोबावाडीमध्ये असताना श्रीस्वामीमहाराजांची दिनचर्या अशी होती. पहाटे चार वाजता उठून योग शिकावयाला आलेल्या लोकांना पात्रापात्रतेप्रमाणे नेती, धौती, बस्ती, इत्यादि योगातील काही प्रक्रिया ते सांगत असत. श्रीस्वामीमहाराजांना पूर्वाश्रमापासून योगाभ्यासाबद्दल विशेष आस्था असल्यामुळे त्यांनी मिळेल तेथून योगाचे शिक्षण घेऊन योगात प्राविण्य संपादन केले होते. त्यांच्या योगज्ञतेची सर्व भरतखंडात ख्याती पसरली होती. त्यामुळे श्रीस्वामीमहाराजांपासून योग शिकण्यासाठी पुष्कळ लोक येत असत. योगाभ्यास शिकवून झाल्यावर सूर्योदयापूर्वी शौच मुखमार्जन उरकून ते स्नान करीत असत. नंतर नित्यकर्म आटोपून श्रीस्वामीमहाराज देवदर्शनाला जात. प्रथम श्रीपादुकांचे दर्शन घेऊन नंतर ते श्रीरामचंद्रयोग्यांच्या समाधीचे दर्शन घेत. मग श्रीनारायणस्वामींचे दर्शन करून वर मठात येऊन बसत. त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांकडे ब्रह्मकर्म शिकावयाला बरेचसे लोक येत. त्यांमध्ये श्रीक्षेत्र नरसोबा-

वाडीतील पुजाऱ्यांची मुलेही असत. श्रीस्वामीमहाराज या लोकांना प्रात:संध्येपासून सर्व ब्रह्मकर्माचे शिक्षण देत असत. काही लोक उपनिषदे ऐकावयाला येत. त्यांना ते उपनिषदे सांगत असत. एवढे होईतो मध्यान्ह होत असे. मध्यान्हीचे स्नान व आन्हिक उरकून ते भिक्षेला जात. येथे भिक्षा हा श्रीस्वामीमहाराजांच्या दृष्टीने एक अवघड कार्यक्रम होऊन बसला होता. वाडीतील सर्वच पुजाऱ्यांचे श्रीस्वामीमहाराजांवर प्रेम होते. प्रत्येकाला असे वाटे की, श्रीस्वामी-महाराजांनी आपणाकडील भिक्षा घ्यावी. कोणाचेही मन दुखवू नये अशी श्रीस्वामीमहाराजांची इच्छा होती. त्यामुळे प्रत्यही तीन घरची भिक्षा हा नियम मोडून ते सात घरची भिक्षा घेत असत. दररोज क्रमाक्रमाने घरे घेत ते भिक्षेला जात असत. भिक्षा घेतल्यावर अध्यापन पुन्हा चालू होत असे. काही लोक ज्योतिष, वैद्यक, मंत्र, तंत्र इत्यादि विविध विषयांसंबंधी प्रश्न विचारीत असत. त्या सर्व प्रश्नांना श्रीस्वामीमहाराज अत्यंत सविस्तरपणे व खुलासेवार उत्तरे देऊन विचारणारांचे समाधान करीत असत. पुष्कळ लोक आपल्या प्रापंचिक अडचणी घेऊन येत. कोणाला असाध्य रोग असत. कोणी पिशाच्चबाधेने जर्जर झालेले असत; तर कोणी पोटी संतान नाही म्हणून दु:खी असत. श्रीस्वामीमहाराज सर्वांना उपाय सांगत असत. व्याधिग्रस्तांना ते औषधे देत व पिशाच्चबाधा झालेल्यांना मंत्र, तंत्र, यंत्र इत्यादि करून देत असत. पुत्रार्थी लोकांना नागनारायणबळी किंवा संतानगोपाल विधी व मंत्र, तंत्र वगैरे सांगत असत. इतरांना त्यांच्या त्यांच्या कामनेप्रमाणे कोणाला स्वर्णपालखदान तर कोणाला श्रीगुरुचरित्र सप्ताह विधी वगैरे उपचार सांगत असत. हे झाल्यावर दररोज जी पत्रे येत असत, त्या पत्रांना श्रीस्वामीमहाराज स्वतः उत्तरे लिहीत असत.

दुपारी चार वाजल्यानंतर श्रीस्वामीमहाराज श्रीमद्भागवतातील

तेथे जमलेल्या मंडळींसमोर वेदस्तुती व ब्रह्मस्तुती हे विषय सांगत असत. त्याचप्रमाणे काही लोकांना द्विसाहस्री गुरुचरित्र टीकेतील कठिण विषय समजावून सांगत असत. थोडक्यात श्रीस्वामीमहाराज लोकांना शिक्षण देण्यासाठी कोणता विषय हाताळीत नसत तेच शोधावे लागेल. हे सर्व झाल्यावर श्रीस्वामीमहाराज सायंसंध्येकरिता श्रीकृष्णापंचगंगा संगमावर जात असत. सायंसंध्येकरिता श्रीकृष्णा-पंचगंगेच्या घाटावर जेथे श्रीस्वामीमहाराज बसत ती जागा, शिरोळचे श्री. बाबूराव कुलकर्णी धुऊन ठेवीत असत. ही सेवा त्यांनी अव्याहत दीड महिना केली. सायंसंध्येच्या वेळी श्रीस्वामीमहाराजां-बरोबर बरीच मंडळी असत. संगमावरही बराच वेळ बैठक होत असे. या बैठकीमध्ये अनेक जणांच्या शंकांचे निरसन होत असे.

संगमावर अशा प्रकारे चर्चा चालू असतानाच इकडे श्रींची पालखी निघत असे. ज्यावेळी तिसरी प्रदक्षिणा सुरू होत असे त्यावेळी श्रीस्वामीमहाराज संगमावरून निघून देवांकडे येत असत व श्रींच्या पालखीची तिसरी प्रदक्षिणा पूर्ण झाली की, श्रींना वंदन करून नंतर ते वरती ब्रह्मानंदांच्या मठात येत असत. तेथे सुद्धा रात्री बारा एक वाजेपर्यन्त मंडळी बसलेली असत. या लोकांचे शंकासमाधान व त्यांच्याशी शास्त्रचर्चा करण्यात मध्यरात्र टळून जात असे. एक वाजल्यानंतर अंगावरची छाटी पसरून श्रीस्वामीमहाराज झोपत असत. झोप फक्त दोन ते तीन तासच होत असे. पुन्हा पहाटे चार वाजता उठून दररोजचे कार्यक्रम सुरू होत असत. श्रीक्षेत्र नरसोबावाडीमध्ये दीड महिना असा हा कार्यक्रम चालू होता. त्यामध्ये कधी खण्ड पडला नाही. दीड महिन्याचा हा काळ कसा हसत व आनंदात गेला ते वाडीकरांना कळले सुद्धा नाही. श्रीस्वामी-महाराजांच्या दर्शनसाठी दूरदूरहून लोक येत असत. त्यांमध्ये सावंतवाडी, मुंबई, वऱ्हाड येथील मंडळीच अधिक असत. दर्शना-

साठी येणाऱ्या लोकात आर्त आणि पीडितांचीच संख्या मोठी असे. श्रीस्वामीमहाराज सर्वांना उपाय सांगत असत आणि प्रत्येकाला त्याच्या श्रद्धेप्रमाणे फळ मिळत असे.

श्रीस्वामीमहाराजांकडून दंड घेण्याच्या इच्छेने ज्यावेळी श्रीदीक्षितस्वामीमहाराज ब्रह्मावर्ताला जावयास निघाले होते त्यावेळी त्यांची आणि श्रीस्वामीमहाराजांची भेलसा या गावी भेट झाली होती. तेथे श्रीदीक्षितस्वामीमहाराजांनी आपला मनोदय श्रीस्वामी महाराजांच्या कानावर घातल्यावर "जशी देवांची इच्छा असेल तसे होईल" असे म्हणून त्यांनी श्रीदीक्षितस्वामीमहाराजांना वाडीला पाठविले होते. श्रीस्वामीमहाराज वाडीला येऊन एक आठवडा लोटला; तरी श्रीदीक्षितस्वामीमहाराजांना दंड देण्याची गोष्ट काही निघेना. आठ दिवस वाट पाहून श्रीदीक्षितस्वामीमहाराजांनी एका रात्री सर्वजण निघून गेल्यावर आपणास दंड देण्याची श्रीस्वामीमहाराजांना पुन्हा विनंती केली. पूर्वाश्रमात कागलची मूर्ती मिळाल्यापासून श्रीस्वामीमहाराजांनी कोणतीही गोष्ट देवांच्या आज्ञेशिवाय केली नव्हती. संन्यास ग्रहणानंतर स्वतःची इच्छा अशी त्यांना राहिलीच नव्हती. "प्रभो तुझी इच्छा! तुझ्या इच्छेप्रमाणेच सर्व काही होऊ दे!" अशी त्यांची भावना होती. श्रीदत्तांच्या आज्ञेचे पालन करणे एवढेच ते जाणत होते. देवांनी सांगितले, अमुक ठिकाणी जा, की ते तेथे गेले. तेथून निघण्याचा आदेश होईपर्यन्त तेथून ते हलले नाहीत. ते ठिकाण सोडण्याची आज्ञा झाल्यावर कितीही अवघड परिस्थिती निर्माण झाली; तरी त्यांनी देवांच्या आज्ञेचे पालन केले. श्रीदीक्षितस्वामीमहाराज खरे म्हणजे श्रीस्वामीमहाराजांचे आवडते शिष्य होते. आपल्याकडून त्यांना दंड मिळावा असे श्रीस्वामीमहाराजांना वाटलेही असेल; पण जोपर्यन्त त्यांना देवांकडून आदेश मिळत नव्हता तोपर्यन्त ते श्रीदीक्षितस्वामीमहाराजांना दंड देऊ शकत

नव्हते. त्यामुळे श्रीदीक्षितस्वामीमहाराजांसारख्या शिष्याच्या परीक्षेचाच हा प्रसंग होता.

श्रीदीक्षितस्वामीमहाराजांची विनंती ऐकून श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "स्वामी! तुम्हाला दंड देण्याबद्दल आपणास आज्ञा झालेली नाही. तेव्हा तुम्ही दुसऱ्या कोणाकडूनही दण्ड घ्या." हे शब्द उच्चारताना श्रीस्वामीमहाराजांना नक्कीच कठिण वाटले असेल; पण त्यांच्याजवळ त्याला काही पर्याय नव्हता. श्रीस्वामीमहाराजांचे शब्द ऐकल्यावर आपणावर वज्राघात झाला असे श्रीदीक्षितस्वामीमहाराजांना वाटले. त्यांच्या नेत्रातून अश्रुधारा वाहू लागल्या. आपली सर्व गात्रे सुन्न होत आहेत असे त्यांना वाटू लागले. जी एकमेव इच्छा मनाशी बाळगून ते आत्तापर्यन्त दिवस कंठीत होते ती त्यांची इच्छा श्रीस्वामीमहाराजांच्या एका वाक्याने धुळीला मिळाली. त्यावेळी त्यांच्या मनात असे विचार आले की, "ज्याअर्थी श्रीस्वामीमहाराजांकडून आपणाला दंड मिळत नाही त्याअर्थी आपण देवांच्या कृपेला पात्र नाही. असे असले तरी सुद्धा श्रीगुरुमाउलीची करुणा भाकली पाहिजे. त्यांनी तर माझ्यावरील प्रेम काढून घेतलेले नाही हे निश्चित आहे! त्यांची इच्छा झाली तर काय अशक्य आहे?" असा विचार करून ते श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाले की, "गुरुदेव! मला दण्डी करण्याची जर आपली इच्छा असेल; तर आपणाकडूनच मला दंड मिळाला पाहिजे. नाही तर हा शिष्य दंडाशिवायच राहील. शिष्याची सर्व चिंता गुरुमाउलीलाच आहे. यापेक्षा मी अधिक काय बोलणार?" श्रीस्वामीमहाराजांनाही वाईट वाटले असेल; पण ते काही करू शकत नव्हते. ते छाटी पांघरून झोपी गेले.

श्रीस्वामीमहाराज जरी झोपी गेले; तरी आपला दण्डग्रहणाचा निश्चय आपल्या सर्वज्ञ श्रीसद्गुरुनाथचरणी निवेदन केल्यावर

श्रीदीक्षितस्वामीमहाराज रात्रभर अश्रू ढाळीत तेथेच उभे राहिले. ज्याप्रमाणे मासोळी ही पाण्याशिवाय तडफडते त्याप्रमाणे आपल्या ईप्सित ध्येयप्राप्तीसाठी त्यांची अंतरात सारखी तळमळ चालली होती. ही तळमळ सर्वसाक्षी प्रभूला कळल्यावाचून कशी राहील ? देव तरी आपल्या भक्ताच्या इच्छेविरुद्ध कसे जाणार ? पहाटेच्या सुमारास आपल्या अनुग्रहीत शिष्याला दंड देऊन कृतार्थ करण्या-बद्दल श्रीस्वामीमहाराजांना देवांची आज्ञा झाली.

त्यावेळी " महाराज आता उठतील. आपले भवितव्य गुरु-माउलीच्या इच्छेवरच सर्वस्वी अवलंबून आहे. देवा ! माझे दुरित अद्याप संपले नाही काय ? " असा विचार करीत श्रीदीक्षितस्वामी-महाराज त्या वंदनीय सद्गुरुचरणांकडे अत्यंत दीन होऊन सारखे पाहात उभे होते. त्यांच्या डोळ्यांतून सारखा अश्रुप्रवाह चालू होता.

अशा अवस्थेत पहाटे चार वाजले. श्रीस्वामीमहाराज उठून बसले. त्यावेळी त्यांना आपल्यासमोर श्रीदीक्षितस्वामीमहाराज रात्री आपण झोपताना जसे उभे होते तसेच उभे आहेत असे दिसले. ते पाहून श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, " स्वामी ! तुम्ही रात्रभर येथेच उभे आहात ? बरे, तर जा आता. तुमच्या इच्छेप्रमाणे दण्ड धारणाची तयारी करा. तुमची इच्छा पूर्ण होईल." आपल्या श्रीसद्-गुरुनाथमहाराजांची ही अमृतमयवाणी कानावर पडल्याबरोबर श्रीदीक्षितस्वामीमहाराजांनी आपल्या श्रीगुरुदेवांच्या श्रीचरणांवर मस्तक ठेवून ते चरण आपल्या अश्रूंनी धुऊन काढले. आत्ताचे हे अश्रू आनंदाचे होते. श्रीस्वामीमहाराजांनीही त्याला प्रतिबंध केला नाही. आपल्या लाडक्या शिष्याचे कौतुक गुरू करणार नाही तर कोण करणार ! कोलगावचे श्री. गणेशपंत सातवळेकर यांना दंड घेऊन येण्याची पूर्व सूचना होतीच. म्हणजे श्रीस्वामीमहाराजांकडून

श्रीदीक्षितस्वामीमहाराजांना दंड मिळावा हे अगोदरपासूनच ठरलेले होते. फक्त त्या अगोदर शिष्याची परीक्षा पाहावयाची होती व त्याची आर्तता किती आहे हे पाहावयाचे होते. प्रायश्चित, पर्यंकशौच, योगपट्ट वगैरे विधी झाल्यावर श्रीस्वामीमहाराजांनी श्रीदीक्षित-स्वामीमहाराजांना दंड देऊन " नृसिंहसरस्वती " असे नाव दिले. हा सर्व विधी शके १८२७ च्या चैत्र महिन्यात श्रीनारायणस्वामींच्या मंदिरात झाला.

प. प. श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराज हे श्रीस्वामी-महाराजांचे एकनिष्ठ भक्त व पट्टशिष्य होते. हे मितभाषी, शान्त, दान्त, सदा हसतमुख, प्रेमळ व एकान्तप्रिय होते. वाडीमध्येच राहून श्रीदत्ताची पूजा व उत्सव करीत राहावे अशी श्रीस्वामीमहाराजांची त्यांना आज्ञा होती. त्याप्रमाणे श्रीदीक्षितस्वामीमहाराज वाडीला बरीच वर्षे सेवा करीत राहिले होते. बऱ्याच वर्षांच्या सेवेनंतर त्यांच्यामध्ये आणि पुजाऱ्यांमध्ये मतभेद निर्माण झाले आणि वाडी सोडून जाणे हाच एकमेव पर्याय त्यांना उरला; परन्तु वाडी सोडू नये अशी गुर्वाज्ञा असल्यामुळे श्रीदीक्षितस्वामीमहाराज मोठ्या पेचात पडले. त्यावेळी श्रीस्वामीमहाराज उत्तरेमध्ये होते. श्रीदीक्षिस्वामी-महाराजांनी वाडीतील परिस्थिती श्रीस्वामीमहाराजांच्या कानावर घातली. त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांची अशी आज्ञा झाली की, " प्रसंगच आल्यास वाडी सोडावी. " श्रीस्वामीमहाराजांची आज्ञा मिळताच श्रीदीक्षितस्वामीमहाराज नदीच्या पैल तीरावर असलेल्या अमरापूर किंवा औरवाड या गावातील श्रीअमरेश्वराच्या मंदिरात जाऊन राहिले. या मंदिराचा त्यांनी जीर्णोद्धार केला व तेथे " श्रीवासुदेवानंदसरस्वतीपीठ " म्हणून एक संस्था स्थापना केली.

श्रीदीक्षितस्वामीमहाराजांच्या दंडग्रहणानंतर ज्यावेळी श्री-स्वामीमहाराज सायंसंध्येला संगमावर जात असत त्यावेळी त्यांचा

दण्ड आपल्या हाती घेऊन श्रीदीक्षितस्वामीमहाराज त्यांच्या बरोबर जात व संगमावर गेल्यावर तो दंड श्रीस्वामीमहाराजांच्या हाती देत. संध्या झाल्यावर श्रीस्वामीमहाराज "वेदान्त केसरी" हा ग्रंथ सांगत असत. मध्यान्ही गुरुशिष्य दोघेही एकत्रच भिक्षेला जात व श्रीगोविंदस्वामींच्या मठात भिक्षा संपवीत असत. यावेळी श्रीस्वामीमहाराजांनी वाडीतील मुलांकरिता संस्कृत पाठशाला स्थापन करून श्रीदीक्षितस्वामीमहाराजांची तेथे अध्यक्ष म्हणून नेमणूक केली व श्री. धुंडीराजशास्त्री कवीश्वर यांना अध्यापक नेमले. तेथे विद्यार्थ्यांना धार्मिक शिक्षण दिले जात असे. श्रीस्वामीमहाराजांनी आपल्या पादुकांचा एक जोड या संस्कृत पाठशालेला व एक जोड श्रीदीक्षितस्वामीमहाराजांना प्रसाद म्हणून दिला होता.

श्रीस्वामीमहाराजांचे वाडीतील वास्तव्य हा एक अपूर्व योग होता. जवळजवळ चौदा वर्षांनी त्यांचे वाडीमध्ये पुनरागमन झाले होते. चौदा वर्षांपूर्वी त्यांनी वाडी सोडली तेव्हा ते गृहस्थाश्रमी होते. त्यावेळी त्यांच्या बरोबर सौ. अन्नपूर्णाबाईही होत्या. चौदा वर्षांपूर्वी वाडीच्या लोकांना श्रीस्वामीमहाराजांची पूर्ण ओळख पटली नव्हती. त्यांचा अधिकार लोकांना माहीत झाला नव्हता. चतुर्थाश्रमात प्रवेश केल्यावर श्रीस्वामीमहाराजांमध्ये देवकळेचा जो विकास झाला त्याने गुजराथ प्रांत, मध्यप्रदेश, उत्तरप्रदेश, उत्तराखड हा हिन्दुस्थानचा अर्धा भाग प्रभावित झाला होता. चौदा वर्षांतील त्यांच्या संचाराच्या अद्‌भुत कथा वाडीला येऊन पोहोचत असत. वाडीकरांना असे वाटावयाचे की, "श्रीस्वामीमहाराज आपल्या घरचेच आहेत." त्यांचा श्रीस्वामीमहाराजांवर प्रेमाचा हक्क होता. त्यामुळे चौदा वर्षांच्या एक तपाहून अधिक काळानंतर श्रीस्वामीमहाराज वाडीला आल्यावर तेथील लोकांनी त्यांना क्षणाचीही उसंत लाभू देऊ नये, हे साहजिकच होते. श्रीस्वामी-

महाराजांच्या सहवासात जास्तीत जास्त वेळ घालवावा असे प्रत्येकाला वाटे.

एक दिवस श्रीस्वामीमहाराज नेहमीप्रमाणे श्रीकृष्णापंचगंगेच्या घाटावर सायंसंध्येसाठी गेले होते. सोबत श्रीदीक्षितस्वामीमहाराज, श्री. सीतारामबुवा वगैरे आठ दहा मंडळी होती. पालखीची तिसरी प्रदक्षिणा सुरू झाली. श्रीस्वामीमहाराज संगमावरून उठले व मंदिराच्या दिशेने चालू लागले. मंदिरात येऊन देवदर्शन करून तिसरी प्रदक्षिणा आटोपल्यावर श्रीस्वामीमहाराज वर जाऊ लागले. त्यांच्या उजव्या हातात दंड व डाव्या हातात भोपळ्याचा कमंडलू होता. चार सहा पायऱ्या चढून गेल्यावर एका पायरीवर श्रीस्वामीमहाराज क्षणमात्र थांबले. त्यावेळी त्यांचे शरीर थोडे थरथरल्यासारखे झाले व डाव्या हातातील कमंडलू गळून पडला; परन्तु चमत्कार असा की सुक्या भोपळ्याचा कमंडलू खाली पडला तरी तो फुटला नाही किंवा त्याला चीरही पडली नाही. सोबत असलेल्या लोकांनी हे ओळखले की, श्रीस्वामीमहाराज समाधी अवस्थेत आहेत. त्याही स्थितीमध्ये श्रीस्वामीमहाराज चालत श्रीनारायणस्वामींच्या मंदिरात जाऊन बसले. अशा स्थितीत कोणाशीही काहीही बोलणे न होताच समाधी अवस्थेतच बराच काळ गेला. सर्व मंडळी हात जोडून उभी होती. आज काहीतरी विशेष प्रकार होणार आहे असे सर्वांना वाटू लागले. सगळीकडे निःशब्द शांतता पसरली. बऱ्याच वेळाने श्रीस्वामीमहाराजांच्या मुखातून अत्यंत जोरात व आवेशयुक्त वाणी ऐकू आली की, "चारही फडातील वृद्ध पुजारी मंडळींना हाक मारा." ही आज्ञा समजल्याबरोबर धावपळ करून सर्व वृद्ध मंडळी गोळा होऊन श्रीस्वामीमहाराजांच्या समोर उभी राहिली. ते सर्वजण आलेले पाहताच श्रीस्वामीमहाराजांच्या मुखातून पुन्हा असे शब्द बाहेर पडू लागले की, "तुमच्या चालू आचरणाचा श्रींना कंटाळा

आला असून त्यात काही सुधारणा करण्याकरिता आपणास इकडे आणले आहे. तुम्ही तुमच्या पूर्वजांच्या आचरणाप्रमाणे वागत नाही. तुमचे आचरण बिघडले आहे. ते तुम्ही सुधारले नाही; तर तीन वर्षे झालेली शिक्षा काहीच नाही, अशी भयंकर शिक्षा होईल." श्रीस्वामीमहाराजांच्या मुखातून निघालेले हे शब्द ऐकून सर्वजण अत्यंत घाबरून गेले. वाडीला अनाचार माजला होता ही गोष्ट खरी होती. जो तो स्वतःच्या फायद्यासाठी धडपडत होता. देवांवर व्हावयाचे नित्य उपचारही वेळेवर होत नसत. देवांची पूजा,' नैवेद्य इत्यादि भलत्या वेळी होऊ लागले होते. हे सर्व लक्षात घेऊन तेथे जमलेल्या सर्व वृद्ध मंडळींनी हात जोडून व अत्यंत नम्र होऊन श्रीस्वामीमहाराजांची अशी प्रार्थना केली की, "आमच्याकडून झालेल्या सर्व अपराधांची क्षमा करून या आम्हां बाळ गोपाळांच्या-कडून पूर्वजांप्रमाणे आचरण करून घेऊन योग्य प्रकारे इष्ट ती सेवा करून घ्यावी." अशी प्रार्थना केल्यावर सर्व वृद्ध मंडळी हात जोडून तशीच उभी राहिली. श्रीस्वामीमहाराज आणखी काही तरी बोलतील अशी सर्वांची अपेक्षा होती; पण ते अधिक काही न बोलता ब्रह्मा-नंदांच्या माडीवर आपल्या जागेवर जाऊन बसले. अद्यापही ते देह-भानावर आले नव्हते. सर्व मंडळी बरोबरच वर आली होती. देवांचा आणखी काहीतरी आदेश होईल म्हणून मंडळी तीनचार घटका वाट पाहत थांबली होती; पण श्रीस्वामीमहाराज काहीही बोलले नाहीत. तेव्हा एका गृहस्थाने धैर्य करून त्यांना असे विचारले की, "श्रींचा रोष जाण्यास काय करावे ?"

श्रीस्वामीमहाराज आता पूर्णपणे देहभानावर आले होते. हा श्न ऐकताच ते असे म्हणाले की, "आपल्याला काही कळत नाही: आपणही तुमच्यासारखेच एक आहोत." या उत्तराने लोक खिन्न होऊन गेले. वाडीच्या पुजाऱ्यांवर देवांचे प्रेम होते. म्हणून तर

त्यांनी पुजाऱ्यांची कानउघडणी करण्यासाठी श्रीस्वामीमहाराजांना वाडीला पाठविले होते. तसे नसते तर देवांनी पूर्व सूचना न देताही त्यांना शिक्षा केली असती.

यावेळी श्रीक्षेत्र नरसोबावाडीला कौलगावचे श्री. गणेशपंत सातवळेकर, सावंतवाडीहून श्री. नारोपंत उकिडवे, श्री. शंकरराव सप्रे वगैरे मंडळी श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी आली होती. यांपैकी एक श्री. सातवळेकर वगळता बाकीच्या सर्वांना पुष्कळ वर्षांनन्तर श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन झाले होते. सोळा वर्षांनी दर्शन झाल्यामुळे सर्वांना अवर्णनीय असा आनंद झाला होता. श्री. नारोपंत उकिडवे हे श्रीस्वामीमहाराजांचे पूर्वाश्रमातील अगदी निकटवर्ती भक्त आणि स्नेही होते. भरतभेटीसारखाच हा प्रसंग होता. श्रीस्वामीमहाराज पुन्हा संचाराला बाहेर पडल्यावर त्यांचे पुन्हा दर्शन कधी घडेल ते कोणी सांगावे ? या विचाराने श्रीस्वामी-महाराजांचा एक फोटो काढून घ्यावा असे सर्वांनी ठरविले व कुरुंदवाडहून एका फोटोग्राफरला वाडीला बोलावून घेतले. फोटो-ग्राफरला बोलविण्यापर्यन्त धाडस तर झाले ; पण श्रीस्वामीमहा-राजांना फोटोसाठी बसा असे सांगण्याचे धैर्य मात्र कोणाला होईना. अखेर हिय्या करून सर्वांनी आपली इच्छा श्रीस्वामीमहाराजांच्या कानी घातली.

सर्वांनी फोटो काढावयाची इच्छा व्यक्त केल्यावर श्रीस्वामी-महाराज त्यांना असे म्हणाले की , "हृदयात ठेवावयाचे सोडून कागदावर फोटो कसला काढता ? काही जरूर नाही." ज्या लोकांनी ही इच्छा व्यक्त केली होती ते सर्वजण पूर्वाश्रमापासून श्रीस्वामीमहाराजांच्या परिचयातील होते. श्रीस्वामीमहाराजांची मूर्ती त्यांच्या हृदयामध्ये कोरलेली होती हे वेगळे सांगावयालाच नको. श्रीस्वामीमहाराजांनाही तशी खात्री होती म्हणून तर ते असे

म्हणाले ; पण श्रीस्वामीमहाराजांच्या नकाराने सर्वांनाच वाईट वाटले. एवढी तयारी केली, फोटोग्राफरला बोलाविले, ते सर्व आता फुकट जाणार असे सर्वांना वाटून पुन्हा एकदा प्रार्थना करून पाहावी म्हणून सर्वांनी श्रीस्वामीमहाराजांना अशी प्रार्थना केली की "फोटोची सर्व तयारी केलेली आहे व फोटोग्राफरही आलेला आहे." हे सर्वांचे म्हणणे ऐकताच आपल्यावरील प्रेमापोटीच हा आग्रह चालला आहे हे श्रीस्वामीमहाराजांना काय समजले नव्हते ? पण फोटो काढून घेणे ही एक अनावश्यक गोष्ट आहे असे त्यांना वाटत होते. असे असले तरी सुद्धा लोकाग्रहास्तवच "बरे तर चला!" असे म्हणून ते फोटो काढून घ्यावयाला तयार झाले व ब्रह्मानंदांच्या माडीवरून उतरून श्रीनारायणस्वामीमहाराजांच्या मंदिराच्या कट्ट्यावर येऊन बसले. या फोटोत श्रीस्वामीमहाराज सिद्धासन घालून बसलेले असून त्यांच्या उजव्या हातात दंड व डावा हात पोटाकडून नाभिप्रदेशाजवळ आलेला आहे. जवळच डाव्या बाजूला कमंडलू आहे. त्यावेळी घेतलेला हाच श्रीस्वामीमहाराजांचा पहिला फोटो आहे.

एकदा सावंतवाडी संस्थानचे कारभारी श्री. विनायकराव गुप्ते व पेडण्याचे एक प्रभू गृहस्थ श्री. बाबूराव देशमुख असे दोघे मिळून श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी श्रीक्षेत्र नरसोबावाडीला आले. श्री. विनायकराव गुप्ते अधिकार नसताना वेदोक्त कर्म करीत असत. असे शास्त्रबाह्य वर्तन श्रीस्वामीमहाराजांना पसंत नसे. श्री. गुप्ते व श्री. देशमुख दर्शनाला आले त्यावेळी श्रीस्वामीमहाराज श्रीदत्त-पादुकांजवळ बसले होते. श्री. गुप्त्यांनी समोर येऊन श्रीस्वामीमहा-राजांना नमस्कार केला व ते त्यांच्यासमोर बसले. त्यांना पाहताच श्रीस्वामीमहाराज त्यांच्याकडे पाठ करून बसले. ते पाहून श्री. गुप्ते पुन्हा समोर जाऊन नमस्कार करू लागले. त्यावेळी श्रीस्वामीमहा-

राजांनी पुन्हा त्यांच्याकडे पाठ केली. मग मात्र श्री. गुप्ते समोर न जाता पाठीमागूनच श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाले की, "माणगावी केव्हा येणे होईल ?" हे ऐकताच श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "काही काम नाही." त्यावेळी श्री. गुप्ते पुन्हा त्यांना असे म्हणाले की, "मातृभूमीकडे संन्याशाने यावे असे आहे ना ?" हे ऐकून श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "तोच मार्ग धरला आहे, पूर्ण साधेल तो सुदिन." याप्रमाणे बोलणे झाल्यावर श्री. गुप्ते मनातून निराश होऊन निघून गेले. त्यांचे श्रीस्वामीमहाराजांविषयी चांगले मत झाले नाही. सावंतवाडीला परतल्यावर ते श्रीस्वामीमहाराजांची निंदा करू लागले. वास्तविक श्री. गुप्ते यांच्यावर येणाऱ्या आगामी संकटाची सूचना म्हणूनच त्यांचा नमस्कार न स्वीकारता श्रीस्वामीमहाराजांनी तोंड फिरविले होते. आपण असे का करता असे नम्रपणे विचारण्याऐवजी श्री. गुप्ते नको ते प्रश्न विचारीत राहिले. पुढे एक-दोन वर्षांतच श्री. गुप्त्यांवर संस्थानची अवकृपा झाली. त्यांना नोकरीवरून कमी करून संस्थानच्या हद्दीत पुन्हा पाय न ठेवण्याबद्दल ताकीद देण्यात आली.

एकदा शिरोळचे मामलेदार श्री. बागल श्रीस्वामीमहाराजांना भेटावयाला आले. त्या दिवसात मामलेदार म्हणजे बडे प्रस्थ असे. कधी कधी अशा माणसांमध्ये मोठ्या हुद्याबरोबर वृथा अहंकारही वास करीत असतो. दर्शन झाल्यावर ते आशीर्वाद मागण्याऐवजी नसत्या शंकाकुशंका उपस्थित करू लागले. बुवाबाजीवर कोरडे मारण्याच्या उद्देशाने ते श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाले की, "सध्या जिकडे तिकडे बुवा दिसतात. यातील खरे कोण आणि खोटे कोण हे आमच्यासारख्या अज्ञ माणसांनी कसे ओळखावे ?" हा प्रश्न ऐकताच श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "साधू होऊनच साधला ओळता येते. इतरांना ते कळावयाचे नाही."

श्रीस्वामीमहाराजांचे हे सडेतोड उत्तर ऐकून अधिक काही न बोलता श्री. मामलेदारसाहेब निघून गेले.

सांवतवाडीतील श्री. रामभाऊ सबनीसांचे घराणे श्रीस्वामीमहाराजांच्या कृपेला पात्र झालेले होते. श्री. रामभाऊ सबनीसांनी श्रीस्वामीमहाराजांच्या पूर्वाश्रमात माणगावच्या श्रीदत्तमंदिराचा कारभार व्यवस्थितपणे सांभाळून श्रीस्वामीमहाराजांची कृपा संपादन केली होती. त्यांच्याच कुटुंबातील श्री. कृष्णराव सबनीस यावेळी श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठी वाडीला आले होते. श्रीस्वामीमहाराज श्री. कृष्णरावांना आशीर्वादपूर्वक असे म्हणाले की, "मातृदेवो भव । पितृदेवो भव । आचार्यदेवो भव ।" यातच सर्व काही आले. आपल्या मातापित्यांची सेवा व गुरुसेवा हीच खरी ईश्वरसेवा होय व हीच ईश्वरभक्ती होय."

कवठेगुळंद येथील श्री. तात्यासाहेब इनामदार हे श्रीस्वामीमहाराजांचे एकनिष्ठ भक्त होते. श्रीस्वामीमहाराजांच्या सांगण्यावरूनच त्यांनी विवाह केला होता. लग्नासाठी त्यांनी जी मुलगी पसंत केली होती ती सुद्धा श्रीस्वामीमहाराजांनी सुचविलेलीच होती. लग्न होऊन बरीच वर्षे लोटली; तरी श्री. तात्यासाहेबांना संतान झाले नाही. यावेळी ते आपल्या पत्नीला घेऊन श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनाला श्रीक्षेत्र नरसोबावाडीला आले होते. श्रीस्वामीमहाराजांना नमस्कार करून त्यांनी त्यांना अशी विनंती केली की, "आपल्या आज्ञेवरून मी हिच्याशी लग्न केले; पण आज ४२ वर्षे झाली, अद्याप आम्हाला संतती झाली नाही." असे म्हणून त्यांनी पुन्हा आपल्या पत्नीची पत्रिका श्रीस्वामीमहाराजांना दाखविली. ती पत्रिका पाहून श्रीस्वामीमहाराज असे त्यांना म्हणाले की, "ही स्त्री तर वंध्या आहे." ते ऐकून श्री. तात्यासाहेब श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाले की,

"महाराज! आपणच तर अशी वंध्या स्त्री आम्हाला दिली. आपण सांगितले म्हणून तर मी हिच्याशी लग्न केले." हे ऐकताच श्रीस्वामी-महाराज हसले व त्यांनी श्री. तात्यासाहेबांना एक अनुष्ठान लिहून देऊन ते करावयास सांगितले. नंतर त्यांनी उभयतांना प्रसादाचे नारळ दिले. प्रसाद घेऊन श्री. तात्यासाहेब आनंदाने घरी जावयाला निघाले. वाटेत त्यांनी आपल्या उपाध्यायाकडून श्रीस्वामीमहाराजांचा एक फोटो विकत घेतला. तो फोटो त्यांना पसंत पडला नाही म्हणून त्यांनी तो बदलून दुसरा आणला व तो घेऊन ते घरी गेले. घरी गेल्यावर त्याच दिवशी रात्री त्यांना स्वप्नात असा दृष्टान्त झाला की, "माझे स्वरूप तुम्हांला पसंत पडले नाही, याकरिता तुम्हाला दिलेला प्रसाद परत द्या." असे म्हणून प्रसादाचे दोन्ही नारळ श्रीस्वामीमहाराजांनी स्वप्नात परत घेतले. या स्वप्नामुळे उभय-तांना फार वाईट वाटले. पुढे काही दिवस गेल्यावर श्री. तात्या-साहेब पुन्हा वाडीला आले व व्यथित अंतःकरणाने त्यांनी आपणास पडलेले स्वप्न श्रीस्वामीमहाराजांना सांगून त्यांची क्षमा मागितली.

श्री. तात्यासाहेबांनी त्यांना असे सांगितल्यावर श्रीस्वामी-महाराज त्यांना असे म्हणाले की, "अशीच एक गोष्ट काल येथे एकजण सांगत होते. हे गृहस्थ निजले असताना त्यांना कोणीतरी चापट मारून असे म्हणाले की, "मूर्खा माझ्याकडे पाय करून काय निजलास ?" ते गृहस्थ जागे होऊन पाहतात ; तर ते खरो-खरच फोटोकडे पाय करून निजले होते. पुन्हा आपल्याकडून असे घडू नये म्हणून देवांनीच आपणास ही शिक्षा केली असावी असे समजून ते गृहस्थ स्वस्थ राहिले. तुमच्या बाबतीमध्ये सुद्धा असेच घडले असावे. तरी आपण आपले मन अत्यंत सरळ व दोषरहित ठेवावे."

श्रीस्वामीमहाजांनी सांगितलेली ही हकीकत ऐकून श्री. तात्या-

साहेब त्यांना असे म्हणाले की, "महाराज! आम्ही आपली अजाण लेकरे आहोत. आपण आमचे अपराध पोटात घालून आम्हाला क्षमा करा." भक्तवत्सल श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना पुन्हा नारळ-प्रसाद दिला. यथाकाळ त्यांना एक मुलगा व एक मुलगी झाली.

माणगावचे श्री. शंभूशास्त्री साधले यांच्याकडे श्रीस्वामीमहाराज पूर्वाश्रमात रघुवंशाचे बारा श्लोक आणि ज्योतिषशास्त्रातील केशवीचे गणित शिकले होते. नंतर श्री. शंभूशास्त्र्यांनीच त्यांचे शिक्षण बंद केले होते. पुढे माणगावमध्ये असताना श्रीस्वामीमहाराजांनीच श्री. शंभूशास्त्र्यांचा मुलगा गजानन यास प्रथम केशवीचे गणित शिकविले होते व त्याच्याकडून माणगावचे श्री. बाबा साटम यांची पत्रिका तयार करून दिली होती. पत्रिका श्री. बाबा साटम यांना न पाहताच केली होती. पत्रिकेमध्ये शरीरावरील सर्व खाणाखुणा वर्तविल्या होत्या. पत्रिका तयार झाल्यावर श्री. बाबा साटम यांना बोलावून श्री. गजाननाने बनविलेली पत्रिका त्यांना वाचून दाखविण्यात आली. पत्रिकेत लिहिल्याप्रमाणे सर्व खाणाखुणा श्री. सामस यांच्या अंगावर आहेत हे पाहून सर्वांना आश्चर्य वाटले. श्रीस्वामीमहाराजांनी आणखी बऱ्याच गोष्टी श्री. गजाननराव साधले यांच्याकडून वर्तविल्या होत्या. पुढे श्री. गजाननराव हे श्री. गजाननशास्त्री साधले झाले व ते मुंबईमध्ये राहू लागले.

एकदा त्यांच्या पत्नीच्या नाकातून रक्त पडू लागले. त्यांनी पुष्कळ डॉक्टरी इलाज केले; पण रक्त पडणे काही थांबले नाही. श्रीस्वामीमहाराजांची कीर्ती श्री. गजाननशास्त्र्यांच्या कानी गेली होती. पूर्व परिचयही होताच. श्रीस्वामीमहाराज वाडीला आहेत असे कळल्यावर श्री. गजाननशास्त्री पत्नीला घेऊन वाडीला आले. त्यांनी श्रीस्वामीमहाराजासाठी फळफळावळ, छाटी, धाबळी व एक कमंडलू या वस्तू आणल्या होत्या. या जिनसा श्रीस्वामीमहाराजांसमोर ठेवून त्यांनी

जेव्हा नमस्कार केला तेव्हा श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "आधी देवांना नमस्कार करा." असे म्हणून त्यांनी श्री. शास्त्रीबुवांनी आणलेल्या सर्व जिनसा तेथेच लोकांना वाटून टाकल्या. श्री. गजाननशास्त्र्यांच्या आग्रहास्तव फक्त कमंडलू तेवढा स्वतः-साठी ठेवून घेतला. तो कमंडलू सुद्धा फक्त तीन दिवसच शौचाला जाताना श्रीस्वामीमहाराजांनी वापरला. दुसऱ्या दिवशी श्रीस्वामी-महाराजांनी श्री. गजाननशास्त्र्यांना इकडे येण्याचे कारण विचारले. तेव्हा ते त्यांना असे म्हणाले की, "आपल्या पत्नीच्या पोटी संतान नसल्यामुळे ती अतिशय दुःखी आहे व गेले कित्येक दिवस तिच्या नाकातून रक्त पडत असल्याने ती फार हैराण झाली आहे; तरी आपण तिच्यावर कृपा करावी." श्री. गजाननशास्त्र्यांनी श्रीस्वामी-महाराजांना अशी विनंती केल्यावर त्यांनी श्री. गजाननशास्त्र्यांच्या पत्नीसाठी भस्माच्या तीन पुड्या दिल्या व ते भस्म गावी गेल्यावर तुंब्याच्या रसातून तिच्या नाकात घालावयाला सांगितले व दोघांनाही संतानप्राप्तीसाठी एक मंत्र लिहून देऊन त्याचा विधियुक्त जप करण्यास सांगितले आणि पहिला मुलगा होईल असा आशीर्वादही दिला. श्रीस्वामीमहाराजांच्या सांगण्याप्रमाणे माणगावला जाऊन उपचार केल्यावर श्री. गजाननशास्त्र्यांच्या पत्नीच्या नाकातून रक्त पडण्याचे थांबले. संतानप्राप्तीच्या मंत्राच्या विधीमध्ये काही फरक पडल्यामुळे मात्र त्यांना पहिली मुलगी व दुसरा मुलगा झाला. श्रीगजाननशास्त्र्यांच्या भावाला सुद्धा संतान नव्हते. त्यांनी श्रीस्वामी-महाराजांचे दर्शन घेऊन संतानप्राप्तीचा उपाय विचारला. त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांनी त्यांच्या पत्नीला अश्वत्थाला प्रदक्षिणा घालण्यास सांगितले. त्याप्रमाणे अश्वत्थाला प्रदक्षिणा घालताच श्री. गजाननशास्त्र्यांच्या बंधूंना मुलगा झाला.

श्रीस्वामीमहाराजांचा वाडीच्या पुजाऱ्यांवर विशेष लोभ होता.

कोणी दुःखी कष्टी असल्यास त्याचे दुःख निवारण करण्यासाठी श्रीस्वामीमहाराज उपाय सांगत असत. श्री. आप्पा, श्री. रंगोबा वगैरे पुजाऱ्यांचा आजार श्रीस्वामीमहाराजांच्या प्रसादाने बरा झाला होता. श्री. अण्णाजी कृष्ण पुजारी कर्जबाजारी होते. अल्पउत्पन्नामुळे कर्जफेड व कुटुंबाचे पोषण त्यांना जड जात असे. त्यांचा चेहरा नेहमीच चिंतातुर असे. श्रीस्वामीमहाराजांच्या सान्निध्यात ते नेहमी श्रीस्वामी-महाराजांच्या पाठीमागे जाऊन बसत. एक दिवस श्रीस्वामी-महाराजांनी त्यांना असे विचारले की, "काय अण्णाजी! कर्ज वगैरे काही नाही ना? सर्व ठीक आहे ना?" त्यावर एक दीर्घ श्वास सोडून श्री. आण्णाजी त्यांना असे म्हणाले की, "महाराजांच्या कृपेने सर्व काही ठीक आहे; पण पोष्टात पोष्टमनची नोंकरी करून कुटुंबाचा उदरनिर्वाह करणे व कर्ज फेड करणे जमत नाही." हे ऐकताच श्रीस्वामीमहाराजांनी एक "शक्तिवर्धक पाक" करण्याची क्रिया त्यांना सांगितली. त्याप्रमाणे पुढे त्यांनी शक्तिवर्धक पाक तयार केला. त्याचा बराच खप होऊन सर्व कर्जातून श्री. अण्णाजी कृष्ण पुजारी हे पूर्णपणे मुक्त झाले व अत्यंत सुखाने नांदू लागले.

श्रीक्षेत्र नरसोबावाडीचे श्री. सखाराम बापू गेंडे हे चांगले फोटो-ग्राफर होते. त्यांचे शेतीचे उत्पन्नही बरेच होते; पण त्यांची शेती पुष्कळ वर्षे तंटयात पडल्यामुळे त्यांना शेतीचे काहीसुद्धा उत्पन्न मिळत नसे. पुढे त्यांना सगळीकडे विटाळ आहे असा भास होऊ लागला. त्यावेळी श्रीस्वामीमहाराज वाडीला आलेले नव्हते. त्यामुळे श्री. सखारामबापूंनी आपली अवस्था श्रीस्वामीमहाराजांना पत्राने कळविली होती. श्रीस्वामीमहाराजांनी पत्रोत्तरी त्यांना श्रीदत्तमाला-मंत्राचा जप करण्यास सांगितले होते. या जपाने श्री. सखारामबापूंचा विटाळाचा त्रास नाहीसा झाला व कित्येक दिवस बंद असलेले शेतीचे उत्पन्नही कुळाकडून नियमितपणे येऊ लागले. श्रीस्वामीमहाराजांनी

सांगितलेल्या या अनुष्ठानामुळे पुढे त्यांचे सर्व आयुष्य सुखात गेले.

श्रीस्वामीमहाराजांचा पूर्वाश्रमात माणगावमध्ये जसा श्री. आणावकरांच्या समंधाबरोबर संबंध आला होता, तसाच एका विद्वान् समंधाचा त्यांना वाडीमध्ये प्रत्यय आला. श्रीस्वामीमहाराज श्रीसुरेश्वराचार्यांची सूत्रवृत्ती आपल्या शिष्यांना समजावून सांगत होते. त्यावेळी तेंथे श्री. अंतोबा घाटे, श्री. शंकरराव, श्री. लक्ष्मणराव फुलारी वगैरे मंडळी होती. एकदा सूत्रवृत्ती सांगताना अनवधानानें मूळ अर्थाचा अनुरोध चुकून दुसराच अर्थ सांगितला गेला. त्यावेळी श्री. लक्ष्मणराव फुलारी मध्येच असे म्हणाले की, "याचा अर्थ असा नाही." सर्वांनाच आश्चर्य वाटले. श्रीस्वामीमहाराजही आश्चर्यानें असे म्हणाले की, "लक्ष्मण! तू रे कधी सूत्रवृत्ती वाचली होतीस?" त्यावर लक्ष्मणराव फुलारी असे म्हणाले की, "तो काय सूत्रवृत्ती वाचतो! तो मी आहे." त्यावेळी कोठे सर्वांच्या लक्षात आले की, आत्ता जो बोलला तो श्री. लक्ष्मणराव फुलाऱ्यांच्या अंगातील समंध असून श्री. लक्ष्मणराव फुलारी नव्हे!

या दीड महिन्याच्या काळात श्रीस्वामीमहाराजांचा श्रीक्षेत्र नरसोबावाडी येथे मुक्काम असताना अनेक लोकांनी येऊन आपले मनोरथ पूर्ण करून घेतले. त्या काळात कितीतरी लोकांना त्यांनी दुःखमुक्त केले. लहान मुलांचे रोग बरे केले. कित्येकांच्या भूत–पिशाच्चबाधा घालविल्या. अनेकांच्या असाध्य व्याधी बऱ्या केल्या. अनेक जणांना प्रापंचिक अडचणीतून मार्ग काढण्यासाठी उपाय सांगितले. सासरी न नांदणाऱ्या कितीतरी मुलींना त्यांच्या सासरी पाठवून त्यांचे संसार सुखाचे केले आणि काही भाग्यवंतांना परमार्थ सोपानाची उच्च पायरी गाठावयाला साहाय्य केले.

ज्या कामासाठी देवांनी श्रीस्वामीमहाराजांना वाडीला पाठवून दिले होते ते काम म्हणजे येथील पुजाऱ्यांसाठी एक आचारसंहिता

घालून देणे हे होते. देवांच्या आज्ञेप्रमाणे व श्रीक्षेत्र नरसोबा-वाडीतील पुजारी मंडळींच्या प्रार्थनेवरून श्रीस्वामीमहाराजांनी आचरणाचे काही नियम दिले; पण काही पुजारी मंडळींना ते पसंत न पडल्यामुळे त्यांनी त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांची निंदा केली. त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांनी घालून दिलेले नियम असे होते–

(१) पूर्वी देवांना यात्रेकरूंचीच महापूजा होत असे. यात्रेकरू नसले तर पादुका संध्याकाळपर्यन्त पूजेशिवाय तशाच ठेवीत व संध्याकाळी धुपाचे वेळी पूजा करीत असत. त्याकरिता श्रीस्वामी महाराजांनी सर्वांना असे सांगितले की, "ही रीत बरी नाही तुम्ही स्वतः श्रीदत्तपादुकांची मध्यान्ही पूजा करीत जा. यात्रेकरू येवो अगर न येवो."

(२) श्रीरामचंद्र योगी, श्रीकाशीकरस्वामी, श्रीगोपाळस्वामी इत्यादि देव मानलेल्या व नित्य पूजेतील सर्व श्रीस्वामींच्या पुण्य-तिथ्या करून एकेक दिवस त्यांचाही उत्सव व समारंभ करीत जा. तसेच पौष शुद्ध द्वितीयेला श्रीमन्नृसिंहसरस्वतीस्वामीमहाराज यांची जयंती व भाद्रपद शुद्ध चतुर्थीला श्रीपादश्रीवल्लभांची जयंती साजरी करावी.

(३) स्नपनविधी बंद करावा.

## स्नपन अनुष्ठानः–

श्रीस्वामीमहाराजांच्या त्यावेळच्या श्रीक्षेत्र नरसोबावाडीच्या आगमनापूर्वी तेथे वारंवार स्नपन अनुष्ठान नावाचा विधी होत असे. दररोज रात्री पालखी व शेजारती झाल्यावर देव विश्रांतीसाठी जातात. पुन्हा दुसऱ्या दिवशी पहाटे काकड आरतीने देवांना जाग-वावयाचे व त्यानंतर आधल्या दिवशीच्या महापूजेचे विसर्जन करा-वयाचे, अशी ही नित्याची पद्धत असे व आहे; परन्तु या दिवसात

देवांना स्नपन अनुष्ठानाने साकडे घालण्याची पद्धतही पुजारी मंडळींनी सुरू केली होती. एखाद्या भक्ताला आपली मनोकामना लवकरात लवकर पूर्ण व्हावी अशी इच्छा झाल्यास त्याच्या पुजाऱ्याने शेजारती झाल्यावर, देवांचा एक शागीर्द बरोबर घेऊन मध्यरात्री त्या भक्ताला श्रीकृष्णेमध्ये स्नान करवून, ओलेत्याने देवांना गंधफूल वाहावयाला लावावयाचे. असे करण्यापूर्वी सकाळी केलेली महापूजा अगोदर विसर्जन करावी लागत असे. श्रीपादुकांवर गंधफूल वाहून झाल्यावर श्रीरामचंद्रयोग्यांच्या समाधीवर गंधफूल वाहत असत. असे हे स्नपन अनुष्ठान सात दिवस करावे लागत असे.

कालांतराने या विधीचा दुरुपयोग होऊ लागला. यजमानाने वजन खर्च केल्याशिवाय पूजा होत नसे. श्रद्धेपोटी होणारी ही पूजा पुढे पैसेवाल्यांची मक्तेदारी झाली. वाडीतील श्रीपादुकांच्या रूपाने प्रत्यक्ष भगवान् श्रीदत्तात्रेय तेथे सदेह वास्तव्य करून आहेत अशी सर्व भक्तांच्या मनामध्ये भावना रुजलेली आहे. स्नपन अनुष्ठान करणाऱ्यांच्याही मनामध्ये अर्थातच ही भावना असे; म्हणून तर ते देवांना साकडे घालीत असत. सकाळी काकड आरतीपासून तो रात्री शेजारतीपर्यंन्त जे विधी होतात ते याच भावनेपोटी होतात. शेजारती झाल्यानंतर देवांची स्वारी झोपावयाला गेल्यावर मध्यरात्री त्यांना जागेवरून गंधफूल वाहावयाचे म्हणजे देवांची झोपमोड करावयाची ही गोष्ट कोणाही निष्ठावान् भक्ताला आवडणारी नव्हती. श्रीस्वामी महाराजांनाही ती आवडली नाही व त्यांनी हे स्नपन अनुष्ठान कायमचे बंद करावयाला लावले.

पुढे श्रींचा कट्टा धुण्याचा वार्षिक समारंभ झाला. यावेळी पुजारी मंडळींनी संप्रोक्षण विधी केला व देवांचा प्रसाद व्हावा म्हणून दोन महारुद्र करावयाचे ठरविले. दोन्ही महारुद्रांच्या वेळी श्रीस्वामी-महाराज स्वतः पूजेला बसले होते. पहिल्या महारुद्राची सांगता

श्री. बाळंभटजी खोंबारे यांच्या घरी झाली. त्यावेळी चार पाचशे ब्राह्मणभोजन झाले. दोन्ही महारुद्रांच्या सांगतेच्या वेळी श्रीस्वामी-महाराज प्रसादाला आले होते. दुसऱ्या महारुद्राची सांगता झाल्या-वर पुजारी मंडळींनी श्रींच्या अंगावरील एक छाटी श्रीस्वामी-महाराजांच्या अंगावर घातली. ते वस्त्र मिळाल्याबरोबर पूर्वी ब्रह्मावर्ताहून श्रीक्षेत्र नरसोबाच्यावाडीला जावे म्हणून देवांनी आज्ञा देतानाच, "आपली छाटी मिळेपर्यंन्त तेथे राहावे" असे सांगितले होते, याचे तात्काळ स्मरण होऊन आता आपले येथील काम झाले आहे व छाटी मिळाल्यामुळे आपणास उत्तरेकडे जाण्याची आज्ञा मिळाली आहे, हे श्रीस्वामीमहाराजांनी ओळखले व येथून निघण्याचा विचार त्यांनी सर्व मंडळींना कळविला. श्रीस्वामीमहाराज वाडी सोडून जाणार हे ऐकताच तेथील सर्व लोकांना धक्का बसला व अत्यंत दुःख झाले. हा आनंदसोहळा कधी संपणारच नाही अशी सर्वांची समजूत होती. एक तपाहून अधिक काळ लोटल्यानंतर श्रीस्वामीमहाराज पुन्हा वाडीला आले होते. ते आता बराच काळ वाडीला राहणार असे लोकांना वाटले असावे. त्यावेळी प्रमुख पुजारी मंडळी श्रीस्वामीमहाराजांसमोर हात जोडून उभी राहिली व त्या सर्वांनी त्यांची अशी प्रार्थना केली की, "आणखी काही दिवस तरी आम्हा बाळगोपाळांना आपल्या संगतीचा लाभ द्यावा. एवढ्यात निघून जाण्याची घाई करू नये." ती प्रार्थना ऐकून श्रीस्वामी-महाराज त्यांना असे म्हणाले की, "आपले सर्वांचे प्रेम मी समजू शकतो; पण देवांच्या आज्ञेबाहेर मला जाता येत नाही. आता येथून निघण्याची आज्ञा झाली आहे." हे ऐकताच सर्व मंडळी त्यांना असे म्हणाली की, "एवढ्या वर्षांनी आपण वाडीला आला आहात! आणखी काही दिवस मुक्काम वाढविला; तर आमच्या आनंदाला

४५

सीमा राहणार नाही. श्रीनारायणस्वामींच्या पुण्यतिथीचा उत्सव चार दिवसांनी चैत्र वद्य अमावास्येला आला आहे. तो करून मग जावे." हे ऐकताच "ठीक आहे. आपणा सर्वांचा आग्रह आहे तर श्रीनारायणस्वामींचा उत्सव संपेपर्यन्त राहू." असे म्हणून श्रीस्वामी-महाराजांनी चार दिवस मुक्काम वाढविला. मात्र उत्सव संपल्या-बरोबर निघण्याचे ठरले. त्यावेळीही सर्व मंडळींनी तेथे राहण्याचा खूपच आग्रह केला. त्यावेळी श्रीस्वामीमहाराज सर्वांना असे म्हणाले की, "आपणास श्रींची आज्ञा उल्लंघन करता येणार नाही." ज्यावेळी इतक्या स्पष्टपणे त्यांनी सर्वांना सांगितले त्यावेळी सर्वांचा नाईलाज झाला व शेवटी वैशाख शुद्ध प्रतिपदेस त्यांनी वाडीहून निघण्याचे ठरविले.

वैशाख शुद्ध प्रतिपदेला सकाळी दहा वाजल्यापासून सर्व माणसांचा समुदाय श्रीपादुका मंदिराच्या रोखाने चालत होता; पण तेथे कोणी थांबत नव्हते. देवांचे दर्शन घेऊन लोक श्रीब्रह्मानंदांच्या मठासमोर येऊन उभे राहत होते. या सर्व लोकांचे "प्राणजीवन व उद्धारकर्ते मायबाप, श्रीस्वामीमहाराज" आज वाडीकरांचा निरोप घेऊन पुढील संचारासाठी प्रस्थान करणार होते. गेला दीड महिना येथे आनंद सोहळा ेत होता. भक्तीची पंढरी फुलली होती. आज त्या सोहळ्याचा शेवट व्हावयाचा होता. श्रीस्वामीमहाराजांनी आपले सकाळचे आन्हिक उरकले. दंडाला परशुमुद्रा बांधली व ते दरवाजात आले. समोरचा संपूर्ण चौक लोकांनी भरून गेला होता. डाव्या हाताला नजर पोहोचेपर्यन्त रस्ता माणसांनी फुलला होता. सर्व लोक दर्शनासाठी रस्त्यात तिष्ठत उभे होते. यावयाला व जावयाला वाट नव्हती. या सर्व लोकांना दर्शन देऊन प्रसाद देणे अत्यंत आवश्यक होते. श्रीस्वामीमहाराजांवरील भक्तिप्रेमामुळे ही मंडळी. सकाळपासून येथे उभी होती. प्रसाद देण्यासाठी श्रीस्वामीमहाराज

मठाच्या बाहेरच्या कट्टयावर येऊन बसले. लोकांनी प्रेमाने आणलेल्या जिनसांचा स्वीकार करून श्रीस्वामीमहाराज प्रसाद म्हणून त्यांना तो परत देत होते. सकाळी दहा वाजता सुरू झालेला प्रसादाचा हा कार्यक्रम दुपारी चार वाजले तरी अव्याहत चालला होता; पण समोरची गर्दी कमी झालेली दिसत नव्हती. प्रसाद घेऊन लोक तेथेच थांबले आहेत असे वाटत असे; पण तसे नव्हते. प्रत्येकजण प्रसाद घेऊन साश्रुनयनांनी व जड अंतःकरणाने परत जात होता. त्यांच्या जागेवर दुसरा माणूस येत होता. तीन तीन तास थांबले तरी दर्शन होत नव्हते. चार वाजून गेले तरी हजारो दर्शनार्थी समोरच्या चौकात व रस्त्यावर उभे होते. एक वेळ प्रसाद मिळाला नाही तरी चालेल; पण श्रीस्वामीमहाराजांना डोळे भरून पाहून घेऊ या असे प्रत्येकाला वाटत होते.

शेवटी चार वाजल्यावर श्रीस्वामीमहाराज उठले व आपल्या छाटया वगैरे घेऊन श्रीपादुकांच्या दर्शनासाठी खाली मंडपात गेले. तेथे त्यांनी श्रींचे दर्शन घेऊन प्रार्थना केली. चारही फडातील पुजाऱ्यांना व इतरही जमलेल्या लोकांना त्यांनी आपल्या हाताने पुष्पप्रसाद दिला. श्रीस्वामीमहाराज जावयाला उठले. सोबत श्रीदीक्षितस्वामीमहाराजही जावयाला निघाले. त्यावेळी पुजाऱ्यांनी श्रीस्वामीमहाराजांना अशी विनंती केली की, श्रीदीक्षितस्वामीमहाराजांना तरी वाडीला ठेवून जावे. त्यावर श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "आम्ही घालून दिलेल्या नियमांप्रमाणे वागू असे लिहून द्या म्हणजे स्वामींना येथे ठेवतो, नाहीतर घेऊन जातो." चारही फडातील पुजाऱ्यांनी श्रीस्वामीमहाराजांनी तयार केलेल्या नियमांच्या कागदावर सह्या केल्यावर श्रीदीक्षितस्वामीमहाराजांना वाडीला राहावे लागले. नंतर सर्वांना उद्देशून गंभीर स्वरात श्रीस्वामीमहाराजांनी असा उपदेश केला की, "आपल्या पूर्वजांचा फार मोठा

वारसा तूम्हाला लाभला आहे. ज्याप्रमाणे पूर्वजांनी सदाचार न सोडता श्रींची सेवा केली त्याप्रमाणे तुम्हीही हा वारसा पुढे चालू ठेवा व तशीच श्रींची सेवा करा. त्यात तुम्हा सर्वांचे कल्याण आहे. यामुळेच सर्व संकटातून पार पडाल. तुम्ही ब्राह्मण आहात. नित्य ब्रह्मकर्म केल्यावर श्रीगुरुचरित्र वाचल्याशिवाय अन्नग्रहण करू नका. एवढे केल्यावर तुम्हाला काही सुद्धा कमी पडणार नाही. श्रीनृसिंहसरस्वतीस्वामींना येथे ठेवले आहे. त्यांच्या आज्ञेने वागा. तुम्हा सर्वांना वारंवार हेच सांगणे आहे की, श्रींचे पाय सोडू नका." श्रीस्वामीमहाराजांचा हा उपदेश सर्व लोक जिवाचे कान करून ऐकत होते. श्रीस्वामीमहाराजांचे बोलणे थांबले आणि सगळीकडे निःशब्द शांतता पसरली. श्रीस्वामीमहाराज श्रींना वंदन करून उठले व मंडपातून ते बाहेर पडणार एवढ्यात—

**गुरुराया जाऊं नका हो । टाकुनिया आम्हां दीनांसी ।**
**साहवेल विरहा कैसें । तुजविणें सर्व उदासी ।।**

हे पद दहा पंधरा मुले मंडपामध्ये उभी राहून व हात जोडून भारावलेल्या आवाजात गाऊ लागली. ज्यावेळी भगवान् श्रीनृसिंह-सरस्वतीस्वामीमहाराज गाणगापूर कायमचे सोडून निघाले होते, त्यावेळच्या हकीकतीचे हे पद आहे. आत्ताचा हा प्रसंग तसाच होता. "गुरुराया जाऊं नका हो"—हे पद ऐकताच सर्वांच्याच नेत्रातून अश्रू वाहू लागले. गाणारे तर अश्रू ढाळीतच गात होते. सर्वांचे ते विलक्षण प्रेम पाहून श्रीस्वामीमहाराजही गहिवरले व त्यांच्या डोळ्यात पाणी तरळले. त्यावेळी सर्व भावना बाजूला सारून आपणास आज वाडीचा निरोप घेतलाच पाहिजे, या ठाम निश्चयाने श्रीस्वामीमहाराजांनी लोकांचे कसेबसे समाधान केले व वर श्रीनारायणस्वामींच्या मंदिरात उत्सवमूर्तींच्या दर्शनाला गेले. ज्यावेळी श्रीस्वारीचे दर्शन करून ते बाहेर आले तेव्हा शेकडोशे

लोक प्रसाद घेण्यासाठी बाहेर उभे होते. हे लोक अद्याप प्रसाद न मिळता तसेच राहिलेले आहेत असे पाहून श्रीस्वामीमहाराज तेथेच कट्ट्यावर बसले व सर्वांना अर्ध्या तासात प्रसाद देण्याचे काम कसेवसे उरकून तेथून उठले.

एवढ्यात गावातील सुवासिनी स्त्रियांनी तेथे येऊन मंगलारतीने श्रीस्वामीमहाराजांना ओवाळले. ओवाळून झाल्यावर श्रीस्वामी-महाराज रस्त्याने निघाले, तेव्हा रस्त्यातही ठिकठिकाणी सुवा-सिनींनी श्रीस्वामीमहाराजांच्या मस्तकावर अक्षता टाकून पंचार-तींनी ओवाळले. त्यावेळी इतकी गर्दी झाली की, लोक श्रीस्वामी-महाराजांच्या अंगावर पडू नयेत म्हणून त्यांच्या भोवती १५-२० मंडळींनी हातास हात धरून कडे बनविले. मात्र स्त्रियांना ओवाळण्या-साठी व इतर लोकांना दर्शन देण्यासाठी जागा मोकळी ठेवली होती. अशा रीतीने जणू काही ही एक अपूर्व शोभायात्राच चालली होती.

त्यावेळच्या या अपूर्व सोहळ्याचा तो थाट पाहून कन्यागताच्या वेळी श्रींची स्वारी ( उत्सवमूर्ती ) पालखीतून शुक्लतीर्थावर स्नानाला जाते किंवा श्रीकृष्णेला महापूर आला म्हणजे श्रींची मूर्ती गावात येते त्यावेळची सर्वांना आठवण झाली आणि समारंभाचा हा थाट वरील दोन्ही उत्सवांपेक्षा काकणभर अधिकच सरस आहे असे सर्वांना वाटले. श्रीस्वामीमहाराजांना ओवाळण्याचा हा सोहळा पाहण्याचे भाग्य ज्या लोकांना लाभले ते वृद्ध लोक असे म्हणत असत की, " एवढ्या मोठ्या समारंभाचा मान श्रीपाद-श्रीवल्लभ श्रीमन्नृसिंहसरस्वतीमहाराजस्वरूप श्रीगुरुदत्तात्रेयांखेरीज मनुष्य प्राण्याला या क्षेत्रात कधीही मिळाल्याचे पाहण्यात व ऐकण्यात नाही. या क्षेत्रात फक्त देवांचाच उत्सव होतो. मानवाचा येथे उत्सव होत नाही; पण तो मान त्यावेळी देवस्वरूप श्रीस्वामी-महाराजांना मिळाला होता. "

या यात्रेत सर्वांपुढे वाद्यें वाजत होती. त्याच्याही पुढे श्रींपुढील भगवे झेंडे फडकत होते. त्यानंतर कोणी आरत्या म्हणत होते तर कोणी भजन करीत चालले होते. बरोबर असलेली सर्व मंडळी श्रींचा व श्रीस्वामीमहाराजांच्या नावाचा जयजयकार करीत चालली होती. श्रीस्वामीमहाराज अत्यंत भारावलेल्या अंतःकरणाने व धीर-गंभीर पावले टाकीत चालले होते. रस्त्याच्या दुतर्फा शेकडो, हजारो लोक हात जोडून श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन घेण्यासाठी उभे होते. मधूनच "श्रीगुरुदेवदत्त", "श्रीवासुदेवानंदसरस्वती-स्वामीमहाराज की जय" असा जयघोष होत होता. गावातील जोर्डलिबापर्यंत सर्व वाडी गाव आणि पलीकडच्या औरवाड गावा-तील रहिवासी श्रीस्वामीमहाराजांबरोबर आले होते. तेथे सर्वांनी श्रीस्वामीमहाराजांपुढे लोटांगण घातले. श्रीस्वामीमहाराज थोडा-वेळ जोर्डलिबाखाली थांबले व कमंडलूतील पाणी सर्वांच्या अंगावर शिंपडून हात वर करून त्यांनी सर्वांना आशीर्वाद देऊन परत जाण्यास सांगितले. त्यावेळी ते सर्वांना उद्देशून असे म्हणाले की, "आता मागे फिरा. तुम्ही सर्वच मंडळी इकडे आल्यावर तिकडे श्रींची पालखी, धूप इत्यादि कामे कोण करणार? तरी लवकर परत जा." श्रीस्वामीमहाराजांनी असे सांगितले तरी लोकांचे पाय मागे वळेनात. अश्रू भरल्या नेत्रांनी सर्वांनी श्रीस्वामीमहाराजांचा निरोप घेतला व बहुतेक सर्वजण जड अंतःकरणाने परत फिरले.

भजनी मंडळींमधील काही मंडळी भजन करीत श्रीस्वामीमहा-राजांबरोबर शिरोळपर्यंन्त आली. वैशाख शु. १, शके १८२७, सकाळी दहा वाजता श्रीब्रह्मानंदांच्या मठातून बाहेर पडलेले श्रीस्वामीमहाराज त्या दिवशी एक घटका रात्रीच्या वेळी शिरोळला येऊन पोहोचले. शिरोळला ज्या शिळेवर श्रीनृसिंहसरस्वतीस्वामी महाराजांनी भिक्षा घेतली, ती शिळा भोजनपात्र म्हणून प्रसिद्ध

आहे. हे भोजनपात्र शिरोळच्या श्रीदत्तमंदिरामध्ये आहे. त्या रात्री श्रीस्वामीमहाराजांनी याच श्रीदत्तमंदिरात मुक्काम केला. सोबत श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराजसुद्धा होते. श्रीस्वामीमहाराज शिरोळला येणार हे अगोदरपासूनच तेथील लोकांना माहीत झालेले होते. श्री. बाबूराव कुलकर्णी ( वल्लभ ) व त्यांचे चुलते यांनी श्रीदत्तमंदिराची झाडझूड करून दिवाबत्तीची सोय केली होती व श्रीस्वामीमहाराजांच्या स्नानासाठी गंगेचे पाणी भरून ठेवले होते. श्रीदत्तमंदिरात आल्यावर श्रीस्वामीमहाराजांनी देवांना नमस्कार केला व वाटेत स्पर्शास्पर्श झाल्यामुळे रात्री तेथेच स्नान केले. पंचगंगा तेथून एक मैल लांब असल्यामुळे रात्री तिकडे जाणे शक्य नव्हते. सर्व मंडळी थकून गेली होती. सर्वांनी फराळ केला. श्रीस्वामीमहाराजांनीही चार घोट लिंबाचे सरबत घेतले. एवढे होईपर्यन्त मध्यरात्र झाली. मग सर्व मंडळी निद्रावश झाली.

श्रीस्वामीमहाराजांचा शिरोळला तीन दिवस मुक्काम झाला. तेथे श्रीस्वामीमहाराज पहाटे उठून पंचगंगेवर स्नानाला जात असत. नंतर नित्यकर्म आटोपून जिज्ञासूंना उपनिषदे सांगत. वाडीहून बरीच मंडळी दररोज दर्शनाला येत होती. आजूबाजूच्या गावातील लोक, कोणी शिकण्यासाठी तर कोणी पीडा निवारणासाठी येत असत. दुपारी भिक्षा झाल्यावर ते आर्त लोकांना पीडानिवारणार्थ योग्य तो उपाय सांगत असत. यावेळी पुष्कळ जणांची पिशाच्च-बाधा दूर करण्यात आली. श्रीक्षेत्र नरसोबावाडीचे श्री. दादो-नारायण पुजाऱ्यांच्या पत्नीला समंधाची पीडा होती. तिच्या अंगातील समंध काढून श्रीस्वामीमहाराजांनी त्या समंधाला मुक्ती दिली. दररोज अशातऱ्हेने चाललेले हे कार्यक्रम उरकेपर्यन्त संध्याकाळ होत असे. त्यानंतर सायंसंध्येसाठी श्रीस्वामीमहाराज पंचगंगेच्या घाटावर जात असत. येथील मुक्कामात बऱ्याच लोकांनी

श्रीस्वामीमहाराजांकडून अनुग्रह घेतला.

वैशाख शुद्ध ४ ला सकाळी पुढील संचारासाठी श्रीस्वामीमहाराज शिरोळहून निघाले. शिरोळ सोडताना येथेही वाडीसारखीच गर्दी झाली. लोक साश्रुनयनांनी श्रीस्वामीमहाराजांचा निरोप घेण्यासाठी उभे राहिले. सर्व लोकांनी श्रीस्वामीमहाराजांना वाजत गाजत गावाबाहेर पोहोचविले. अशा रीतीने श्रीस्वामीमहाराज शिरोळपासून मैलभर दूर गेल्यावर तेथे त्यांनी श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराजांना तीर्थप्रसाद दिला आणि आशीर्वाद देऊन असे सांगितले की, " प्रत्यक्ष परमेश्वर नांदत आहे. निष्ठा ठेवून वागा म्हणजे झाले. " असा उपदेश करून त्यांनी श्रीदीक्षितस्वामीमहाराजांना व इतर लोकांना परत पाठविले. नंतर २०-२५ मंडळींसह ते मिरजेच्या घाटावर येऊन पोहोचले. मिरजेच्या श्रीमंत मळेकरीणबाईंनी शिरोळहून निघाल्यावर मिरजमार्गे येण्याची श्रीस्वामीमहाराजांना विनंती केली होती; पण सध्या काही निश्चित सांगता येत नाही असे श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना कळविले होते.

श्रीस्वामीमहाराज मिरजेच्या घाटावर आले. या घाटाला अर्जुनवाडचा घाट किंवा मिरजेचा घाट म्हणतात. येथून मिरज गाव तीन चार मैल दूर आहे. श्रीस्वामीमहाराजांबरोबर वीसपंचवीस मंडळी होती. श्रीस्वामीमहाराज या घाटावर आल्याचे अद्याप सर्व लोकांना कळले नव्हते. त्यामुळे सोबत आलेल्या मंडळींना आयताच एकान्त मिळाला. श्रीस्वामीमहाराजांची सेवा करण्याचे आपले मनोरथ येथे पूर्ण करण्याचे या मंडळींनी ठरविले. कित्येकांनी श्रीस्वामीमहाराजांपुढे लोटांगणे घातली. श्रीस्वामीमहाराजांनी प्रतिकार करण्यापूर्वीच काही लोकांनी त्यांचे पाय चुरले. काही जणांनी हळुवार हातांनी त्यांची पाठ रगडली. एकाने म्हणता म्हणता सर्वांनीच त्यांचे अंगसंवाहन करण्यास सुरुवात केली. तेव्हा

श्रीस्वामीमहाराज असे म्हणाले की, "या देहास कोणाचा स्पर्शसुद्धा झाला नव्हता; पण येथे काही इलाज चालत नाही व बोलता येत नाही." भक्त मंडळी हे सर्व आपल्यावरील प्रेमापोटी करीत आहेत, हे श्रीस्वामीमहाराजांनी ओळखले होते. त्यामुळे त्यांनी कोणालाच नको म्हणून प्रतिबंध केला नाही. सायंसंध्या झाल्यावर श्रीस्वामीमहाराजांनी घाटापासून तीन-चार मैल दूर असलेल्या मिरज गावातून आलेले ताक घेतले. बरोबर आलेल्या मंडळींमध्ये श्री. नरहरीबुवा म्हणून एक गाणारे होते. त्यांचा रात्री श्रींच्या पुढे धावा, विडा वगैरे म्हणण्याचा नियम होता. येथे त्यांनी श्रीस्वामीमहाराजांपुढे धावा, विडा वगैरे नियमाप्रमाणे म्हटल्यावर मंडळी झोपावयाला गेली.

दुसऱ्या दिवशी सकाळी श्रीस्वामीमहाराज स्नान करण्यासाठी श्रीकृष्णेवर गेले. श्रीस्वामीमहाराज स्नान करीत असताना बरोबरची मंडळी प्रवाहाच्या खालच्या बाजूला पाण्यात उभी राहिली. सत्पुरुषांच्या व आपल्या गुरूंच्या अंगावरून येणारे पवित्र उदक आपल्या शरीरावरून गेले; तर आपले अज्ञान व आपली सर्व पापे धुऊन जातात. शेवटी श्रीस्वामीमहाराजांनी आपल्या हातांनी श्रीकृष्णामाईचे पाणी सर्वांच्या अंगावर घातले; पण एवढ्याने तो सोहळा पूर्ण झाला नाही. श्रीस्वामीमहाराज स्नान करून आल्यावर सर्व भक्तांनी त्यांच्या चरणांवर श्रीकृष्णेचे पाणी घातले व ते तीर्थ म्हणून घेतले. श्रीस्वामीमहाराजांच्या पायी ज्यांची एवढी श्रद्धा होती, त्यांनी त्यांच्या शरीराला स्पर्श करून थोडे शरीर रगडले व पायाचे तीर्थ घेतले म्हणून श्रीस्वामीमहाराज त्यांच्यावर थोडेच रागावणार ? नित्यकर्म आटोपल्यावर श्रीस्वामीमहाराजांनी काही जणांना उपनिषदे सांगितली व उपनिषदांची पोथी तपासून दिली. एवढे होईपर्यन्त एक वाजला. मग श्रीस्वामीमहाराज भिक्षेला गेले.

श्रीस्वामीमहाराज आलेल्या पत्रांना स्वतःच उत्तरे लिहीत असत. पत्रांना उत्तर लिहिण्याचे काम चालू असताना हाती आलेले एक पाकीटपत्र उघडून वाचण्यापूर्वीच श्रीस्वामीमहाराज असे उद्गारले की, "आम्ही कोणाला येथे या असे आमंत्रण पाठवीत नाही किंवा कोणाला बोलावीत नाही. कोणी आलेच तर त्यांच्या दुःखावर इलाज सांगितल्याशिवाय राहत नाही. हे पत्र लिहिणाऱ्याला येथे येणे योग्य वाटत नसल्यास त्याने येऊ नये." लिफाफा फोडून आतील पत्र वाचल्यावर "आपण नसत्या उठाठेवी कशाला करता." वगैरे मजकूर त्यात आढळला.

मिरजेच्या घाटावर श्रीस्वामीमहाराजांचा तीन दिवस मुक्काम झाला. या ठिकाणीसुद्धा नंतर दर्शनार्थींची फार गर्दी होऊ लागली. दर्शनाला येणारी भक्त मंडळी श्रीस्वामीमहाजांसमोर ठेवावयाला नारळ, खडीसाखर, पेढे वगैरे आणीत असत. पहिल्या दिवशी बाजारपेठेतील सर्व नारळ संपले. एवढी गर्दी दररोजच होत असे. अपरूप असे ते दर्शन एकदा नेत्रांद्वारे हृदयात साठवून भक्तांचे समाधान होत नसे. लोक पुनःपुन्हा दर्शनाला येत असत. यावेळी श्रीस्वामीमहाराजांनी काही लोकांना पीडा निवारणार्थ मंत्र लिहून दिले. वाडी आणि मिरज ही दोन्ही ठिकाणे तशी एकमेकांपासून फारशी दूर नाहीत. वाडीमध्ये जो जो सोहळा झाला होता तो तो येथेही लोकांनी केला. श्रीस्वामीमहाराजांचा एक फोटो आपणापाशी असावा अशी इच्छा लोकांनी व्यक्त केली. श्रीस्वामीमहाराजांनी फोटोसाठी उभे राहण्यास होकार दर्शविताच फोटोग्राफरला आणून लोकांनी त्यांचा एक उभा फोटो काढून घेतला. गाव सोडून जाताना निरोप घ्यावयाचे काम प्रत्येक ठिकाणी बिकट होत असे. प्रत्येक गावाला वाटे श्रीस्वामीमहाराजांनी आणखी काही दिवस येथे राहावे. अर्थात् "आणखी काही दिवस" या कालमर्यादेला अंत नसतो.

तो कडू दिवस कधी उजाडू नये असे सर्वांना वाटे. मिरजेतील लोकांनी अश्रू भरल्या नयनांनी श्रीस्वामीमहाराजांचा निरोप घेतला.

ब्रह्मावर्ताहून वाडीला येतेवेळी श्रीस्वामीमहाराज पंढरपूर मार्गे आले होते. त्यावेळी पंढरपूरच्या लोकांनी त्यांना तीन दिवस तरी पंढरपूरला राहावे असा आग्रह केला होता. त्यावेळी तेथे थांबण्यास वेळ नसल्यामुळे "परत येते वेळी पाहू," असे आश्वासन श्रीस्वामी-महाराजांनी त्यांना दिले होते. आता त्या आश्वासनाच्या पूर्तीसाठी श्रीस्वामीमहाराज पंढरपूरला जावयाला निघाले. वाटेत कमळा-पूरला मुक्काम झाला. तेथे रात्री स्वप्नामध्ये एक आजानुबाहू पुरुष आले आणि श्रीस्वामीमहाराजांना असे म्हणाले की, "तुम्ही सर्वत्र संचार करता. स्वतः कविताही करता. असे असताना आमच्याकडे तुमचे लक्ष का नाही ?" ही स्वप्नात दिसलेली विभूती कोण हे श्रीस्वामीमहाराजांना उमगेना. त्यांनी ध्यानावस्थेत आपल्या उपास्य देवतेला हा प्रश्न विचारला. त्यावेळी देव त्यांना असे म्हणाले की, "हे अक्कलकोटचे स्वामी असून यांची अशी इच्छा आहे की, तुम्ही अक्कलकोटला यावे व आपले चरित्र काव्यरूपाने लिहावे." त्यावेळी श्रीस्वामीमहाराज त्यांना असे म्हणाले की, "ही जिव्हा श्रीदत्त-चरणी समर्पण केली आहे. श्रींची आज्ञा होऊन यथार्थ माहिती मिळाल्यास कवित्व करता येईल." इतके सांगितल्यावर ते देवांना पुन्हा असे म्हणाले की, "श्रीअक्कलकोटस्वामीमहाराजांची इच्छा पूर्ण व्हावी म्हणून प्रथम पंढरपूरला जाऊन नंतर अक्कलकोटमार्गाने गाणगापूरला जाईन." असा आपला मनोदय जेव्हा श्रीस्वामी-महाराजांनीं देवांना सांगितला तेव्हा देवांनी त्यांना असा आदेश दिला की, "उत्तरेकडे जाताना अक्कलकोटास जाऊन मग गाणगापुरास जावे. गाणगापूरला फक्त तीन दिवस मुक्काम करावा. तेथे फक्त श्रीपादुकांचे दर्शन घ्यावे व तीनही दिवस मौन धरावे."

देवांच्या आज्ञेप्रमाणे श्रीस्वामीमहाराज गाणगापूरला जावयाला निघाले. प्रवासात त्यांना अतिसाराचा त्रास झाला; पण शरीर-स्वास्थ्यावर श्रीस्वामीमहाराजांचे कोणतेच कार्यक्रम अवलंबून नसत. शरीरभोग भोगीत त्यांचा संचार चालू होता. त्यामुळे देवांच्या आज्ञे-प्रमाणे ते अक्कलकोटला येऊन पोहोचले व तेथे श्रीस्वामींचे दर्शन घेऊन ते श्रीक्षेत्र गाणगापूरला जावयाला निघाले. वाटेमध्ये श्रीकृष्णा-माईने दर्शन देऊन "कृष्णालहरी" स्तोत्र लिहावे अशी आज्ञा केली. वास्तविकपणे श्रीक्षेत्र नरसोबावाडीच्या मुक्कामात तेथील मंडळींनी श्रीस्वामीमहाराजांना अशी विनंती केली होती की, "गंगालहरी-प्रमाणे एक "कृष्णालहरी" आम्हाला म्हणण्याकरिता तयार करून द्यावी." वाडीकर मंडळींच्या या विनंतीप्रमाणे श्रीक्षेत्र नरसोबा-वाडीत असताना त्यावेळी असे स्तोत्र लिहिण्याचा योग जमून आला नाही. मात्र तो योग आता प्रत्यक्ष श्रीकृष्णामाईंच्या आज्ञेने अकस्मात् आला. श्रीदत्तप्रभूंच्या प्रेरणेने श्रीस्वामीमहाराजांच्या मुखातून एकेक श्लोक स्वयंस्फूर्तीने येत गेला. हे श्लोक रचण्याच्या वेळी प्रत्यक्ष श्रीकृष्णामाई पुढे उभ्या राहत होत्या. पहिला श्लोक लिहून झाला नाही तोच दुसरा तयार होत होता. असे एकावन्न श्लोक रचले गेल्यावर "आता पुरे" असे भगवती श्रीकृष्णामाई समाधानाने म्हणाल्या व अंतर्धान पावल्या.

श्रीस्वामीमहाराज संचार करीत गाणगापूरला येऊन पोहोचले व त्यांनी श्रीपादुकांचे दर्शन घेतले. श्रीक्षेत्र गाणगापूर ही श्रीदत्तात्रेयांची राजधानी आहे. येथे श्रींचे सदैव वास्तव्य आहे. तेव्हा देवांचे आपणास साक्षात् दर्शन व्हावे अशी श्रीस्वामीमहाराजांची इच्छा होती; पण तसे प्रत्यक्षात दर्शन न झाल्यामुळे दुःखित अंतःकरणाने ते पापविनाश तीर्थावर गेले व साक्षात् दर्शन झाल्यावाचून येथून उठावयाचे नाही असा निश्चय करून तीन रात्री ते तेथेच राहिले. तेव्हा देवांनी त्यांना

असा दृष्टान्त दिला की, " भीमा अमरजा संगमावर चल. तेथे दर्शन होईल." त्याप्रमाणे संगमावर गेल्यावर भक्तवत्सल श्रीप्रभूंनी साक्षात् दर्शन दिले. त्यावेळी साक्षात् दर्शन झाल्यावर त्यांनी देवांना असे विचारले की, "गाणगापूरचा मठ सोडून जाणार नाही अशी आपली प्रतिज्ञा असता आज असे कसे झाले ? " त्यावर श्रीदत्तप्रभू त्यांना असे म्हणाले की, " कलियुगाचा प्रभाव दिवसेंदिवस अधिक वाढत चालल्यामुळे मठात पूर्ण गुप्तरूपाने व येथे संगमावर प्रकट रूपाने वास करतो." इतके सांगून देव गुप्त झाले.

श्री. तुकाराम नावाचा एक सच्छील गुरुभक्त ब्राह्मण श्रीदत्त-प्रभूंचे प्रत्यक्ष दर्शन व्हावे अशा उत्कट व तीव्र इच्छेने गाणगापूरमध्ये तीन वर्षे फक्त फलाहार करून तप करीत होता. या भक्ताची मनो-कामना पूर्ण होण्याची वेळ येताच देवांनी श्रीस्वामीमहाराजांना गाणगापूरला जाण्याची आज्ञा केली होती. " तीन शिरे सहा हात " अशा स्वरूपात त्या भक्ताला दर्शन न देता श्रीस्वामीमहाराजांच्या रूपात देवांनी त्याला दर्शन दिले. त्यामुळे त्या भक्ताची प्रत्यक्ष दर्शनाची इच्छा पूर्ण झाली. त्यावेळी श्रीस्वामीमहाराजांनी त्याला पुढील स्तोत्र करून दिले.

## गुरुस्तुती ( गाणगापूर )

जो सत्य आहे परिपूर्ण आत्मा। जो नित्य राहे उदितप्रभात्मा।
ज्ञानें जयाच्या नर हो कृतार्थ। तो पूर्ण आनंद गुरू समर्थ ॥ १ ॥
अखंड आत्मा अविनाशी दत्त। तया पदीं लाविति जे स्वचित्त।
वित्तभ्रमा सोडिती ते कृतार्थ। तो पूर्ण आनंद गुरू समर्थ ॥ २ ॥
जो जागृतिस्वप्नसुषुप्तिसाक्षी। जो निर्विकारें सकलां निरीक्षी।
वीक्षी परी ज्यासि नसे निजार्थ। तो पूर्ण आनंद गुरू समर्थ ॥ ३ ॥

जळीं स्थळीं सर्वंहि वस्तुमाजीं। व्यापूनि राहेचि तयासि राजी।
जो ठेवी भावें नर हो कृतार्थ। तो पूर्ण आनंद गुरू समर्थ ॥ ४ ॥
जें दृश्य तें रूप नसे जयाचें। दृश्यांत राहे अविकारी ज्याचें।
स्वरूप तोचि अविनाशी अर्थ। तो पूर्ण आनंद गुरू समर्थ ॥ ५ ॥
दृश्यासि घेतां न च घेववें जें। स्वरूप तत्स्थ प्रभुचें स्वतेजें।
स्वयें प्रकाशे जगिं जो परार्थ। तो पूर्ण आनंद गुरू समर्थ ॥ ६ ॥
असोनि सर्वत्र गुरुप्रसादा-। विना न लागे करतांहि खेदा।
भेदाचि वार्ता करि जो अपार्थ। तो पूर्ण आनंद गुरू समर्थ ॥ ७ ॥
अनन्यभावें भजतां अनन्य-। लभ्य प्रभू जो न च होयि अन्य।
संन्यस्तसर्वेषणतारणार्थं। तो पूर्ण आनंद गुरू समर्थं ॥ ८ ॥
मागे तुकाराम तयासि दत्त। दे वासुदेवा करुनी निमित्त।
हे स्तोत्र चिन्मात्रपदा समर्थ। द्याया हराया सकालाध्यनर्थं।
गाणगापुरिं अठराशे सत्तावीस शकामधीं।
उदेलें स्तोत्र हें आधिव्याधि हारी हरो कुधी ॥
॥ इति श्रीमत् परहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानंदसरस्वती विरचिता गुरुस्तुतिः ॥

श्रीस्वामीमहाराजांना गाणगापूरमध्ये फक्त तीन रात्री राहावे अशी देवांची आज्ञा होती. संन्याशाने कोणत्याही एका ठिकाणी तीन दिवसांपेक्षा अधिक काळ राहू नये, अशी शास्त्राज्ञा असल्यामुळे या ठिकाणीसुद्धा ती पाळावी अशी देवांची इच्छा असावी. तसेच फक्त पादुकांचे दर्शन घ्यावे अशी आज्ञा झाली होती. त्याचे कारण गावा-मधील कलिप्रभावयुक्त दूषित वातावरणात न राहता श्रीस्वामी-महाराजांनी संगमावर राहावे अशी देवांची इच्छा असावी. त्याच-प्रमाणे श्रीक्षेत्रवाडीमध्ये पुजाऱ्यांना जसा उपदेश केला तसा येथेही करावा की काय असे श्रीस्वामीमहाराजांना वाटण्याची शक्यता असल्यामुळे "मौन धरावे" अशी देवांची त्यांना आज्ञा झाली असावी.

“मी स्वतःच येथे असल्यामुळे आपण काहीही करू नये व कोणाला उपदेश करण्याचे कारण नाही; म्हणून मौन पाळावे.” असा देवांच्या या आज्ञेमागील उद्देश असावा. पुढे हे असेच होते, असा नंतर देवांनीच खुलासा केल्याचा उल्लेख श्रीस्वामीमहाराजांनी एका भक्ताला पाठविलेल्या पत्रात केला आहे. श्रीक्षेत्र गाणगापूरमध्ये देवांचे दर्शन व्हावयाला श्रीस्वामीमहाराजांसारख्या भक्तोत्तमाला तीन दिवस लागले; मग इतरांना किती कालावधी लागेल याची कल्पनाही करता येत नाही.

श्रीक्षेत्र गाणगापूरमध्ये तीन दिवस मुक्काम केल्यावर, देवांच्या आज्ञेप्रमाणे, श्रीस्वामीमहाराज तेथून पुढील संचाराला निघाले व हुमाणाबादमार्गे श्रीगोदावरी काठी वैशाख वद्यांत गंगाखेड येथे येऊन पोहोचले. येथेच त्यांच्या पत्नीला आजार होऊन ती माउली, आपल्या पतीचा पुढील मार्ग निष्कंटक करण्यासाठी निजधामाला निघून गेली होती. ही घटना शके १८१३ म्हणजे इ. स. १८९१ मध्ये घडली. त्यानंतर श्रीस्वामीमहाराज जवळजवळ १३/१४ वर्षांनंतर पुन्हा गंगाखेडला येत होते. येथे बरीच मंडळी पूर्व परिचयाची होती. एक तपाच्या कालावधीमध्ये खरे म्हणजे आठवणी बुजून जातात; पण येथील लोकांच्या मनातील श्रीस्वामीमहाराजांच्या आठवणी बुजल्या नव्हत्या. गेल्या १३/१४ वर्षांमध्ये श्रीस्वामीमहाराजांच्या कीर्तीचा सौरभ जसा सगळीकडे सतत पसरत होता तसा तो येथेही आला होता. त्यामुळे श्रीस्वामीमहाराज येथे येणार असे कळल्यावर जुन्या आठवणींना उजाळा देत येथील मंडळी त्यांच्या दर्शनाची उत्सुकतेने प्रतीक्षा करीत होती. श्रीस्वामीमहाराज येथे येताच पूर्व परिचित मंडळी त्यांच्या भोवती जमा झाली. श्रीस्वामीमहाराजांची कीर्ती ऐकून त्यांच्या दर्शनासाठी आलेली मंडळीसुद्धा बरीच होती. या वर्षीचा दशहरा येथेच झाला.

भगवान् श्रीदत्तात्रेयांचे द्वितीय अवतार श्रीमन्नृसिंहसरस्वतीस्वामीमहाराज यांच्या कारंजा या जन्मगावी चातुर्मास करावा या इच्छेने श्रीस्वामीमहाराज गंगाखेडहून निघाले; पण देवांची इच्छा वेगळी होती. श्रीस्वामीमहाराजांचा आत्तापर्यन्तचा संचार देवांच्या आदेशाप्रमाणे झाला होता. त्यांच्या स्वतःच्या इच्छेप्रमाणे झाला नव्हता. भगवान् श्रीरामकृष्ण परमहंसांच्या चरित्रामध्ये आपणास असे दिसते की, त्यांच्या शिष्यांनी एखादी गोष्ट करण्यासाठी श्रीरामकृष्णांना विनंती केली; तर "जशी आईची इच्छा असेल तसे होईल, माझ्या इच्छेने थोडेच काही होणार आहे ?" असे ते उत्तर देत असत. त्यावर शिष्य मंडळी त्यांना असे म्हणत असत की, "महाराज ! आपली इच्छा तीच कालीची इच्छा. आपल्या इच्छेविरुद्ध ती नाही." पण श्रीरामकृष्णांना अनुभवाने ठाऊक होते की, सर्व काही आईच्याच इच्छेने होते. श्रीस्वामीमहाराजांच्या चरित्रामध्ये आपणाला हेच दिसून येते. त्यांना एखादी गोष्ट करावयाची इच्छा झाली आणि देवांच्या मनात वेगळेच असले; तर देवांच्या योजनेप्रमाणेच गोष्टी घडत असत. आपला पंधरावा चातुर्मास कारंजाला करण्याच्या उद्देशाने श्रीस्वामीमहाराज गंगाखेडहून द्वादश ज्योतिर्लिंगांपैकी श्रीक्षेत्र परळी वैजनाथाचे दर्शन करून श्रीक्षेत्र माहूरला आले. श्रीक्षेत्र माहूरला येण्याचा त्यांचा हा दुसरा प्रसंग होता. येथे भगवान् श्रीदत्तात्रेय, श्रीरेणुकामाता इत्यादिकांचे दर्शन करून ते औंढ्या नागनाथाच्या दर्शनाला गेले. तेथे नागनाथाचे दर्शन करून श्रीस्वामीमहाराज येवलेमार्गे हिंगोलीला गेले. तेथून कारंजास जाण्याचा त्यांचा बेत होता. रात्री हिंगोली येथे मुक्काम करून दुसऱ्या दिवशी पहाटे उठून त्यांनी आपली नित्यकर्मे उरकली व ते पुढील मार्गाला लागले. रात्री हिंगोलीमध्ये बराच पाऊस पडला होता. पहिल्या पावसाने मुंग्यांची वारुळे

उध्वस्त झाली आणि लक्षावधी मुंग्या रस्त्यावर पसरल्या. आपली व्यवस्था लावण्यासाठी त्या सगळीकडे पसरल्या होत्या. त्यामुळे रस्त्यावरून चालताना जपून चालावे लागे. जलद गतीने चालणाऱ्या श्रीस्वामीमहाराजांची गती या मुंग्यांमुळे कुंठित झाली व दुपारपर्यन्त फक्त पाच मैल प्रवास झाला. त्यामुळे त्यांचा पांगरी या गावी मुक्काम झाला. त्या दिवशी त्यांची भिक्षा तेथेच झाली. दुसऱ्या दिवशी पांगरीहून कारंजाला नाही तर प्रयागला तरी जावे असा विचार करून श्रीस्वामीमहाराज निघाले; पण उत्तरेच्या वाटेवर तर फारच मुंग्या होत्या. त्यामुळे पाऊल टाकता येईना. पुढील प्रवास श्रीस्वामी-महाराजांच्या इच्छेप्रमाणे व्हावा हे देवांना रुचले नसावे. ही गोष्ट श्रीस्वामीमहाराजांच्या ध्यानात येताच देवांचे स्मरण करून ज्या दिशेला मुंग्या नसतील त्या दिशेने प्रवास करावयाचा असे त्यांनी ठरविले; कारण तशीच देवांची इच्छा असणार. ज्याप्रमाणे उत्तरेकडे अपार मुंग्या होत्या त्याप्रमाणे पूर्वेकडे आणि दक्षिणेकडेही फार मुंग्या होत्या. राहिली पश्चिम दिशा. पश्चिमेच्या मार्गावर मुंग्या नव्हत्या. आपण पश्चिमेच्या बाजूला जावे अशी देवांची इच्छा दिसते असे म्हणून श्रीस्वामीमहाराजांनी पश्चिमेचा मार्ग धरला. त्यावेळी पाऊस सारखा पडतच होता. त्या तशा पावसाळी वातावरणात हिंगोलीपासून पश्चिमेस बारा मैल दूर नरसी या गावी श्रीस्वामी-महाराज ज्येष्ठ महिन्याच्या वद्य पक्षात येऊन पोहोचले. त्यांचे तेथे येणे अगोदर ठरलेले नव्हते. तसे असते तर शेकडोशे लोक त्यांच्या स्वागतासाठी सामोरे आले असते; पण त्यावेळी त्यांचे आगमन लोकांना कळले नाही. काही वेळाने लोकांना त्यांच्या आगमनाची सुवार्ता कळताच गावकरी श्रीस्वामीमहाराजांपुढे जमा झाले व "श्रीगुरुदेवदत्त" असा घोष करून सर्वांनी त्यांच्या समोर साष्टांग

नमस्कार घातला. "नारायण" पूर्वक सर्वांना आशीर्वाद देऊन श्रीस्वामीमहाराज राहण्यासाठी सोयीस्कर जागेचा तपास करण्यास निघाले. गावातील मंडळींनी त्यांना मंदिरे, श्रीमंतांचे वाडे वगैरे दाखविले; पण त्यांपैकी एकही ठिकाण श्रीस्वामीमहाराजांना पसंत पडले नाही. पुढे एका घरासमोर औदुंबर व अश्वत्थ हे वृक्ष त्यांना दिसले. हे स्थान राहण्यास चांगले आहे असे श्रीस्वामीमहाराजांना वाटले. चौकशी करता ते घर श्री. सीतारामभटजी अष्टेकर या यजुर्वेदी ब्राह्मणाचे असल्याचे कळले. श्री. अष्टेकर मूळचे श्रीगंगा-तीरचे राहणारे होते. काही अडचणींमुळे चारपाच वर्षांपूर्वी ते नरसी-मध्ये येऊन राहिले होते. तेथे आल्यावर त्यांनी कयाधू नदीतीरी श्रीमारुतीच्या मंदिरात तपश्चर्या केली. पुढे त्यांचे लग्न झाले व ते संसार करू लागले. श्री. अष्टेकरांचे घर जरी श्रीस्वामीमहाराजांना राहण्यासाठी पसंत पडले; तरी येथूनही पुढें जावयाची त्यांची इच्छा होती; पण पावसाचा जोर वाढून कयाधू नदीला पूर आला आणि पुढचा मार्ग बंद झाला. आषाढ पौर्णिमेपर्यन्त पूर कमी झाला नाही; तेव्हा पुढील चातुर्मास येथेच करावा असे ठरवून श्रीस्वामी-महाराजांनी आपले आसन श्रीराममंदिरामध्ये ठेवले.

अनन्तकोटी ब्रह्माण्डनायक श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य भगवान् श्रीवासुदेवानन्दसरस्वती श्रीदत्तात्रेयस्वामीमहाराज यांचा अखण्ड जयजयकार असो. श्रीस्वामीमहाराज !! ज्याप्रमाणे आपले अलौकिक परमभक्त, श्रेष्ठतम शिष्य व पूर्वाश्रमातील आपले धाकटे बन्धू श्रीसीतारामहाराज यांनी "सद्गुरु यावें। मम भजनीं सादर व्हावें ॥" असे म्हणून, कामादिक शत्रू, आशा, तृष्णा इत्यादि सर्व दुरिते नाहीशी होऊन आणि दुस्तर असा संसाररूपी अरण्या-तील मार्ग सुकर होऊन आत्मज्ञानप्राप्तीने आपण अमर व्हावे अशी अत्यंत कळकळीने आपल्या चरणी जी प्रार्थना केली आहे, ती

प्रार्थना ऐकून ज्यावेळी आपण आपल्या भक्ताच्या हृदयरूपी सिंहासनावर येऊन आरूढ झालात त्यावेळी भक्तिप्रेमाचे पूर उसळून येऊन " आनंदाचे डोहीं आनंद तरंग। आनंदचि अंग आनंदाचें " अशी संतश्रेष्ठ श्रीतुकाराममहाराज यांनी कथन केल्याप्रमाणे त्यांची स्थिती झाली त्याप्रमाणेच आम्ही हे जे चरित्ररूपाने आपले भजन करीत आहोत त्यालाही आपण उपस्थित राहून सर्व साधकांच्या, भक्तांच्या व वाचकांच्या अंतःकरणात विराजमान होऊन, भक्ति-प्रेमाचे पूर उत्पन्न करून, आम्हा सर्वांचे चित्त आपल्या चरणी रंगून त्वत्स्वरूप व्हावे, याकरिता त्यांच्याच शब्दात आपल्या परमकोमल व परमपवित्रचरणी अत्यंत शरणागतीपूर्वक प्रार्थना करीत आहोत, ती मान्य करून घेऊन आम्हा सर्वांना धन्य व कृतार्थ करावे.

– पद –

सद्गुरु यावें। मम भजनीं सादर व्हावें॥ ध्रृ०॥
तव आगमनें विघ्नें पळती। कामादिक रिपु नष्टचि होती।
आशा तृष्णा मनिं बहु झुरती। कोठें जावें॥ १॥
भवविपिनींचा मार्ग भयंकर। क्षुरधारेपरि म्हणती कविवर।
सद्गुरु येउनि धरितिल जरि कर। अमरचि व्हावें॥ २॥
किति रे माझा अंत पाहसी। मज दीनासी काय मागसी।
विश्वाचा तूं पालक असती। मनिं समजावें॥ ३॥
माझा धांवा हा परिसोनी। दंडकमंडलु करिं घेवोनि।
देशिक आले हो धांवोनी। आसन द्यावें॥ ४॥
हृत्पीठावरि गुरु हे बसले। भजनीं प्रेमाचे पुर आले।
सीतारामीं चित्त रंगलें। सात्त्विक भावें॥ ५॥

उत्तरार्ध – सिद्धखण्ड – क्रमाङ्क १
अर्थात्
खण्ड दुसरा समाप्त.

## ॥ दिगंबरा दिगंबर श्रीपादवल्लभ दिगंबरा ॥

### या महामंत्राचे माहात्म्य

काही द्रष्टया ऋषींना वेदमंत्र दिसले, स्फुरले, जाणवले अथवा त्यांना त्या मंत्रांचा साक्षात्कार झाला आणि त्यांनी त्या वेदमंत्रांचे गायन केले. या मंत्रांच्या रूपाने त्यांना अंतिम सत्याचा साक्षात्कार झाला. त्यामुळे वेदांना शब्दब्रह्म म्हणतात. तसाच प्रकार "दिगंबरा दिगंबरा श्रीपादवल्लभ दिगंबरा" या मंत्राच्या बाबतीमध्ये घडला. ब्रह्मावर्त येथील शके १८२५ च्या चातुर्मासातील मुक्कामात तेथे सुरु झालेल्या प्लेगच्या साथीच्या निवारणार्थ श्रीस्वामीमहाराजांनी लोकांन ाभजनाचे सप्ताह करण्यास सांगून, प्रत्येक सप्ताहासाठी स्वतः भजन तयार करून दिले होते. सात मंत्रांचे सात सप्ताह झाल्यावर "दिगंबरा दिगंबरा श्रीपादवल्लभ दिगंबरा" या मंत्राचा आठवा सप्ताह झाला. त्यानंतर आणखी एक सप्ताह झाला. श्रीस्वामीमहाराजांनी तयार करून दिलेल्या भजनांपैकी, मंत्रांपैकी, "दिगंबरा दिगंबरा श्रीपादवल्लभ दिगंबरा" हा मंत्र लोकांच्या हृदयात आजपर्यन्त कायमचे स्थान करून बसला आहे. श्रीदत्तसंप्रदायाचा तो महामंत्र झाला आहे.

श्रीस्वामीमहाराजांना अनेक वेळा देवांच्या आपल्यावरील असीम कृपेची व अपार प्रेमाची प्रचीती आलेली होती. भगवान् श्रीदत्तात्रेयांचा त्यांना साक्षात्कार झाला होता. देवांच्या निरन्तर सान्निध्याचा त्यांना अनुभव येत होता; पण ईश्वरी साक्षात्काराचा अत्युच्च अनुभव त्यांना आला तो दररोजच्या या दर्शनाहून वेगळाच होता. नामरूपातीत, निर्गुण व निराकार असे सत्य या नेहमीच्या अनुभवान भिन्न होते. भक्तश्रेष्ठ नामदेव आणि पंढरीचा विठोबा यांच्यामधील भक्तिप्रेमाचे संबंधसुद्धा श्रीस्वामीमहाराज आणि भगवान् श्रीदत्तात्रेयांच्या संबंधासारखे दिव्य होते; पण श्रीगुरुकृपेनंतर

श्रीनामदेवांना प्राप्त झालेला परमेश्वराच्या साक्षात्काराचा अत्युच्च अनुभव सगुणरूपाहून वेगळा होता. श्रीनामदेवांशी अंगसंग करणारे ते "विटेवरील सगुण परब्रह्म" आणि नामरूपातीत अंतिम सत्याचा साक्षात्कार हे दोन वेगळे अनुभव होते. "शिवंभूत्वा शिवं यजेत्" अशी ती अनुभूती होती.

श्रीस्वामीमहाराजांच्या साधनेतील परमोच्च अनुभूतीच्या वेळी सहज व उत्स्फूर्त असा "दिगंबरा दिगंबरा श्रीपादवल्लभ दिगंबरा" हा महामंत्र त्यांना स्फुरला व तो त्यांच्या मुखातून बाहेर पडला. त्या अवस्थेमध्ये त्यांना जो शब्दातीत अनुभव आला व जे अपरूप दर्शन त्यांच्या अंतःचक्षूंना झाले ते त्यांनी आपल्या दिव्य प्रतिभेच्या साहाय्याने "दिगंबरा दिगंबरा श्रीपादवल्लभ दिगंबरा" या मंत्रामध्ये शब्दबद्ध व साकार केले. यावेळी देवी सरस्वतीच त्यांच्या जिभेवर अवतरली होती. श्रीस्वामीमहाराज महाकवी होते. रामायण हे आदिकाव्य जसे एका हृदय हेलावून सोडणाऱ्या अनुभूतीनंतर जन्माला आले तसाच हा मंत्रसुद्धा एका दिव्य अनुभूतीनंतर जन्माला आला. साधनेतील त्या परमोच्च अनुभूतीच्या वेळी श्रीस्वामीमहाराजांना भगवान् श्रीदत्तात्रेयांचा निर्गुण साक्षात्काराचा जो अनुभव आला तो त्यांनी या मंत्राद्वारे व्यक्त केला. त्यांना आलेली ती अनुभूती "दिगंबरा दिगंबरा श्रीपादवल्लभ दिगंबरा" या शब्दात त्यांनी गुंफली. हा मंत्र श्रीस्वामीमहाराजांच्या साधनेचे सार आहे.

"दिगंबरा दिगंबरा श्रीपादवल्लभ दिगंबरा" या मंत्रामध्ये एकाक्षरी गणेशमंत्र – गणेशबीज – समाविष्ट आहे. त्याचप्रमाणे काही प्रमाणात अग्निबीजाचाही वापर येथे झाला आहे. या मंत्राच्या जपाने साधकाची देहशुद्धी आणि चित्तशुद्धी होते. त्याचे शरीर कान्तिमान् होते. चित्तशुद्धीमुळे साधनेमध्ये पुढे येणारे दिव्य आध्यात्मिक अनुभव ग्रहण करण्यास साधक समर्थ बनतो. श्रीस्वामीमहाराजांच्या

अखंड साधनेतून हा मंत्र प्रकट झाला आहे. त्यामुळे या मंत्राच्या जपाने साधक श्रीस्वामीमहाराजांना लाभलेल्या त्या दिव्य अनुभूती-पर्यन्त निश्चितच पोहोचू शकतो. हा मंत्र आपल्या संप्रादायाचा महामंत्र आहे, असे परमपूजनीय श्रीगुळवणीमहाराज म्हणत असत या मंत्राचा जप करण्याची एक विशिष्ट लय आहे. साधका-साधकां साठी ती भिन्न असू शकेल. तशी ती सामुदायिक जपासाठीसुद्धा भिन्न आहे. ही लय प्रत्येक साधकाला त्याच्या गुरुदेवांच्या आशीर्वादाने आणि श्रीस्वामीमहाराजांच्या कृपेने प्राप्त होते.



---

## (२) श्रीगोरक्षग्रंथ

१) महायोगी श्रीगोरक्षनाथ विरचित योगबीज — १०-००
२) श्रीगोरक्षगीता — ३-००
३) महायोगी श्रीसिद्धगोरक्षनाथ विरचित अमरौघशासन
( मूळ संस्कृत, मराठी अर्थ व विवरणासह ) — २०-००
४) महायोगी श्रीसिद्धगोरक्षनाथ विरचित अमरौघप्रबोध
( मूळ संस्कृत, मराठी अर्थ व विवरणासह ) — २०-००

## (३) उपनिषद्ग्रंथ

१) अद्वयतारकोपनिषद्
(मूळ संस्कृत, मराठी अर्थ व विवरणासह) — ५-००
२) अमृतबिन्दूपनिषद् अथवा ब्रह्मबिन्दूपनिषद्
(मूळ संस्कृत, मराठी अर्थ व विस्तृत विवरणासह) — १०-००
३) सौभाग्यलक्ष्म्युपनिषद्
(मूळ संस्कृत, मराठी अर्थ व विस्तृत विवरणासह) — १०-००

## (४) ज्ञानेश्वरीग्रंथ

१) ज्ञानेश्वरी : सिद्धयोग दर्शन — १५०-००
२) श्रीनिरंजनरघुनाथस्वामीमहाराज विरचित
ज्ञानेश्वरी : दृष्टान्त परिभाषा टीका — १००-००

## (५) चरित्रग्रंथ

१) स्वामी अवधूत श्रीनिरंजन रघुनाथ ( चरित्र ) — १[illegible]-००
२) श्रीथोरलेस्वामीमहाराज – प. प.
श्रीवासुदेवानंदसरस्वती टेंबेस्वामीमहाराज } ५०-००
३) यांचे चरित्र ( खण्ड पहिला )
,, ( खण्ड दुसरा )

## (६) इतर

१) श्रीश्रीसद्गुरुसंग ( खंड पहिला ) — २०-००
२) गोष्टीरूप वेदान्त ( खण्ड पहिला ) — ३०-००
३) श्रीसत्यदत्तव्रतपूजाकथा — ५-००

## (७) सूत्रग्रंथ

१) शक्तिसूत्रे (मूळ संस्कृत, मराठी अर्थ व विवरणासह) २—००
२) नारद भक्तिसूत्रे (मूळ संस्कृत व मराठी अर्थासह) २—००

## (८) प्रकाशित स्तोत्रग्रंथ

१) नित्यउपासनाक्रम आणि महायोगी सद्गुरु श्रीगुळवणीमहाराज यांच्या विविध आरत्या व प्रार्थना ४—००
२) घोरसंकटनिवारणपूर्वक श्रीदत्तप्रीतिकारकस्तोत्र (मूळ संस्कृत, मराठी अर्थ व विवरणासह) २—००
३) सार्थश्रीदत्तात्रेयकवच (मूळ संस्कृत, मराठी अर्थ व विवरणासह) २—००
४) श्रीदत्तस्तवस्तोत्र (मूळ संस्कृत, मराठी अर्थ व विवरणासह) २—००
५) अपराधक्षमापनस्तुतिस्तोत्र (मूळ संस्कृत, मराठी अर्थ व विवरणासह) ३—००
६) मंत्रात्मक श्लोक (मूळ संस्कृत, मराठी अर्थ व विवरणासह) ३—००
७) चंचलचित्त स्थिर करणारे सार्थ श्रीदत्तस्तोत्र (मूळ संस्कृत, मराठी अर्थ व विवरणासह) २—००
८) श्रीललितापञ्चरत्नस्तोत्र (मूळ संस्कृत व मराठी अर्थासह) १—००
९) देवर्षी श्रीनारद विरचित सार्थ शत्रुनाशकर श्रीदत्तात्रेयस्तोत्र (मूळ संस्कृत व मराठी अर्थासह) १—००
१०) श्रीकुण्डलिनीस्तुतिस्तोत्र (मूळ संस्कृत व सुबोध मराठी भाषांतरासह) २—००
११) प्रज्ञावर्धक, प्रज्ञाकर व सरस्वती स्तोत्रे (मूळ संस्कृत व सुबोध मराठी भाषान्तरासह) २—००
१२) श्रीदत्तभावसुधारसस्तोत्र (मूळ संस्कृत व सुबोध मराठी भाषान्तरासह) ५—००
१३) श्रीविद्यारण्यस्वामी विरचित सद्गुरुप्रार्थना (मूळ संस्कृत व मराठी अर्थासह) २—००

